ग्रंथमाला

मासिकपुस्तकांत छापलेलें प्रकरण.

---

# महाराष्ट्राचा इतिहास.



## पुस्तक १ लें.



---

## अभ्युदय.



लक्ष्मण कृष्ण चिपळुणकर, बी. ए.,

हेडमास्तर हायस्कूल अकोला, यांणीं,

इंग्रजी भाषेंतील इतिहास व मराठी भाषेंतील बखरी यांचे आधारें,

तयार केला तो,

---

विष्णु गोविंद विजापूरकर, एम्. ए.,

ग्रंथमालासंपादक, यांणीं,

कोल्हापूर ' विद्याविलास ' छापखान्यांत छापिला.

---

किंमत रु० २८८.

# अनुक्रमणिका.

# महाराष्ट्राचा इतिहास.

## प्रस्तावना.

---

इतिहासाचे वाचनापासून आपणांस मनोरंजन व बोध हीं दोन्हींही प्राप्त होतात, हें आजमितीला कोणास सांगितलें पाहिजे असें नाहीं. हल्लीं यूरोपांतील सर्व सुधारलेले देशांतून, तेथील ग्रंथकारांनीं देशभाषेंत त्यांचे इतिहास लिहून ठेविले असल्यामुळें, त्यांचे अध्ययनानें तेथील होतकरू प्रजांचे ठिकाणीं, त्यांचे वाडवडिलांनीं जीं शौर्याचीं, शहाणपणाचीं, व चातुर्याचीं यामार्गे कृत्यें केलीं, त्यांजबद्दल योग्य आदर, अभिमान व प्रीति हीं उत्पन्न होतात व त्यांस त्यांचें अनुकरण करण्याची सहजच ईर्षा उत्पन्न होते. आमचे लोकांचे दुर्दैवानें, आमचा इतिहास अद्यापपर्यंत चांगला रचिला न गेल्यानें, सध्यां आमची एकेप्रकारें मोठीच हानि होत आहे. इंग्रजींत ह्मण आहे कीं, " ज्या राष्ट्रास मागील वैभवाचा काल नाहीं, त्यास पुढील वैभवाचा तरी काळ कोठून येणार ? " प्राचीन इतिहासाची ही उणीव, आमचे बंगाली, मद्रासी किंवा गुजराथी देशबंधूंस बरेच अंशीं आहे असें ह्मटल्यास चालणोर आहे; परंतु आह्मां महाराष्ट्रीयांचा असा प्रकार मुळींच नाहीं. ज्या लोकांत शिवाजी महाराज, बाजीरावसाहेब पेशवे, महादजी शिंदे यांचेसारखे योद्धे; बाळाजी विश्वनाथ, रामचंद्रबाबा शेणवी, नाना फडणवीस यांचेसारखे मुत्सदी; शाहूमहाराज, थोरले माधवराव पेशवे, अहिल्याबाई होळकरीण यांचेसारखीं थोर मनाचीं व पवित्र मनुष्यरत्नें; तानाजी मालुसरे, बाजी परभु, प्रल्हाद निराजी यांचेसारखे स्वामिभक्त पुरुष; रामशास्त्री प्रभुणे यांचेसारखे निस्पृह न्यायाधीश; नामदेव, तुकाराम, रामदास यांचेसारखे साधु; काशीनाथोपाध्यायासारखे धर्मशास्त्री; मोरोपंत, रघुनाथपंडित, रामजोशी यांचेसारखे कवि; व्यंकटनरसीसारखे गायक; बखतरामासारखे कारागीर; दयारामासारखे सावकार होऊन गेले, त्यांचा इतिहास, वास्तविक पाहतां दुसरे लोकांचे इतिहासापेक्षां कमी योग्यतेचा

किंवा कमी वैभवाचा मुळींच नाहीं, असें कोणीही इतिहासज्ञ मनुष्य सहज कबूल करील.

आमचे महाराष्ट्रीयांचा इतिहास, आह्मांस व आमचे पुढील प्रजांस प्रोत्साहक आहे एवढेंच नाहीं, तर त्यांत जो एक विशेष आहे, तो इतर राष्ट्रांचे इतिहासांत सांपडावयाचा नाहीं. मराठ्यांचा इतिहास हा रोमन, फ्रेंच किंवा स्प्यानिअर्ड लोकांचे इतिहासांसारखा नाहीं— ह्मणजे सीझर यानें जसें केवळ वीरश्रीचे भरांत कित्येक देशांवर स्वाऱ्या करून हजारों लोकांची कत्तल उडविली व त्यांस पादाक्रांत केलें, किंवा नेपोलियनानें जसा सारा यूरोप विनाकारण तुडविला, किंवा स्पेनचे ख्रिस्ती वीरांनीं अमेरिकेंत घुसून तेथें देशचे देश उध्वस्त केले —तसा आमचे इतिहासाचा प्रकार नाहीं. दुसऱ्यांस बुचाडण्याचे बुद्धीनें जें युद्ध आरंभिलेलें असतें, त्यांत वीरश्रीचा उत्कर्ष कितीही दृष्टीस पडला, तरी सुविचारी व न्यायी मनुष्यास तो तादृश प्रशस्त वाटत नाहीं. मराठे लोकांचे इतिहासाचें कथानक, सभोंवतील लोकांस अन्यायानें बुचाडण्याचें किंवा त्यांस सर करण्याचें मुळींच नसून, उलटें दुसरे लोकांनीं त्यांस फार वेळ पादाक्रांत केलें असतां, ते सुदैवानें त्या कचाटींतून कसे पार पडले व त्यांनीं आपलें राज्य, आपला धर्म, आपल्या विद्या, आपलें कलाकौशल्य व आपला रीतरिवाज यांचें पुनरुज्जीवन कसें केलें, या प्रत्येक न्यायप्रिय मनुष्यास आल्हादप्रद वाटणाऱ्या गोष्टींचें तें *आहे!

तथापि आमचा इतिहास इतक्या पुष्कळ तऱ्हेनें मोठा उत्साहोत्पादक, मनोरंजक व बोधप्रद असतांही, त्याजवर चांगली योग्य ग्रंथरचना अद्याप न झाल्याकारणानें, आमचे लोकांत आमचे पूर्वजांचें शौर्य, धाडस, विलक्षण उद्योग, राज्यकारण, शहाणपण वगैरे पुष्कळ उत्तम गुणांबद्दल योग्य आदर उत्पन्न न होऊन, त्यांचें अनुकरण करण्याविषयीं आह्मांमध्यें ईर्षा उत्पन्न होत नाहीं. आमचा इतिहास

---

* निबंधमाला.

इंग्रजी भाषेंत कित्येक थोर व विद्वान् अशा ग्रंथकारांनीं लिहिला आहे. तो त्यांनीं जागोजाग चांगला शोध करूनच, पुष्कळ माहिती मिळवून, व होतां होईल तोंपर्यंत निःपक्षपातबुद्धि कायम ठेवण्याचा यत्न करून, व कित्येकांनीं तर अशा उद्योगांत हजारों रुपयांची स्वतःस घस लावून घेऊन रचिला आहे; तथापि कोणतेही देशाचा इतिहास, तद्देशीय मनुष्य जितका चांगला, बिनचूक, कळकळीनें, प्रेमपूर्वक व आदरयुक्त असा लिहील, व तो जितका निदान तद्देशीय वाचकांस प्रिय होईल; तितका कोणतेही परदेशीयानें मोठी मेहनत घेऊन व तद्देशीयात्मक बुद्धि धरून लिहिला, तरी तो तेवढा खचितच प्रिय होणार नाहीं हें सहजच ध्यानांत येण्यासारखें आहे. पहा, आजमितीला इंग्लंड देशांत पुष्कळ नामांकित इतिहासकार आहेत, तसेच फ्रान्स देशांतही आहेत; परंतु इंग्लंडचा इतिहास एकादे फ्रेंच ग्रंथकारानें लिहिला व तो इंग्लिश लोकांस प्रिय झाला, किंवा इंग्लिश ग्रंथकारानें फ्रान्स देशाचा इतिहास लिहिला आणि तो फ्रेंच लोकांस पसंत पडला असें कधींही होणार नाहीं. तेव्हां, ज्या त्या देशाचा इतिहास तद्देशीयच उत्तम तऱ्हेनें लिहील व तोच तद्देशीय वाचकांस पसंत पडेल; व आपले पूर्वजांचे पराक्रमांचे वाचनापासून आपणांस त्यांचें अनुकरण करण्याची स्फूर्ति होणें, हा जो इतिहासरचनेचा एक प्रधान उपयोग आहे, तो त्यांस वरील पुस्तकावरूनच अर्थात् होईल हें उघड आहे.

असो; आतां आपण प्रथम इंग्लिश इतिहासकारांनीं या विषयासंबंधानें जें काम केलें आहे त्याकडे वळूं. मराठे लोकांचे इतिहासावर इंग्रजींत मूळारंभींचे ग्रंथ ह्मटले ह्मणजे आर्मे व स्काट वेअरिंग यांचे इतिहास होत; परंतु हे दोन्हींही पेशवाई नष्ट होण्याचे अगोदर रचिले गेले असून, त्यांचे कर्त्यांस जितकी विपुल व विश्वसनीय माहिती मिळावयाला पाहिजे होती, तितकी मिळाली नसल्यामुळें, ते ग्रंथ आतां साधारणपणें अपुरेच असे समजले जातात, व त्यांचा आतां कोणी फारसा आधार ह्मणून घेत नाहींत. यांचे मागून पेशवाई समाप्त

झाल्यावर, जेव्हां सर्व महाराष्ट्र देश इंग्रज सरकारचे ताब्यांत आला, व पेशव्यांचे पुण्यांतील दप्तर, जहागीरदार, इनामदार वगैरे लोकांच्या सनदा, व ठिकठिकाणचे महत्वाचे कागदपत्र, वसुलाचे हिशेब, न्यायाचे फैसले इत्यादि इतिहास लिहिणारांस अत्यंत उपयुक्त अशी सामग्रीही त्यावेळचे कमिशनर मि० एल्फिन्स्टनसाहेब बहादूर यांचे हातीं आली, तेव्हां मराठे लोकांचा इतिहास विशेष विश्वसनीय लिहिण्यास आतां ही चांगली संधि आहे असें मनांत आणून, साहेब मजकुरांनीं हें काम त्यावेळीं क्याप्टन ग्रांट डफ ह्मणून सातारचे महाराजांपाशीं इंग्रज सरकारचे कोणी रेसिडेंट होते त्यांस सांगितलें, व त्यांचे स्वाधीन वरील सर्व दप्तर, कागदपत्र वगैरे केलें. ग्रांट डफसाहेबांचे खुद्द ताब्यांत सातारचें दप्तर असल्यामुळें, त्यांस या कामीं त्याची विशेष मदत झाली. मुंबईस जें सरकारी दप्तर होतें तें, व गोवें सरकारापाशीं या विषया-संबंधानें जे कागदपत्र होते ते, अशीं दोन्हींही डफसाहेबांस वाचावयास मिळालीं. याखेरीज साहेबांनीं जागोजाग मराठी बखरी, फारशी तवारीखी, मराठे व मुसलमान सरदार व जहागीरदार यांचा जुना खानगी पत्रव्यवहार, किल्ले, देवळें, मशिदी व इतर प्रसिद्ध ठिकाणचे लिहिलेले लेख, पोंवाडे, दंतकथा, आख्यायिका या सर्वांचीं भाषांतरें करून घेतलीं व वृद्ध, बहुश्रुत अशा लोकांशीं संभाषण करून, त्यांचे समक्ष ज्या महत्वाच्या गोष्टी घडून आल्या, त्या त्यांचे तोंडून रसभरित अशा ऐकून घेतल्या.

येणेंप्रमाणें मराठे लोकांचे इतिहासाची विपुल सामग्री गोळा करून डफसाहेब अखेर ग्रंथ लिहिण्यास बसले. त्यांनीं हें काम कशा मेह-नतीनें व स्वतःस किती त्रास सोसून संपूर्ण केलें, व त्यापासून त्यांस अखेर कवडीचीही किफायत न होतां, उलट या कामांत त्यांस हजारों रुपयांची बूड मात्र कशी आली, हें त्यांचेच शब्दांनीं—अर्थातच भाषां-तररूपानें—रावबहादूर नीलकंठ जनार्दन कीर्तने यांचे ‘ ग्रांट डफचे बख-रीवरील टीका ’ या नांवाचे निबंधांतून येथें दाखल करितों:—

“ मराठ्यांचें जें अति विलक्षण राज्य व ज्याची हकीकत केवळ

लोकांस बरवर माहीत आहे, त्यासंबंधीं लेख मिळविण्याची ही जी एकच संधि आली, ती जाऊन सर्व लेख हातचे जातील, असें सर टामस मनरो व एल्फिन्स्टनसाहेब यांनीं सुचविलें व त्यावरून मी लेख जमा करूं लागलों. जसजसे मी लेख मिळवीत गेलों, तसतसे ते अपुरते असतांही, पुढें आतां आपणांस कोणत्या लेखांची अपेक्षा आहे हें समजण्याकरितां, ते क्रमवार मला लावावे लागले, आणि मग थोडक्यांत मला महाराष्ट्रदेशाच्या हद्दींत व तसेच सर्व हिंदुस्थानभर हस्तक ठेवणें भाग पडलें. या पुस्तकाचा बहुतेक भाग मीं माझीं इतर कामें सतत बारा किंवा चवदा तास ( हीं कामें कशीं असतात हें आपणांस माहीतच आहे ) करीत असतां लिहिला. पुष्कळ पुडकीं वाचलीं असतांही, ज्यांत विश्वास ठेवण्यासारखी एकही गोष्ट सांपडूं नये, अशा पुष्कळ पुडक्यांतून जे लेख काढले होते, त्यांचें भाषांतर करण्याचे कामीं मला, जे मजबरोबर गृहस्थ होते व ज्यांस मजसारखेंच जबर काम करावें लागे, त्यांनीं मदत केली. त्यांत डब्ल्यू. आर. मारिस यांनीं मुख्यत्वें पुष्कळ मदत केली."

"या पुस्तकांत जें पुष्कळ ठिकाणीं फार दुर्लक्ष करून लिहिलेलें दिसतें, त्याचें कारण असें आहे कीं, त्यावेळेस मला विलक्षण डोकें दुखण्याची व्यथा होती. या व्यथेपासून पुढें मला फारच त्रास झाला. प्रत्येक पांच दिवसांनीं पाळी येऊन ती ६ पासून १६ तासपर्यंत राही; व मला काम करणें तें कपाळास थंड पाण्याची पट्टी बांधून करावें लागे. जसजसें कपाळ दुखणें बंद होई, तसतसें माझे हातून पुष्कळ व उत्कृष्ट काम होई; म्हणून असे प्रसंगीं मी केव्हां केव्हां दुसरे दिवशीं रात्रीपावेतों झोंप न घेतां लिहीत असें. तेव्हां अर्थात्च मला आजारी पडून घरीं ( विलायतेस ) पळावें लागलें. जें हें काम मीं हातीं घेतलें होतें, तें शेवटास नेण्यास मला शक्ति व उत्साह येण्यास बरेच दिवस लागले. सरतेशेवटीं ग्रंथ संपवून तो हस्तलिखित मीं मरेसाहेबांकडे पाठविला. त्यांनीं तो परीक्षेकरितां ज्याकडे पाठविला, त्यानें तो वाचून मान्य केला. पुढें मी अलबर मारली स्ट्रीट या नांवाचे आळींत राहणारा

जसा कांहीं सरदारच असा जो पूर्वोक्त मरेसाहेब त्याचे भेटीस गेलों. त्यानें मला सांगितलें कीं, "जर तुह्मीं आपले ग्रंथाचें नांव बदलाल, तर तो आह्मीं छापूं." मीं ह्मटलें कीं, "हा ग्रंथ मराठ्यांची बखर आहे." तो ह्मणाला, "तें खरें; परंतु मराठ्यांची यत्किंचित् माहिती तरी कोणास आहे?" त्यास मीं उत्तर दिलें, "हें पुस्तक करण्याचें कारण तरी हेंच कीं, मराठ्यांची माहिती लोकांस फारच थोडी आहे!" मरेनें उत्तर केलें, 'ठीक आहे; परंतु माहिती असावी अशी तरी कोणास इच्छा आहे? तुह्मीं या ग्रंथाचें नांव 'मोंगल लोकांचा पाडाव' किंवा 'इंग्रज लोकांचा उत्कर्ष' असें ठेविल्यास तें ठीक होईल; परंतु "मराठ्यांची बखर! छे, हें पुस्तक कोणी विकत घेणार नाहीं." हें जें तो ह्मणाला, तें जरी सत्य आहे असें मला पक्कें वाटत होतें, तरी त्याच्या बोलण्यानें माझी हिंमत खचली नाहीं. * * * पुढें सर जेम्स माकिनटाश यांचे शिफारशीवरून, लांगमन आणि कंपनी या मंडळीनें, आह्मीं पुस्तक छापितों ह्मणून मला पत्र पाठविलें. या मंडळीचा 'रीस' ह्मणून पुस्तकवाल्यांचे कामांत मोठा वाकबगार असा भागीदार होता. त्यानें किती पुस्तकें खपतील याचा अदमास करतांना, हिंदुस्थानचे नांवावर फार थोड्या प्रती घातल्या; हें पाहून मला आश्चर्य वाटलें. त्याचें कारण त्यानें असें सांगितलें कीं, हिंदुस्थानांत लोक ग्रंथ विकत घेत नाहींत, ते वाचतात, परंतु ते पुस्तकें लोकांजवळून मागून घेतात; आणि परदेशीं जातांना हें पुस्तक बरोबर घेण्यास योग्य आहे अशी खात्री होण्यास बरेच दिवस लागतील. मरे जें बोलला तें खरें. कांहीं तरी पूर्वी थोडी माहिती असल्याशिवाय जास्ती माहिती करून घेण्याची इच्छा कोणास होत नाहीं. नफातोट्याचे मालक छापणारे झाले. तो ग्रंथ पूर्ण होऊन छापण्यास व तयार होण्यास २० हजार रुपयांवर खर्च लागला. कोर्ट ऑफ् डायरेक्टर्सच्या सभासदांनीं त्याच्या ४० प्रती घेतल्या. मराठी शब्दसंग्रहाच्या देखील त्यांनीं तितक्याच प्रती घेतल्या असत्या! एकंदरीत ह्मटलें तर हें उदारपणाचें कृत्य झालें; परंतु मी जरी हे खरोखर सरकारास उपयोगी लेख मिळविले, व एक

केवळ स्वकपोलकल्पित व मोठा उपयोगी असा नकाशा रचून दिला, तरी मी हा त्यांस पाठविला, त्याचें त्यांनीं मला पावल्याचें उत्तरसुद्धां दिलें नाहीं. त्यांनीं कधींही मला पुसलें नाहीं व मीही सांगितलें नाहीं, कीं हा जो मी खटाटोप केला, त्यांत मी १७००० रुपयांपेक्षां जास्ती रुपयांस बुडालों. ”

डफसाहेबांचा इतिहास सन १८२६ सालीं छापून तयार झाला. त्याची भाषा सुबोध असून त्यांतील वर्णनशैलीही बरीच चांगली आहे. हा इतिहास समग्र वाचला असतां, त्यांत एक मुख्य विशेष दृष्टीस पडतो, तो हा कीं, मेकाले, मिल्ल इत्यादि कांहीं इंग्लिश इतिहासकारां-प्रमाणें, डफसाहेबांनीं जागोजाग आपले पदरचे तर्क चालवून आपले शहाणपणाचा डौल मारण्याचा विशेषसा यत्न केला नाहीं. जसजशा गोष्टी घडून आल्या, तसतशा त्या बहुतेक निष्पक्षपातबुद्धीनें त्यांनीं कथन केल्या आहेत. जेथें जेथें ह्मणून मराठ्यांचा आणि मुसलमानांचा संबंध आला आहे, तेथें तेथें दोन्ही पक्षांचे लेख साहेबांनीं नीट वाचून, त्यांस जो खरा मजकूर वाटला, तो त्यांनीं लिहिला आहे; व येथें पुढील इतिहासकारांस जास्त छडा लावण्याची त्यांनीं गरजच ठेविली नाहीं. जेथें जेथें मराठे लोकांचा व इंग्रज लोकांचा संबंध पडला आहे, तेथेंसुद्धां साहेबांचे हातून मोठासा पक्षपात झालेला आढळत नाहीं. मात्र साहेबांचे लेखांत आणि मराठी बखरींत कोठें सैन्यांचे संख्येंत, कोठें लढाईंत किती लोक पडले, किती बैल वगैरे भरतीचीं जनावरें हांकून नेलीं, वगैरे गोष्टींत थोडें अंतर दृष्टीस पडतें; तथापि एकंदरींत डफसाहेबांचा इतिहास बहुतेक विश्वसनीयच आहे असें ह्मटल्यास हरकत नाहीं, व त्यांनीं आपले ग्रंथरचनेनें एकंदर पुढील इतिहासकारांचे श्रम पुष्कळ हलके केले, व आह्मां महाराष्ट्रीयांस आमचे पूर्वजांचे इतिहासांचीं साधनें, जीं हल्लींचे राजकीय स्थितींत कोणाही एतद्देशीयास इतकीं विपुल प्राप्त होण्यासारखीं नव्हतीं, तीं आमचे आटोक्यांत आणून दिलीं, याबद्दल आह्मीं त्यांचे खरोखर उपकार स्मरले पाहिजेत.

ग्रांट डफसाहेबांचे इतिहासानंतर, या विषयावर दुसरा इतिहास इंग्रजींत कोणीं लिहिला नाहीं, व यासंबंधानें युरोपियन इतिहासकार त्यांचाच इतिहास मुख्य प्रमाणभूत ह्मणून धरितात. आपले लोकांत वाचनाची अभिरुचि अजून फारशी नसल्यामुळें, डफसाहेबांचे इतिहासाची आमच्यांत फारशी चहा नाहीं; व कित्येकांचा तर कांहीं वर्षांपूर्वी असाही समज होता कीं, साहेबांनीं आपणास वाटेल तसा खराखोटा इतिहास लिहून टाकून, त्यास आधारभूत जे पेशव्यांचे दप्तरचे कागद व इतर लेख ते त्यांनीं सर्व जाळून टाकिले. ही समजूत अर्थातच अडाणी लोकांची, कीं ज्यांनीं डफसाहेबांचा इतिहास वाचला नाहीं त्यांची होय. साहेबमजकुरांनीं तर टीपांतून जागोजाग मराठी बखरा, इंग्रजी इतिहास, फारशी तवारिखी व जुन्या दप्तरचे कागदपत्र यांचे आधारांचा उल्लेख केलेला आहे, व ह्या बखरा कोठून मिळाल्या, त्या हल्लीं कोठें आहेत, त्याचप्रमाणें इतिहासदृष्ट्या त्यांची किती योग्यता आहे, याविषयींही माहिती दिली आहे; तथापि ह्या बखरी दुर्मिळ असून त्यांचा डफसाहेबांचे इतिहासाशीं पडताळा घेण्यास साधन नसल्यामुळें, साहेबांचे इतिहासाचे सत्यतेविषयीं पुष्कळ वर्षें आमचे विद्वान् व शोधक लोकांस संशयच होता; परंतु अखेर १८७८ सालीं काव्येतिहाससंग्रह मासिकपुस्तक सुरू होऊन, त्यांतून जुन्या बखरी जसजशा एकामागून एक प्रसिद्ध होत चालल्या, व लोक त्या डफसाहेबांचे इतिहासाशीं ताडून पाहूं लागले, तसतसें साहेबांचे इतिहासाचें नाणें बहुतेक खरेंच आहे अशी त्यांची खात्री होत चालली!

येणेंप्रमाणें क्यापटन ग्रांट डफसाहेबांचा इतिहास एकंदरींत विश्वसनीय आहे यांत कांहीं संशय नाहीं; तथापि इतकेंही करून आह्मीं वर जें आपलें मत प्रदर्शित केलें आहे कीं—ज्या त्या राष्ट्राचा इतिहास तद्राष्ट्रीयानेंच लिहिला पाहिजे, दुसऱ्यानें तो कितीही खटपट करून व तद्राष्ट्रीयात्मकबुद्धि कायम ठेवण्याचा यत्न करून लिहिला, तरी तो तद्राष्ट्रीय वाचकांस प्रिय होणार नाहीं—तें डफसाहेबांचे ग्रंथासही लागू आहे. साहेबमजकूर निष्प्रांजलबुद्धीचे, ग्रंथरचनेचे कामांत कुशल,

वगैरे त्यांचे गुण खरे; परंतु विषयसहृदयता—ह्मणजे ज्या लोकांचा इतिहास लिहावयाचा, त्यांजविषयीं आदरबुद्धि, प्रीति व अभिमान हीं ग्रंथकारास वाटत असल्यानें, विशेष प्रसंग वर्णन करतांना त्यास जो पान्हा फुटत असतो, व जो केवळ अर्थातच तद्राष्ट्रीय इतिहासकारासच येऊं शकेल, व ज्याच्या योगानें तद्राष्ट्रीय वाचकांच्याच चित्तवृत्ति उचंबळतील—हा प्रधान गुण डफसाहेबांचे इतिहासांत सहजच नाहीं. या गुणविशेषानेंच हिराडटस याचा इतिहास ग्रीक लोकांस व लिव्ही याचा इतिहास रोमन लोकांस इतका प्रिय झाला होता, व ते दोन्ही ग्रंथ आज इतके काळ टिकण्याचेंही कारण तेंच होय. साधारण प्रचारांतही आपण पाहतों कीं, आपला एकादा दिवाणी किंवा फौजदारी खटला बुडालाही असला, आणि त्याची हकीकत आपणांस आपले विरुद्ध पक्षाकडील एकादे साधारण संभावित अशाही मनुष्याकडून कळली, व तीच नंतर आपण एकादे जिवलग मित्राचे तोंडून ऐकिली, तर त्या दोन्हींपासून आपल्या मनोवृत्ती जशा निरनिराळ्या होतील, तशाच डफसाहेबांचे इतिहासाचे वाचनापासून, व यापुढें जर कोणी महाराष्ट्रीय ग्रंथकारानें जो निष्पक्षपात बुद्धीचा तर खरा; परंतु ज्यास आपले लोकांविषयीं योग्य आदरबुद्धि, प्रीति व अभिमान हीं वाटत आहेत, अशानें इंग्रजी इतिहासांचे धर्तीवर आमचे लोकांचा इतिहास लिहिला, तर त्याचे वाचनापासून आपले लोकांच्या भिन्न भिन्न मनोवृत्ती होतील हें उघड आहे. डफसाहेबांनीं ज्या आमचे लोकांचा इतिहास लिहिण्यास हातीं घेतला, त्यांस त्यांचे लोकांनीं नुकतेंच जिंकून टाकिलें होतें, व जिंकणारे राष्ट्राचे ठिकाणीं जिंकलेल्या राष्ट्राविषयीं आदरबुद्धि किंवा प्रीति हीं असत नसतात, त्याप्रमाणें डफसाहेबांचेही ठिकाणीं आमचे लोकांविषयीं तीं थोडींच होतीं. सरासरी सत्यास स्मरून आमचे पूर्वजांचे शौर्याविषयीं, बुद्धिवैभवाविषयीं किंवा इतर गुणांविषयीं जें कांहीं त्यांस लिहावेंसें वाटलें, तें त्यांनीं लिहिलें आहे; परंतु साहेबमजकुरांचे ठिकाणीं आमचे पूर्वजांविषयीं पूज्यभाव, सहृदयता किंवा अभिमान हीं वाटत नसल्याकारणानें त्यांस त्यांचे इतिहासांत वास्तविक जितकी बहार आणतां आली असती,

तितकी तीं अर्थातच आली नाहीं. शिवाजी महाराजांचा राज्याभिषेकविधि ह्मणजे मराठे लोकांचे इतिहासांतील सोनेरी अक्षरानें लिहून ठेवण्यासारखा प्रसंग; परंतु त्याचें डफसाहेबांनीं जें वर्णन केलें आहे, त्यापेक्षां त्याच प्रसंगीं महाराजांनीं इंग्लिश लोकांबरोबर जो प्रथम तह केला, त्याचेंच वर्णन निदान दुपटीनें विस्तृत असें केलें आहे. नारायणराव पेशवे मारले गेल्यानंतर त्यांचा गर्भस्थ पुत्र जो सवाई माधवराव, ज्यास 'सवाई यशवंत नानांनीं केवळ राईचे पर्वत करून वाढविलें' त्याच्या लग्नाचा सोहाळा पुण्यास केवढ्या कौतुकाचा, आनंदाचा, व थाटाचा झाला असेल! पण त्या प्रसंगाचा नुसता उल्लेखसुद्धां डफकृत इतिहासांत नाहीं! वास्तविक चिटणीसकृत बखरींत वरील राज्याभिषेकविधीचे वर्णनपर एक स्वतंत्र भागच आहे, व सवाई माधवरावांचे लग्नसमारंभाचें वर्णन पेशव्यांचे बखरींत पांच सात पानें आहे. डफसाहेबांस लग्नसमारंभ, अभिषेकविधि, वगैरे गोष्टी लहान वाटून त्यांचे वर्णनानें इतिहास उगीच लांबेल असें वाटलें असेल असें जर समजलें, तर मुंबईंत, क्यापटन केनिंग यानें तेथील शिबंदींत उपस्थित केलेलें बंड, लेफ्टेनंट जॉर्ज लॉव्हिबांड यांची हास्यास्पद शिष्टाई, कर्नल हार्टले याचे बढतीचे हक्क कसे मारले गेले, वगैरे मराठ्यांचे इतिहासासंबंधानें खरोखर फार कमी महत्वाच्या गोष्टी, यांचेविषयीं पानांचीं पानें मजकूर साहेबांनीं भरला आहे. तसेंच पहिले सहा पेशव्यांच्या मोठ्या पराक्रमाचा वृत्तांत सुमारें पांचशें पानांत आणिला असून, शेवटले दिग्विजयी राजश्रींचे कारकीर्दीची फटफजीती व त्याचसरशी इंग्रज लोकांची चढती कमान ह्यांची हकीकत तीनशें पानांहून अधिक विस्तृत लिहिली आहे! डफसाहेबांचा इतिहास लिहिण्याचा उद्देश तरी आमचे लोकांचे अभिरुचीस तो पात्र व्हावा, किंवा त्याचे आधारानें पुढें कोणी महाराष्ट्रीय ग्रंथकारानें स्वराष्ट्रीयांचे इतिहासाची एखादी अधिक विस्तृत व शोभिवंत अशी इमारत उभी करावी, असा मुळींच नव्हता. त्यांची सर्व काळजी ही होती कीं, आपला ग्रंथ इंग्लिश लोकांस पसंत होऊन जे कोणी साहेबलोक या देशांत पुढें येत जातील, त्यांस त्याचे वाचनापासून उपयोग व्हावा. याकरितांच ग्रँट डफ यांनीं

साहेब लोकांस उच्चार करण्यास कठिण अशीं आमचे लोकांचीं व स्थलांचीं नांवें जितकीं कमी येतील तितकीं आणण्याचा व आपले लोकांसंबंधीं जितका जास्त मजकूर घालतां येईल तितका घालण्याचा यत्न केला आहे.

येणेंप्रमाणें मराठे लोकांस ज्या कित्येक प्रसंगांचे वर्णनापासून विशेष उल्हास वाटण्यासारखा आहे, त्यांचा डफसाहेबांचे इतिहासांत संक्षेप किंवा मुळींच लोप केला असून, साहेब लोकांचेच संबंधाचा विशेष विस्तार केला असल्यामुळें, त्यांचा इतिहास वाचतांना महाराष्ट्रीय वाचकांचा बराच हिरमोड होतो. शिवाय मधून मधून ‘ मराठे लोकांचा जो उदय झाला, तो मुख्यत्वेंकरून भोंवतालील राज्यांत अव्यवस्था व घोंटाळा हीं होतीं ह्मणून झाला. कोणतीही गोष्ट घोंटाळ्याची करून टाकावी हा बहुतेक त्यांचा उद्देश असे व ह्मणून ते अस्सल कागदपत्र व लेख हे नेहमीं फाडून नाहींसे करीत. पुढें जसजशा त्यांच्या फौजा सर्व देशभर पसरूं लागल्या, तसतसा त्यांचा संबंध अनेक राज्यांशीं पडूं लागून ते चोहोंकडे जो गोंधळ व घोंटाळा पसरवीत चालले, तोच त्यांचे इतिहासरचनेंतही अर्थातच होऊं लागला ’ ‘ बाळाजी विश्वनाथ यांच्या वसुलाच्या पद्धतीचें जें वर स्पष्टीकरण केलें आहे, त्यावरून मराठे सरदारांमध्यें परस्परांचे हिताहिताचे संबंधानें एकजूट कशी उत्पन्न झाली, व त्या पद्धतीमुळें त्यांस मोंगलांचे मुलुखांत वरचेवर कुरापत काढण्यास कसें फावत गेलें, हें सहज ध्यानांत येण्यासारखें आहे. त्याचप्रमाणें मराठे सरदार हे अक्षरशत्रु असल्यामुळें, ते आपले ब्राह्मण कारकुनांचे हातांत यावेत, ह्मणून ही वसुलाची पद्धति तिचे कर्त्यानेंच मुळीं मोठे धूर्तपणानें कशी अवजड व घोंटाळ्याची मुद्दाम केली होती, हेंही वाचकांचे सहज लक्षांत येईल. ’ ‘ वज़ीरास ( खान दौरान यास ) भलतीच भ्रांति होती कीं, आपण कारस्थानाचे कामांत मराठे ब्राह्मणांस मागें सारूं, व ह्मणून पेशव्या ( थोरले बाजीरावसाहेब ) बरोबर लढाई करून त्याची खोड मोडायचा विचार करावयाचा टाकून, तो त्याजबरोबर तहाचें बोलणें लावूं लागला.

× × × तहाचें बोलणें लावण्यांत मराठे लोकांची तऱ्हाच ही कीं, त्यांनीं प्रथमच आपणांस मिळेल त्यापेक्षां अधिक मागणी करावी, व विरुद्ध पक्षानें तीही कबूल केली तरी त्यांनीं लागलीच आपली मागणी चढवावी. तसेंच प्रथम त्यांनीं जो अगदीं गरीबीचा स्वर व लीनता हीं धारण केलीं असतील, तीं त्यांनीं लागलींच टाकून देऊन अगदीं अरेरावपणा व जरबीचें भाषण हीं सुरू करावीं—तीं इतकीं कीं, प्रथम ज्यांनीं त्यांची लीनता पाहिली असेल, त्यांस पुढील प्रकाराची कल्पनाही करतां येऊं नये—' वगैरे जे कित्येक मराठे लोकांस व त्यांतही विशेषेंकरून ब्राह्मण लोकांस टोले दिले आहेत, व ज्यांचें निरसन करणेंही कठिण नाहीं, त्यांचेयोगानें महाराष्ट्रीय वाचकांचीं मनें विरस होतात हें सांगणें नकोच. त्याचप्रमाणें मराठी राज्याचे कमनशिबानें त्याचे वांट्यास अखेर बंदुकीचे बारासही भिणारे असे शूर, ब्रह्महत्याही करण्यास न चुकणारे असे धर्मशील, जुन्या, कर्त्या अशा मुत्सद्यांस काढून, टाकून त्यांचे जागीं हुजरे वगैरे लोकांस आपले कारभारी करणारे असे शहाणे शेवटचे बाजीरावसाहेब हे आल्यानें व त्याचा संबंध एका ज्ञानसंपन्न व बलाढ्य अशा राष्ट्राशीं पडल्यानें तें लयास गेलें असतां, तो दुःखप्रसंग त्यावेळचे कित्येक महाराष्ट्रशाईरांनीं जसा आपले पोंवाड्यांतून मोठा हृदयद्रावक असा वर्णिला आहे, व पेशव्यांचे मराठी बखरींतही तो जसा बराच चणचणीत असा उतरला आहे, तसा त्याविषयीं वरील वृत्तीचा उल्लेख डफसाहेबांचे इतिहासांत अखेरीस अर्थातच नाहीं; परंतु मराठे लोकांवर फार दिवस मुसलमानांनीं अंमल चालवून त्यांचें स्वातंत्र्य, त्यांचा धर्म, त्यांचे रीतरिवाज यांचा ऱ्हास मांडला असतां, कालगतीनें मुसलमानी राज्यें बलहीन होऊं लागतांच मराठे लोक हळू हळू डोकें वर काढूं लागून, ते आपली सत्ता पुनः सर्व देशभर पसरवूं लागले, त्यांनीं आपले धर्माची शुद्धि आरंभिली व आपल्या जुन्या विद्यांचें पुनरुज्जीवन केलें, इत्यादि महाराष्ट्रीय लोकांस व एकंदर न्यायप्रिय मनुष्यांस अत्यंत उल्हासाचा जो प्रसंग, त्याचा तरी निर्देश डफसाहेबांनीं कोठें वरील वृत्तीनें केला नाहीं; उलटें या महत् प्रसंगासंबंधानें साहेबांचे उद्गार अगदीं उलट

वृत्तीचे आहेत, ही खरोखरच मोठी दुःखाची गोष्ट आहे. ते लिहितातः—" ब्राह्मणी राज्य मोडून जाऊन त्याचीं लहान लहान स्वतंत्र राज्यें झालीं. तीं होण्यापूर्वी तें चांगलें बलाढ्य होतें. तेव्हांच जर त्याचा आणि दिल्लीचे मोंगल बादशाहीचा सामना सुरू झाला असता, तर तीं दोन्हींही मुसलमानी राज्यें या देशांत खरोखर अधिक काळ टिकलीं असतीं." वरील उल्लेखांत आणि स्पेन देशांत पंधरावे शतकांत मूर लोकांचें राज्य स्पॅनिश लोकांनीं मोडून टाकून त्यांनीं आपली स्वतंत्रता मिळविली व आपले धर्माची शुद्धि केली, या प्रसंगाचा सर्व युरोपियन व ख्रिस्ती इतिहासकारांनीं जो योग्य गौरव व जयजयकार केला आहे, त्यांत किती अंतर आहे बरें!

वरील एकंदर विवेचनावरून आमचे वाचकांचे ध्यानांत आलेंच असेल कीं, डफसाहेबांचे ठिकाणीं विषयसहृदयता नसल्याकारणानें, त्यांचा इतिहास वाचतांना महाराष्ट्रीय वाचकांचा जागोजाग विरस होऊन तो त्यांस प्रिय असा वाटत नाहीं व अजूनही आमचे लोकांत त्याची फारशी चहा होत नाहीं, याचेंही कारण कांहीं अंशीं हेंच होय. तेव्हां आमचे लोकांस आमचे पूर्वजांचें शौर्य, [illegible]णपण, चातुर्य, विलक्षण उद्योग इत्यादि गोष्टींचा इतिहास वाचून त्यांसही ईर्षा उत्पन्न व्हावी, हा जर हेतु सिद्ध करणें असेल, तर तो सिद्ध होण्याकरितां आह्मांस डफसाहेबांचा इतिहास किंवा त्याचें एखादें नुसतें भाषांतर किंवा कॅप्टन हेनरी यांनीं मराठींत केलेला त्याचा संक्षेप हीं अर्थातच उपयोगीं पडणार नाहींत. आह्मांस या विषयावर स्वतंत्र निराळाच ग्रंथ महाराष्ट्र भाषेत लिहिला पाहिजे. हा उद्योग हातीं घेण्यास तीस चाळीस वर्षांपूर्वी ज्या आपणांस सोई होत्या, त्यापेक्षां हल्लीं पुष्कळ अधिक आहेत. पन्नास वर्षांमागें आमचे लोकांचा इतिहास इंग्रजींतही साहेबांनींच लिहावा, व मराठींतही त्याचा संक्षेप करण्यास कोणी महाराष्ट्रीय ग्रंथकार मिळूं नये, व तेंही काम क्याप्टन केपान यांचेसारख्यांनींच उरकावें, अशी स्थिति आजला खास राहिली नाहीं! शिवाय महाराष्ट्र भाषेसही अलीकडे बरेंच शुद्ध वळण लागून ती सुबोध, गोड

व वाचकांचे मनांत निरनिराळे रस उत्पन्न करण्यास समर्थ अशी झाली आहे. याखेरीज आमच्या लोकांच्या इतिहासाचीं साधनेंही पूर्वीपेक्षां जास्त उपलब्ध झालीं आहेत. असो.

आह्मीं वर सुचविल्याप्रमाणें इंग्रजी ग्रंथांचें भाषांतर न करितां, त्यांचे केवळ आधारानें आमच्या लोकांचा स्वभाषेंत निराळाच स्वतंत्र इतिहास लिहिला पाहिजे, ही गोष्ट यापूर्वीं कित्येक विद्वान् गृहस्थांनीं लोकांचे लक्षांत आणण्याचा यत्न केला होता. यांत पहिला नंबर ह्मटला ह्मणजे रा० ब० नीलकंठ जनार्दन कीर्तने यांचा होय. या गृहस्थांनीं १८६७ सालीं पुण्यास एका सभेपुढें 'ग्रांट डफ यांचे मराठ्यांचे बखरीवरील टीका' ह्मणून एक निबंध वाचून तो पुढें त्यांनीं दोन वेळ छापूनही काढिला. हा निबंध पुष्कळ तऱ्हेनें उपयुक्त असून तो मराठे लोकांचा इतिहास लिहूं इच्छिणारांनीं चांगला विचार करण्यासारखा आहे. यानंतर याच गृहस्थांनीं विविधज्ञानविस्तार मासिकपुस्तकांत 'मराठ्यांचे इतिहासाचीं साधनें' या शिरोलेखाखालीं वरील निबंधाचे योग्यतेचाच एक प्रस्तावनेदाखल निबंध लिहून, मल्हार रामराव चिटणीस यांनीं केलेली छत्रपति शिवाजी महाराजांची उत्तम बखर छापून प्रसिद्ध केली. यापुढें या दिशेनेंच परंतु निराळ्या मार्गानें झालेला मोठा यत्न ह्मटला ह्मणजे काव्येतिहाससंग्रहकर्ते यांचा होय. या मासिकपुस्तकांतील विशेष उपयुक्त जो जुन्या बखरी, पत्रें, यादी वगैरेंचा भाग तो आमचे मित्र रा० सा० काशीनाथ नारायण साने यांनीं हातीं घेतला होता, व तो त्यांनीं फार चोख रीतीनें पार पाडला, हें त्यांस फार भूषणास्पद आहे. ज्या बखरींचे आधारावरून ग्रँट डफ यांनीं आपला इतिहास लिहिला त्या बहुतेक यामार्गेंच काव्येतिहाससंग्रहांतून छापून निघाल्या आहेत, व त्या बरेच लोकांच्या अवलोकनांतही आल्या आहेत.

आमच्या कित्येक वाचकांचा येथें असा प्रश्न निघण्यासारखा आहे कीं, या जुन्या बखरीच आमचे इतिहास नव्हत काय? या आमचेच लोकांनीं बरेच वर्षांपूर्वीं आयत्या मराठी भाषेंत लिहिल्या आहेत, तेव्हां नवीन ग्रंथरचनेची काय जरूर आहे? परंतु ज्यांच्या वाचनांत

इंग्रजींतील ह्यूम, गिबन, मेकॉले, फ्रीमन, पेकी वगैरेंचे इतिहास आले असतील, व आमच्या जुन्या बखरीही आल्या असतील, त्यांचें ह्मणणें सहजच पडेल कीं, आमच्या बखरी या आमचे लोकांचे इतिहासाचीं साधनें होऊं शकतील. त्यांस हल्लींचे समजुतीनें इतिहास ह्मणतां येणार नाहीं. ज्यावेळीं या बखरी लिहिल्या गेल्या, त्यावेळीं महाराष्ट्रभाषेस व्याकरण वगैरेचें मुळींच वळण नसून, ज्यास जसें लिहितां येईल तसेंच तो लिही, व तेंही मोडी लिपींत लिही. यामुळें आमच्या बखरी कित्येक ठिकाणीं बऱ्याच दुर्बोध झाल्या आहेत. त्याचप्रमाणें त्यांतील मजकुराची जुळणीही व्यवस्थित नसून स्थलांचा व कालांचा निर्देश निश्चित नाहीं. तसेंच बखरी लिहिणारांस मुसलमान लोकांनीं फारशी किंवा उर्दु भाषेंत लिहिलेल्या तवारिखी ह्या फारशा पाहण्यास न मिळाल्यामुळें, जेथें जेथें त्या लोकांचे इतिहासाचा संबंध येतो, तेथें तेथें बखरींतून त्याबद्दल माहिती मुळींच नसते, किंवा असली तर ती फार चुकीची असते. यामुळें आमच्या मराठी बखरी एकाच दिशेच्या असून त्या अपूर्ण आहेत. ग्रँट डफ यांचे इतिहासाशीं त्या ताडून पहातां त्यांत कोठें कोठें खंड आहेत, व कोठें कोठें अगीच चुका आहेत हें आपल्या चांगलें लक्षांत येण्यासारखें आहे.

तथापि या बखरींपैकीं तीन चार बऱ्याच चांगल्या योग्यतेच्या आहेत, व त्यांचा ग्रँट डफसाहेबांस चांगला उपयोग झाला, व मराठींत आपले लोकांचा नवीन स्वतंत्र इतिहास लिहावा ह्मणून आह्मीं प्रतिपादन करीत आहों, त्या कामांतही यांचा बराच उपयोग होण्यासारखा आहे. या सर्वांत पहिला नंबर ह्मटला ह्मणजे मल्हार रामराव चिटणीस यांचे बखरीचा होय. हे गृहस्थ सातारचे महाराजांचे चिटणीस असून, त्यांनीं पेशवाई बुडण्याचे अगोदर ह्मणजे १८१०चे सुमारास ही बखर लिहिली. त्यांनीं थोरले शिवाजी महाराजांपासून तों तहत धाकटे शाहू महाराजांचे कारकीर्दीपर्यंत सर्व हकीकत दिली आहे. त्यांचे ताब्यांत महाराजांचें दप्तर असल्यामुळें, बखर लिहितांना त्यांस विशेष सोय होती. डफसाहेबांनीं मराठ्यांचे संबंधानें

मजकूर लिहितांना याच बखरीचा मुख्यत्वेंकरून आधार घेतला आहे. दप्तरांतील लेखांखेरीज चिटणिसांनीं त्यांचे पूर्वीं लिहिलेल्या कृष्णाजी अनंत सभासद वगैरेंच्या बखरी पाहिल्या असाव्या, असें त्यांचे बखरी-वरून दिसतें; परंतु चरित्र किंवा बखर ही लिहिण्याचा त्यांचा हा प्रथमच यत्न असल्याकारणानें, त्यांचें ' श्री शिवछत्रपति महाराज यांचें सप्तप्रकरणात्मक चरित्र ' हें बरेच ठिकाणीं दुर्बोध झालें आहे. त्याच-प्रमाणें शिवाजी महाराजांची उत्पत्ति दाखवितांना युधिष्ठिर राजापासून जो पौराणिक तऱ्हेचा पाल्हाळपर व कंटाळवाणा असा वृत्तांत त्यांनीं पहिले बारा तेरा पानें दिला आहे, त्यानें तर वाचकांची प्रथमदर्शनीं बरीच नाउमेद होते; परंतु या पुढील भाग जसजसा आपण वाचीत जावें, तसतसा तो अधिक बरा वाटूं लागतो, व विशेषेंकरून राजाराम महाराजांचे प्रकरणापासून तर बखरींतील कथाभाग विशेषच मनोवेधक साधला आहे. या बखरीचे संबंधानें डफसाहेबांनीं आपलें मत ह्मणून असें दिलें आहे कीं, चिटणीस यांस महाराजांचे दप्तराची वगैरे चांगली सामग्री होती; परंतु तिचा जितका चांगला उपयोग करून घेतां आला असता, तितका त्यांना करतां आला नाहीं. ज्या बखरीचा डफसाहे-बांचे इतिहासास बराच आधार झाला आहे, तिचे लिहिणाराविषयीं एकही चांगला शब्द न लिहितां, त्यांनीं साहेबी थाटाचा वर जो त्रोटक अभिप्राय झोंकून दिला आहे, तो आह्मांस अगदीं पसंत नाहीं. ज्या-वेळीं आमच्या भाषेस व्याकरण, कोश वगैरे गोष्टींचें अगदीं आर्के नव्हतें, व ज्यावेळेस आमच्या लोकांस इतिहास ह्मणजे काय व तो कसा लिहावा याची कल्पनाही नव्हती, त्यावेळीं मल्हार रामराव यांनीं इतक्या तरी योग्यतेची बखर लिहिली, हें त्यांस खरोखरच श्रेयस्कर आहे असें आमचें मत आहे. डफसाहेबांचें ह्मणणें, कीं मल्हाररावांस दप्तराचे कागदपत्राचा विशेष चांगला उपयोग करितां आला नाहीं; परंतु साहेब मजकुरांचे हातीं पुढें तेंच दप्तर येऊन त्यांनीं मूळ कागद-पत्रांवरून ह्मणून शिवाजी महाराजांचे राज्यव्यवस्थेसंबंधीं जी माहिती पहिले पुस्तकाचे सातवे भागांत दिली आहे, तींत आणि चिटणिसांनीं ' राज्यमर्यादास्थापन ' ह्मणून प्रकरणांत त्याचसंबंधानें जी माहिती

दिली आहे, तींत विशेषसें अंतर नाहीं हें, जो कोणी ते दोन्ही भाग ताडून पाहील, त्यास कळण्यासारखें आहे. तेव्हां वास्तविक पाहतां, मराठ्यांचे इतिहासाची पहिल्यानेंच रचना करणारे जे मल्हार रामराव चिटणीस, त्यांनीं या कामांत प्रथमच चांगला उद्योग करून, डफ वगैरे पुढील इतिहासकारांस सामग्री तयार करून दिली, याबद्दल त्यांचे उपकार आपण स्मरणें हें अगदीं योग्य आहे.

मल्हार रामराव चिटणीस यांचे बखरीचे खालचे योग्यतेची बखर ह्मटली ह्मणजे, कृष्णाजी विनायक सोहोनी यांची 'पेशव्यांची बखर' ही होय. ही चिटणिसांचे बखरीप्रमाणें जुने कागदपत्र पाहून लिहिलेली नाहीं. कृष्णाजीपंतांनीं पेशवाईंतील जुन्या गोष्टी कर्णोपकर्णीं ऐकलेल्या होत्या व स्वतः दृष्टीनें पाहिल्या होत्या,—कारण सवाई माधवराव यांचे कारकीर्दीपासूनचा इतिहास त्यांनीं स्वतः दृष्टीनें पाहून कथित केला आहे असें कोणासही स्पष्टपणें दिसून येणार आहे.—त्यांचे आधारानें ही त्यांनीं तोंडानें सांगितली असून ती कोणी लिहून घेतली आहे. ही अव्वल इंग्रजींत लिहिली गेली असावी असें दिसतें. हींत पहिले तीन पेशव्यांची हकीकत फारच थोडी दिली असून, तीही कालानुक्रमानें मुळींच दिली नाहीं. स्वतः कृष्णाजीपंतास मोठमोठ्याही मोहिमेचे शक माहित नसल्याकारणानें, मागल्या गोष्टी पुढें व पुढल्या मागें अशा त्यांचे बखरींत झाल्या आहेत. त्याचप्रमाणें नानासाहेब पेशव्यांचे कारकीर्दीत, 'टिपूचा मुलूख' बाजीरावसाहेबांचे कारकीर्दींत जनकोजी शिंदे, त्याच पेशव्यांचे कारकीर्दींत 'दमाजी गायकवाड हे दाभाड्याचे चाकरीस राहिले,' भाऊसाहेबांचे मृत्यूनंतर रघुनाथराव दादासाहेबांनीं इराणीवर स्वारी करून त्याचा मोड केला व त्याचा वध करून ते त्याचे मानेचा घोट घेणार इतक्यांत त्यांस रणजितसिंग (?) शीखानें मागें ओढिलें, वगैरे कित्येक विलक्षण व ढोबळ चुका या बखरींत झाल्या आहेत. थोरले माधवराव पेशव्यांचे कारकीर्दीपासूनचा पुढील भाग अधिक बरा आहे. या बखरींतील विशेष गोष्ट ही आहे कीं,

तींत पेशवाईंतील कित्येक ठळक ठळक प्रसंगांचीं ह्मणजे पर्वतीचे रमण्यांतील श्रावणमासचे दक्षिणेचा समारंभ, नारायणराव पेशव्यांचा गारद्यांनीं केलेला भयंकर खून, सवाई माधवराव पेशव्यांचा लग्नसमारंभ, शिंद्यांनीं शिमग्यांत केलेला रंग, खर्ड्याचे लढाईनंतर मराठ्यांचे विजयी फौजेचा पुणें शहरांत थाटामाटाचा झालेला प्रवेश इत्यादि गोष्टींचीं वर्णनें बरींच चांगलीं साधलीं आहेत. याशिवाय मधून मधून ज्या आख्यायिका दिल्या आहेत, त्यांतील कित्येक चांगल्याच खुबीदार आहेत. यायोगानें नवीन इतिहास लिहिणारास त्या वेळची लोकस्थिति व रीतिभाति यांबद्दल चांगलेंच अनुमान करितां येण्यासारखें आहे; तथापि इतिहासदृष्ट्या या बखरीची योग्यता, चिटणिसांचे बखरीपेक्षां कमी लागेल यांत संशय नाहीं.

यापुढें नागपूरकर भोंसले, शिंदे, होळकर, गायकवाड, दाभाडे वगैरे निरनिराळे मराठे सरदारांचे घराण्यांच्या बखरी, त्याचप्रमाणें ‘ भाऊसाहेबांची बखर, ’ ‘ साष्टीची बखर, ’ ‘खर्ड्याचे लढाईची बखर ’ अशा मोठमोठ्या मोहिमांचे वृत्तांत व ‘ नाना फडणवीस ’ यांचें ‘ आत्मचरित्र ’ हीं ऐतिहासिक साधनें आहेत; परंतु यांविषयीं येथें पृथक् पृथक् विवेचन करण्याचें प्रयोजन दिसत नाहीं. त्यांतील फक्त दोन लेख, भाऊसाहेबांची बखर व फडणवीस यांचें आत्मचरित्र, ह्यांविषयीं मात्र दोन शब्द लिहितों. भाऊसाहेबांची बखर ही तींतील भाषेचे संबंधानें, मजकुराचे जुळणीचे संबंधानें व कथाभागाचे सत्यतेचे संबंधानेंही खरोखर प्रशंसनीय आहे. या बखरीप्रमाणेंच या बखर लिहिणारानें जर आमचे लोकांचा सर्व इतिहास लिहिला असता तर आजमितीला याच विषयावर निराळा स्वतंत्र ग्रंथ लिहिण्याची फारशी गरजही राहिली नसती. या बखरीहूनही अधिक लहान, परंतु एका तऱ्हेनें फार अधिक योग्यतेचें असें नाना फडणवीस यांचें अपुरें असें आत्मचरित्र आहे. फडणवीस यांनींच जर हा लेख खरोखर लिहिला असेल तर तो अनेक कारणांनीं आपणांस प्रिय वाटण्यासारखा आहे. आमचे देशांतील फार मोठ्या पुरुषाचे आत्मचरित्राचा हा आमच्या

भाषेतला पहिलाच मासला होय. यांतील भाषा बरीच वजनदार असून लिहिणाराची शैलीही त्यांत चांगली दिसून येते; परंतु आत्मचारित्रकारानें आपलीं स्वतःचीं व्यंगें निर्भीडपणें सांगून, त्यांबद्दल मीमांसाही करण्याचा जो यत्न केला आहे तो प्रकार कांहीं विलक्षणच दिसतो! नानांनीं हें आत्मवृत्त लिहिण्यास आपले अगदीं लहानपणा-पासून आरंभ करून, तें त्यांनीं थोरले माधवराव पेशवे यांचे प्रथमच कारभारांत ते शिरले, येथपर्यंत आणून पोहोंचविलें आहे व तेथेंच तें बंद पडलें आहे. यामुळें वाचकांस खरोखरच मोठी हळहळ वाटते. यापुढें नानांनीं, माधवराव पेशव्यांचे वेळीं कारभार कसा चालविला व याहूनही विशेष महत्वाचा त्यांचा जो कार्यभाग कीं, नारायणराव पेशवे मारले गेल्यानंतर, मराठी राज्यावर अनेक संकटें आलीं असतांही त्यांतून त्यांनीं तें कसें पार पाडिलें, याचा वृत्तांत जर त्यांचेच हातून त्यांचे आत्मचरित्राचे पूर्वभागाप्रमाणें अगदीं निर्भीडपणें लिहिला गेला असता, तर त्याचे योगानें आमचे महाराष्ट्राच्याच काय, परंतु एकंदर जगाच्या ऐतिहासिक ग्रंथांतही खरोखरच मोठी भर पडली असती! असो; इतिहासलेखनाचा उद्योग चालवितांना वर निर्दिष्ट केलेल्या मुख्य मुख्य साधनांचा व इतर दुसऱ्या लहानसहान गोष्टींचाही आपणास कसा उपयोग करून घेतला पाहिजे, ह्याविषयीं आतां आपण विचार करूं.

आपल्या इतिहासास मुख्य आधार, क्याप्टन ग्रँट डफ यांचे ग्रंथाचाच होय. लहानमोठ्या सर्व ऐतिहासिक गोष्टींचें वर्णन, त्यांचे कालांचा व स्थलांचा निर्णय, त्याचप्रमाणें मुसलमान लोकांचे राज्यांतील वसुलाची, न्यायाची व लष्कराची वगैरे हरएक बाबीचे व्यवस्थेसंबंधाची माहिती व त्यांचे संबंधानें सुचणारे विचार, हे सर्व भाग साहेबांचे ग्रंथांतून आपण बहुतेक निमुटपणेंच उतरून घेण्यासारखे आहेत. डफसाहेबांनीं आमचे संबंधाचा बहुतेक मजकूर आमच्या जुन्या बखरींतून घेऊन, त्यांतील गोष्टींचे काल त्यांनीं मुसलमान लोकांचे तवारिखींवरून बसविले आहेत. जेथें जेथें ह्मणून मुसलमान इतिहासकारांनीं आपल्या लोकांची बढाई मिरविण्याचा यत्न केला आहे, तेथें तेथें साहेबांनींच परभारें त्यांचा निकाल लाविला आहे. आतां जेथें आमचे लोकांनीं एकट्याचाच

किंवा आमचे लोकांचा आणि इंग्लिश लोकांचा असा दोघांचा संबंध आला आहे, तेथें साहेबांनीं प्रदर्शित केलेले आपले विचार व मतें हीं आपणांस विशेष काळजीनें व शोधकपणानें पडताळून घेतलीं पाहिजेत व येथें आमचे नवीन इतिहासकारांनीं आपली स्वतःचीच बुद्धि चालविली पाहिजे. त्याचप्रमाणें आह्मीं वर दर्शविल्याप्रमाणें, साहेब मजकुरांचे ठिकाणीं विषयसहृद्यता नसल्याकारणानें, आमचे इतिहासांतील प्रसिद्ध पुरुषांचीं वर्णनें त्यांचे ग्रंथांत जितकीं थोर मनोवृत्ति उत्पन्न करणारीं अशीं वठावीं तितकीं वठलीं नाहींत. तेव्हां या बाबतींत तर आमचे नवीन इसिहासकारांस विशेष महत्वाची कारागिरी बजाविली पाहिजे.

यानंतर, डफसाहेबांचे ग्रंथांत ऐतिहासिक गोष्टींचे कथनासंबंधानें जो बराच एक मोठा दोष आढळतो, तोही आमचे नवीन इतिहासकारांनीं सुधारून घेतला पाहिजे. साहेबांनीं आपले इतिहासांत गोष्टींचा क्रम अर्थातच कालानुरोधानें चालविला आहे; परंतु तो इतका तऱ्हेवाईकपणानें चालविला आहे कीं, एक एक गोष्टीचा सबंध दोन तीन वर्षांची हकीकत न सांगतां, त्यांनीं दोन तीन गोष्टी ज्या एका वर्षीं घडल्या असतील, त्यांचे त्या वर्षांत जेवढे भाग घडून आले असतील तेवढेच ओळीनें सांगून, नंतर पुढील सालांत त्यांचे घडलेले पुढील भाग क्रमानें सांगितले आहेत; व हाच क्रम त्यापुढील सालांतही चालू ठेवला आहे. या त्यांचे तऱ्हेवाईक पद्धतीनें पुष्कळ गोष्टींचें वर्णन तुटक तुटक झालें आहे, व त्यामुळें त्या वाचकांचे लक्षांत सहज न भरून त्यांस त्या इतक्या चटकदारही वाटत नाहींत. हा प्रकार पहिले पुस्तकांत ह्मणजे थोरले बाजीरावसाहेबांचे प्रकरणापर्यंतचे भागांत विशेषेंकरून आढळतो व त्यामुळें, 'माझे इतिहासास कांहीं अंशीं शकावली ( Annals )चें स्वरूप आलें आहे' असें साहेबांनीं प्रस्तावनेंत ह्मटलें आहे. आह्मांस वाटतें कीं, मागें दाखविल्याप्रमाणें डफसाहेबांची प्रकृति पुढें पुढें जशी ती विशेष अस्वस्थ होत गेली तशी ती गेली नसती, व त्यांनीं आपला इतिहास पुनः व्यवस्थित लिहिण्याची मेहनत घेतली असती, तर त्यांत वरील दोष खरोखर राहिला नसता.

तथापि साहेबमजकुरांचे हातून त्यांचे शरीरव्यथेमुळें त्यांनीं हातीं घेतलेले कामांत ' जें पुष्कळ दुर्लक्ष ' झालें, व त्यामुळें त्यांचे ग्रंथांत वर सांगितलेली अव्यवस्था दृष्टीस पडते, तिजकडे आमचे नवीन इतिहासकारांनीं अवश्य लक्ष पुरविलें पाहिजे, व सर्व गोष्टींची हकीकत साहेबांचेच इतिहासांतून नीट जुळवून घेऊन, ती चांगली व्यवस्थित व चटकदार वठेल अशाविषयीं खटपट केली पाहिजे.

ग्रँट डफ यांचे ग्रंथाचे खालोखाल, आमचे इतिहासाचीं साधनें ज्या आमच्या जुन्या बखरी, त्यांजपासून नवीन इतिहासकारांस आतां विशेष उपयोग होण्यासारखा नाहीं. कारण, त्यांतून जो मजकूर घेण्यासारखा होता, तो अगोदरच डफसाहेबांनीं आपले इतिहासांत उतरून घेतला आहे, व तो इतके उत्तम रीतीनें घेतला आहे कीं, डफसाहेबांचा इतिहास व जुन्या बखरी ह्या जो कोणी बारीक रीतीनें ताडून पाहील, त्यास, साहेबमजकुरांनीं आपणांस बखरींतून नवीन असें उचलून घेण्यास फारकरून कांहीं ठेविलें नाहीं असें दिसून येईल, व बखरीसारख्या जुन्या लेखांपासून नवीन इतिहास कसा लिहावा, या गोष्टीचेंही त्यांस बरेंच चांगलें शिक्षण मिळण्यासारखें आहे; तथापि डफसाहेबांनीं, शिवाजी महाराजांचे मनावर त्यांची मातोश्री जिजाबाई हिचे शिक्षणानें व रामदास, तुकाराम वगैरे साधूंचे उपदेशानें जे उत्तम संस्कार झाले त्यांचा कथाभाग, त्याचप्रमाणें मागें सांगितलेले राज्याभिषेकविधि, लग्नसमारंभ, श्रावणमासचे दक्षिणेचा रमणा, पाटीलबोबांचा पुण्यांतील रंग वगैरे कथाभाग जे आपले इतिहासांतून गाळले आहेत, ते नवीन इतिहासकारांनीं आपले ग्रंथांत अवश्य उतरून घ्यावे. हाच प्रकार प्रो० फॉरेस्ट यांचे ' मराठ्यांचेसंबंधाचे कागदपत्रांपैकीं निवडक वेंचे ' ह्याही उपयुक्त पुस्तकाचा होय. ह्यांतून मधून मधून पुष्कळ माहिती काढून घेण्यासारखी आहे.

याशिवाय दुसरीं कांहीं किरकोळ व तुटक अशीं साधनें ह्मटलीं ह्मणजे आमचे महाराष्ट्र शाहीर यांचे पोवाडे, वृद्ध लोकांनीं सांगितलेल्या दंतकथा, अलीकडे कित्येक मासिकपुस्तकांतून किंवा वर्तमानपत्रांतून

कधीं कधीं आपले इतिहासाचे माहितीचे जे स्फुटलेख येतात ते, त्याचप्रमाणें बापटकृत थोरले बाजीरावसाहेबांचें चरित्र, खरेकृत नाना फडणविसांचें चरित्र, नातूकृत महादजींचें चरित्र वगैरे नवीन ग्रंथ हे होत. आमचे जुने पोवाड्यांतील सर्वच मजकूर खरा असून तो घेण्यासारखा आहे असें अर्थातच नाहीं; परंतु त्यांचे मदतीनें आपले इतिहासांतील कित्येक प्रसंगांचीं वर्णनें विशेष बहारदार करतां येतील यांत संशय नाहीं. असाच कांहींसा प्रकार आमचेमधील दंतकथांचाही होय; परंतु नवीन इतिहासकारानें आपण अमुक अमुक गोष्ट कशाचे आधारानें लिहिली आहे, हें स्पष्ट टीपांतून अवश्य लिहिलें पाहिजे. डफसाहेबांचेप्रमाणें ‘ Maratha mss. ’ ( मराठी लेख ) असा मोघम आधार लिहूं नये. तर कोणती बखर—चिटणिसांची किंवा पेशव्यांची किंवा भोसल्यांची—किंवा कोणता पोंवाडा किंवा दंतकथा, किंवा कोणतें मासिकपुस्तक किंवा वर्तमानपत्र, हें सांगितलें पाहिजे. बापटकृत बाजीरावसाहेबांचें चरित्र हें जरी निव्वळ इतिहासास अनुसरून लिहिलें नाहीं, तरी त्यांतून बाजीरावसाहेब पेशवे व श्रीपतराव प्रतिनिधि यांचें वाग्युद्ध वगैरे भाग, जे डफसाहेबांचे इतिहासाचे आधारानें रचिले आहेत, ते खरोखरच चांगले साधले आहेत. हे नवीन इतिहास करणारांस नमुन्यादाखल घेण्यासारखे आहेत. खरेकृत नानाफडणवीस यांचें चरित्र, हें आमचे विद्वान् लोकांनीं इंग्रजी इतिहास व बखरी यांचे आधारानें, महाराष्ट्र भाषेत नवीन इतिहासरचना कशी करावी, याचा साधारण नमुनाच आहे असें ह्मटल्यास चालेल. मात्र यांत कोठें कोठें ‘ या गोष्टीबद्दल आमचेपाशीं मजबूत पुरावा आहे ’ येवढेंच ह्मणून पुराव्याचा लेख किंवा त्याचा आधार हीं मुळींच दिलीं नाहींत, ही गोष्ट चांगले इतिहासकारांचे प्रघाताविरुद्ध आहे, व ती नवीन इतिहासकारांनीं अवश्य टाळावी. याखेरीज निबंधमालेंतील ‘ काव्येतिहाससंग्रह ’, ‘ लोकहितवादी ’, ‘ इतिहास ’, ‘ इंग्रजी भाषा ’ वगैरे निबंधांतून मधून मधून आमचे ऐतिहासिक थोर पुरुषांचेसंबंधानें उन्नत मनोवृत्ति उत्पन्न करणारे जे उद्गार आढळतात, त्यांचाही वरील इतिहास रचणारांस बराच फायदा होण्यासारखा आहे.

येथवर आमचे इतिहासाचीं साधनें कोणतीं आहेत व त्यांचा नवीन इतिहास लिहिण्याचे कामीं कसा उपयोग करून घेतां येईल याविषयीं आह्मीं लिहिलें. आतां या इतिहासांतील भाषेसंबंधानें आपले नवीन ग्रंथकर्त्यांनीं कोणत्या गोष्टी लक्षांत ठेविल्या पाहिजेत याविषयीं दोन शब्द लिहितों. इतिहासांतील भाषा जितकी सोपी, चटकदार व रसाळ असेल, तितकी ग्रंथाची चहा अर्थातच अधिक होणारी आहे. मेकॉले यांनीं आपले इतिहासाचे भाषेचा साधेपणा व सफई यांबद्दल जें ह्मटलें आहे कीं, ' माझे इतिहासांत फारकरून असें एकही वाक्य सांपडणार नाहीं, कीं जें नीट समजण्यास वाचकांस तें पुनः वाचावें लागेल. ' हीच महत्वाची गोष्ट आमचे नवीन इतिहास लिहिणारांनीं खरोखरच लक्षांत ठेविली पाहिजे. त्यांनीं आंतील मजकुराचे सत्यतेबद्दल व त्याचे जुळणीबद्दल जितकें लक्ष पुरविलें पाहिजे, तितकेंच ग्रंथाचे भाषेकडेही पुरविलें पाहिजे. सारांश, आमचे मराठी पांचवे व सहावे इयत्तेतील मुलांस त्यांचा ग्रंथ वाचतां वाचतां सहज कळून, तो त्यांस मनोरंजक वाटेल असा त्यांचा यत्न असला पाहिजे.

येणेप्रमाणें महाराष्ट्राचे इतिहासाचे रचनेबद्दल आमच्या कल्पना आह्मीं येथें निर्दिष्ट केल्या. आतां त्या आमचे हातून कितपत वठल्या, हें पाहणें आमचे सुज्ञ वाचकांकडे आहे.

ग्रंथकर्ता.

# महाराष्ट्राचा इतिहास.

## अभ्युदय.

### भाग १.

### महाराष्ट्राचा स्वातंत्र्यनाश.

१ महाराष्ट्राचे इतिहासाचें महत्व. २ त्याचें मनोरंजक व आल्हादकारक स्वरूप. ३ महंमदी धर्माचा उद्भव व प्रसार. ४ सुलतान महंमद गिझनी व घोरी यांच्या हिंदुस्थानावर स्वाऱ्या. ५ गुलाम वंशाची स्थापना. अल्लाउद्दीन खिलजी याची दक्षिणप्रांतावर स्वारी. ६ त्या वेळची महाराष्ट्र, तेलंगण, कर्नाटक वगैरे प्रांतांची स्थिति. ७ अल्लाउद्दीन, महाराष्ट्राचा राजा रामदेव जाधव याचा पराभव करून पुष्कळ लूट गोळा करून परत जातो. ८ मलिक काफर याची महाराष्ट्रावर स्वारी. रामदेव मांडलिक राजा होतो. ९ काफर याच्या तेलंगण व कर्नाटक या प्रांतावरील स्वाऱ्या. १० काफर महाराष्ट्र देश खालसा करितो. महंमद तघलघ आपली राजधानी देवगड येथें करितो. ११ दक्षिणेंतील बंड. जाफरखान बादशाही फौजेचा पराभव करून सुलतान होतो. ब्राह्मणी राज्याची स्थापना.

१ आपले या देशांत गेले सतरावे व अठरावे शतकांत जी मोठी राज्यक्रांति झाली, ती खरोखर लक्षांत ठेवण्यासारखी आहे. हिचा आपले सध्यांचे स्थितीशीं अगदीं निकट संबंध आहे. कारण, ही जर झाली नसती, तर मुसलमान लोक हल्लीं ज्या स्थितींत आहेत, त्या स्थितींत आपला हिंदु समाज राहिला असता. सध्यां जेथें जेथें मराठीं राज्यें आहेत, तेथें तेथें निजामशाहीप्रमाणें मुसलमान लोकांची राज्यें राहिलीं असतीं. आपण सर्वजण केवळ रयत बनून राहिलों असतों, आणि राज्याधिकाराचा संस्कार कोणासही लागण्याचा संभव नव्हता; परंतु सांप्रत आपले देशांत शिंदे, होळकर, गायकवाड, कोल्हापूरकर वगैरे राजे व त्यांचे हिंदु मुत्सद्दी जे आपल्या दृष्टीस

पडत आहेत, त्याचें कारण, वरील राज्यक्रांतिच होय, तेव्हां आपले लोकांस हा कथाभाग किती महत्वाचा आहे हें सांगितलें पाहिजे असें नाहीं.

२ परंतु हा कथाभाग केवळ महत्वाचा आहे एवढेंच नाहीं, तर तो अत्यंत मनोरंजक व आल्हादकारकही आहे. हिंदुस्थानचे इतिहासांतच काय; परंतु एकंदर जगाचे इतिहासांत हीं याहून अधिक मनोरंजक व आल्हादकारक असा कथाभाग क्वचितच आढळेल. शिकंदर बादशहा, सुलतान महंमद, नेपोलियन बोनापार्ट, तैमुरलंग, नादिरशहा वगैरे इतिहास प्रसिद्ध शूर पुरुषांनीं, दुसऱ्यांचे देशांवर स्वाऱ्या करून तेथील अपार संपत्ति लुटून नेली; प्रांतांचेप्रांत उजाड करून टाकले किंवा तेथें आपला करडा अंमल बसविला, या कथाभागापेक्षां, सर्व हिंदुस्थान देश मुसलमान लोकांचे ताब्यांत जाऊन जुना आर्यधर्म व आर्यविद्या यांचा संहार होण्याचा समय आला असतां, सतरावे शतकांत या देशाचे पश्चिमेस महाराष्ट्रीय लोकांचा उदय होऊन हिंदुस्वराज्य स्थापनकर्ते व हिंदुधर्माचे रक्षणकर्ते जे **शिवाजी** महाराज त्यांनीं मुसलमान लोकांचे विजयाचा प्रचंड लोंढा, जो दिल्ली अटकेपासून निघून दक्षिणेकडे जबरदस्त वाहून येत होता, त्यास अवरोध कसा केला व त्याचे मागें अठरावे शतकांत त्यांचे पंतप्रधान पेशवे यांनीं आपले पराक्रमानें व चातुर्यानें तो पूर्ण आटवून टाकून, त्याचे उलट दक्षिणेकडून उत्तरेकडे विजयाची लाट कशी नेली व खुद्द दिल्लीचे पातशाही तक्त हलविलें व हिंदुधर्म व हिंदुविद्या यांचें पुनरुज्जीवन केलें, हा कथाभाग रसिक व न्यायप्रिय वाचकांस अधिक आल्हादकारक वाटून, कित्येक स्थलविशेषीं ते रोमांचित होऊन आनंदभरांत माना डोलवितात यांत नवल नाहीं!

३ सातवे शतकाचे आरंभीं महंमदी धर्माचा उद्भव होऊन त्याचे संचारानें एशिया खंडाचें पूर्व भागांत आरब, तुर्क, स्यारासिन्स, मोंगल वगैरे ज्या नवीन शूर जाती उत्पन्न झाल्या, त्या लवकरच एशिया, आफ्रिका व यूरोप या तिन्ही खंडांतून आपला धर्म व राज्यसत्ता ह्या

पसरवीत चालल्या. पैगंबरास मरून पुरतीं शंभर वर्षें झालीं नाहींत तोंच, त्यांचा अंमल इराण, आफगाणिस्थान वगैरे देशांत स्थापन होऊन, तो पूर्वेस सिंधुनदापर्यंत पसरला. या पलीकडे जो हिंदुस्थान देश त्याची सुपीकता व विलक्षण संपत्ति यांबद्दल त्याचा प्राचीनकाळापासून नांवलौकिक असल्यामुळें तो सर करण्याकरितां महंमदी लोकांचे अथातच यत्न सुरूं झाले; परंतु सिंधुनदा पलीकडे सिंध व पंजाब या प्रांतांतून तोंडाशींच शूर व कडवे असे रजपूत लोक व त्यांचे मागें मध्य हिंदुस्थानांत चांगलीं बलाढ्य राज्यें असल्यामुळें, मुसलमान लोकांचा या देशांत सुमारें तीनशें वर्षेपर्यंत कायमचा असा अंमलच बसेना;* तथापि तेवढे वेळांत त्यांनीं आपला मोर्चा पश्चिमेकडे फिरवून ईजिप्त, सीरिया व आफ्रिका खंडाचे उत्तरकांठचे सर्व देश हे जिंकले. यानंतर त्यांनीं स्पेन देशांत शिरून तेथें आपला पूर्ण अंमल बसविला व तेथून ते हळूं हळूं गॉल ( फ्रान्स ) देशाचे कांहीं भागांवरही पसरले.

४ येणेंप्रमाणें महंमदी धर्माचा प्रसार करीत व जुन्या पातशाहींचा नाश करीत, मुसलमान लोकांच्या निरनिराळ्या जाती युरोप व आफ्रिका खंडांतून चोहोंकडे पसरत चालल्या असतां, त्यांपैकीं कांहींकांचे, जमीनीकडून किंवा निदान जलमार्गानें तरी हिंदुस्थानांत येऊन मुलूख जिंकावा म्हणून मधून मधून यत्न चाललेच होते; परंतु त्यांत त्यांपैकीं कोणासही म्हणण्यासारखें यश आलें नाहीं. शेवटीं इ० स० १००१ यावर्षी गिझनी येथील सुलतान महंमद यानें पंजाबावर स्वारी करून तेथून बरीच लूट मारून नेली व यानंतर त्यानें वर्ष दोन वर्षांनीं पुनः पुनः अशा हिंदुस्थावर एकंदर सतरा स्वाऱ्या केल्या; व त्यांत अपरंपार संपत्ति गोळा करून ती आपले देशांत नेली. याचे पाठीमागें घोर येथील सुलतान महंमद घोरी, यानेंही हिंदुस्थानावर स्वाऱ्या करण्याचा क्रम चालविला; परंतु गिझनी येथील सुलतानाप्रमाणें तो लूट नेऊनच स्वस्थ बसला नाहीं; त्यानें हा देश जिंकून येथें आपला

---

* Hunter's Brief History of the Indian People.

अंमल बसविण्याचा उद्योग चालविला. त्यानें हळूं हळूं पंजाबापासून बंगाल्यापर्यंत सर्व मुलुख सर करून ठिकठिकाणीं आपले सुभेदार नेमिले व राज्यव्यवस्था सुरूं करण्याचा यत्न केला; परंतु या दोन सुलतानांनीं स्वाऱ्या करून पुष्कळ लूट मारून नेली व देश काबीज केले, ह्मणून जें वर सांगितलें आहे, तें कांहीं स्वल्प आयासानें झालें असें नाहीं. पहिला सुलतान हा सोमनाथ येथील लूट करून परत जात असतां, त्यास वाटेंत असे हाल सोसावे लागलें कीं, त्यांत त्याचें बहुतेक सैन्य नाश पावलें व दुसरे सुलतानाचा ठाणेश्वर येथें पूर्ण पराभव होऊन, त्याच्या दाणादाण झालेल्या फौजेच्या मागें वीस कोसपर्यंत हिंदुंचीं सैन्यें लागलीं होतीं! सारांश, हिंदुस्थानांत मुलुख जिंकतांना किंवा तो जिंकल्यावर आपले ताब्यांत ठेवतांना, मुसलमानी राजांस अव्वलपासून अखेरपर्यंत साधारणपणें कठीणच पडत असे. *

---

* The popular notion that India fell an easy prey to the Musalmans is opposed to the historical facts. Muhammedan rule in India consists of a series of invasions and partial conquests, during eleven centuries, from Usman's raid in 636 to Ahamadshah's tempest of devastation in 1761 A. D. They represent in Indian History the over-flow of the Nomad tribes of Central Asia to the South-east; as the Huns, Turks, and other Tartar tribes disclose in early European annals the West-ward movements from the same great breeding-gronnds of nations. At no time was Islam triumphant throughout all India. Hindu dynasties always ruled over a large area. At the height of the Mahomedan power the Hindu princes paid tribute and sent agents to the imperial court. But even this modified supremacy of Dehli lasted for little over a century (1578–1707), before the end of that brief period the Hindus had again begun the work of reconquest. The native chivalry of Rajaputana was closing in upon Dehli from the south-east; the religious confederation of the Sikhs was growing into a military power on the north-west. The Marathas combined the fighting powers of the lower castes with the statesmanship of the Brahmans and subjected the Mahomedan kingdoms throughout India to tribute.

*Hunter's Brief History of the Indian People*

५ घोर येथील सुलतान महंमद यानें, हिंदुस्थानचा उत्तरभाग सर केला खरा; परंतु तेथील लोक पूर्णपणें पादाक्रांत होऊन गेले नव्हते. त्यांपैकीं गारवर ह्मणून एके शूर व कडवे जातीनें १२०३ या वर्षी पंजाब प्रांतांत शिरून लाहोर शहर घेतलें व तो सर्व प्रांत उध्वस्त केला. पुढें तीन वर्षांनीं सुलतान सिंधु नदीचे कांठीं आपली छावणी करून राहिला असतां, ह्या लोकांनीं नदींतून पार पोहून जाऊन त्याचे छावणींत प्रवेश केला व त्याला ठार मारिलें. (१२०६). या सुलतानामागें हिंदुस्थानांत त्याचे जे कित्येक सरदार होते, त्यांमध्यें दिल्ली येथील सुभेदार कुतुबुद्दीन हा बलिष्ठ होता. त्यानें बाकीच्यांस आपले ताब्यांत आणून, हिंदुस्थानांत प्रथम मुसलमानी राजा असा तोच झाला. हा प्रथम तुर्की गुलाम असून, तो पुढें एवढ्या वैभवास चढला. यावरून त्याचे वंशास गुलामवंश असें इतिहासांत नांव आहे. या गुलामवंशांत तीन चार राजे बरेच पराक्रमी होऊन गेले. हें घराणें मोडून गेल्यावर, त्याचे मागें खिलजी घराण्याचा पहिला राजा जलालुद्दीन हा १२८८ या सालीं दिल्लीचे तक्तावर बसला. याचे कारकीर्दींत नर्मदा नदीपर्यंत उत्तरेकडील सर्व प्रदेश मुसलमान लोकांचे ताब्यांत आला. या बादशहाचा पुतण्या अल्लाउद्दीन खिलजी यानें सन १२९४ सालीं मध्यप्रांतांतून सागर, जबलपूर या शहरांचे वाटेनें येऊन प्रथम दाक्षिणेंत स्वारी केली.

६ यावेळीं दक्षिणेत लहान मोठीं अशीं चार पांच हिंदु राज्यें होतीं. प्रथम देवगड (दौलताबाद) येथें जाधव नांवांचे मराठे राजे राज्य करीत होते. त्यांचें घराणें बरेंच जुनें असून, ते आपणांस यदु-कुळांतील ह्मणून समजत असत. महाराष्ट्रांतील शककर्ता राजा शालिवाहन याचे वंशातीलही ते होते, असा लोकांत साधारणपणें समज आहे; परंतु त्यास इतिहासदृष्ट्या चांगलासा आधार नाहीं. या राजांचा अंमल सर्व महाराष्ट्रावर असून, त्यांनीं बारावे शतकाचे अखेर कर्नाटकांतील चालुक्य राजांचा पाडाव करून, त्यांचें राज्य आपले राज्यांस जोडिलें होतें. त्याचप्रमाणें त्या प्रांतांतील द्वारसमुद्र येथील

बल्लाळ राजांचाही त्यांनीं कित्येक वेळ पराजय केला होता. महाराष्ट्रांतील लोक * शूर, धाडसी व बुद्धिवान् असल्याचा त्यांचा पहिलेपासून नांव लौकिक असे ; परंतु त्यांचा स्वभाव अत्यंत उलाढालीचा असून वतनासंबंधाच्या हक्कासाठीं ते इतके आतुर असत कीं, त्यांनीं नेहमीं एकमेकांशीं झुंजत रहावें. व प्रसंग पडल्यास परराज्यांतील लोकांसमुद्धां मिळून, आपले भांडणाचे पायीं स्वराज्य जरी बुडालें तरी बेहत्तर आहे, अशी त्यांची कांहीं चमत्कारिक चुरस. असे राज्यांत नेहमीं पाळेगार ह्मणजे छोटेखानी स्वतंत्र होऊन बसलेले राजे असत. याशिवाय जहागीरदार, देशमुख, देशपांडे, हे आपापले गांवांस तट, गढ्या वगैरे बांधून मजबूत असल्यामुळें, राजा खबरदार नसला ह्मणजे त्यांनीं सरकारांत वसूल भरण्याची टाळाटाळ करावी. व कधीं कधीं फौजफांटा जमवून त्याशीं युद्धाचाही घाट घालावा. सा-

---

* या काळाचे पूर्वीं ६०० वर्षें ह्मणजे इ० स० ६२९ ह्या वर्षी चीन देशांतील प्रसिद्ध प्रवासी ह्यूएन सिआंग हा हिंदुस्थानांत आला असतां त्यानें त्या वेळचे कित्येक देशांचें जें वर्णन केलें आहे, त्यांत त्यानें महाराष्ट्राविषयीं पुढें दिल्याप्रमाणें मजकूर लिहिला आहे :—

× × If they (People of Mahârâshtra) are going to seek revenge, they first give their enemy warning; then each being armed they attack each other with lances (spears). When one turns to flee, the other pursues him ; but they do not kill a man down (a person who submits). If a general loses a battle, they do not inflict punishment, but present him with a woman's clothes and so he is driven to seek death for himself. The country provides for a band of champions to the number of several hundred. Each time they are about to engage in conflict, they intoxicate themselves with wine, and then one man with lance in hand will meet thousands and challenge them in flight. × ×

× × At the present time Silâditya Mahârâja has conquered the natives from East to West and carried his arms to remote districts, but the people of this country (Mahârâshtra) alone have not submitted to him. × ×

*Buddist records of the Western World, Vol. I.*

रांश, महाराष्ट्रांत राजाचा अंमल विशेष खबरदार नसून, तो जर जहा-गीरदार, देशमुख, वगैरे मंडळीच्या धोरणानें चालला, तरच त्याचें राज्य प्रबळ असे; नाहींतर तें अगदीं अव्यवस्थित व दुबळें असे. अल्लाउद्दीन दक्षिणेंत स्वारी करून आला, तेव्हां देवगडास रामदेव जाधव ह्मणून राजा होता. तो विशेष खबरदार किंवा हुषार असेल असें दिसत नाहीं.

महाराष्ट्राचे आग्नेयेस तेलंगण देशांत, नरपति ह्मणून राजे राज्य करीत होते. त्यांचीं राजधानी वारंगूळ हें शहर होती. हे राजे, बहार प्रांतांतील मागध राजांचे आप्त असून, त्यांचें राज्य साधारण बरेंच मोठें असावें, असें वाटतें.

यानंतर दक्षिणेंतील तिसरें राज्य ह्मटलें ह्मणजे, कर्नाटकचें होय. त्याची राजधानी *द्वारसमुद्र ह्मणून शहर असून, त्याचे संपत्तीविषयीं त्यावेळीं चांगली प्रसिद्धि होती. येथें बल्लाळ ह्मणून राजे राज्य करीत असत. ह्यांचा अंमल, अकरावे शतकांत सर्व कर्नाटक प्रांत, मलबार, द्रविडदेश, व तेलंगणचा कांहीं भाग एवढ्या प्रदेशांवर हो-ता. हे राजे रजपूत जातीचे असून, ते आपणांस यदुकुळांतील ह्म-णून ह्मणवीत असत, व ह्मणून महाराष्ट्रांतील जाधव राजांचे हे दू-रचे तरी आप्त असावेत असें दिसतें. यांचे निशाणावर शार्दूलाचें (वाघाचें) चित्र असें. हे राजे पूर्वीं जैन धर्माचे असून, ते पुढें ११३३ पासून रामानुज पंथाचे झाले होते.

कर्नाटक प्रांताचे दक्षिणेस ह्मणजे द्रविड देशांत, लहान लहान आणखी दोन हिंदु राज्यें होतीं. त्यांपैकीं फार प्राचीन असें पांड्य नांवाचे राजांचें राज्य होतें. यांची राजधानी मादुरा ही होती. दुसरें राज्य चौल राजांचें होय. याची राजधानी कांची (कांजीवरम) येथें होती. हे राजे एक वेळ फार प्रबळ असून, त्यांचें राज्य सर्व द्रविड देश, कर्नाटक प्रांत, तेलंगण, या प्रांतांवर असून तें गोदावरी-

* हें शहर म्हैसूर प्रांताचे उत्तरेस होतें.

पर्यंत पसरलें होतें; परंतु बारावे शतकांत ते अगदीं निर्बळ होऊन त्यांचा अंमल कांची, तंजावर वगैरे शहरांसभोंवतींच काय तो राहिला. या दोन राज्यांखेरीज पश्चिम समुद्रकांठीं मलबार प्रांतांत फार लहान लहान स्वतंत्र संस्थानें होतीं; परंतु त्यांचा महाराष्ट्राचे इतिहासाशीं विशेष संबंध नसल्यामुळें, त्यांची येथें विशेष माहिती आह्मीं देत नाहीं.

७ असो. येणेंप्रमाणें अल्लाउद्दीन खिलजी हा दक्षिणेंत उतरला त्यावेळीं, महाराष्ट्र वगैरे दक्षिणेकडील देशाची *स्थिति होती. अल्लाउद्दीन यानें यापूर्वी मध्यप्रांतांतील भिलसा वगैरे प्रांत काबीज केले असल्यामुळें, त्यास त्याचा चुलता जलालुद्दीन बादशहा यानें, अयोध्या प्रांताची सुभेदारी दिली होती. तेथें त्यानें दक्षिण देशाचे दौलतीबद्दल नांवलौकिक ऐकून त्याजवर स्वारी करण्याचा मोठा धाडसाचा विचार केला. त्यानें आपलेबरोबर फक्त ८००० स्वार घेतले असून, त्यांसह तो मध्य प्रांतांतील मोठमोठीं अरण्यें, विंध्याद्रि पर्वताच्या अवघड वाटा, रानटी गोंड लोकांचे मुलुख, हे ओलांडून देवगडावर चाल करून जाण्यास निघाला. मध्यंतरीं जेथें जेथें बलाढ्य शत्रु आढळेल, तेथें तेथें त्यांस त्यानें अशी थाप द्यावी कीं, माझे चुलत्याशीं माझें पटेनासें झालें, ह्मणून मी राजमहेंद्रीचे राजाचे चाकरीस राहण्यास जात आहें. येणेंप्रमाणें कांहीं शौर्यानें व कांहीं लबाडीनें अल्लाउद्दीनानें एकदांचें देवगड शहर गांठलें. तो तेथें इतका अकस्मात् येऊन पोहोंचला कीं, तेथील राजा रामदेव ह्याची लढाईची मुळींच कांहीं तयारी नव्हती व त्याचा मुलगा व बायको अशीं उभयतां जवळचे एका देवालयास देवदर्शनासाठीं गेलीं होतीं. रामदेवाचें इतकें बेसावधपणानें राहण्याचें कारण असें सांगतात कीं, रजपूत लोकांत, शत्रूंस लढाईची इशारत दिल्याखेरीज त्यांजवर हल्ला करणें गैर आहे, असा समज $ आहे, व अशा प्रकारचे लबाडीचा हा पहिलाच प्रसंग असावा; तथापि शत्रु चालून आला असें पाहून रामदेवानें तसेच तीन चार

---

* एलफिन्स्टन् व मेडोज टेलर यांचे इतिहास.

$ एलफिन्स्टन् साहेबांचा इतिहास.

हजार लोक गोळा करून, तो मुसलमान लोकांचे तोंडावर गेला; परंतु अल्लाउद्दीनाचें सैन्य पुष्कळच अधिक असल्यामुळें, रामदेवाचा पराभव होऊन तो शहराजवळ किल्ला होता त्यांत शिरला. इकडे मुसलमान लोकांनीं शहरांत घुसून तें सर्व लुटून फस्त केलें. अल्लाउद्दीनानें शहरांतील शाहूसावकारांस पकडून आणून, त्यांनीं आपापली छपविलेली दौलत दाखवून द्यावी ह्मणून, त्यांचे फार हालहाल केले. यानंतर त्यानें किल्ल्यास वेढा देऊन अशी अफवा उठवून दिली कीं, दिल्लीचे बादशहानें मजबरोबर ८,००० स्वारांची टोळी देऊन ही आपले फौजेची अघाडी ह्मणून पाठविली आहे व तो स्वतः प्रचंड सैन्य घेऊन मागून येत आहे. रामदेवास ही अफवा खरी वाटली ह्मणून ह्मणा, किंवा किल्ल्यांत धान्याचे पोत्यांऐवजीं मिठाचींच पोतीं घाई घाईनें चुकीनें येऊन पडलीं होतीं, ही गोष्ट त्यास समजली होती ह्मणून ह्मणा, कसेंही असो, त्यानें अल्लाउद्दीनाबरोबर तहाचें बोलणें लावून तो उभयपक्षीं ठरविण्यांतही आला; परंतु इतक्यांत रामदेवाचा मुलगा शंकरदेव, जो शहराबाहेर राहिला होता, त्यानें एक मोठी फौज मोठ्या त्वरेनें गोळा करून आणली. बापानें तह ठरविला असतां व त्यानें तो न मोडण्याविषयीं त्यास सांगून पाठविलें असतांही शंकरदेवानें मुसलमानांचे फौजेवर चाल केली. या लढाईंत हिंदूंची फौज अधिक असल्यामुळें, अल्लाउद्दीनाचे फौजेचा मोड होऊन नाश होण्याचा प्रसंग आला होता; परंतु किल्ल्याकडून कांहीं कुमक येऊं नये ह्मणून जे सुमारें १००० स्वार अल्लाउद्दीनानें तिकडे लढाई जुंपण्याचे पूर्वी ठेविले होते, ते आपले सैन्यास येऊन मिळण्याकरितां मोठी दौड करून एकाएकीं येत असतां, त्यांचा इतका मोठा धुराळा उठला कीं, दिल्लीहून बादशहाची जी मोठी फौज येणार ह्मणून अफवा होती, तीच ही येत आहे असें शंकरदेवाचे सैन्यास वाटलें व तेणेंकरून कांहीं लोक भयानें पळून जाऊं लागले; यामुळें हिंदूंचे सैन्यांत जो एकदां घोंटाळा झाला तो पुनः आवरला नाहीं, व अखेर त्यांचा पूर्ण पराभव झाला.

येणेंप्रमाणें शंकरदेवाचे फौजेची दाणादाण झाल्यावर, अल्लाउद्दीननें किल्ल्यास विशेषच पेंच लाविला व रामदेवाकडून पुनः तहाचें बोलणें

आलें असतां, त्यानें आपल्या पूर्वीच्या अटी अर्थातच अधिक चढविल्या. रामदेवाचेही मनांत असेंच बोलणें लांबवावें, ह्मणजे तितके अवकाशांत सभोंवतालून आपणांस कुमक येऊन पोहोंचेल व मग मुसलमानांची खोड मोडतां येईल अशी आशा होती; परंतु दुर्दैवानें किल्ल्यांतील शिबंदीस पोत्यांची झालेली घालमेल कळून येऊन त्यांनीं अगदीं धीर सोडिला. यामुळें रामदेवाचा नाइलाज होऊन, त्यानें अखेर अल्लाउद्दीन ह्मणेल त्याप्रमाणें तह कबूल केला. त्यास, अल्लाउद्दीनाला पुष्कळ पैसा, जवाहीर व इलिचपूर परगणा हीं द्यावीं लागलीं. यानंतर अल्लाउद्दीन आपण आल्यावाटेनें परत गेलों असतां धोका होईल असें जाणून, तो परत जातांना मध्यप्रांतांतून न जातां, निराळेच मार्गानें माळवा प्रांतांतून हिंदुस्थानांत निघून गेला.

८ या पुढें अल्लाउद्दीन हा आपले चुलत्यास ठार मारून बादशहा झाल्यावर, त्यानें आपला सरदार मलिक काफर याजबरोबर एक लक्ष फौज देऊन महाराष्ट्रावर स्वारी करण्याकरितां पाठविलें. या स्वारीचें कारण असें झालें कीं, रामदेवानें कबूल केलेली खंडणी बादशहाकडे वेळचेवेळीं पोंहचत नसे, व अलीकडे तीन वर्षांत ती मुळींच गेली नव्हती. मलिक काफर हा खानदेशांतील सुलतानपुरावरून देवगडास येऊन पोहोंचला. तेथें येतांक्षणींच त्यानें बहुतेक सर्व महाष्ट्रदेश सर केला व अखेर त्यानें देवगडचे किल्ल्यास वेढा घातला. मुसलमानांचे प्रचंड सैन्यापुढें रामदेवाचें कांहीं चालेनासें होऊन, तो अखेर बादशहाशीं तह करण्यास कबूल झाला. तो बादशहाची भेट घेण्याकरितां काफराबरोबर दिल्लीस गेला. तेथें बादशहानेंही त्याचा मोठा आदर करून, त्यास राजाधिराज हा किताब दिला. त्यास त्याचे तैनातीकरितां गुजराथेंतील नवसरी परगणा नेमून देऊन, त्याचे वाटखर्चास १००० टक्के दिले. येणेंप्रमाणें रामदेव हा दिल्लीचे बादशहाचा मांडलिक राजा बनला ( १३०६ ) व तो यापुढें आपली खंडणी देण्यास कधीं चुकला नाहीं.*

* प्रो० बाळाजी प्रभाकर मोडक यांनीं फारिस्ता वगैर फारसी इतिहासकारांच्या आधारें लिहिलेला, ‘ दक्षिणेंतील मुसलमानी राज्यांचा इतिहास ’.

९ यानंतर १३०९ या सालीं अल्लाउद्दीन बादशहानें, काफर यास पुन: दक्षिणेंत स्वारी करण्यास पाठविलें. हिचा रोख तेलंगणांतील वारंगुळ राजधानीवर होता. याच शहरावर बादशहानें सहा वर्षांपूर्वी बंगाल प्रांतांतून एक फौज पाठविली होती; परंतु तीस तेलंगणचे राजानें दाद दिली नव्हती. यावेळीं काफर यानें प्रथम देवगडास येऊन मुक्काम केला. तेथें रामदेवानें त्याचे सैन्याची चांगलेप्रकारें बरदास्त ठेविली. नंतर येथून काफर यानें तेलंगणावर चालून जाऊन, तो बहुतेक लुटून घेतला व तेथील राजाचा पराभव करून त्याचा वारंगुळचा मोठा मजबूत किल्ला काबीज केला; परंतु यानंतर राजा काफरास शरण आल्यावरून, त्यानें त्याजपासून पुष्कळ पैसा घेऊन, व बादशाहास दरसाल मी खंडणी पोहोंचवीत जाईन असें कबूल करवून घेऊन, तो माघारा दिल्लीस गेला ( १३०९ ). याचे पुढील वर्षी काफरानें पुन: दक्षिणेंत फौज घेऊन, कर्नाटकचा राजा बल्लाळ यांजवर स्वारी केली. या खेपेसही काफरानें देवगडास मुक्काम केला; परंतु यावेळीं तेथील राजा रामदेव हा मरण पावला असून, त्याचा मुलगा शंकरदेव यानें त्याच्या सैन्याच्या दाणावैरणीची नीट व्यवस्था केली नाहीं. यामुळें, काफरानें आपल्या फौजेचा एक कंपू पैठणास ठेवून तो पुढें कर्नाटकाकडे गेला. त्यानें तो सर्व प्रांत जिंकून त्याची राजधानी द्वारसमुद्र ही लुटून घेतली, ( १३१० ) या मोहिमेंत मुसलमान लोकांस, ३१२ हत्ती, २०००० घोडे व ९६,००० मण सोनें मिळालें, असें फेरिस्ता लिहितो ※.

१० शंकरदेवाकडून वेळच्यावेळीं बादशाहास खंडणी पोहोंचत नाहींशी झाल्याकारणानें, त्यानें, त्याजवर काफर यास फौज देऊन पाठविलें. ही त्याची दक्षिणेंतील चवथी स्वारी होय. यावेळीं मुसलमानांनीं ढबळापासून रायचूरपर्यंत सर्व मुलूख लुटून फस्त केला, शंकरदेवास ठार केलें व त्याचें राज्य खालसा करून देवगड येथें त्यांनीं दक्षिणेंतील आपलें मुख्य ठाणें केलें. ( १३१२ ).

※ प्रो० बाळाजी प्रभाकर मोडक यांचा इतिहास.

वर लिहिल्याप्रमाणें, महाराष्ट्राचे स्वातंत्र्याचा नाश होऊन, तो दिल्लीचे बादशाहींत सामील झाला; परंतु यानंतर लवकरच अल्लाउद्दीन बादशहास बरें वाटेनासें होऊन, त्याच्यानें राज्यकारभार पाहवेनासा झाला. तो बहुतेक काफर याचेच तंत्रानें चालूं लागल्यामुळें, इतर बडे लोकांस त्याजविषयीं मत्सर व द्वेष हे वाटूं लागले. राज्यांत चोहोंकडे घोंटाळा उत्पन्न झाला व ठिकठिकाणीं बंडें उपस्थित झालीं. दक्षिणेंत रामदेवाचा जावई हरपाळदेव यानें मोठा दंगा करून, महाराष्ट्रांतील सर्व ठाण्यांतून मुसलमान शिबंदी हांकून लाविली. फक्त देवगडचें ठाणें मात्र मुसलमानलोकांकडे राहिलें व त्यासही हिंदूंनीं वेढा घातला. यापुढें, अल्लाउद्दीन हा मरण पावून त्याचे मागें त्याचे राज्यांत कांहीं वेळ अधिकच घोंटाळा झाल्यामुळें, महाराष्ट्राकडे दिल्लीहून फौज रवाना झालीच नाहीं. शेवटीं दोन वर्षांनीं त्याचा तिसरा मुलगा मुबारक हा बादशहा होऊन, त्यानें महाराष्ट्रांवर मोठ्या फौजेनिशीं स्वारी केली. मुसलमान लोकांनीं पुनः सर्व देश जिंकला व हरपाळदेवास मोठे हाल हाल करून ठार मारिलें. ( १३१८ ).

मुबारक बादशाहाचे मागून दिल्लीचे तक्तावर, तघलख घराण्यांतील पहिला बादशहा ग्यासुद्दीन तघलख हा बसला. त्याचेवेळीं दक्षिणेंत पुनः बंड होऊन तेलंगण देशाचे राजानें बराच जोर धरिला. यामुळें, बादशहानें आपला वडील मुलगा युनाखान, जो पुढें महंमद तघलख ह्मणून त्याचे मागून गादीवर बसला, त्यास बरोबर मोठी फौज देऊन दक्षिणेकडे रवाना केलें. युनाखान यानें वारंगुळास वेढा घालून तें घेण्याची पराकाष्ठा केली; परंतु तें त्याचे हातीं येईना. शेवटीं त्यास प्रथम देवगडाकडे व अखेर दिल्लीकडे फौजेनिशीं परत जावें लागलें. या मोहिमेंत त्याचे पुष्कळ लोक मरण पावून, फक्त ३००० स्वार राजधानीस परत आले असें लिहिलें आहे*. यानंतर राजपुत्र युनाखान यानें पुनः तेलंगणावर स्वारी करून वारंगूळ हें शहर घेतलें, आणि तेथील राजास कैद करून दिल्लीस नेलें. ( १३२३ ).

* एलफिन्स्टन साहेबांचा इतिहास.

यापुढें दोन वर्षांनीं युनाखान हा स्वतःच बादशहा झाला. तो
ठा शूर असून विद्वान्ही होता; परंतु त्याचा स्वभाव मोठा क्रूर,
हरी, अचाट कृत्यांस सहज प्रवृत्त होणारा, व कांहींअंशीं वेड-
ळ असा होता. यामुळें त्याचे राज्यांत बंदोबस्त न राहून, वा-
वार मोठमोठीं बंडें उपस्थित होत. याशिवाय वायव्येकडून त्याच्या
ज्यावर मोंगल लोकांच्या एकसारख्या स्वाऱ्या चालल्याच
ल्या. या लोकांचे एका प्रचंड टोळीनें, सिंधु नदी उतरून
द्द दिल्लीपर्यंत चाल केली, व मग बादशहास, त्यांस पुष्कळ खंडणी
ऊन परत लावावें लागलें. खजीन्यांत पैशाची अगदीं टंचाई हो-
न गेली. ती भरून काढण्याकरितां ह्मणून महंमद तवलख यानें,
ीन देशावर स्वारी पाठवून दिली; परंतु ही मोहीम अगदीं फसून
ाऊन, त्याचें सर्व सैन्य हिमालयाचे पाहडांत मरण पावलें. या-
तर त्यानें, रुप्याचे नाण्याऐवजीं तांब्याचे तुकडे चालवेत, अशीही
ुक्ति करून पाहिली, तीही फसली; परंतु या सर्वांहून अतिशय
डेपणाचें व क्रूरपणाचें त्याचें कृत्य ह्मटलें ह्मणजे, दिल्ली येथून
ाजधानी बदलून ती देवगडास आणावयाची, व दिल्लीचे सर्व लोकांस
ं शहर ओस पाडून नवीन राजधानीचें शहरास हाकून नेण्याचा
याचा जुलूम होय! या त्याचे शेवटचे कृत्यानें तर, त्याचे राज्यास
्हासच लागला.

११ सन १३४४ यावर्षीं गुजराथेंत कांहीं सरदारांनीं बंड उप-
स्थित केलें, तें बादशहानें कांहीं वेळानें मोडिलें; परंतु त्यांतील
कांहींजण गुजराथेंतून पळून जाऊन, दक्षिणेंत येऊन राहिले. तेथें
*दौलताबाद येथील सुभेदार कुतुलखखान यानें त्यांस आश्रय दिला;
त्याचे मनांतील हेतु असा होता कीं, कांहीं वेळानें ' बादशहाचा राग
शांत झाला ह्मणजे तो त्यांस क्षमा करील; परंतु बंडखोर सरदारांस,
सुभेदारानें आश्रय दिला हें बादशहास समजतांच, त्यास त्याचा मोठा

* देवगड ही जेव्हां महंमद तघलघ यानें आपली राजधानी केली तेव्हां
तिचें नांव बदलून दौलताबाद असें तिचें नवीन नांव ठेविलें.

राग आला. त्याजवर त्याची मोठी गैरमर्जी होऊन, त्यानें त्यास कामावरून दूर केलें, व बंडखोर सरदार जर मजकडे येतील, तर मी त्यांस क्षमा करीन, अशी त्यांस आशा लावून, आपणांकडे गुजराथेंत घेऊन येण्यास त्यानें माणसें पाठविलीं. सरदारांसही प्रथम बादशहाचे कपटाचा संशय न येऊन, ते गुजराथेकडे चालले; परंतु त्या प्रांताचे सरहद्दीवर जाऊन पोहोंचल्यावर, आपणांस दगा करण्याचा बादशहाचा बेत खास दिसतो असें त्यांस वाटल्यावरून, त्यांनीं आपले पाहारेकऱ्यांस ठार केलें, व बंडाचें निशाण उभें करून, ते त्वरेनें दौलताबादेकडे परत आले.

इतक्यांत बादशहाचे जुलमास त्रासलेले असे जे कित्येक हिंदु राजे, जहागीरदार, देशमुख वगैरे लोक होते, तेही बंडवाल्यांस जाऊन मिळाले व थोडेच वेळांत त्यांचे फौजेचा एवढा मोठा जमाव झाला कीं, दौलताबादचे किल्ल्यांतील शिबंदीसही धैर्य येऊन, त्यांनीं आपले नवीन सुभेदारास कैद करून, किल्ला बंडवाल्यांचे स्वाधीन केला. येथपर्यंत प्रकार बरा झाला; परंतु या पुढें व्यवस्था नीट राहण्याकरितां, कोणास तरी मुख्य अधिकार देणें जरूर आहे असें पाहून, बंडवाले सरदारांनीं आपापसांत विचार ठरविला व इसमाएल म्हणून एक हजार घोडेस्वारांचा कोणी त्यांपैकीं सरदार असून, त्याचा भाऊ मलिक मूग म्हणून माळव्यांतील बादशहाचे सैन्यावर अधिकारी होता, त्यास त्यांनीं आपला राजा केलें. अर्थातच ही निवडणूक करतांना बंडवाल्यांस अशी आशा होती कीं, प्रसंगीं मलिक मूग हा आपणांस येऊन मिळेल. राजा होतांच इसमाएल यानें आपणांस नासिरुद्दीन असें नवीन नांव घेतलें.

दक्षिणेंत हें जें नवीन बंड उत्पन्न झालें, त्याची खबर महंमद तघलख बादशहास कळतांच, तो लागलाच गुजराथेंतून मोठी फौज घेऊन तें मोडण्यास निघाला. त्याची आणि बंडवाल्यांची दौलताबादेजवळ मोठी निकराची लढाई झाली. तींत कोणतेही पक्षाची विशेष सरशी झाली

नाहीं ; तथापि बंडवाले हे समरांगण सोडून निघून गेले व बादशाही फौजही तेथेंच तळावर राहिली. बंडवाल्यांस लढाईचे अगोदर आपले पक्षाची कांहीं तरी सरशी होईल अशी उमेद असून, त्याप्रमाणें घडून आलें नाहीं असें पाहून, त्यांनीं यापुढें लढाई चालविण्याची आपली पद्धत बदलण्याचा विचार केला. त्यांनीं असें ठरविलें कीं, नासिरुद्दीन यानें दौलताबादेचे किल्ल्यांत राहून, तो बादशहाशीं लढवावा व बाकीचे सरदारांनीं निरनिराळे प्रांतांत निघून जाऊन, शत्रूशीं मैदानांत मोठ्या जमावानिशीं न लढतां, लहान लहान टोळ्यांनिशीं त्यांस दाणावैरण वगैरे पोहोंचूं देऊं नये. ते गैरसावध असले ह्मणजे त्यांजवर एकाएकीं हल्ला करून त्यांस ठार करावें किंवा लुटावें; परंतु त्यांचा मोठा जमाव चालून आला तर लागलेंच डोंगरांतून वगैरे अवघड ठिकाणीं पळून जावें ; अशा तऱ्हेची लपंडावाची लढाई चालवावी, ह्मणजे बादशाही फौज त्यामुळें अगदीं जेरीस येईल.

बंडवाल्यांचा हा बेत महंमद तघलख बादशहाचे लवकरच ध्यानांत येऊन, त्यानें ताबडतोब दौलताबादचे किल्ल्यास वेढा घातला व आपला जांवई इमाद उल्मुल्क तेब्रीज याजबरोबर एक मोठी फौज देऊन, त्यास त्या सर्व बंडखोर सरदारांत जाफरखान ह्मणून जो एक हुषार व प्रमुख असा सरदार होता, त्याचे पाठीस प्रथम लाविलें. किल्ल्याचे वेढ्याचें काम बादशहानें स्वतः मोठे झपाट्यानें व दक्षतेनें चालविलें व यामुळें नासिरुद्दीनाचे आंतील शिबंदीची अन्नसामुग्री संपून जाऊन, त्यांचे फार हाल होऊं लागले. इतक्यांत त्यांचे सुदैवानें दिल्लीकडे मोठें बंड उठण्याची बातमी बादशहास लागल्यामुळें, वेढ्याचें काम कांहीं अधिकाऱ्यांवर टाकून, तो उत्तर हिंदुस्थानांत मोठे त्वरेनें निघून गेला. बादशहा निघून गेला ही बातमी पसरतांच, दक्षिणेंतील सर्व भागांतून बंडवाल्यांस अनुकूळ असलेले लोक चोहोंकडून गोळा होऊं लागले. व त्यांनीं दौलताबादेचे किल्ल्यास वेढा घालून राहिलेले बादशाही सैन्यास असा कांहीं त्रास दिला कीं, तें सैन्य लवकरच भय पावून किल्ल्याचा वेढा उठवून नर्मदेकडे परत कूच करून निघून गेलें. तें परत जात

असतांना, दक्षिणी लोकांनीं त्यांचे पाठीवर सतत राहून त्यांचा बराच नाश केला.

दौलताबादेकडे झालेलें वर्तमान जेव्हां जाफरखान यास कळलें, तेव्हां त्यानें बादशाही फौजेस चुकवून जाण्याचा क्रम सोडून देऊन तो आतां तिजबरोबर टक्कर देण्यास तयार झाला. त्याजरोबर २०,००० फौज जमा झाली होती. इमाद उलमुल्कानेंही झालेलें स्थित्यंतर लक्षांत आणून, तो बेदर येथें आपली मोठी छावणी करून राहिला परंतु बादशाही फौजेपुढें पळून न जातां, जाफरखान हा आत तिजबरोबर सामना करण्यास तयार झाला आहे, एवढ्याच गोष्टी बंडवाल्याचे पक्षास दिवसेंदिवस अधिकाधिक बळकटी येत चालली ज्या लोकांचीं मनें इतकावेळपर्यंत डळमळीत होतीं, तीं त्यांचीं आत दृढ होऊन ते उघडपणें जाफरखानाचे फौजेंत येऊन मिळूं लागले तेलंगणचे राजाचा १५,००० घोडा जो बादशाही फौजेंत होता, त्या जाफरखानानें मोठे युक्तीनें आपले लष्करांत ओढिलें व याच सुमारा दौलताबादेकडून ५००० लोकांची टोळीही त्यास येऊन मिळाल यामुळें त्यास विशेष जोर येऊन त्यानें इमाद उलमुल्काचे फौजे एकदम हल्ला केला. दोहों सैन्यांचें मोठें तुंबळ युद्ध होऊन, त्य इमाद उलमुल्क हा पडला व बादशाही फौजेचा अगदीं मोड झाल जय प्राप्त होतांच, जाफरखानानें आपले सैन्याच्या निरनिराळ्या टोळ्य सभोंवतालील मुलुख काबीज करण्याकरितां रवाना केल्या व आप स्वतः बाकी राहिलेले सर्व सैन्यासह दौलताबादेकडे कूच करु चालला. तेथें तो येऊन पोहोंचला असें पाहून, नासिरुद्दीन हा त्या सत्कार करण्याकरितां किल्ल्याबाहेर पडून त्यास सामोरा गेला मोठ्या समारंभानें त्यास किल्ल्यांत घेऊन आला. यानंतर नासिरुद्द यानें पाहिलें कीं, जाफरखानासारख्या शूर व हुषार सरदारापुढें आ तेज पडणार नाहीं व सर्व फौजेचें व लोकांचें लक्ष त्याजकडे अ तेव्हां त्यासच मुकाट्यानें राज्यासनावर आपण बसवून, स्वतः त्य दरबारांत फक्त उमराव होऊन बसावें, यांतच आपला निभाव अ

म्हणून त्यानें सर्व सरदार लोकांस बोलावून आणून त्यांस तो ह्मणाला, ' माझें आतां वय फार झालें आहे. माझ्यानें राज्यकारभाराचे कष्ट होत नाहींत; तेव्हां जाफरखान यांस हें राज्यपद द्यावें हें ठीक आहे. तोच तें नीट रक्षण करील व सर्व रयतेचा सांभाळ करील. " नासिरुद्दीनाचें हें भाषण, त्यानें अटकळ केल्याप्रमाणें सर्व सरदारांस मान्य झालें व त्याप्रमाणें ता० १२ आगष्ट सन १३४७ या दिवशीं, जाफरखान हा सुलतान झाला. त्यानें आपणास, अल्लाउद्दीन हसन कांगोब्राह्मणी, असें नांव धारण करून, आपल्या नांवानें नाणीं पाडण्यास व आपल्या नांवानें खुतबा वाचविण्यास प्रारंभ केला. त्यानें आपली राजधानी कलबुर्गें शहर केली. ह्या सुलतानाचे राज्यास, त्याचे नांवास शेवटीं जोडलेले शब्दावरून, ब्राह्मणीराज्य, असें ह्मणतात.

येणेंप्रमाणें महाराष्ट्राचा स्वातंत्र्यनाश होऊन, तो मुसलमान लोकांचे ताब्यांत गेला, तो या परतंत्र स्थितींत सुमारें तीनशें वर्षें राहिला. या काळांत त्याजवर जे प्रथम ब्राह्मणीवंशाचे सुलतान होऊन गेले, त्यांची हकीकत पुढील भागांत दिली आहे.

---

# भाग २.

## ब्राह्मणीराज्य.

१ महाराष्ट्राच अभ्युदयाचा इतिहास बरोबर समजण्यास ब्राह्मणीराज्य, व तें मोडून गेल्यावर त्याजपासून जीं पांच स्वतंत्र राज्यें झालीं, त्यांचे इतिहासाचे ज्ञानाची आवश्यकता. २ अल्लाउद्दीनशहा कांगो ब्राह्मणी याची पूर्वीची हकीगत. त्याचे राज्यकारभाराची शैली. ३ त्याचे मृत्यूनंतर त्याचा मुलगा महंमदशहा तक्तावर बसतो. त्याचे स्वभावाचें वर्णन. तो आपले गवयांवर खुष होऊन त्यांचे बिदागीची वरात विजयानगरचे राजावर देतो, यामुळें लढाई होते. विजयानगरचे राज्यांतील एक लक्ष हिंदुलोकांची कत्तल करण्याबद्दल शहा शपथ घेतो व ती तो शेवटास नेतो. त्याचे राज्यांतील बंदोबस्त. ४ त्याचे मागून त्याचा मुलगा मुजाईनशहा तक्तावर बसतो. त्याची विजयानगरची स्वारी. त्याचा खून. ५ त्याचा चुलता दौदखान हा सुलतान होतो. त्याचा मारेकऱ्यांचे हातून मृत्यु. यानंतर महंमुदशहा तक्तावर बसतो. त्याचे सुस्वभावाचें व उत्तम राज्यव्यवस्थेचें वर्णन. ६ त्याचे मागून त्याचे दोन पुत्र गादीवर बसतात; परंतु ते दोघेही अल्पकाळांतच पदच्युत होतात. शेवटीं फेरोजखान हा शहा होतो. त्याचे सद्गुणांचें व दुर्गुणांचें वर्णन. विजयानगरचे राजानें त्याचे मुलखांतील एका सोनारणीचे मुलीस धरून नेण्याचा प्रयत्न केल्यावरून, विजयानगरावरील स्वारी. शहास प्रथम जय येतो; परंतु अखेर त्याचा पराभव होतो. विजयानगरचा राजा मुसलमान लोकांची कत्तल करितो. शहाचा मृत्यु. ७ त्याचा भाऊ अहंमदखान सुलतान होतो. त्याची विजयानगरावरील स्वारी. हिंदु लोकांची कत्तल. राज्यांतील बंदोबस्त. ८ त्याचे मागून त्याचा मुलगा अल्लाउद्दीनशहा (दुसरा) ह गादीवर बसतो. त्याचे भावाचें बंड. विजयानगरचे राजाबरोबर लढाई शहाचें वर्तन बिघडून तो दारू व स्त्रिया यांचे नादीं लागतो. राज्यकारभारां घोंटाळा. मलिक उन् तुजार याची कोंकणांतील स्वारी. शिरक्याचे दंग्यां मुसलमानी फौजेचा नाश होतो. दाक्षिणी व परदेशी सरदारांमध्यें दुही माजते व तेणेंकरून राज्यास उतरती कळा लागते. शहाचा मृत्यु. ९ त्याचा मुलग हुमायुनशहा याचें क्रूर, अविचारी व भयंकर वर्तन. त्याचा अल्पकाळांतच मृत्यु १० त्याचा मुलगा निजामशहा गादीवर बसतो. तो वयांत येण्यापूर्वीच मर पावतो. त्याचा धाकटा भाऊ महंमदशहा (दुसरा) हा तक्तावर बसतो. तोह

ह्वान असल्यामुळें त्याची आई व वजीर महंमद गवान हे राज्यकारभार चालवि-
ात. ब्राह्मणीराज्याचा विस्तार विशेष होतो; परंतु सुभेदारांस वचकांत
वण्यास व्यवस्था नसल्यामुळें, ते हळू हळू सुलतानास डोईजड होतात. महंमद
वान वजीर याचे सद्गुणांचें वर्णन, सुभेदारांची शक्ति कमी करण्याकरितां त्याची
ोजना. त्यास शत्रु उत्पन्न होतात. त्याचा वध. सुभेदार, सुलतानाचा हुकूम
ानीनातसे होतात. त्याचा मृत्यु. ११ त्याचा अल्पवयी मुलगा महंमूदशहा
दुसरा ) हा गादीवर बसतो. दाक्षिणी व परदेशी लोकांचे तंटे वाढून ते एकमे-
ांची कत्तल करितात. युसफ आदिलखान हा विजापुरास, मलिक अहंमद हा
हंमदनगरास, फत्ते उल्ला इमाद उलमुल्क हा वऱ्हाडांत, व कुतुब उलमुल्क हा
ोवळकोंडा येथें स्वतंत्र होऊन बसतात. शहा हा मूर्ख व व्यसनी निघतो.
याचा सर्व राज्यकारभार त्याचे वजीर प्रथम कासीम बेरिद व त्याचे मरणानंतर
याचा मुलगा अमीर बेरिद हे आटोपतात, व शहा केवळ बाहुल्याप्रमाणें होऊन
ाहतो. त्याचे मरणानंतर त्याचे नामधारी पदास चार सुलतान अल्पकाळांतच
ाकामागून एक चढतात. त्यांपैकीं शेवटला कलीम उल्लाशहा हा आपले वाईट
स्थतीस कंटाळून, अहंमदनगरास पळून जातो व तेथील सुलतानाचेपाशींच मरेपर्यंत
ाहतो. त्याचेबरोबर ब्राह्मणीवंशाचा शेवट होतो. १२ ब्राह्मणीराज्याचें साधारण
वरूप, त्याचें वैभव व महाराष्ट्रीयांचे अभ्युदयाशीं त्याचा संबंध.

१ मागील भागांत सांगितल्याप्रमाणें, महंमद तघलख बादशहाचे
क्षिणेंतील सरदारांनीं बंड केल्यामुळें, महाराष्ट्रांत ब्राह्मणीराज्य नांवाचे
का स्वतंत्र मुसलमानी राज्याची स्थापना झाली. हें राज्य बरेंच
लाढ्य होऊन तें सुमारें दीडशें वर्षें टिकलें व यानंतर तें मोडून
ाऊन त्याचीं पांच निरनिराळीं स्वतंत्र राज्यें झालीं. तींही सर्व
ुसलमानीच असून, त्यांतील दोघांची बरीच भरभराट झाली व हींही
ाणखी पुढें दीडशे वर्षेंपर्यंत राहिलीं. ह्या तिन्हीं राज्यांचे इतिहा-
ाचा, आपला मुख्य कथाभाग जो महाराष्ट्राचा अभ्युदय त्याच्याशीं
गदीं निकट संबंध आहे. हा इतिहास हिंदुस्थानचे इतिहासांतून
्वचितच दिला असतो. ग्रांटडफ साहेबांचे ग्रंथांतसुद्धां तो इतका थोडा
ुटक व अपूर्ण असा दिला आहे कीं, त्याजवरून ब्राह्मणीराज्याचे
वरूपाची, त्याचे वैभवाची किंवा त्याचा पुढील महाराष्ट्रीयांचे अभ्युद-
ाशीं जो संबंध आहे, त्याची वाचकांस चांगली कल्पना होत नाहीं.

याकरितां या भागांत ब्राह्मणीराज्याचा व पुढील दोन भागांत विजापूर व अहंमदनगर येथील राज्यांचा संक्षिप्तरूपानें इतिहास देण्याचा आह्मीं यत्न करितों.

२ ब्राह्मणी राज्याचा स्थापनकर्ता जो सुलतान अल्लाउद्दीन हसन कांगो ब्राह्मणी, हा मूळ अगदीं हलक्या स्थितींत जन्मला असून, तो आपली बुद्धि, शौर्य व अद्भुत दैव यांचेयोगानें तक्ताधीश झाला. असें सांगतात कीं, तो लहानपणीं दिल्ली शहरांत कांगो ह्मणून कोणी ब्राह्मण ज्योतिषी रहात होता, त्याचे चाकरीस होता. एके दिवशीं तो आपले धन्याचें शेत नांगरीत असतां, त्यास तेथें द्रव्यानें भरलेला एक हंडा सांपडला; परंतु त्यानें तो पळवून न नेतां, तो आपले धन्याकडे नेऊन दिला. हसनचें हें इमानीपणाचें वर्तन पाहून, कांगो ब्राह्मणास मोठें आश्चर्य वाटलें व त्यानें ही अद्भुत गोष्ट, राजपुत्र महंमद तघलघ याजपाशीं सांगितली व त्याजकडून ती त्याचा बाप ग्यासुद्दीन तघलघ बादशहा यास कळली. बादशहा, हसनावर खुष झाला व त्यानें त्यास १०० स्वारांची सरदारी सांगितली. येणेंप्रमाणें हसनचें दैव उघडून तो दिवसेंदिवस अधिकाधिक योग्यतेस चढत चालला. कांगो ब्राह्मणानें त्याचे ग्रह पाहून त्याची जन्मपत्रिका केली व त्यास राज्यपदाचा योग आहे असें त्यास आढळून आल्यावरून, त्यानें हसनास ती गोष्ट कळविली व त्याजपासून असें वचन घेतलें कीं, जर दैववशात् सांगितलेलें भविष्य खरें झालें, तर त्यानें आपले नांवापुढें कांगोब्राह्मणी असें उपनांव जोडावें व आपणास राज्याची खजीनदारी द्यावी.

असो; यापुढें महंमद तघलघ हा स्वतः जेव्हां बादशहा झाला, तेव्हां त्यानें आपले कित्येक सरदार दौलताबादेचे नवीन सुभ्यावर पाठविले, त्यांत हसन हाही गेला. तेथें कांहीं वर्षांनीं महंमदाचे जुलमी, लहरी व क्रूर वर्तनामुळें, मागील भागांत सांगितल्याप्रमाणें दक्षिणेंत बंड उपस्थित होऊन, बंडवाल्यांनीं नासिरुद्दीन ह्मणून जो नवीन सुलतान दौलताबादेस स्थापन केला, त्यानें हसनाची बुद्धि व पराक्रम पाहून त्यास जाफरखान असा किताब दिला. यानंतर

नासिरुद्दीनानेंही आपला राज्याधिकार जाफरखानाचे स्वाधीन केल्यामुळें, मूळचा दिल्ली येथील कांगो ब्राह्मणाजवळचा हलका नोकर जो हसन, तो अल्लाउद्दीन हसनशहा कांगोब्राह्मणी ह्मणून दक्षिणेचा सुलतान झाला!

अल्लाउद्दीनशहा यानें कांगो ब्राह्मणास पूर्वी जें वचन दिलें होतें, त्याप्रमाणें त्यानें आपले नांवास कृतज्ञताबुद्धीनें कांगोब्राह्मणी हें उपनांव जोडिलें व त्या ब्राह्मणास बोलावून आणून आपली खजिनदारी सांगितली. हा सुलतान लढाईचे कामांत जसा हुषार होता, तसाच तो राज्यकारभारांतही मोठा चतुर होता. त्यानें नुकताच बादशाही फौजेवर जो जय मिळविला, तो पुष्कळ अंशीं हिंदुराजे, पाळेगार, देशमुख, देशपांडे वगैरे लोकांचे साहाय्यानें मिळविला होता. त्यांचे मदतीशिवाय, त्यानें जी लपंडावाची झुंज बादशाही फौजेबरोबर बरेच वेळ खेळली, ती त्यास खेळतांच आली नसती. पुढें सुलतान झाल्यावरही, हिंदुलोकांचीं मनें आपणांवर राहिल्याशिवाय आपलें नूतन स्थापित झालेलें राज्य चालणार नाहीं, हें त्यानें लक्षांत आणून, जे मुख्य मुख्य हिंदु सरदार व इतर वजनदार लोक त्याचे पक्षास धरून होते, त्यांस त्यानें त्यांचे योग्यतेप्रमाणें नवीन गांव किंवा इनाम जमिनी वंशपरंपरा करून दिल्या; जे जुने देशमुख, देशपांडे होते, त्यांजकडे त्यांचे पूर्वापार हक्क चालविले व जे कित्येक पाळेगार होते, त्यांस सामोपचारानें वश करून घेतले. मराठे शिलेदारांस कोणांस दोनशें, कोणांस तीनशें अशा घोडेस्वारांच्या मनसबा दिल्या व त्यांचे खर्चासाठीं त्यांस स्वतंत्र जमिनीही तोडून दिल्या. या जमिनी बहुतकरून कोणातरी मुसलमान जहागीरदारांचे परगण्यांत दिल्या असत व अशा जहागीरदारांवर एक प्रांताचा सुभेदार ह्मणून नेमिला असे. येणेंप्रमाणें निरनिराळे जातीचे, निरनिराळ्या धर्माचे व निरनिराळ्या दरजाचे लोक एकत्र करून, त्या सर्वांत मिलाफ राहून आपले राज्याची भरभराटी होईल, अशाविषयीं अल्लाउद्दीनशहानें तजविजी केल्या*.

यापुढें १३५१ या सालीं, दिल्लीचा बादशहा महंमद तघलख हा मरण पावून, उत्तर हिंदुस्थानांत अधिकाधिक घोंटाळा उत्पन्न झाल्या-

* ग्रांट डफ यांचा इतिहास.

कारणानें, अल्लाउद्दीनशहास आपले राज्यास विशेष बळकटी आणण्यास व तें वाढविण्यासही सवड सांपडली. वारंगुळचा राजा बराच लढाऊ आहे असें मनांत आणून, त्यानें त्याजपासून कौलास शहर व त्याचे खालचा मुलुख एवढेच घेऊन त्याजबरोबर तह केला व दक्षिणेंत यापूर्वी जितका ह्मणून बादशाही मुलुख होता, तितका हळूं हळूं आपले ताब्यांत आणण्याचा उद्योग चालविला. तसेंच लढाई अगदीं बंद ठेविली, तर आपली महाराष्ट्रीय प्रजा जी स्वभावतः मोठी उलाढाली करणारी आहे, ती विनाकारण कटकटी उपस्थित करील हें मनांत आणून, अल्लाउद्दीनशहा ह्यानें मधून मधून *विजयानगरचे राजांबरोबर युद्ध चालूं ठेविलें व त्याजपासून त्यानें कांहीं मुलुखही हिसकावला. त्याचें राज्य बहुतेक सर्व महाराष्ट्रावर पसरलें असून, त्यांत फक्त कोंकणपट्टांटमाथा हा मात्र सामील झाला नव्हता. त्यानें आपले सर्व राज्याचे चार विभाग करून, प्रत्येकास तरफ ह्मणून नांव दिलें असे. त्याजवर एक तरफदार नेमला असून, त्याजकडे त्या प्रांताचे लष्कराचा,

---

* मागें भाग १ पान १२ यांत, राजपुत्र युनान यानें वारंगुळ शहर घेऊन तेथील राजास कैद करून दिल्लीस नेलें व तेलंगणचें राज्य खालसा केलें ह्मणून लिहिलें आहे; परंतु वारंगुळ हें मुसलमानांचे हातीं पडल्यावर, तेथील राजघराण्यांतील बुक्क व हरिहर या दोन पुरुषांनीं, सन १३३५ यावर्षी कर्नाटक प्रांतांत विजयानगरचें राज्य स्थापन केलें. हें यापुढें चांगलें भरभराटीस येऊन सुमारें सव्वादोनशें वर्षें टिकलें व जेव्हां हिंदुस्थानांत बहुतेक भागांत मुसलमानी राज्यें प्रबल होऊन राहिलीं होतीं व हिंदूंचा धर्म, विद्या, रीतरिवाज हीं सर्व ठिकाणीं ऱ्हास पावलीं होतीं, त्यावेळीं याच राज्यांत कायतो त्यांस थारा मिळून, त्या चांगल्या स्थितींत होत्या. चारी वेदावर भाष्यें व अनेक वेदांत ग्रंथ रचणारे सायण आणि माधव हें बंधुद्वय बुक्क राजाचे वेळींच उदयास आलें. शेवटीं हेंही राज्य १५६४ या सालीं विजापूर, अहंमदनगर, गोवळकोंडें व बेदर येथील सुलतानांनीं एकत्र होऊन, तेथील शेवटचा राजा रामराज याजवर स्वारी केली व त्याचा तालीकोट येथील लढाईत पूर्ण पराभव केला. राजा लढाईत मारला जाऊन, त्याचे राजधानीचा विध्वंस होऊन व त्याचा सर्व मुलुख वरील सुलतानांनीं आपापसांत वाटून घेतल्यामुळें, त्याचा पुढें फारसा पत्ताही राहिला नाहीं; तथापि त्याचें अस्तित्व, त्याचें वैभव व त्याचें बरेंच वर्षेपर्यंत टिकणें, ह्या गोष्टींचा महाराष्ट्रीयांचे पुढील अभ्युदयावर बराच परिणाम झाला हें पुढील वृत्तांतावरून दिसून येईल.

जमाबंदीचा, न्यायखात्याचा वगैरे सर्व अधिकार असे. या सुलतानाचे वेळीं कांगो ब्राह्मणाची खजीनदारीवर नेमणूक झाल्यामुळें, त्यानें आपले हाताखालीं बरेच ब्राह्मण उत्तरहिंदुस्थानांतून आणून लाविले. ह्या ब्राह्मणांचे मागून दक्षिणी ब्राह्मणांचाही शिरकाव होऊन, यापुढें जमाबंदीचे वगैरे कामांत हेच लोक वाकबगार ह्मणून ठरले.

अल्लाउद्दीनशहा हा प्रजेचे कल्याणाविषयीं मोठा दक्ष असे. तो दररोज दोनवेळ कचेरींत येऊन जमाबंदीचें व न्यायाचें काम करी व तो गोरगरीबांची लवकर दाद घेत असे. त्याचें चांगले व शहाणपणाचें वर्तनावर त्याची सर्व प्रजा खूष असे. शेवटीं हा सुलतान गुजराथप्रांतांत स्वारी करण्याकरितां गेला असतां, तेथें त्यास दुखणें लागून तो कलबुर्ग्यास परत आला. तेथें तो ता० १० आगष्ट १३९८ यावर्षीं मरण पावला. यावेळीं त्याचें वय ६७ वर्षांचें होतें.

२ अल्लाउद्दीनशहा* याचे मागून त्याचा मुलगा महंमदशहा हा

---

* ब्राह्मणी राजांची वंशावळी पुढें दिल्याप्रमाणें आहे:—

(१) अल्लाउद्दीन हसनशहा कांगो ब्राह्मणी
|
(४) दाऊदशहा. (२) महंमदशहा (पहिला) (५) महमुदशहा (पहिला)
|
(८) फेरोजशहा (९) अहंमद–शहा (३) मुजाईदशहा (६) ग्यासुद्दीन (७) शमसुद्दीन
|
(१०) अल्लाउद्दीनशहा (दुसरा)
|
(११) हुमायुनशहा
|
(१२) निजामशहा. (१३) महंमदशहा (दुसरा)
|
(१४) महंमदशहा (दुसरा)
|
(१७) वलीउल्ला (१५) अहंमदशहा (दुसरा) (१६) अल्लाउद्दीन (तिसरा)
|
(१८) कलीमउल्लाशहा.

त्याचे गादीवर बसला. तो बापाप्रमाणेंच शूर, हुषार व खबरदार असा होता; परंतु त्याचेप्रमाणें शांत व विचारी नव्हता. यास धर्मवेड विशेष असे व यामुळें त्यानें एक दोन प्रसंगीं मशिदींतून जहाज प्रसिद्ध करून, विजयानगरचे राज्यांतील एक लक्ष हिंदुलोक ठार मारल्याखेरीज मी आपली तरवार म्यानांत घालणार नाहीं, अशी त्यानें क्रूरपणाची प्रतिज्ञा केली व ती त्यानें शेवटासही नेली. परराज्यांतील निरपराध हिंदुप्रजेशीं ज्याप्रमाणें हा सुलतान वागला, तशा रीतीनें महाराष्ट्रांतील हिंदुप्रजेशीं त्यास वागण्यास प्रसंग आल्याचा इतिहासांत कोठें उल्लेख नाहीं; तथापि हिंदुप्रजेशीं त्याची वागणूक कडकपणाचीच असेल असें वाटतें व दक्षिणेंतील हिंदुलोकांचे आणि मुसलमानलोकांचें विशेष हाडवैर पडण्यास—ज्याचीं कालांतरानें उत्पन्न झालेलीं फळें आपणांस **शिवाजी महाराजांचे** वर्तनांत दृष्टीस पडतात, त्याचा—आरंभ या वेळेपासून झाला असावा यांत संशय नाहीं.

असो; *महंमदशहा हा गादीवर येतांच, तो नवीनच आहे असें पाहून, तेलंगण व विजयानगर येथील राजांनीं, मागील शहानें त्यांचे राज्यांतील जे मुलुख काबीज केले होते, ते परत देण्याविषयीं त्यास नेट लाविला. ह्मणून त्यानें प्रथम तेलंगणचे राजावर स्वारी करून त्याचा मुलगा विनायकदेव याचा पराभव केला; परंतु लवकरच राजानें शहास पुष्कळ मौल्यवान रत्नें व मोठी खंडणी देण्याचें कबूल केल्यावरून दोघांचा तह झाला; परंतु या गोष्टीस तीन चार वर्षें लोटलीं नाहींत, तोंच तेलंगणचे राजाबरोबर पुनः लढाईचा प्रसंग आला. याचें कारण असें झालें कीं, कांहीं कारवानांनीं चांगले चांगले घोडे

---

* या भागांतील यापुढील बहुतेक मजकूर, प्रो० बा० प्र० मोडक यांचे इतिहासाचे आधारानें लिहिला आहे. क्वचित् स्थळीं मात्र ग्रांट डफ यांचे ग्रंथांतील मजकूर घेतला आहे. ज्या कोणांस ब्राह्मणीराज्य व दक्षिणेंतील इतर मुसलमानी राज्यें यांचा सविस्तर इतिहास वाचण्याची इच्छा असेल, त्यांनीं प्रो० मोडक यांचा ग्रंथ अवश्य वाचावा. त्यांतील भाषा अगदीं साधी असून, मधून मधून वर्णनें फार चांगलीं आहेत व माहितीही यथास्थित आहे.

शहाकडे विकावयाकरितां चालविले असतां, त्यांजपासून ते वेलंपट्टण येथें विनायकदेवानें मध्येंच कमी किंमत देऊन जबरदस्तीनें घेतले. ही गोष्ट महंमदशहास कळतांच, त्यानें एकाएकीं त्या शहरावर स्वारी करून विनायकदेवास पकडून कैद केलें व त्यास घोड्यांबद्दलचा जाब विचारिला असतां, त्यानें कांहीं उद्धटपणें उत्तर दिल्यावरून. सुलतानास राग येऊन त्यानें त्यास किल्ल्याचे तटावरून विस्तवाचे ढिगांत टाकून देण्यास हुकूम दिला. यानंतर शहा तेलंगणप्रांत लुटून परत कलबुर्ग्याकडे चालला असतां, तेथील लोकांनीं त्याचे फौजेवर वरचेवर हल्ले करून त्यास असा त्रास दिला कीं, त्यास सोनें, जवाहीर वगैरे मात्र ठेवून, बाकी तंबू, डेरे वगैरे जड लष्करी सामान हें सर्व जाळून टाकून सड्या स्वारीनिशीं कुच करणें भाग पडलें. या स्वारींत त्याचे सैन्याचा फार नाश झाला, व त्याचे हातावर जखम लागून तो आजारी झाला; परंतु इतक्यांत त्याचा सरदार मलिक सैफ उद्दीन घोरी हा पुष्कळ फौजेनिशीं त्यास येऊन मिळाल्यामुळें, तेलंगणची फौज मागें हटली व सुलतानानें त्यांचीं कित्येक ठाणीं घेतलीं. यापुढें तेलंगणचा राजा शरण आल्यावरून त्याजबरोबर शहानें तह केला. त्यांत असें ठरलें कीं, राजानें सुलतानास ३३ लक्ष रुपये खंडणी द्यावी व गोवळकोंडाचा किल्ला व त्याचे खालचा सर्व मुलुख त्याचे स्वाधीन करावा.

तेलंगणचे राजावरची स्वारी फत्ते झाली, ह्मणून महंमदशहानें मोठा उत्साह केला. यावेळीं एके दिवशीं संध्याकाळीं शहा दारू पिऊन तर्र झाला असतां, कांहीं गवयांचें गाणें ऐकून तो त्यांजवर फार खुष झाला व त्यानें गवयांस बिदागी देण्याकरितां विजयानगरचे राजाचे खजीन्यावर वरात देण्यास दिवाणास हुकूम केला! दिवाणानें पाहिलें कीं, शहा दारूचे अमलांत असल्यामुळें, त्यानें हा विलक्षण हुकूम केला असावा, ह्मणून त्यानें हुकुमाची बजावणी एक दिवसपर्यंत केली नाहीं; परंतु तिसरे दिवशीं शहानें हुकुमाप्रमाणें बिदागीबद्दल वरात दिली कीं नाहीं ह्मणून दिवाणास विचारिलें, तेव्हां दिवाणानें आपले पोटांतील खरा भाव सांगितला असतां, त्यानें अंमळ रागावून ह्मटलें, 'तें कांहींही असो. माझे तोंडांतून एकदां शब्द निघाला ह्मणजे तो खोटा व्हावयाचा नाहीं.

वरात तुह्मीं आतांच रवाना करा.' विजयानगरचे राजास, शहाकडून आलेली वरात पाहून अर्थातच फार राग आला व त्यानें ती आणणारे मनुष्यास गाढवावर बसवून त्याची शहरांतून धिंड काढवून त्यास परत हांकून लाविलें व त्यावेळीं जरी पर्जन्यकाळ चालू होता, तरी त्यानें मुलतानाचे मुलुखावर चालून जाण्याचा निश्चय केला. त्याचें सैन्य कृष्णानदी उतरून मुद्गलचे किल्ल्यावर चालून आलें व त्यांनीं तो किल्ला घेतला, व तेथील सर्व लोकांची कत्तल उडविली.

हें वर्तमान महंमदशहास कळतांच, त्यास मोठा संताप येऊन तो राजधानीचे मोठे मशीदींत गेला व तेथें देवाची प्रार्थना करून, तेथें जमलेल्या सर्व मुसलमान लोकांसमक्ष त्यानें जहाद प्रसिद्ध केली व विजयानगरचे राज्यांतील एक लाख हिंदु ठार मारल्याखेरीज मी आपली तरवार म्यानांत घालणार नाहीं, अशी त्यानें कुराणावर शपथ घेतली! यानंतर तो जलदीनें फौज घेऊन कृष्णानदीजवळ आला. तेथें तो आल्याचें वर्तमान ऐकून, विजयानगरची फौज कृष्णानदी ओलांडून आडोनीकडे हटली; परंतु परत जातांना पर्जन्यामुळें, त्यास पुष्कळ जड सामानसुमान माघारें नेतां आलें नाहीं; तें अर्थात्च शत्रूंचे हातीं लागलें. याशिवाय मुसलमान लोकांनीं हिंदु फौजेचे बाजारबुणग्यांवर हल्ला करून 'पुरुष, स्त्रिया व मुलें यांमध्यें भेद न करितां सुमारें ७० हजार लोक कापून काढले!' यापुढें विजयानगरचा राजा कृष्णराय, हा मागें हटत हटत तुंगभद्रा नदी उतरून आपले राज्यांत आला. त्याचे पाठोपाठ मुसलमान लोकांचेंही सैन्य आलें. शेवटीं कृष्णरायाचा सेनापति भोजमल्ल हा, ४० हजार स्वार व ९ लक्ष पायदळ एवढी फौज बरोबर घेऊन, मुसलमान लोकांचे फौजेवर चालून गेला. यावेळीं त्या लोकांचे १०,००० स्वार व ३०,००० पायदळ इतकें होतें. ही लढाई सबंध दिवसभर चालली होती असें सांगतात. तींत प्रथम हिंदूंची सरशी झाली; परंतु अखेर मुसलमान लोकांचे तोफखान्यामुळें, भोजमल्लाचे सैन्याची फळी फुटून त्याची दाणादाण झाली. भोजमल्लासही मोठी जखम लागून तो खालीं पडला व त्याचे लोकांची कत्तल उडाली. (१३६९). यानंतर कृष्णराय हा

शहाचे फौजेवर लढाई न करितां, पहाडांतून व जंगलांतून मागें हटत आपले राजधानीकडे परतला. शहाही त्याचे मागोमाग पोहोंचून त्यानें विजयानगरास वेढा घातला; परंतु शहर मोठें असल्याकारणानें तें मुसलमानांचें हातीं येईना. इतक्यांत कृष्णरायानें आपले वकील सुलतानाकडे पाठवून तहाचें बोलणें सुरू केलें. त्यावरून शहा त्या गोष्टीस कबूल झाला; परंतु गवयांस बिदागी देण्याबद्दल जी वरात दिली होती, ती प्रथम देण्याबद्दल त्यानें आग्रह धरिला; ती देऊन टाकतांच दोहों पक्षांचा तह ठरला; परंतु याचवेळीं विजयानगरचे वकीलांनीं शहास विनंति केली कीं, 'राजाराजांचे भांडणांत निरपराध रयतेची कत्तल करावी, असें कोणत्याही धर्मांत नाहीं व मुख्यत्वें बिचाऱ्या स्त्रिया व मुलें यांनीं काय कोणाचा अपराध केला आहे?' महंमदशहास वकीलांचें हें बोलणें मान्य होऊन त्यानें ह्मटलें कीं, 'झालें तें झालें. त्यास आतां उपाय नाहीं; परंतु याउपर जय मिळाल्यावर, एकाही इसमास मी ठार मारणार नाहीं व माझे मागून जे सुलतान माझे तक्तावर बसतील, त्यांनींही अशीच वहिवाट ठेवावी, अशी त्यांस माझी आज्ञा आहे.'

या शहाचे कारकीर्दींत दौलताबाद परगण्याचा सुभेदार बहिरामखान यानें, नाईक लोकांचा मुख्य गोविंददेव ह्मणून कोणी मराठा सरदार होता, त्यानें उत्तेजन दिल्यावरून बंड केलें; परंतु शहानें तें लवकरच मोडून टाकिल्यामुळें, त्या दोघांसही गुजराथेंत पळून जावें लागलें. सर्व ब्राह्मणी राजांचे राशिदांत महाराष्ट्रांत ह्मणून बंड झालें, असें हेंच काय तें लिहिलें आहे. यापुढें तें अगदीं झालें नाहीं.

यानंतर, महंमदशहानें मोठी अशी कोणतीही लढाई केली नाहीं. त्यानें आपलें सर्व लक्ष आपले राज्याचे सुधारणेकडे लाविलें. तो दरवर्षी आपल्या निरनिराळ्या परगण्यांतून फिरे व रयतेची सर्व प्रकारची दाद घेई. त्यानें चोरांचा व दरवडेखोरांचा उपद्रव नाहींसा करण्याकरितां, त्यांस ठार मारून त्यांचीं डोकीं राजधानीस पाठवून देण्याकरितां सर्व सुभेदारांस हुकूम पाठविले व त्यावरून कलबुर्ग्यास ८,००० डोकीं रवाना होऊन, त्यांचा वेशीपुढें ढीग केला होता ह्मणून सांगतात. या

सुलतानाचे वेळीं ब्राह्मणीराज्य चांगलें भरभराटीस आलें. त्याचा खजीना नेहमीं पूर्ण भरलेला असून, फौजफाटाही सर्व जय्यत असे. येणेंप्रमाणें बरेंच चांगलें प्रकारें राज्य करून, महंमदशहा हा १३७५ या सालीं मरण पावला.

४ महंमदशहाचे मागून त्याचे तक्तावर त्याचा मुलगा मुजाईतशहा हा बसला. हा शरीरानें मोठा धिप्पाड व बळकट असून, मोठा हिंमतवान् व धाडशी असे. हा तक्तावर बसला, तेव्हां ह्याचें वय १९ वर्षांचें काय तें होतें. थोडेच दिवसांत विजयानगरचे राजाचे आणि ह्याचे सरहद्दीवरील कांहीं किल्ल्यांसंबंधानें वाद उत्पन्न होऊन, हा विजयानगरचे मुलुखावर स्वारी करण्यास निघाला. ह्यानें कृष्णा व तुंगभद्रा ह्या नद्या ओलांडून आडोनीचे किल्ल्यास वेढा दिला; परंतु तो लवकर साध्य होईना, ह्मणून कांहीं फौज तेथें ठेवून तो कृष्णरायाचे फौजेवर चालून गेला. असें सांगतात कीं, या स्वारींत मुजाईतशहास एके दिवशीं एका प्रचंड वाघाचे शिकारीची बातमी लागून, तो त्याची पारध करण्यास लागलाच निघाला. त्यानें वाघास गांठून व त्याचे अंगावर एकट्यानेंच चालून जाऊन त्यास एकाच तीरासरसें ठार केलें! शहाचे या अद्भुत कृत्याबद्दल लवकरच चोहोंकडे बातमी पसरली. ती विजयानगरचे लोकांनीं ऐकतांच ते मनांत दचकले व त्यांनीं, आतां शहाबरोबर उघडे मैदानांत लढाई करण्याचा बेत सोडून देऊन, ते निबिड जंगलांत आश्रय घेऊन राहिले व तेथून मुसलमान लोकांवर छापे घालण्याचा त्यांनीं विचार केला. कृष्णराय यानें राजधानीचा बचाव आपले सरदारांस करण्यास सांगून, तो स्वतः जंगलांतून व डोंगरांतून राहूं लागला; तथापि त्याचा पिच्छा मुजाईतशहा हा सोडीना. त्यानें त्याचा पाठलाग करून वाटेंत जेथें जेथें ह्मणून हिंदु देवस्थानें त्यास आढळलीं, त्यांस त्यानें भ्रष्ट केलें व पुष्कळ देवळें पाडून टाकलीं. शेवटीं कृष्णराय यास जंगलची हवा न मानल्यामुळें, तो चोरवाटांनीं राजधानीस परत गेला. ही बातमी शहास कळतांच तोही राजधानीस जाण्याचा मोठा रस्ता टाकून देऊन, एका जवळचे परंतु अवघड वाटेनें राजधानीवर एकाएकीं येऊन थडकला व तींतील एका

भागांत त्यानें आपला शिरकावही केला! येथून कृष्णराय ज्या गढींत रहात होता, ती फारच जवळ होती. यावेळीं हिंदु व मुसलमान या दोघांचे फौजेचें मोठें तुंबळ युद्ध झालें; परंतु त्यांत विशेष सरशी अशीं कोणतेही पक्षाची झाली नाहीं. यानंतर असेंच कांहीं दिवस युद्ध चालल्यावर, राजधानी हातीं येत नाहीं असें पाहून, मुजाईतशहानें आपली छावणी तेथून उठवून तो आडोनीचे किल्ल्यापाशीं आला. तेथें अजून वेढ्याचें काम चालूंच होतें. शहानेंही तें काम ९ महिने-पर्यंत मोठे नेटानें चालविलें; परंतु किल्ला फार बळकट आहे, तो अल्प आयासानें प्राप्त होणार नाहीं असें ध्यानांत आणून, त्यानें, तो घेण्याचा नाद सोडून दिला. यानंतर लवकरच त्यानें कृष्णरायाबरोबर तह करून तो माघारा आपले मुलुखाकडे निघाला. तो वाटेंत एके दिवशीं मुद्गलचे किल्ल्याजवळ शिकार करून दमून आपले तंबूंत निजला असतां, त्याचा चुलता दाऊदखान, ज्यास त्याचे कांहीं आगाळिकीवरून तो रागें भरला होता, त्यानें तेथें गुप्तपणें प्रवेश करून त्यास तलवारीनें ठार केलें. ( एप्रिल १३७८ ). या सुलतानानें पुरतीं तीन वर्षेंसुद्धां राज्य केलें नव्हतें. तों इतक्यांत त्याचा असा भयंकर अंत झाला.

९ मुजाईतशहाचे मागून त्याचा चुलता दाऊदखान हा त्याचे गादीवर बसला; परंतु त्यास, त्यानें अन्यायानें मिळविलेला राज्याधिकार फार दिवस पचला नाहीं. तो एकेदिवशीं मशीदींत गुडघे टेकून प्रार्थना करीत बसला असतां, मुजाईतशहाची बहीण शहाजादी रूपवर आवा हिनें मारेकरी घालून त्यास तेथेंच ठार केलें, व पहिला सुलतान अल्लाउद्दीनशहा याचा धाकटा मुलगा महंमूद यास तक्तावर बसविलें. ( मे १३७८ ).

महंमूदशहा हा ब्राह्मणी वंशांतील सर्व सुलतानांमध्यें फार योग्य असा सुलतान होऊन गेला. अकबर, थोरले माधवराव पेशवे, अहल्याबाई होळकरीण, लॉर्ड रिपनसाहेब अशीं जीं कित्येक नीति-मान्, शहाणीं व थोर मनाचीं नृपरत्नें या देशांत होऊन गेलीं, त्या कोटींतीलच महंमूदशहा हा होय. यानें एकंदर १९ वर्षें राज्य केलें; परंतु तेवढा सर्व काळ, त्यानें लढाई करून विनाकारण रक्तपात, किंवा

धर्मवेडास वश होऊन शत्रूकडील निरपराध रयतेची कत्तल किंवा त्यांचे देवस्थानांची भ्रष्टता वगैरे मूर्खपणाचीं व दुष्टपणाचीं कृत्यें न करितां, पूर्ण शांततेंत, रयतेचे दुःखशमनांत व धर्मशील व परोपकाराचे कृत्यांत घालविला! या सुलतानास विद्येची मोठी आवड असे व तो विद्वान् लोकांचे समागमांत आपला काळ घालवी. याचेवेळीं शिराज येथील प्रसिद्ध फारशी कवि, खाजा हाफीज, हा होता. त्यास शहानें कांहीं नजराणा पाठवून आपले दरबारीं येऊन राहण्यास बोलाविलें; परंतु खाजा हाफीज हा जहाजांत बसून कलबुर्ग्यास येण्याकरितां निघाला असतां, बंदरापासून थोडेंच अंतरावर समुद्रांत मोठें वादळ झाल्यामुळें, तो मागें परतला व पुनः जहाजांत बसण्यास त्याचा धीर होईना!

महंमूदशहा लहान होता, तेव्हां त्यास रंगेल व छाकटे पोषाख करणें आवडत असे; परंतु तक्तावर बसल्यापासून तो अगदीं नेहमीं साधा पोषाख करी. तो वरचेवर असें ह्मणें कीं, ‘सुलतान हा केवळ दौलतीचा रखवालदार किंवा जिम्मेदार आहे. ह्मणून वाजवीपेक्षां फाजील खर्च करणें ह्मणजे त्यास अगदीं गैर आहे.’ याचे कारकीर्दीचे अखेर ह्मणजे १३९६ या सालीं, दक्षिणेंत मोठा दुष्काळ सुरू झाला. तो यापुढें बारा वर्षें राहिला, अशी दंतकथा आहे. त्यास ‘दुर्गादेवी’ असें नांव आहे. यावेळीं महंमूदशहानें १०,००० बैल लावून, माळवा व गुजराथ येथून दक्षिणेंत धान्य आणिलें व तें त्यानें स्वस्तदरानें रयतेस विकलें. कलबुर्गा, बेदर, एलिचपूर, दौलताबाद, चौल, दाभोळ वगैरे मोठमोठे शहरांतून अनाथाकरितां भिक्षागृहें स्थापिलीं व तीं सतत चालावीं, ह्मणून त्यांस नेमणुका करून दिल्या. तसेंच कुराण शिकविण्याकरितां पगार देऊन मोठमोठ्या मौलवींस ठेविलें व आपल्या सर्व राज्यांत आंधळ्या पांगळ्यांस दरमहा धर्मादाय मिळावा अशी तजवीज केली.

या शहाचा सभोंवतालचे राज्यांत चांगला दबदबा असे, ह्मणून वारंगुळ व विजयानगर येथील राजांनीं आपल्या खंडण्या कधींही थकविल्या नाहींत. येणेंप्रमाणें या सुलतानानें १९ वर्षें मोठे नीतीनें,

शहाणपणानें व शांततेनें राज्य करून, तो १३९७ या सालीं मरण पावला.

६ महंमूदशहाचे मागून त्याचे गादीवर त्याचा वडील मुलगा घैसासउद्दीन हा बसला; परंतु लालचीन ह्मणून माजी शहाचे तुर्की गुलामांपैकीं एक गुलाम होता, त्याचें दरबारांत बरेंच वजन असे. त्यास घैसासउद्दीनशहानें आपली वजीरी न दिल्याकारणानें, त्यानें त्यास एके दिवशीं आपले घरीं मेजवानीस बोलावून नेलें व तेथें तो दारूचे गुंगींत असतां, त्याचे कपटानें डोळे काढून त्यास आंधळे केलें. यानंतर लालचीन यानें घैसासउद्दीनाचा धाकटा भाऊ शमसुद्दीन यास तक्तावर बसवून, तो स्वत: सर्व राज्यकारभार करूं लागला; परंतु ही स्थिति फार दिवस टिकली नाहीं. ज्यानें आपला पुतण्या मुजाईतशहा यास ठार मारून कांहीं वेळ तक्त बळकाविलें होतें व ज्यास मशी-दींत निमाज पढत असतांच, मारेकरी घालून शहाजादी रूपवर आग्रा हिनें ठार केलें ह्मणून मागें सांगितलें आहे, त्या दाऊदशाहाचे दोन मुलगे फेरोजखान व अहंमदखान यांनीं, सागरचे सुभेदाराचे मदतीनें फौज जमवून, कलबुर्ग्यावर चाल केली; परंतु त्यांचा मेर्लोले या गांवाजवळ लालचीनाचे फौजेनें मोड केला. यापुढें फेरोजखान व अहंमदखान यांस दगा करून पकडण्याकरितां, त्यांस माफीचीं पत्रें पाठवून लालचीनानें दरबारीं बोलावून आणिलें; परंतु तेथें ते येऊन पोहोंचल्यावर कांहीं सरदार लोक, लालचीनाचे कारभारास नाखुष झाले होते, त्यांचे मदतीनें, या दोन राजपुत्रांनीं राजधानीचा किल्ला आपले स्वाधीन करून घेतला व लालचीन व शमसुद्दीनशहा यांस कैद केलें. त्यांनीं घैसासउद्दीनशहास कैदेंतून काढून, त्याचे डोळे काढिले असल्यामुळें, त्यास कांहीं दिसत नव्हतें, तरी त्याचे पुढें लालचीनास आणून ठेविलें व त्याचे हातून त्यास कट्यारीनें ठार केलें. शमसुद्दीनशहाचे डोळे काढून त्यास बेदरचे किल्ल्यांत कैद करून ठेविलें व फेरोजखान हा स्वत: तक्तावर बसला. ( १३९७ ).

फेरोजशहा हा ब्राह्मणी वंशांतील सुलतानामध्यें मोठा पराक्रमी व नामांकित असा होऊन गेला. त्याचे वेळीं ब्राह्मणीराज्य पुष्कळ वाढून

त्यांची चांगली भरभराट झाली असें सांगतात. सुलतानास महंमूदशहाप्रमाणें विद्येची अभिरुचि असून, तो विद्वान् लोकांचा फार मान ठेवी; तथापि हा बराच लहरी स्वभावाचा असून, यास दारूचें व स्त्रियांचें फार वेड असे. याचे जनानखान्यांत ३,००० स्त्रिया होत्या, असें लिहिलें आहे. यानें भीमा नदीचे कांठीं एक नवीन शहर वसवून, त्यास फेरोजाबाद असें नांव ठेविलें. तेथें नदीजवळच त्यानें एक बालेकिल्ला बांधून व त्यांत नदीचें पाणी जागोजाग खेळवून, त्यानें तें स्थान मोठें रमणीय केलें व येथेंच तो पुष्कळदां मोठे चैनींत रहात असे.

फेरोजशहा तक्तावर बसल्यानंतर, थोडेच दिवसांनीं विजयानगरचा राजा देवराय, यानें तुंगभद्रा नदी ओलांडून दुआब प्रांतावर स्वारी केली व मुदगल व रायचूर या दोन किल्ल्यांवर हल्ला केला. ही खबर शहास कळतांच, तोही आपली फौज घेऊन कृष्णा नदीचे कांठीं आला; परंतु त्यावेळीं पर्जन्यकाळ असल्यामुळें, नदीस पुष्कळ पूर आला असून, मुसलमान लोकांस उतार मिळेना. याशिवाय दक्षिण तीरावर हिंदूंची मोठी फौज असून ती त्यास आलीकडे येऊं देईना. येणेंप्रमाणें फेरोजशहास अडचण येऊन पडली असतां, काजी सिराज ह्मणून कोणी एक जवान व धाडशी असा मुसलमान त्याजकडे येऊन ह्मणाला, 'मला हुकूम कराल, तर मी आपले कांहीं साथी घेऊन शत्रूंचे छावणींत जातों व देवरायास किंवा त्याचे पुत्रास गुप्तपणें ठार मारतों. ह्मणजे तेणेंकरून जी त्यांचे छावणींत धांदल होऊन जाईल, तितक्यांत आपण कांहीं फौज नदी पार उतरून द्यावी व शत्रूंवर हल्ला करावा.' शहानें या गोष्टीस रुकार दिल्यावर, काजी सिराज यानें आपले साथीदारांसुद्धां बजवायांचीं सोंगें घेऊन देवरायाचे छावणींतील एके कलावंतिणीचे ताफ्यांत शिरकाव केला. तेथें एके दिवशीं रात्रीं राजपुत्रापुढें गाणेंबजावणें झाल्यावर, कट्यारी हातांत घेऊन त्या फिरवीत नाचण्याचा खेळ सुरू झाला असतां, काजी सिराज हा स्त्रीवेष धारण करून नखरे करीत, हंसत, नाचत गाणें गात व कट्यारी मोठ्या सफाईनें फिरवीत पुढें आला.

त्याचा तो नाच, आविर्भाव वगैरे पाहून, राजपुत्र फार खुष झाला; परंतु त्या लबाड मारेकऱ्यानें, कांहीं वेळ आपलें कौशल्य दाखवून, बरीशी संधि पाहून, तो राजपुत्रावर एकाएकीं धांवला, व त्यास वार करून ठार केलें. हें भयंकर कृत्य होतांच, देवरायाचे छावणींत चोहोंकडे एकच धांदल होऊन गेली! याच सुमारास फेरोजशहा हाही नदी ओलांडून ४००० लोकांसह शत्रूंचे छावणीवर चालून गेला; परंतु पुत्रवधामुळें देवराय हा घाबरून गेला असल्यामुळें, तो लढाई न देतां, आपले राजधानीकडे पळत सुटला. मुसलमान लोकांनीं त्याचे फौजेचा तेथपर्यंत पाठलाग करून ते विजयानगरास येऊन भिडले व तेथें आल्यावर त्यांनीं तें शहर उध्वस्त करण्यास आरंभ केला. यामुळें, देवराय हा अगदीं टेकीस येऊन त्यानें शहास ११ लक्ष होन देऊन त्याशीं तह केला.

यानंतर कांहीं वर्षांनीं, केरळचा राजा नरसिंगराय यानें, वऱ्हाड प्रांतावर स्वारी केल्यावरून त्याजवर सुलतानानें फौज पाठवून त्याचा पराभव केला व त्याचे राजधानीस वेढा दिला; परंतु नरसिंगराय हा लवकरच शहास शरण येऊन, त्यानें शहास आपली मुलगी व पुष्कळ द्रव्य व कांहीं मौल्यवान चिजा दिल्या व पूर्वीप्रमाणें खंडणी देण्याचें कबूल केलें. यावरून लढाई बंद होऊन उभय पक्षांचा तह झाला.

याच सुमारास तैमुरलंग यानें हिंदुस्थानावर स्वारी करून त्यानें दिल्ली लुटली ( १३९८ ) व यापुढें तो सर्व दक्षिण देश जिंकण्याकरितां निघणार आहे अशी बातमी ऐकून, फेरोजशहानें त्याचे सामर्थ्यास भिऊन, त्याजकडे मोठ्या नजरा देऊन वकील पाठविले; व त्यास असें पत्र लिहिलें कीं, ‘ मी आपले ताबेदारांपैकीं आहे व आपण दक्षिण देश जिंकावयास याल, तेव्हां मी आपले फौजेसह आपणांस येऊन मिळण्यास सिद्ध आहें. ’ तैमुरलंग ह्यानें शहाचें पत्र व नजरा पाहून तो फार खुष झाला व त्यानें त्यास गुजराथ व माळवा हे प्रांत तुह्मांस आह्मीं दिले आहेत, अशाबद्दल सनदा पाठवून दिल्या; परंतु यापुढें तैमुरलंगाचे फौजेची वावटळ हिंदुस्थानांतून निघून गेल्यावर, गुजराथ व माळवा येथील सुलतानांनीं, विजयानगरचे राजाबरोबर फेरोजशहा

विरुद्ध मसलत चालविली व तिचे जोरावर देवरायानें चार वर्षे खंडणी पाठविण्याची टाळाटाळ केली. शहानेंही वरील कट झालेला जाणून तूर्त तो स्वस्थच बसला. शेवटीं, पुढें लिहिलेल्या चमत्कारिक रीतीनें विजयानगरचे राजाबरोबर युद्धाचा पुनः प्रसंग आला.

मुदगल शहरांत एका सोनाराची मुलगी मोठी रूपसंपन्न होती. तीस, शिवाय गाणें, बजावणें, नृत्य वगैरे कला ह्या शिकविल्या होत्या, ह्मणून ती विशेषच स्पृहणीय झाली होती. तिचा नांवलौकिक आसपास पुष्कळ पसरला असल्यामुळें, तिची वार्ता देवरायाचे कानावर गेली व तीस आपली बायको करण्याविषयीं त्यास इच्छा प्राप्त झाली. रायानें तिजविषयीं तिचे आईबापाकडे मागणें केलें; परंतु ते त्या गोष्टीस अनुकूल होईनात. शेवटीं तिला पकडून आणून तिशीं लग्न करावें असा बेत करून, ती शहाचे मुलखांत आहे या गोष्टीचा विचार न करितां, त्यानें एके रात्रीं मुदगल शहरांत ९,००० घोडेस्वार बरोबर घेऊन एकाएकीं प्रवेश केला व शहराचे ज्या भागांत ती रहात होती त्यास वेढा दिला; परंतु या धांदलींत, मुलगी व तिचे आईबाप हे भिऊन दूर रानांत पळून गेल्यामुळें, रायाची शिकार चुकली! यानंतर तो हिरमुष्टा होऊन आपले प्रांतांत परत चालला असतां, त्याजवर त्या प्रांताचे सुभेदारानें हल्ला केला; परंतु राजाचे लोक अधिक असल्यामुळें, त्यांनीं सुभेदाराचा मोड केला; तथापि थोडेच वेळानें त्यास अधिक कुमक येऊन पोहोंचल्यावर, त्यानें देवरायाचे फौजेवर पुनः हल्ला केला, व त्यास तुंगभद्रा नदीचे पार हांकून लाविलें.

आपले राज्यांत येऊन विजयानगरचे राजानें जें हें मूर्खपणाचें कृत्य केलें, त्याबद्दल फेरोजशहास त्याचा राग येऊन त्यानें देवरायावर स्वारी केली. शहाची फौज थोडेच वेळांत विजयानगरास जाऊन थडकली व त्यांनीं शहरावर हल्ला केला; परंतु तें सहजरीतीनें स्वाधीन होत नाहीं असें पाहून, शहा हा राजधानीजवळ तळ देऊन राहिला व त्याचा भाऊ अहंमदखान यानें सर्व कर्नाटक प्रांत लुटिला. माळवा व गुजराथ येथील सुलतानाकडून कुमक मिळण्याची आशा देवरायास

बरेच वेळ होती; परंतु ती आतां येत नाहीं असें पाहून, त्यानें अखेर शहाशीं तहाचें बोलणें लाविलें. शहानें त्यास असें सांगून पाठविलें कीं, तुमची मुलगी मला बायको देऊन तिला अंदण ह्मणून बंकापूरचा किल्ला व शिवाय १० लक्ष होन खंडणी तुह्मीं आह्मांस दिल्याशिवाय तह होणार नाहीं. मुसलमानास आपली कन्या देणें हें देवरायास अत्यंत लाजिरवाणें वाटलें; परंतु निरुपायास्तव तो त्या गोष्टीस कबूल झाला! शेवटीं तह होऊन देवरायाचे मुलीचें शहाशीं मोठे समारंभानें लग्न लागलें; परंतु समारंभ संपल्यावर देवराय जांवयास पोहोंचविण्याकरितां फक्त दोन कोस आला. छावणीपर्यंत आला नाहीं, याचा सुलतानास मोठा राग आला व पुन: एकादी चांगली संधि पाहून देवरायाबरोबर लढाई करण्याचें त्यानें मनांत योजिलें. ( १४०६ ).

यानंतर सुमारें १० वर्षांनीं, फेरोजशहानें विजयानगरचे राज्यावर स्वारी करून, आडोनीपासून ३९ कोसांवर पानगल ह्मणून किल्ला आहे त्यास वेढा घातला; परंतु मुसलमान लोकांचा यावेळीं मोड होऊन त्यांचे मागें हिंदूंचीं सैन्यें लागलीं. त्यांनीं शहास आपले हद्दींत पिटाळून लावून, त्याचा मुलुख उध्वस्त करण्यास आरंभ केला व यामागें मुसलमान लोकांनीं कित्येकवेळां हिंदूंची कत्तल केली होती, तिचा द्वेष मनांत आणून, आतां हिंदूंनींही मुसलमानांचे कत्तलेस आरंभ केला व त्यांचे डोक्याचे ढीग रचले! त्यांनीं अनेक शहरें घेतलीं व पुष्कळ दर्गे, मशीदी वगैरे पाडून टाकिल्या. शहाचे राज्याची अशी दुर्दशा कांहीं दिवस झाल्यावर, शेवटीं त्याचा भाऊ अहंमदखान यानें, देवरायाचे फौजेवर हल्ले करून तीस मोठे प्रयासानें आपले हद्दींत घालविलें. (१४१७).

यापुढें लवकरच फेरोजशहाची प्रकृति बिघडून त्यास भ्रम झाला. त्याचा पुत्र हसनखान हा मूर्ख, दुर्बल व दुर्व्यसनी होता; तथापि त्यास तक्तावर बसवावें असें त्याचे मनांत होतें. शहाचा हा हेतु, त्याचा भाऊ अहंमदखान यास न आवडून, त्यानें बंड केलें व शहाचे फौजेचा पराभव केला. यानंतर शहानेंच चांगुलपणा घेऊन, आपले भावास स्वत: तक्तावर नेऊन बसविलें, व यापुढें आपण केवळ

पाहुण्याप्रमाणें राहूं लागला. अशा स्थितींत फेरोजशहा फार दिवस वांचला नाही. तो सप्टेंबर १४२२ महिन्यांत मरण पावला.

७ फेरोजशहाचे मागून, त्याचा भाऊ अहंमदखान हा तक्तावर बसला. हा आपले भावाप्रमाणें विषयासक्त वगैरे कांहीं नसून, त्याची वृत्ति त्याचे अगदीं उलट होती. हा आपणांस वली (साधु) ह्मणवीत असे, व तो मुसलमानी धर्म मोठ्या कडक रीतीनें पाळी. याचे कारकीर्दींत ब्राह्मणी राज्याचा दबदबा व भरभराट हीं तर राहिलींच; परंतु ह्याचे धर्मवेडामुळें, विजयानगरचे राज्यांतील हिंदु-प्रजेची कत्तल पुनः सुरू झाली.

विजयानगरचे राजानें, नुकतेंच फेरोजशहाचे कारकीर्दींत आपले राज्यांत फार नासाडी केली; तिजबद्दल सूड घेण्याकरितां, अहंमदशहानें मोठी फौज गोळा करून कर्नाटकावर स्वारी केली. त्यानें विजया-नगरचे सभोंवतालचा सर्व प्रदेश उध्वस्त केला, व पुरुष, स्त्रिया, मुलें यांचा कांहीं भेद न करितां, त्यांची कत्तल आरंभिली. तसेंच जागो-जाग देवळें पाडलीं, मूर्ती फोडल्या, व पाठशाला जमीनदोस्त केल्या. हा अनर्थ चाललेला पाहून, ५००० हिंदूंनीं, शहास कोठें तरी गांठून त्यास ठार करण्याचा कट केला. तो एके दिवशीं शिकारीचे नादांत आपले सैन्यापासून बराच दूर राहिलेला पाहून, त्यास त्यांनीं गांठलें, व एक वेळ तो त्यांचे हातीं सांपडून ठार केला जातो असेंही वाटलें; परंतु इतक्यांत त्याचे कांहीं सरदारांस त्याचे संकटाची बातमी लागून, ते त्याचे साहाय्यास आल्यामुळें, त्याचेवरचा प्रसंग टळला. यापुढें आपले मुलुखाचा पुष्कळ खराबा झालेला पाहून, विजयानगरचे राजानें शहास मागील सर्व थकलेले खंडणीची भरपाई करून देऊन, त्या-जबरोबर तह ठरविला (१४२२).

यानंतर दोन वर्षांनीं अहंमदशहानें वारंगुळचे राजावर फौज पाठवून त्याचा पराभव केला. त्याचे पुष्कळ सैन्याची कत्तल करून, खुद्द राजासही ठार केलें, व त्याचा सर्व मुलूख काबीज केला (१४२४). या शहाचें, माळवा व गुजराथ येथील सुलतानांबरोबरही थोडेसें युद्ध झालें; परंतु नंतर लवकरच त्यानें त्या दोघांशीं तह केला.

मागें, दुर्गादेवी ह्मणून जो भयंकर दुष्काळ दक्षिणेंत पडला होता ह्मणून सांगितलें, त्याचे योगानें गोदावरी व कृष्णा या दोन नद्यांमधील मुलुखाची इतकी खराबी झाली कीं, त्यांतून तो प्रांत सुमारें तीस वर्षेंपर्यंत सांवरला नाहीं. परगण्यांचे परगणे केवळ निर्जन झाले, व त्यामुळें, त्यांतून अर्थातच वसूल मुळींच होईना. डोंगरावरून असलेले किल्ले, जे यापूर्वीं मुसलमानांनीं जिंकले होते, ते आतां पुनः पाळेगार किंवा दरवडेखोर लोक यांचे हातीं गेले, व ते शेतकऱ्यांस आपले शेतांत मुळींच ठरूं देईनात. शेवटीं १४२९ या सालीं, अहंमदशहानें मलिक उत् तुगार या सरदाराबरोबर फौज देऊन, दरवडेखोरांचा नाश करून मुलुखांत बंदोबस्त करण्याकरितां पाठविलें. त्यानें आपणाबरोबर परगण्या परगण्यांचे देशमुख घेऊन, प्रथम खटावदेश व महादेवाचा डोंगर, यांतील सर्व रामोशी व दरवडेखोर नाहींसे केले. नंतर त्यानें वांईकडे कुच करून सभोंवतालचे कित्येक किल्ले काबीज केले, व तेथून तो घांटानें कोंकणांतही उतरला; नंतर तेथें कांहीं दिवस राहून, तो माघारा देशावर आला व तेथें, दादू नरसू काळे ह्मणून एक त्याचे विश्वासांतील कारकून होता, त्याजकडे त्यानें मुलुखाची व्यवस्था करण्याचें सोंपविलें. यावेळीं देश उध्वस्त झाला होता, ह्मणून दादू नरसू यानें दोन दोन तीन तीन गांवें एकाच गांवाचे हद्दींत अशीं घातलीं व शेतकरी लोकांस परत बोलावून, त्यानें त्यांस जमिनीची लागवड करण्यास सांगितलें. पहिले वर्षीं त्यानें सारा सर्वांसच माफ केला व दुसरे वर्षापासूनही दर बिघ्यामागें तोबराभर दाणा कायतो त्यांनीं द्यावा, असा त्यानें ठराव केला!*

अहंमदशहाचे वेळीं कलबुर्गा येथील राजधानी बदलून, ती बेदर शहरीं गेली. कारण पहिले शहरापेक्षां दुसरे शहराचें हवापाणी हें अधिक बरें होतें व यापुढें ब्राह्मणी राज्याचा शेवट होईपर्यंत, बेदर येथेंच राजधानी राहिली. अहंमशहास आपले धर्माचे साधूंविषयीं

---

* ग्रांट डफ.

मोठी भक्ति असे व तो त्यांचे आज्ञेप्रमाणें वागे. हा शहा इ० स० १४३९ या सालीं मरण पावला.

८ अहंमदशहा वल्ली याचे मागून त्याचा मुलगा, अल्लाउद्दीनशहा (दुसरा) हा त्याचे तक्तावर बसला. हा बराच पराक्रमी असून स्वभावानें गरीब व विचारी होता. यानें आपला धाकटा भाऊ महंमद यास, विजयानगरचे राजापासून आपली थकलेली खंडणी वसूल करण्याकरितां तिकडे पाठविलें असतां, त्यानें देवरायासच मिळून त्याचे मदतीनें मुद्गल, रायचूर, नळदुर्ग व सोलापूर हीं ठाणीं बळकावलीं. भावानें उत्पन्न केलेल्या बंडाचें वर्तमान अल्लाउद्दीनशहास कळतांच, तो मोठी फौज बरोबर घेऊन त्याशीं युद्ध करण्याकारितां निघाला. थोडेच दिवसांत दोघांची लढाई होऊन, तींत महंमद याचा पराभव झाला, व तो जंगलांत व पहाडांत पळून गेला; परंतु शहानें त्यास माफीचें पत्र पाठवून त्यास बोलावून आणून, त्याचा प्रीतीनें मोठा सत्कार केला, व त्यास रायचूर परगणा नेमणुकीदाखल करून दिला! यापुढें महंमदानेंही कांहीं दंगाधोपा न करितां, स्वस्थपणें चैनींत आपले दिवस काढले.

खानदेशाचा सुलतान नसीरखान यानें, आपली मुलगी अल्लाउद्दीन शहास दिली होती; परंतु तिजवरून शहाचें प्रेम उडून, त्यानें कोंकणांतील सोनखेडचे हिंदु राजाचे एका अति सुस्वरूप मुलीशीं लग्न केलें. यामुळें नसीरखानास राग येऊन त्यानें, वऱ्हाड प्रांतावर स्वारी केली; परंतु शहानें आपला सरदार मलिक उत् तुजार यास पाठवून त्याचा मोड केला, व त्यास मागें हांकून लाविलें. या कामगिरीबद्दल मलिक उत् तुजार याचा शहानें मोठा सत्कार करून, त्यास दौलताबादेची सुभेदारी दिली. याचवेळीं सुलतानानें असाही हुकूम दिला कीं, दरबारांत दक्षिणी व हबशी लोकांवर मोंगल लोकांस जागा द्यावी. यापूर्वीच कांहीं वर्षांपासून, ब्राह्मणी राज्यांतील सरदारांत दोन फळ्या उत्पन्न झाल्या होत्या—एक दक्षिणी मुसलमान व हबशी यांची, व दुसरी परदेशी लोक ह्मणजे मोंगल, तुर्क, इराणी यांची. या दोघांमध्यें यापुढें अधिकाधिक चुरस वाढत जाऊन,

ब्राह्मणी राज्याचा ऱ्हास होण्यास जीं कित्येक कारणें झालीं, त्यांपैकीं हें एक मुख्य झालें. मलिक उत् तुजार जो परदेशी लोकांचा मुख्य होता, त्यास व त्याचे पक्षास सुलतानानें दिलेला मान पाहून, विरुद्ध पक्षाचे लोकांस अतिशय वाईट वाटलें, व ते यापुढें आपले प्रतिस्पर्ध्यांचा पाडाव कसा होईल या उद्योगास लागले! [ १४३७ ].

विजयानगरचा राजा देवराय यास आलीकडे कांहीं वर्षांपासून असें वाटूं लागलें होतें कीं, ब्राह्मणी सुलतानास आपणांस खंडणी द्यावी लागते, ती कशी तरी एकदां काढून टाकिली पाहिजे. ह्मणून त्यानें आपले प्रधान मंडळीचे संमतीनें, आपले फौजेंत मुसलमान लोक चाकरीस ठेवण्याचा क्रम चालविला, व त्यांस निमाज पढण्याकरितां मशिदी वगैरे बांधून देऊन, त्यांची नीट व्यवस्था ठेविली. याखेरीज त्यानें आपली हिंदु फौजही अधिक वाढवून, तो कृष्णेच्या कांठीं लढाईचे तयारीनें आला. अल्लाउद्दीनशहा यासही ही खबर कळतांच त्यानेंही आपली फौज गोळा केली. उभयपक्षांच्या तीन मोठ्या लढाया झाल्या; परंतु त्यांत विशेष सरशी कोणाची झाली नाहीं. देवरायाचा मुलगा एका लढाईंत पडला, व सुलतानाचे दोन मोठे सरदार शत्रूंचे हातीं लागले. शेवटीं देवरायानें पूर्वीप्रमाणें खंडणी देण्याचें कबूल केल्यावरून, लढाई बंद होऊन उभयपक्षांचा तह झाला [ १४४३ ].

येथपर्यंत अल्लाउद्दीनशहाचा राज्यकारभार उत्तम प्रकारें चालला असून, त्याचें वर्तनही चांगलें असे. त्यानें मुलकी व लष्करी खात्यांतून चांगली व्यवस्था ठेविली होती. लोक धर्माचरणानें चालतात किंवा नाहीं हें पाहण्याकरितां, तो काजी व मौलवी यांस वरचेवर चोहोंकडे पाठवीत असे. लोकांनीं दारू पिऊं नये ह्मणून त्याची मोठी सक्ति असे. त्याचप्रमाणें जुवेगारांस तो मोठी शिक्षा करी. भिकाऱ्यांनीं भिक्षा मागूं नये, त्यांनीं कांहीं तरी उद्योग करावा, ह्मणून त्यांसही तो शिक्षा देत असे. " त्यानें मूर्तिपूजकांचीं देवळें पाडून तेथें मशिदी बांधिल्या. तो ब्राह्मणांशीं कधीं बोलत नसे व त्यांस तो कधीं राज्यांत

कामांवर नेमूं देत नसे.$ ” परंतु विजयानगरचे लढाईवरून आल्यापासून शहाचें हें सद्वर्तन अगदीं बदललें. यापुढें तो ऐषआरामांत अगदीं गर्क होऊन गेला. सर्व राज्यकारभार प्रधानावर टाकून, तो अक्षयीं महालांत पडून राही. त्यानें आपले जनानखान्यांत १००० स्त्रिया गोळा केल्या असें ह्मणतात. कचेरींत तो कधीं चार पांच महिन्यांतून एकादेवेळीं आला तर येई!

मागें अहंमदशहा वल्ली याचे कारकीर्दींत, कृष्णा व गोदावरी या नद्यांमधील प्रांतांत, पाळेगार, दरवडेखोर लोक वगैरेचा दंगा मोडून, तेथें दादू नरसू याचेकडून मलिक उत् तुजार यानें व्यवस्था लाविली ह्मणून लिहिलें आहे; परंतु ती व्यवस्था फार दिवस टिकली नाहीं. त्या प्रांतांत पुनः बंदोबस्त नाहींसा झाला. ह्मणून तो पुनः नीट करावा व होईल तर घांट व कोंकण या दोन्ही प्रांतांतील सर्व डोंगरी किल्ले हस्तगत करावे व तो सर्व मुलुख सर करावा, या हेतूनें अल्लाउद्दीनशहानें, १४५३ या वर्षीं मलिक उत् तुजार या सरदारास बरोबर फौज देऊन त्या प्रांतीं पाठविलें. मलिक उत् तुजार यानें चाकण येथें मुख्य छावणी करून, तेथून सैन्याच्या निरनिराळ्या टोळ्या पाठवून, एकामागून एक डोंगरी किल्ले घेण्याचा क्रम चालविला. तो अखेर स्वतः कोंकणांत उतरला व त्यानें शिरके याचा किल्ला घेतला. यावेळीं शिरके याचें सर्व कुटुंब मुसलमान लोकांचे हातीं आलें. तुजार यानें शिरक्यास मुसलमान होण्याविषयीं धमकी देऊन सांगितलें; परंतु त्यानें युक्तीनें तुजार यास ह्मटलें कीं, “ मुसलमान होण्यास माझी स्वतःची कांहीं हरकत नाहीं; परंतु आमचे प्रांतांत *खेळण्याचा राजा शंकरराय हा माझा नातेवाईक असून प्रतिस्पर्धी आहे. मीच एकटा बाटलों तर, तो माझे लोकांस मजविरुद्ध चिथवील व माझी चोहोंकडे टर उडवील, तर तुह्मीं त्याचे प्रांतावर स्वारी करून तो प्रथम माझे स्वाधीन करून द्या, ह्मणजे मी

---

$ प्रो० मोडक. मूर्तिपूजकांचीं देवळें पाडणें, ब्राह्मणांशीं कधीं न बोलणें, हें मुसलमान इतिहासकारांचे दृष्टीनें शहाचे सद्गुण होत; हिंदु किंवा इतर धर्माचे लोकांचे दृष्टीनें ते अर्थातच नव्हत, हें निराळें सांगणें नकोच.

* विशाळगड.

लागलाच मुसलमान होतों. मग मी आपली स्वतःची व या प्रांतांतील सर्व पाळेगार लोकांची खंडणी सुलतानाकडे दरवर्षी पाठविण्यास कधींही चुकणार नाहीं." शिरके याचें हें कपटाचें भाषण तुजार यास कळलें नाहीं. तो लागलाच तसें करण्यास कबूल होऊन, खेळण्याचे किल्ल्याकडे फौज घेऊन निघाला; परंतु ती वाट फार अवघड डोंगराळ मुलखांतून आहे, असें जेव्हां त्याचे फौजेस समजलें, तेव्हां दक्षिणी व हबशी सरदार हें पुढें पाऊलच टाकीनात. तेव्हां मलिक उत् तुजार हा शिरके याजवर भरंवसा ठेवून, आपले परदेशी फौजेसहच पुढें सरसावला. शेवटीं मुसलमान लोकांची फौज त्या डोंगराळ प्रदेशांतून जातां जातां एका अशा बिकटजागीं येऊन पोहोंचली कीं, तेथें दोन्हीं बाजूंनीं गगनचुंबित डोंगर लागून गेले असून, समोर समुद्राची खाडी दिसत होती. जाण्याची वाट इतकी अरुंद होती कीं, तेथें दोन तंबूसुद्धां शेजारीं शेजारीं देतां येऊं नयेत; परंतु सर्वांत मोठें संकट ह्मटलें ह्मणजे त्या प्रदेशांतील वाईट हवेमुळें मलिक उत् तुजार हा हगवणीनें अतिशय बेमार होऊन, त्यास आपले लोकांस शिस्त ठेवण्यास हुकूम देण्याचेंही सामर्थ्य उरलें नव्हतें! अशा स्थितींत तें सैन्य एके दिवशीं दिवसभर पहाडी मजल कंठून दमून भागून अव्यवस्थितपणें रात्रीं पडलें असतां, शिरक्यानें शंकररायास गुप्तपणें सूचना पाठवून, त्या फौजेवर एकाएकीं छापा घातला व त्या सर्वांची कत्तल करविली! या प्रसंगीं ७,००० मुसलमानलोक अगदीं गारद झाले व त्यांत मलिक उत् तुजार हाही ठार झाला.*

वरील भयंकर कत्तलेंतून परदेशी फौजेपैकीं जे लोक सुटून पळाले, ते चाकणचे छावणींत हळू हळू येऊन गोळा झाले. ते दक्षिणी व हबशी लोकांस मागें राहिल्याबद्दल दोष देऊं लागले; व त्याचे उलट दक्षिणी व हबशी लोक हे परदेशी लोकांस असें ह्मणूं लागले कीं, आह्मीं नको नको ह्मणत असतां, मलिक उत् तुजार यानें दुराग्रहानें बिकट पहाडी प्रदेशांत जाऊन आपला व आपले फौजेचा नाश करून घेतला. यावेळीं अल्लाउद्दीनशहाचें लक्ष मागें लिहिल्याप्रमाणें राज्य-

* या स्वारीचें वर्णन मूळ ग्रंथांत खरोखर फार चटकदार केलें आहे.

कारभारांत नसून, त्यानें तो सर्व प्रधानांवर सोंपविला होता व दक्षिणी सरदारांपैकीं बरेच लोक प्रधानमंडळांत असल्यामुळें, त्यांनीं परदेशी लोकांविषयीं शहास भलभलता मजकूर समजाऊन दिला, व चाकण किल्ल्यांतील त्या सर्व लोकांची कत्तल करविली. येणेप्रमाणें यावेळे-पासून दक्षिणी व परदेशी लोकांचें अगदीं हाडवैर पडून, ते एकमेकाचे नाशाविषयीं टपून बसूं लागले! ( १४५३ ).

९ यापुढें चार वर्षांनीं शहा मरण पावला व त्याबरोबरच ब्राह्मण-शाईचें वैभव व भरभराट ह्यांस उतरती कळा लागली. त्याचे मागून त्याचा मुलगा हुमायूनशहा हा गादीवर बसला. हा अतिशय क्रूर, जुलमी व अविचारी असल्यामुळें, त्याचे राज्यांतून कित्येक चांगले चांगले कामगार त्यास सोडून गुजराथेंत निघून गेले. त्याचा धाकटा भाऊ हसनखान यास कित्येक सरदार अनुकूल होऊन त्यांनीं बंड केलें; परंतु शहानें तें लवकरच मोडून टाकिलें. त्यानें हसनखानास एका भयंकर वाघापुढें टाकून त्याजकडून त्यास खावविलें, व जे सरदार त्यास मिळाले होते, त्यांचीं त्यानें आपल्या समक्ष डोकीं उडविलीं व त्यांच्या स्त्रियांस त्यांचे वाड्यांतून ओढून आणून राजमहालांतील चौकांत त्यांची दांडग्या व सोरट लोकांकडून अप्रतिष्ठा करविली! परंतु या दुष्ट सुलतानाचें राज्य सुदैवानें फार वेळ चाललें नाहीं. त्यास १४६१ यासालीं आजार होऊन त्यांत तो मरण पावला.

१० याचे मागून याचा मुलगा निजामशहा हा तक्तावर बसला. तो केवळ आठ वर्षांचा असल्यामुळें, त्याची आई ही, खाजेखान महंमद गवान ह्मणून कोणीएक अति सुविचारी, भला व स्वामिभक्त असा प्रधान होता, त्याचे मदतीनें राज्यकारभार चालवूं लागली. ही बेगमही फार योग्य स्त्री होती. हिंदुस्थानचे इतिहासांत चांदबिबी, अहिल्या-बाई वगैरे ज्या थोड्या राज्यकर्त्या, हुषार व शहाण्या अशा स्त्रिया होऊन गेल्या, त्या वर्गांतीलच ही बेगम होय. हिनें अल्पवयी शहास दरबारांत नियमानें पाठवून, प्रधानांचे मार्फत राज्यकारभार मोठे हुषारीनें व न्यायानें चालविला व त्यामुळें हुमायूनशहाचे जुलमास व क्रूरपणास प्रजा जी अगदीं त्रासून गेली होती, ती आतां अगदीं शांत व संतुष्ट

झाली; तथापि शहा लहान असून स्त्री राज्य चालवित आहे, तेव्हां ब्राह्मणीराज्यावर स्वारी करण्यास ही संधि बरी आहे, असा विचार करून, माळव्याचे सुलतानानें दक्षिणेंत स्वारी केली. त्याचे फौजेपुढें निजामशहाचे फौजेस टिकाव धरवेना व शहास बेदरास आश्रय धरण्यास जावें लागलें; परंतु तेथेंही त्याचा निभाव न लागून, तो अखेर फेरोजाबादेस गेला व त्यानें गुजराथेचे सुलतानाची कुमक मागितली. त्यावरून गुजराथेची फौज दक्षिणेंत येऊन, तिनें माळव्याचे फौजेचा पराभव केला व तीस मागें आपले देशांत हांकून लाविलें. यावेळीं महंमद गवान यानेंही, शत्रूंवर वरचेवर छापे घालून व धान्य, गवत वगैरे माळव्याचे फौजेस अगदीं न मिळे असा कडेकोट बंदोबस्त करून, त्यांचे फार हाल केले.

येणेप्रमाणें परचक्राचें अरिष्ट टळलें; परंतु निजामशहा हा पुढील सालीं ह्मणजे १४६२ सालीं, त्याचा लग्नसमारंभ मोठ्या थाटानें चालून तो संपण्यापूर्वींच, रात्रीं एकाएकीं मरण पावला. त्याचे मागून त्याचा धाकटा भाऊ महंमदशहा ( दुसरा ) हा गादीवर बसला. त्याचें वय ९ वर्षांचें होतें. हा शहाही लहान असल्यामुळें, पूर्वीप्रमाणें त्याची आई व महंमद गवान यांनींच राज्यकारभार चालविला. मलिक उत् तुजार याचे फौजेचा नाश झाल्यापासून, ब्राह्मणी राज्यांत कांहीं दिवस विशेष व्यवस्था नसल्यामुळें, कोंकणांत फौज पाठविण्यास झालेंच नाहीं. शेवटीं १४६९ या सालीं महंमद गवान हा फौज घेऊन खेळण्याचे राजाचें पारिपत्य करण्याकरितां कोंकणांत गेला व त्यानें त्याचा किल्ला घेतला. यानंतर थोडेच दिवसांनीं, त्यानें विजयानगरचे राजाचे ताब्यांत असलेलें गोंवें शहरही हस्तगत करून घेऊन, त्यानें सर्व कोंकणप्रांत सर केला, व तेथें त्यानें कीश्वरखान यास सुभेदार नेमिलें. ( १४७० ).

याच सुमारास ओरिसा प्रांतावर, निजाम उलमुल्क बहिरी या सरदारास, शहानें फौज देऊन पाठविलें व त्यानें कंडापिली व राजमहेंद्री हीं दोन्हीं ठाणीं घेतलीं. या कामगिरीवरून निजाम उलमुल्कास तेलंगण प्रांताची सुभेदारी शहानें दिली व अशाच प्रकारची कामगिरी

खानदेशांत जाऊन युसफ आदीलखान यानें बजावल्यावरून, त्यास त्यानें दौलताबादेची सुभेदारी सांगितली. महंमदशहा यानें स्वत: दक्षिणेस बेळगांवाकडे फौज घेऊन जाऊन, त्यानें तेथील राजाचा पराभव केला व त्याचा बळकट किल्ला काबीज केला. ( १४७२ ). याच वर्षीं शहाची आई, जिनें त्याच्या लहानपणीं त्याचें राज्य संभाळिलें व तो मोठा झाल्यावर त्यास वेळोवेळीं चांगला सल्ला देऊन त्याचे उपयोगीं पडली, ती मरण पावली.

सन १४७७ यावर्षीं कंडापिली येथें बंड उत्पन्न झालें. तें मोडण्याकरितां शहा तेथें गेला व त्यानें तें शहर हस्तगत केलें. या शहरांत एक हिंदूचें देऊळ होतें तें त्यानें पाडून टाकून, तेथील कांहीं ब्राह्मणांस त्यानें आपले हातानें ठार केलें. हें कृत्य कित्येक दक्षिणी लोकांस आवडलें नाहीं व कांगो ब्राह्मणीचे पवित्र ज्ञातीचे मनुष्यांस सुलतानानें ठार मारिलें, हें अशुभ झालें व तेणेंकरून ब्राह्मणी राज्यास उतरती कळा लागली, असें ते ह्मणूं लागले; परंतु ब्रह्महत्येपेक्षां या विनाश काळाचीं विशेष ठळक अशीं दुसरीं कांहीं कारणें, शोधक मनुष्यांस या काळाचे पूर्वीच कित्येक वर्षांपासून दिसूं लागलीं होतीं; व त्यांचे निर्मूलनार्थ कांहीं दूरदर्शी लोकांनीं कांहीं उपायांची योजनाही केली होती; परंतु ती पूर्ण अमलांत येण्यापूर्वीच योजकांचा नाश होऊन राज्याचा व्हावयाचा तो नाश झाला!

ब्राह्मणी राज्य, पहिला अल्लाउद्दीनशहा यानें स्थापन केल्यानंतर, थोडेच वर्षांनीं त्यानें त्याचे निरनिराळे असे चार विभाग करून, प्रत्येकास तरफ असें नांव दिलें व त्याजवर एक एक तरफदार नेमून, त्याचे हातीं तेथील लष्करी, मुलकी, न्यायमनसुब्याचा वगैरे सर्व अधिकार दिला, ह्मणून मागें या भागाचे आरंभींच सांगितलें आहे. यापुढें महंमदशहा ( दुसरा ) याचे वेळेपर्यंत ह्मणजे सुमारें दीडशें वर्षांमध्यें तेलंगण, विजयानगर, ओरिसा, कोंकण या प्रांतांतील कित्येक भाग ब्राह्मणी राज्यांत हळूं हळूं सामील झाल्यामुळें, तें बरेंच अवाढव्य झालें; परंतु त्याचे वृद्धीचे मानानें त्यांत विशेष बंदोबस्त व नवीन नवीन व्यवस्था हीं जीं करायाला पाहिजे होतीं, तीं मुळींच कधीं केलीं

नसल्या कारणानें, त्याची वृद्धीच त्याचे नाशास कारण झाली. पूर्वी-पासूनच तरफदारांकडे सर्व अधिकार दिला असून, त्यांचे तरफांचा विस्तार होत चालला, तरी त्यांमधील निरनिराळे खात्यावरून स्वतंत्र कामगार नेमून, तरफदारांचा अधिकार फार मोठा होऊं न देण्याविषयीं कोणी सुलतानांनीं खबरदारी घेतली नाहीं. पहिले अल्लाउद्दीनशहा-पासून दुसरे अल्लाउद्दीनशहापर्यंत जे दहा सुलतान होऊन गेले, ते चांगले पराक्रमी असल्यामुळें, तरफदार जरी मोठे होत चालले, तरी ते शहास वचकत असत; परंतु हुमायूनशहाची वाईट कारकीर्द व त्यामागून निजामशहा व महंमदशहा यांचें बाळपण व त्यामुळें शहाण्या परंतु दुर्बळ अशा स्त्रियांचे हातीं कारभार चालणें, इत्यादि गोष्टींचेमुळें, तक्ताचें वजन कमी होऊन तरफदार शिरजोर होत चालले व त्यामुळें, एकंदर राज्याचे निरनिराळे तुकडे होऊन तें मोडून जाण्याची भीति वाटूं लागली!

हा अनर्थ टाळावा ह्मणून, महंमदशहा ( दुसरा ) याचा वजीर महंमद गवान यानें, पुढील युक्ति काढली. त्यानें प्रत्येक तरफेचे दोन दोन विभाग करून, त्यांतील एकावर जुने तरफदार तसेच ठेविले व नवीनांवर नवीन तरफदार नेमिले. ही जुनी व नवी व्यवस्था कशी झाली, हें खालचे तक्त्यावरून समजून येईल:—

| जुने तरफ. | नवे तरफ. | तरफदार. |
|---|---|---|
| १ कलबुर्गा. | १ विजापूर.<br>२ हसनाबाद. | महंमद गवान.<br>दस्तुर दिनार. |
| २ दौलताबाद. | १ दौलताबाद.<br>२ जुन्नर. | युसफ अदीलखान.<br>फकीर उलमुल्क. |
| ३ तेलंगण. | १ राजमहेंद्री.<br>२ वारंगुळ. | निजाम उलमुल्क बहिरी.<br>अझीमखान. |
| ४ वऱ्हाड. | १ गावल.<br>२ माहूर. | फत्ते उल्ला इमाद उलमुल्क.<br>खोदवंदखान. |

येणेंप्रमाणें प्रत्येक तरफेचे दोन दोन विभाग करून, त्याशिवाय त्या प्रत्येक विभागांत सुलतानाच्या खाजगी उत्पन्नाकरितां ह्मणून कित्येक गांव तोडून दिले व त्यांवर सुलतानाचे विशेष विश्वासाचे कारकून नेमिले. यांतील अंतस्थ हेतु असा होता कीं, या कारकुनांचे मार्फत तरफांतील सर्व खरे व्यवस्थेची सुलतानास बातमी लागावी. ही नवीन सुधारणा, सन १४७८ सालीं महंमद गवान वजीर यानें महंमदशहाचे हुकुमानें सुरू केली.

महंमद गवान हा मूळचा इराणचे एका राजघराण्यांतला होता; तथापि स्वदेशांतील कारस्थानें, दगे वगैरे गोष्टीस कंटाळून, त्यानें व्यापाऱ्याचा पेषा घेतला व निरनिराळे देशांत प्रवास करण्यांतच त्यानें आपलें पूर्व वय घालविलें. यास विद्येची उत्तम अभिरुचि असून, कविता करण्याचीही शक्ति होती. हा फिरतां फिरतां शेवटीं दाभोळचे बंदरांत उतरून तो बेदरास गेला असतां, अल्लाउद्दीनशहा ( दुसरा ) यानें त्याचे अलौकिक गुण पाहून त्यास आपले पदरीं राहून घेतलें. यापुढें तो हुमायूनशहाचे कारकीर्दीत वजीर झाला व तेव्हांपासून पुढें त्यानें तें काम मोठ्या हुषारीनें, विश्वासानें व नेकीनें चालविलें. महंमद गवान ह्याचें आचरण फार पवित्र, त्याचा धर्मादाय मोठा, व त्याची इभ्रत, शहाणपण, व चातुर्य हीं अलौकिक होतीं. त्याचा सर्व पैसा पाठशाळांची स्थापना, विद्वान् लोकांचा सत्कार, गोरगरीबांचें संगोपन, इत्यादि उपयुक्त गोष्टींकडेसच होत असे. त्याचा स्वतःचा खर्च दररोज दोन रुपये इतकाच काय तो असे!

येणेंप्रमाणें हा मुसलमान मुत्सद्दी, आमचे इतिहासांतील बाळाजी विश्वनाथ पेशवे किंवा नाना फडनवीस यांचेप्रमाणें राज्यकारभारांत मोठा निष्णात असून, आचरणाचेसंबंधानें त्यांचेपेक्षां अधिक पवित्र असा होता; परंतु इतके तऱ्हेनें त्याचें वजन असतांही, त्यानें तरफदारांचा अधिकार कमी करून, शहाचा अधिकार वृद्धिंगत करण्याकरितां जेव्हां वर सांगितलेली योजना केली, तेव्हां त्यास बरेच सरदार लोक शत्रु झाले. शिवाय तो स्वतः परदेशी लोकांचा मुख्य असा सम-

जला जात असल्याकारणानें, त्याजविषयीं दक्षिणी व हबशी लोकांस मत्सर व द्वेष हीं वाटत होतींच. त्यांस हें नवीन कारण मिळतांच, ते अर्थात् त्याचे नाशाविषयीं खटपट करूं लागले. यांत तेलंगणचा सुभेदार निजाम उल्मुल्क, जो दक्षिणी पक्षाचा मुख्य होता, तो प्रमुख होता. त्यास आपले तरफेंत दुसरा मनुष्य—अझीमखान हा घुसविलेला पाहून, बरें न वाटून त्यानें शहास अर्ज केला कीं, " माझे तरफेचें काम माझा मुलगा मलिक अहंमद हा करण्याजोगा आहे, तेव्हां त्यास मी तेथें आपला नायब ह्मणून ठेवून, हुजूर नरसिंगरायाचे मुलखावर स्वारी करण्यास जाणार आहेत, तर आपणांबरोबर स्वारींत रहावें अशी माझी विनंति आहे. " त्यावरून महंमदशहानें निजाम उल्मुल्काचें ह्मणणें मान्य करून, त्यास आपले बरोबर स्वारीस घेतलें.

यानंतर थोडेच दिवसांनीं, निजामानें शहाचे हुजऱ्यांकडून त्याचे कान महंमद गवानाविरुद्ध भरण्यास आरंभ केला. त्याचेयोगानें सुलतानाचेंही मन हळूं हळूं कलुषित होऊन, त्याची वजिराविषयींची भक्ति उडत चालली. शहाचे मनाची अशी स्थिति झाली असतां, निजामानें गवानाचे एका दासास दारू पाजून, तिचे गुंगींत त्याजकडून एका कोरे कागदावर त्याचे ताब्यांत असलेल्या वजीराचे मोर्तबाचा छापा मारून घेतला व त्याचे डोक्यावर त्यानें ओरिसाचे राजास गवानानें पुढील मजकुराचें पत्र लिहिल्यासारखें खोटें पत्र लिहिलें. ' आह्मीं सर्व सरदार शहाचे क्रूरपणास कंटाळून गेलों आहों, तर तुह्मीं जर यावेळीं राज्यावर स्वारी करून याल, तर आह्मीं तुह्मांस कुमक करूं व मग सर्व राज्य तुह्मीं आह्मीं वांटून घेऊं. ' हें बनावट पत्र पाहतांच, तें खरें आहे असें वाटून, वजीराचे बेइमानपणाविषयींची शहाचे मनाची पक्की खात्री झाली. महंमद गवानास ताबडतोब बोलावून आणून त्या पत्राबद्दल त्याचा जबाब विचारला. वजीरानें ' हें पत्र खोटें आहे, पूर्ण चौकशी कराल तर आपणांस खरी हकीगत कळून येईल, ' वगैरे पुष्कळ सांगितलें; परंतु सुलतानाचें मन पक्कें दूषित झालें असून त्यांत तो दारू प्याला असल्यामुळें, त्यास विचार

मुळींच राहिला नव्हता. त्यानें एकदम वजीराचें तेथल्यातेथेंच डोकें उडविण्याविषयीं हुकूम देऊन, तो जनानखान्यांत निघून गेला. ( १४८१ ).

महंमद गवान याचा वध झाल्यानंतर, थोड्याच दिवसांनीं त्याचे शत्रूंनीं केलेलें कपट सुलतानाचे लक्षांत आलें. त्यामुळें, त्यास आपले अविचाराचे कृत्याबद्दल पुष्कळ पश्चात्ताप झाला; परंतु गोष्ट होऊन गेल्यावर त्याचा काय उपयोग? वजीराचे वधामुळें, बहुतेक सुभेदारांस शहाविषयीं तिटकारा उत्पन्न झाला. ते यापूर्वी डोईजड झालेच होते व आतां त्यांस आपली बेपर्वाई दाखविण्यास आयतीच संधि मिळाली. ते यानंतर शहाचा हुकूम वगैरे न घेतां, मोहिमेवरून आपापल्या फौजा घेऊन आपापल्या सुभ्यांकडे परत निघून गेले! सरदारांनीं केलेला हा अवमान पाहून, शहास अतिशय वाईट वाटलें; परंतु नाइलाज ह्मणून, त्यास तें सहन करणें भाग पडलें; कारण तसें न केलें व त्यांस शासन करण्याचा विचार केला, तर ते आतांच बंड करतील, असें त्यास वाटलें. गवानाचे वधाविषयींची गोष्ट त्याचे मनांत पुनः पुनः येई व ती मनांतून निघून जावी, ह्मणून तो दारू पिण्याचे वगैरे व्यसनांत दिवस घालवूं लागला; परंतु अशा स्थितींत तो फार वर्षें वांचला नाहीं. त्यास लवकरच दुखणें लागून, तो १४८२ सालीं मरण पावला. मरतेवेळीं त्यास फार यातना होऊन, ' महंमद गवान मला तोडीत आहे, ' असें तो वारंवार ओरडे, असें ह्मणतात.

११ महंमदशहाचे मरणानंतर, त्याचा मुलगा महंमुदशहा हा त्याचे तक्तावर बसला. त्यावेळीं त्याचें वय फक्त १२ वर्षांचें होतें. आधींच राज्यांत अव्यवस्था झालेली असून, सुभेदार शहास डोईजड झाले होते, व त्यांत तक्तावर लहान मुलगा बसला, मग काय विचारितां? अर्थातच राज्यांत अधिकाधिक गोंधळ उत्पन्न होऊन, सुभेदार स्वतंत्र होण्यास आरंभ झाला. महंमुदशहा तक्तावर बसल्यानंतर, थोडेच दिवसांनीं त्यास मुजरा करण्याकरितां, युसफ अदीलखान व फत्ते उल्ला इमाद उलमुल्क हे सरदार आपापले सुभ्यांवरून आले.

हे दोघेही परदेशी लोकांचे पक्षाचे असून, त्यांतील पहिल्यास, महंमद गवान यानें आपला पुत्र असें ह्मटलें होतें. यावेळीं दक्षणी व परदेशी या दोन पक्षांचें वैमनस्य फारच वाढलें असून, ते एकमेकांशीं मोठे सावधगिरीनें रहात होते. प्रथम कांहीं वेळ दोघांचा सल्ला झाल्यासारखा दिसत होता; परंतु निजाम उल्मुल्कानें कपटानें एके दिवशीं, एकाएकीं राजधानींतील परदेशी फौजेवर हल्ला करून त्यांची मोठी कत्तल केली. ही बातमी, शहराबाहेर परदेशी लोकांची फौज होती तीस लागतांच, ती शहरचे वेशीचीं दारें फोडून आंत घुसली व तिनें दक्षणी पक्षाचे लोकांचा चांगला सूड घेण्यास प्रारंभ केला. हा दंगा सुमारें २० दिवस चालला. शेवटीं राजधानींतील सय्यदांचे मध्यस्तीनें दोहों पक्षांची समजूत पडून असें ठरलें कीं, यूसफ अदीलखान यानें आपले विजापूरचे सुभेदारीवर परदेशी सर्व फौज घेऊन निघून जावें व निजामानें वजीरीचें काम चालवावें. येणेंप्रमाणें ठराव होऊन, यूसफ अदीलखान हा जो एकदां विजापुरास निघून गेला, तो तेव्हांपासून पुनः बेदरास परत आलाच नाहीं. तो विजापुरासच हळूहळू स्वतंत्रपणें राहण्यास लागून, सन १४८९ सालापासून तर तो आपणास सुलतान असें ह्मणवूं लागला.

यूसफ अदीलखान हा निघून गेल्यावर, निजाम उल्मुल्क यानेंच सर्व राज्यकारभार बळकावला; परंतु त्यास थोडेच दिवसांत दस्तुर दिनार, कासीम बेरिद वगैरे सरदार हे शत्रु उत्पन्न झाले. तो, वारंगुळचा सुभेदार कोवा उल्मुल्क याचें बंड मोडण्याकरितां, तेलंगणांत लहान सुलतानास घेऊन गेला असतां, चाकणचा जहागीरदार झैन उद्दीन याचे बंडाची त्यास बातमी लागली. त्यावरून त्याचे बंदोबस्ताकरितां त्यानें, आपला मुलगा मलिक अहंमद यास पाठवून देऊन, तो स्वतः तेलंगणांतच राहिला; परंतु तेथेंही छावणींत शहा, दस्तुर दिनार व कासीम बेरिद यांचा आपणांविरुद्ध झालेला कट पाहून व आपण तेथेंच राहिलों असतां आपला घात होईल अशी त्यास भीति वाटून, तो वारंगुळाहून छावणी सोडून बेदरास येऊन दाखल झाला. तेथें येण्याचा त्याचा इरादा असा होता कीं, शहाचा खजीना जो त्यानें

चढविलेल्या एका कामगाराचे हातीं होता, तो होईल तितका लांबवून, मग आपण आपला पुत्र मलिक अहंमद याजकडे जुन्नराकडे निघून जावें; परंतु खजीन्यावरील कामगार हा शहास मिळाला असल्यामुळें, त्यानें निजामास एकांतीं मसलत करण्याचे मिषानें एकीकडे गांठून, त्यास ठार केलें व त्याचें डोकें कापून तें महंमुदशहाकडे वारंगुळास पाठवून दिलें !

निजाम उल्मुल्क याचा येणेंप्रमाणें नाश झाल्यावर, त्याचा मुलगा मलिक अहंमद यानें अर्थातच बंड केलें. त्याचेकडे दौलताबाद, जुन्नर वगैरे प्रांतांची सुभेदारी यापूर्वीपासूनच असल्यामुळें, तो फौजफांटा बाळगून मजबूत होता. त्याजवर महंमुदशहानें कित्येक वेळां आपल्या फौजा पाठविल्या; परंतु त्या सर्वांचा त्यानें पराभव केला, व अखेर भिंगार या गांवाजवळ आपले स्वतःचे नांवाचें अहंमदनगर ह्मणून नवीनच शहर वसविलें. यानंतर थोडेच दिवसांनीं तो आपणास सुलतान असें ह्मणवूं लागून, त्यानें मशिदींतून आपले नांवानें खुतबा वाचविण्यास आरंभ केला.

याचे पूर्वीच वऱ्हाडचा सुभेदार फत्तेउल्ला इमाद उलमुल्क हाही स्वतंत्रपणें वागूं लागला होता, व सरासरी १४८४ सालपर्यंत, तो शहाचे कधीं हुकूम मानी, कधीं नाहीं, असें त्यानें चालविलें होतें; परंतु वरील सालापासून, त्यानें आपणांस सुलतान असें ह्मणविण्यास आरंभ केला.

येणेंप्रमाणें ब्राह्मणी राज्याची अगदीं अव्यवस्था होऊन, त्याचीं १४८९ सालापर्यंत तीन लहान लहान स्वतंत्र राज्यें झालीं. वऱ्हाड, विजापूर, दौलताबाद, जुन्नर असे त्याचे चांगले चांगले प्रांत निघून जाऊन, महंमुदशहाचे ताब्यांत तेलंगण व बेदर आणि कलबुर्गा या शहरांभोंवतालचा मुलूख हेच काय ते राहिले; परंतु हीही निकृष्ट स्थिति फार दिवस टिकली नाहीं ! महंमुदशहा हा वयांत आल्यावर, तो अगदीं मूर्ख असा निपजून, तो राज्यकारभार वगैरे कांहीं एक पाहिनासा झाला. तो असर्यी दारू पिऊन गुंग असे. यामुळें

लबाड व कारस्थानी सरदारांस संधि सांपडून, त्यांनींच सर्व राज्यकारभार आटोपला. मागें सांगितलेला कासीम बेरिद, हा वजीर होऊन त्यानें प्रथम, व त्याचे मरणानंतर त्याचा मुलगा अमीर बेरिद यानें मागून, असें, शहास केवळ बाहुलें करून टाकिलें. अशी स्थिति झाली असतां, तेलंगणचा सुभेदार कुतुब उल्मुल्क हाही १५१२ सालीं स्वतंत्र झाला. व मग महंमुदशहाच्या नांवाचाही अंमल त्याचे दोन राजधान्यांचे सभोंवतीं कायतो राहिला !

वर सांगितल्याप्रमाणें ब्राह्मणी राज्याची अति निकृष्ट अवस्था होऊन, महंमुदशहा हा बेरिदांचे केवळ हातांतल्याप्रमाणें होऊन गेला. ते जें सांगतील त्याप्रमाणें त्यास करावें लागे ; व ते जी नेमणूक करून देतील, तींत त्यास रहाणें भाग पडे. शेवटीं या नीच स्थितीस कंटाळून, तो, अमीर बेरिदाचे कचाटींतून पळून जाऊन, वऱ्हाडचा नवीन सुलतान फत्तेउल्ला इमाद उल्मुल्क याचे आश्रयास गेला, व त्याची फौज बरोबर घेऊन त्यानें बेरिदावर चाल केली ; परंतु दोन्ही सैन्यें समोरासमोर उभीं राहून लढाईस आरंभ झाला असतां, महंमुदशहा हा, एकाएकीं वऱ्हाडचे सुलतानाचे लष्करांतून पळून, बेरिदाचे सैन्यांत येऊन मिळाला. त्यास, कदाचित् वऱ्हाडांत गेल्यानें आगींतून निघून फोपाट्यांत पडतों असें वाटलें असावें, असें ह्मणतात ! शहा पुनः आपले ताब्यांत आल्यावर अमीर बेरिदानें अर्थातच त्यास अधिक प्रतिबंधांत ठेविलें ( १५१४ ). आपले या हतभाग्य स्थितीस कांहीं उपाय नाहीं असें समजून, महंमुद-शहानें पूर्ववत् दारू पिण्यांत वगैरे काळ घालविण्याचा क्रम चालविला व तो शेवटीं १५१८ या सालीं मरण पावला.

ब्राह्मणी राज्याचा येथेंच शेवट झाला असें ह्मणण्यास कांहीं हरकत नाहीं. परंतु अमीर बेरिद याचे हातांत जरी सर्व राज्यसत्ता आली होती, तरी आपणच स्वतंत्र सुलतान होण्यापेक्षां कोणी तरी नांवाचा सुलतान करून त्याचे नांवाचे दबदब्याखालीं आपला अधिकार अधिक चालेल असें मनांत आणून, त्यानें महंमुदशहाचे मरणानंतर त्याचा वडील मुलगा अहंमद ( दुसरा ) यास सुलतान केलें ; परंतु हा दोन वर्षांतच

मरण पावल्यामुळें, अमीर बेरिदानें त्याचा धाकटा भाऊ अल्लाउद्दीन यास तक्तावर बसविलें. त्यानें वजीराचे पेंचांतून सुटावें ह्मणून त्याज-विरुद्ध कट केल्यावरून वजीरानें त्यांस पदच्युत करून त्याचे जागीं त्याचा कनिष्ट बंधु वलीउल्ला यास चढविलें ( १५२१ ). परंतु हा सुलतान मागील दोहोंपेक्षांही अधिक हतभाग्य ह्मणायाचा. कारण, याची राणीच वजीरावर फिदा होऊन त्याच्याशीं लग्न लावण्याकरितां तिनें त्यास विष घालून ठार केलें! ( १५२४ ). वली उल्लाशहा याचे मागून त्याचे नामधारी पदवीस अहंमदशहा ( दुसरा ) याचा मुलगा कलीमउल्लाशहा यांस बेरिदानें चढविलें; परंतु त्यानें नवीन शहास मुळींच कांहीं अधिकार किंवा मोकळीक न ठेवतां, त्यास राजधानींत नजर कैदेंत ठेविलें. यामुळें, त्यानें आपले स्थितीस कंटाळून, मोंगल लोकांचा पहिला बादशहा जो बाबर, ज्यानें हिंदुस्था-नावर स्वारी करून व इब्राहीम लोदी याचा पराभव करून, त्याचें दिल्लीचें तक्त नुकतेंच ( १५२६ ) बळकाविलें होतें, त्याजकडे मदतीकरितां अर्ज पाठविला. ही बातमी वजीरास कळल्यावर त्यानें सुलतानास पहिल्याहीपेक्षां जास्त जरबेंत ठेवण्यास आरंभ केला; तथापि तींतूनही त्यानें आपली सुटका करून घेऊन तो आपला मामा विजापूरचा सुलतान इस्माएल अदीलशहा याजकडे पळून गेला; परंतु तेथेंही त्याचे मनाप्रमाणें त्याचा आदर न झाल्यामुळें तो विजापुराहून निघून अखेर अहंमदनगरचा सुलतान बुऱ्हाण निजामशहा याचेजवळ जाऊन राहिला. त्यानें त्याचा साधारण बराच बोज ठेविला; यामुळें कलीम उल्लाशहा हा त्याचेपाशींच मरेपर्यंत राहिला. या शहाबरोबर अखेर ब्राह्मणीवंशाचा शेवट झाला.

१२ येणेंप्रमाणें ब्राह्मणी राज्याचा वृत्तांत येथें संपला. आतां या राज्याचें साधारण स्वरूप, त्याचें वैभव, त्याची राज्यपद्धति व त्याजपा-सून पुढील महाराष्ट्रीय लोकांचे अभ्युदयावर काय परिणाम झाला, एवढें लिहून हा भाग संपवितों. ब्राह्मणी राज्याचा विस्तार मूळारंभीं कोंकण घांटमाथ्या खेरीज करून, बाकी सर्व महाराष्ट्रावरच कायतो होता; परंतु अल्लाउद्दीन हसनशहा कांगो ब्राह्मणी याचे मागून,

त्याचे तक्तावर एक मागून एक चांगले हुषार, पराक्रमी व बुद्धिमान् असे दहा अकरा सुलतान होऊन गेल्यामुळें, ब्राह्मणी राज्यांत तेलंगण, कोंकण, ओरिसा हे प्रांत, व विजयानगरचे राज्यापैकीं कांहीं भाग, हे सामील होऊन, त्यांचा पुष्कळच अधिक विस्तार झाला व त्याची हिंदुस्थानांतील अति बलाढ्य राज्यांमध्यें गणना होऊं लागली. त्याची नांवलौकिक इराण, आरबस्थान, तुर्कस्थान वगैरे शेजारचे देशांत पसरून, तेथून कोणी शिपाई, व्यापारी, कोणी कारागीर या वेगवेगळ्या नात्यानीं हजारों लोक येऊन, ब्राह्मणी सुलतानांचे आश्रयास रहात असत. नामांकित कवि मौलवी वगैरे विद्वान् लोक, हे कलबुर्गें व बेदर येथें येत जात; त्याचप्रमाणें गायन, वादन, वगैरे कला व निरनिराळीं कसबाचीं कामें, यांसही योग्य उत्तेजन मिळत असे. सारांश, ब्राह्मणी राज्यांत यावेळीं त्या काळचे सुधारणेचीं सर्व चिन्हें दिसत होतीं.

ब्राह्मणी राज्याच्या हयातींत त्याच्या दोन राजधान्या झाल्या; प्रथम कलबुर्गें व मागून बेदर. हीं दोन्हीं शहरें अजून आहेत; परंतु त्यांची पहिली भरभराट अर्थातच आतां राहिली नाहीं. या दोन्ही शहरांस त्यांचे शेजारीच जे किल्ले आहेत, त्यांचीं कामें अद्यापही पाहण्यासारखीं आहेत. कलबुर्गें येथील किल्ल्यांत, फेरोजशहा यानें आरंभ करून अर्धीच बांधून पडलेली मशीद आहे, ती खरोखरच फार उत्तम आहे; व ती जर संपूर्ण झाली असती, तर ती हिंदुस्थानांतील सर्व इमारतींहून मोठी ह्मणून झाली असती, असें सांगतात. फेरोजशहानें बांधलेले मोठमोठे वाडे वगैरे इमारती, आतां सर्व पडून गेल्या आहेत व त्यांचा देखावा मोठा विलक्षण व उदासवृत्ति उत्पन्न करणारा असा हल्लीं दिसतो. किल्ल्याबाहेर पहिले पहिले ब्राह्मणी सुलतानांच्या कबरी आहेत, त्या अजून बऱ्याच चांगल्या स्थितींत असल्यामुळें, त्या पाहून प्रवाशांस बरेंच समाधान वाटतें. याशिवाय मधून मधून बरेच अंतरावर अशा ओस पडलेल्या मशीदी, थडगीं, बगीच्यांतील बंगले हेही दृष्टीस पडतात व त्या सर्वांचे प्रसारावरून, मूळ राजधानीचे विस्ताराची बरीच कल्पना करितां येते.

बेदर शहर हें कलबुर्ग्याहूनही विशेष लक्षांत ठेवण्यासारखें आहे.

ह्याचा किल्ला अजून सबंध असून त्याचे रचनेसारखी रचना दुसरीकडे कोठेंही आढळण्यांत नाहीं असें ह्मटलें आहे. या किल्ल्यांतही ब्राह्मणी सुलतानांचे वाडे, महाल वगैरे पुष्कळ मोठमोठ्या इमारती आहेत. त्या हल्लीं जरी पडून गेल्या आहेत, तरी त्यांचे अवशेषावरून त्यांचे मूळ वैभवाची व सौंदर्याची कल्पना करितां येते. बेदर शहरांत महंमद गवान वजीरानें बांधलेली मोठी पाठशाळा, ही त्यावेळचे मोठे इमारतींपैकीं ह्मणून समजली जात असे. ही दुमजली असून तींत विद्यार्थ्यांस राहण्याकरितां पुष्कळ खोल्या केल्या होत्या. तिचे समोरचे बाजूचे प्रत्येक कोंपऱ्यास, शंभर फुटींहून अधिक उंचीचे मनोरे असून, तिजमध्यें जागोजाग कुराणांतील वाक्यें कोरलेलीं होतीं. ह्या पाठशाळेंत ३००० ग्रंथ होते ह्मणून सांगतात. ह्या इमारतींत पुढें औरंगजेब बादशहाचे कारकीर्दींत बंदुकीचे दारूचा सांठा ठेविला असतां, त्यास आग लागून तो सर्व उडाला व तेणेंकरून ही इमारत बरीच पडून गेली.

या दोन शहरांशिवाय ब्राह्मणी सुलतानांचे वैभवाची व पराक्रमाची साक्ष देण्यास, त्यांनीं ठिकठिकाणीं जे भुईकोट व डोंगरी किल्ले बांधिले आहेत, ते होत. यांचेविषयीं असें ह्मटलें आहे कीं, याचवेळीं यूरोप खंडांत जे किल्ले बांधिले आहेत, त्यांचेपेक्षांही हे फार अधिक मोठे व बळकट असे आहेत. ह्या किल्ल्यांपैकीं विशेष प्रसिद्ध असे गाविलगड, नरनाळा, परिंडा, सोलापूर, नळदुर्ग, उदगीर, शहापूर, माहूर व ओसवा येथील किल्ले होत, व त्यांतूनही पहिले दोन किल्ल्यांची तर लोक फारच तारीफ *करितात.

ब्राह्मणी राज्याचे राज्यपद्धतीसंबंधानें पहातां, तिजविषयीं विशेषशी माहिती मिळत नाहीं. फेरिस्ता यानें जी थोडीबहुत मधून मधून आपले ग्रंथांत दिली आहे, तीच कायती देण्यासारखी आहे. तिजवरून मागें सांगितल्याप्रमाणें असें समजतें कीं, सर्व राज्याचे चार

---

* मेडोज टेलर यांचा इतिहास.

भाग केले असून, त्यांपैकीं प्रत्येकावर एक एक तरफदार ह्मणून मुख्य अधिकारी असे, व त्याचेकडेच फौजेचीं, वसुलाचीं, न्यायमनसुब्याचीं वगैरे सर्व कामें सोंपविलीं असत. मोठमोठ्या हुद्यांवरून बहुतेक मुसलमान लोकच नेमले जात असून, हिंदूंस फारकरून ते मिळत नसत; तथापि खेडेगांवांतून, पाटील, पांडे वगैरे अधिकाऱ्यांची अगदीं प्राचीन काळापासून चालत आलेली व्यवस्था, ब्राह्मणी राज्यांतही चालू होती. तिजमध्यें मुसलमानांनीं कधीं हात घातला नाहीं. महंमद गवान याचे-वेळेपर्यंत जमिनीचे साऱ्याबद्दल, तींत उत्पन्न झालेलें धान्य वगैरेच सरकार घेत असे. रोख पैसा घेण्याची वहिवाट ही गवान यानें प्रथम सुरू केली. देशांतील बहुतेक जमीन लागवडीस सध्यांप्रमाणेंच आणली असून, त्यांत वस्तिही बरीच होती. देशांतील व बाहेरील व्यापार चांगला चालत होता. विद्येकडे ब्राह्मणी सुलतानांचें चांगलें लक्ष असून, तिजकरितां त्यांचा बराच पैसा खर्च होत असे. प्रत्येक खेड्यास लहान मोठी मशीद बांधली असून, तेथें लहान मुलांस विद्या शिकविण्याकरितां व धर्मोपदेश करण्याकरितां, एक मुल्ला नेमला असे, व त्यास खेड्याचे इतर अधिकाऱ्याप्रमाणेंच तेथें नेमणूक करून दिली असे. मोठमोठ्या शहरांतून पाठशाळा स्थापन केल्या असून, तेथें फारशी व आरबी ह्या भाषा शिकण्याची उत्तम सोय केली असे. या संस्थांचेसाठीं सुलतानांनीं मोठमोठ्या नेमणुका करून दिल्या असत. विद्येचेसंबंधानें ही व्यवस्था अर्थातच मुसलमान लोकांपुरती होती; हिंदूंकरितां कांहीं सोय नसे. ते आपली विद्या शास्त्र्यांजवळच खासगी खर्चानें शिकत असत. त्यांस सुलतानांचा अटकाव किंवा उत्तेजन हीं दोन्हींही नव्हतीं. रयतेचे सुखाकरितां तळीं, कालवे वगैरे बांधण्याचे कामीं ब्राह्मणी सुलतानांनीं बरेंच लक्ष पुरविलें होतें. तेलंगणांत त्यांनीं केलेलीं असलीं कामें अद्यापही बरींच आहेत. फौजेचीही व्यवस्था त्यावेळीं बरीच चांगली *असे.

---

* यासंबंधाची किरकोळ माहिती प्रो० मोडक याचे पुस्तकांत चांगली दिली आहे. ती त्यांनीं ज० ब्रिग्ज यांचे फेरिस्ताचे भाषांतरावरून घेतली आहे.

आतां शेवटीं या ब्राह्मणी राज्यापासून यापुढें आमचे महाराष्ट्रीयांचे अभ्युदयावर काय परिणाम झाला, ह्याविषयीं मात्र लिहावयाचें राहिलें. ब्राह्मणी राजवंशांत दोन तीन खेरीज करून एकामागून एक चांगले शूर, विचारी व राज्यकारणी असे सुलतान होऊन गेले ह्मणून मागें लिहिलेंच आहे. त्यांचे कोणाचेही कारकीर्दीत महाराष्ट्रांतील हिंदु लोकांनीं बंड केल्याचा इतिहासांत कोठें मुळींच उल्लेख नाहीं. फक्त अहंमदशहा ( पहिला ) याचेवेळीं गोविंद देव ह्मणून कोणी मराठा सरदार होता, त्यानें दौलताबादेचे सुभेदारास चिथावून देऊन जें बंड उपस्थित केलें, तेवढेंच कायतें सांगितलें आहे; तथापि एवढ्या गोष्टी-वरूनच महाराष्ट्रांतील हिंदूप्रजेस ब्राह्मणी सुलतान व त्याचे मुख्य अधिकारी हे बरेच गरीबीनें वागवीत असतील असें जें कित्येक इंग्रज इतिहासकारांचें मत आहे, तें मात्र सर्वथैव खरें आहे असें आह्मांस वाटत नाहीं. कारण, तसें असतें तर, शिवाजी महाराजांचे मनांत अगदीं लहानपणापासून यवनांविषयींचें उत्पन्न झालेलें हाडवैर, राम-दास स्वामींनीं त्यांचे निर्मूलनाविषयीं केलेला उपदेश, प्राचीन ग्रंथांतून अनेक संतांचा छळ केल्याबद्दलच्या लिहिलेल्या कथा, व हल्लींही वरील राज्यास पांचशें वर्षें होऊन गेलीं असतां, व अलीकडे तर पाऊ-णशें वर्षें एकसारखें इंग्रज सरकारचें धर्मांत हात न घालणारें, शांत-तेचें व बरेंच भरभराटीचें राज्य चाललें असतांही, हिंदु—मुसलमानांचे जागोजाग होणारे भयंकर दंगे, या गोष्टींची दुसऱ्या रीतीनें समा-धानकारकपणें उपपत्ति सांगतां येणार नाहीं. ब्राह्मणी सुलतानांचें वर्तन एकंदरींत विचारी व सरळ व न्यायी असें असेल; परंतु धर्माचे बाबतींत त्यांचे हांतून कित्येकवेळां जाणूनबुजून व पुष्कळवेळां तर केवळ अज्ञानानें व गैरसमजूतीनें हिंदु लोकांचीं मनें दुखावलीं जात असतील; तसेंच खेडेपाड्यांतून मुल्ला, व मोठमोठ्या शहरांतून काजी, हेही आपलें धर्मवेड चालवून हिंदूलोकांचे मनावर आघात करीत असतील यांत कांहीं संशय नाहीं. ह्या गोष्टी त्यावेळचे मुसलमान लोकांनीं

---

तिजवरून हल्लीं इंग्रज सरकारचे पलटणींतील नेटिव शिपायांपेक्षां ब्राह्मणी राज्यां-तील शिपायांची स्थिति कशी बरी होती हें चांगलें सांगितलें आहे.

लिहिलेल्या इतिहासांत नाहींत, ह्मणून त्या घडल्या नसतील असें ह्मणणें सयुक्तिक होणार नाहीं. कारण, या इतिहासांत मोठमोठ्या लढाया, बंडें वगैरे मोठमोठ्या ढोबळ गोष्टी खेरीजकरून, बाकी गोष्टींचा फारसा उल्लेख आढळतच नाहीं. आलीकडे इंग्रजींत मेकॉले, मिल्ल यांचेसारखे वरील इतिहास मुळींच विस्तृत नाहींत. त्यांतूनही मुसलमान इतिहास-कारांचे, वरील प्रथमदर्शनीं लहान, परंतु परिणामीं अत्यंत महत्वाच्या गोष्टी ध्यानांत येऊन, त्यांनीं त्या लिहून ठेवाव्या, हेंही त्यावेळचे एकंदर ज्ञानाचे मानानें कठीणच होतें! तेव्हां वर लिहिलेल्या गोष्टींचा उल्लेख, मुसलमानी इतिहासांत नाहीं ह्मणून त्या होत नव्हत्या, असें समजणें चुकीचें होय असें आह्मांस वाटतें. आमचे या ह्मणण्यास दुसरा आधार ह्मटला ह्मणजे, मुसलमानी इतिहासांतून दुसरे गोष्टींसंबं-धानें केलेले जे कित्येक प्रत्यक्ष उल्लेख आहेत, त्यावरून होणारें अनु-मान हें होय. प्रस्तुतचा हा ब्राह्मणी राज्याचा भाग वाचला असतां, आपले लक्षांत तीन मुख्य गोष्टी येण्यासारख्या आहेत. प्रथम कित्येक ब्राह्मणी सुलतानांनीं, विजयानगरचे राज्यांतील जात किंवा वय हीं न पाहतां, लाखों हिंदूंची कत्तल केली, त्यांचीं पवित्र क्षेत्रें बाटविलीं, त्यांचीं देवळें पाडलीं व त्यांचेजागीं मशिदी बांधिल्या, ही एक गोष्ट होय. दुसरी, मलिक उत् तुजार यानें कोंकणांतील शिरके यांस बाटण्याविषयीं घातलेली जरब व त्यामुळें तुजार याचा कपटानें झालेला नाश, ही होय. तिसरी ह्मटली ह्मणजे, अल्लाउद्दीनशहा ( दुसरा ) याचे सद्गुण सांगत असतां, “ तो ब्राह्मणांशीं मुळींच बोलत नसे, व तो त्यांस कधीं कोणत्याही कामावर नेमून देत नसे, ” असें जें मुस-लमान इतिहासकारांनीं लिहिलें आहे, ही होय. ह्या तिन्ही गोष्टींचा विचार केला असतां, महाराष्ट्रांतही कधीं कधीं हिंदूंचे हातून कांहीं आगळीक घडली असतां, कित्येकांचा विनायकदेवाप्रमाणें अग्निमुखांत स्वाहा होत असेल, शेंकडों लोकांची—पुरुष, बायका व मुलें असा भेद मनांत न आणतां—विजयानगरचे निरपराध प्रजेप्रमाणें कत्तल उडत असेल, ठिकठिकाणीं देवस्थानें भ्रष्ट होत असतील, पुष्कळ देवळांचा विध्वंस होऊन त्यांचे जागीं मशिदी बांधिल्या जात असतील, हजारों हिंदु-

स्त्रियांवर बाटण्याचा प्रसंग येत *असेल, व पुरुषांवर शिरक्यास दिलेली धमकी बजावली जात असेल, असें अनुमान करणें चुकीचें होणार नाहीं! कारण, विजयानगरचे राज्यांत किंवा कोंकणांतच हें धर्मवेड चालवावें, आणि आपले महाराष्ट्रांत चालवूं नये, असा ब्राह्मणी सुलतानास कांहीं धरबंद नव्हता. मात्र या दुष्ट कृत्यांचें मान, महाराष्ट्रांत कदाचित् कमी होतें ह्मणून ह्मणा, किंवा येथील लोकांस त्यांची प्रतिकृति करण्याचें सामर्थ्य त्यावेळीं नव्हतें ह्मणून ह्मणा, त्यांपासून सर्व हिंदुप्रजेचीं मनें एकाएकीं क्षुब्ध होऊन, एकादें प्रचंड बंड उत्पन्न झालें नाहीं हें खरें; तथापि त्यांचेयोगानें महाराष्ट्रीय लोकांचे मनांनीं हळूं हळूं चेत घेऊन, त्याजपासून पुढें भडकणारे अग्निप्रळयाची सिद्धता यावेळीं झाली, असें मानण्यास कांहीं हरकत नाहीं. फ्रान्स देशांत अठरावें शतकाचे अखेरीस जी भयंकर राज्यक्रांति झाली, ती जशी हळूं हळूं कित्येक वर्षें धुमसतां धुमसतां, एकदम एकाएकीं प्रकट होऊन तिनें सर्व युरोपखंड हालवून सोडिलें; तसेंच यावेळीं ब्राह्मणी सुलतानांनीं जें हिंदुप्रजाछलरूपीं अग्निबीज पेरिलें, त्याचा यापुढें सुमारें तीनशें वर्षांनीं मोठा भडका होऊन, त्यास दुसरे कित्येक गोष्टींचें साहाय्य झाल्यामुळें तो प्रचंड झाला कीं, त्याचे आंचीनें प्रथम दक्षिणेंतील व नंतर उत्तरहिंदुस्थानांतील बहुतेक मुसलमानी राज्यें होरपळून जळून गेलीं!

या अग्निप्रळयाची उपपत्ति करतांना ग्रांट डफ साहेबांनीं, आह्मीं दिलेल्या या कारणांचा मुळींच उल्लेख केला नाहीं; परंतु जे कोणी ब्राह्मणी राज्याचा इतिहास वाचून आह्मीं वर केलेले प्रतिपादनाचा विचार करतील, त्यांचें मन बरेंच अंशीं आह्मांसारखें होईल असें आह्मांस वाटतें.

---

* To this dynasty, the origin of the present Mahomedan population of the Dekkan in the rural districts is still traceable. The foreign troops, that is the Persians, Tartars, Moguls and Arabs, intermarried with the women of the country or took them forcibly at first, as slaves and concubines, and from them descended the Dekkanees or mixed breeds. * * *

*Meadows Taylor's History of India.*

# भाग ३.

---

## आदिलशाही.

---

१ विजापूरचा सुभेदार युसफ आदिलखान हा तेथेंच स्वतंत्र होतो. त्याचा मूळ वृत्तान्त. त्याचे विरुद्ध कासीम बेरिद हा कट करितो; पण तो फसतो. त्याचे मुलुखावर विजयानगरचा प्रतिनिधि तिमराज याची स्वारी व त्याचा पराजय. बहादुरखान गिलानी व दस्तुर दिनार यांचीं बंडें मोडण्यास युसफ आदिलशहा महंमुदशहा ब्राह्मणी यास मदत करितो. आदिलशहा आपले राज्यांत शिया धर्म चालू करितो. त्यामुळें त्याचे विरुद्ध अमीर बेरिद हा निजामशहा, कुतुबशहा व इमादशहा यांचा कट करितो. त्यांतून तो मोठे कष्टानें पार पडतो. त्याची गोवें शहरावर स्वारी, त्याचा मृत्यु व त्याचें स्वभाववर्णन. २ त्याचे मागून त्याचा मुलगा इस्माएल आदिलशहा हा त्याचे गादीवर बसतो. तो लहान असल्यामुळें, त्याचा कारभार, त्याचे बापाचा वजीर कमालखान हा चालवितो. त्यास राज्यपदाचा लोभ होऊन तो तें मिळविण्यासाठीं यत्न करितो; परंतु त्यांतच तो ठार मारला जाऊन, इस्माएलशहा स्वत:च कारभार पाहूं लागतो. त्याजविरुद्ध अमीर बेरिद हा निजामशहा, कुतुबशहा व इमादशहा यांचा कट रचितो व महंमुदशहा ब्राह्मणी यास बरोबर घेऊन विजापुरावर स्वारी करितो; परंतु त्यांत त्याचा पूर्ण पराभव होतो. इस्माएलशहा हा, महंमुदशहा ब्राह्मणी हा हातीं लागला असतांही, त्याचा योग्य सत्कार करितो व त्याचे पुत्रास आपली बहीण देतो. त्याची विजयानगरचे प्रांतावर स्वारी, व तींत त्याचे अविचारानें झालेला त्याचा पराजय. इस्माएलशहा आपली दुसरी बहीण, अहंमदनगरचा सुलतान बुऱ्हाण निजामशहा यास देतो व तीस आंदण ह्मणून सोलापूरचा किल्ला व त्याचे खालचा परगणा हे देऊं करितो; परंतु ते लवकर दिले न गेल्याकारणानें, दोन्ही सुलतानांची लढाई जुंपते. तींत निजामशहाचा पराभव होतो. यानंतर इस्माएलशहा हा, अमीर बेरिदावर स्वारी करून त्याचा पूर्ण पराभव करून, त्याचा सर्व प्रांत खालसा करितो व त्यास आपले पदरीं लहानशी सरदारी देऊन ठेवितो; परंतु थोडे दिवसांनीं इस्माएलशहा हा त्यास, बेदर व त्याचे खालचा थोडासा प्रांत परत देतो. आदिलशहाची कुतुबशहावरची स्वारी व तींत त्याचा मृत्यु. त्याचें

स्वभाववर्णन. ३ त्याचेमागून त्याचा वडील मुलगा मल्लु हा गादीवर बसतो; परंतु थोडेच दिवसांत तो पदच्युत होऊन त्याचे जागीं धाकटा भाऊ इब्राहीम हा येतो. तो लागलीच शिया धर्म बंद करून सुनी धर्म चालू करितो व सर्व दफ्तर महाराष्ट्र भाषेंत ठेवण्यास हुकूम देतो. विजयनगरास गादीबद्दल तंटे लागल्यामुळें, तेथील एक पक्ष इब्राहीम आदिलशहाची कुमक मागतो. ती तो पुष्कळ द्रव्य घेऊन देतो. आदिलशहास आपला वजीर असदखान याजविषयीं विनाकारण संशय येतो. या गोष्टीचा बुऱ्हाण निजामशहा व अमीर बेरिद हे फायदा घेऊन, आदिलशहावर स्वारी करितात. विजापूरचा सुलतान मोठे पेंचांत येतो. त्यास असदखान मोठे युक्तीनें सोडवितो. बुऱ्हाण निजामशहा व आदिलशहा यांचे पुन्हां युद्ध जुंपतें. प्रथम आदिलशहास जय येतो; परंतु अखेर त्याचा पराभव होतो. इब्राहिम आदिलशहाचा भाऊ अबदुल्ला याचें बंड व त्याचें निवारण. इब्राहिमशहास वाईट दिवस येतात. हुसेन निजामशहाचे हातून त्याचा पूर्ण पराभव होतो. त्याचा सरदार ऐन उल्मुल्क बंड करून त्यास विजापुरांत कोंडितो. आदिलशहा विजयानगरचा राजा रामराज याची मदत घेऊन, आपले राज्याची सरासरी धाराधार करितो. त्यास दुखणें लागून त्यांत त्याचा वाईट रीतीनें अंत होतो. ४ इब्राहिम आदिलशहाचे मागून, त्याचा मुलगा अल्ली आदिलशहा त्याचे गादीवर बसतो. तो विजयानगरचा राजा रामराज याचा स्नेह संपादन करून, हुसेन निजामशहाबरोबर युद्ध चालवितो. त्यांत निजामशहाचा अगदीं पराभव होऊन, विजयानगरकर त्याचे मुलखांतील गांवें जाळून टाकून, मशीदी, थडगीं वगैरे पाडितात व कुराणाची अप्रतिष्ठा करितात. रामराज हा, आदिलशहास आपलेपेक्षां कमी दर्जाचे राजाप्रमाणें वागवितो. या सर्व गोष्टी आदिलशहा कांहीं वेळ निमुटपणें सहन करितो; पण कांहीं वेळानें तो गोवळकोंडें, अहंमदनगर, बेदर येथील सुलतानांबरोबर मसलत करून, मुसलमानी धर्माची अप्रतिष्ठा करणारा जो रामराज त्याचा पाडाव करण्याकरितां कट करितो. ते आपापसांत सोयरिका करून सर्व एक मतानें विजयानगरावर स्वारी करण्याकरितां कडेकोट तयारी करितात. तालीकोट येथें मुसलमानी सुलतान व रामराज यांचें मोठें तुंबळ युद्ध होतें. त्यांत रामराजाचा पूर्ण पराभव होऊन तो शत्रूंचे हातीं सांपडतो. त्याचा वध व अप्रतिष्ठा. विजयानगरचा समूळ विध्वंस. आदिलशाही व निजामशाही यांमधील पुन: चुरस व लढाई सुरू होते. दोघांमध्यें तह ठरतो. यानंतर अल्ली आदिलशहा विजयानगरचे प्रांतांतील बरेच मोठमोठे किल्ले जिंकून घेतो; परंतु थोडेच दिवसांनीं तो आपले

राज्याची वगैरे साधारण व्यवस्था लावून टाकून, बहुतेक सर्व राज्यकारभार वजीराकडे सोंपवितो, व आपण स्वतः चैनींत व ऐषआरामांत काळ घालवूं लागतो. तो एका खोजाचे हातून मारला जातो. त्यानें बांधलेल्या इमारतींचें वगैरे वर्णन. ५ अली आदिलशहाचे मागून त्याचा पुतण्या इब्राहिम आदिलशहा (दुसरा) हा गादीवर बसतो. तो लहान असल्यामुळें त्याची चुलती चांदबिबी ही, कामीलखान नांवाच्या वजीराचे मदतीनें राज्यकारभार चालविते. वजीरास राज्यपदाचा लोभ प्राप्त होऊन, तें मिळण्यासाठीं तो यत्न चालवितो. त्याचा नाश होऊन त्याचे जागीं कीश्वरखान वजीर होतो. तोही थोडे वेळानें कामील-खानाप्रमाणें राज्याभिलाषाचा उद्योग करूं लागून नाश पावतो. त्याचे मागून एकलासखान ह्मणून एक हबशी सरदार हा वजीर होतो. त्याचाही मागील दोघांप्रमाणेंच यत्न सुरूं होतो. इतक्यांत दक्षिणी सरदार व हबशी सरदार यांमध्यें तंटे उत्पन्न होतात. त्यामुळें मुर्तिजा निजामशहा व कुली कुतुबशहा यांस विजापुरावर स्वारी करण्यास संधि मिळते. विजापुरास वेढा पडतो व आदिलशाही आतां खास बुडते, अशी अवस्था तीस प्राप्त होते. इतक्यांत कांहीं अकल्पित योग घडून येऊन, तिची संकटांतून मुक्तता होते. एकलासखान यास पदच्युत करून, दिलावरखान ह्मणून दुसरा एक हबशी सरदार वजीर होतो. तोही राज्यपदाचाच यत्न चालवितो; परंतु त्याचे हुषारीमुळें राज्यांत बरीच व्यवस्था होते. अहंमदनगरास मोठी राज्यक्रांति होऊन, दिलावरखानाचे मद-तीनें, बुऱ्हाण निजामशहा (दुसरा) तेथील गादीवर बसतो. इब्राहिम आदिलश-हावरील दिलावरखान वजीराची सक्त अटक, तींतून त्याची मुक्तता, दिलावर-खान पदच्युत होऊन कैदेंत पडतो. इब्राहिमशहाचा धाकटा भाऊ इस्माएल याचें बेळगांव येथें बंड, व त्याचा मोड. अहंमदनगरचा सुलतान इब्राहिम निजा-मशहा हा विजापूरचे मुलखावर स्वारी करितो. तींत त्याचा पराभव होऊन, तो लढाईंत पडतो. यानंतर अहंमदनगरांत दुफळी उत्पन्न होऊन, मोठी धामधूम माजते, व त्यामुळें प्रथम दिल्लीचा मोंगल बादशहा व नंतर विजापूरचा इब्राहिम आदिलशहा हे निजामशाहीचे प्रकरणांत पडतात, व त्यांच्या लढाया होतात; परंतु हा कथाभाग विशेषेंकरून निजामशाहीचे इतिहासांतील असल्यामुळें, तो येथें न देतां, पुढील भागांत देण्यांत आला आहे. इब्राहिम आदिलशहाचा राज्य-कारभार, त्याचे गुण व त्यानें बांधलेल्या इमारती इत्यादिकांचें वर्णन, त्याची बरीदशाहीवरील स्वारी, व तिचा अंत. मलिकंबराशीं त्याची झटापट. त्याचा

मृत्यु. आदिलशाहीचा या पुढील वृत्तांत, महाराष्ट्राचे एकंदर इतिहासांत सामील होत असल्याकारणानें, तो येथेंच थांबविला आहे. आदिलशाहीचा विस्तार, तिची राज्यव्यवस्था, तिचें वैभव व तिचा महाराष्ट्रीय लोकांचे अभ्युदयाशीं असलेला संबंध.

मागील भागांत सांगितल्याप्रमाणें, विजापूर येथील सुभेदार युसफ आदिलखान याचा आणि निजाम उल्मुल्क याचा तंटा होऊन, युसफ आदिलखान हा जो आपली परदेशी लोकांची टोळी घेऊन बेदर शहर सोडून गेला, तो पुनः त्या शहरीं आला नाहीं. तो विजापूर येथेंच राहून तेथें तो हळू हळू स्वतंत्रतेनें वागूं लागला, व अखेर १४८९ या सालीं त्यानें राजचिन्हें धारण केलीं. युसफ आदिलशहानें विजापुरास जें हें नवीन स्वतंत्र राज्य स्थापन केलें, त्यास त्याचे नांवावरून आदिलशाही असें ह्मणतात. हें सन १४८९ पासून १६८६ पर्यंत ह्मणजे १९७ वर्षेपर्यंत चाललें. *आदिलशाही राजघराण्यांत, चार पांच सुलतान चांगले पराक्रमी होऊन गेले व त्यांचें राज्य सतरावे शतकाचे मध्यभागापर्यंत चांगलेंच भरभराटींत राहिलें. यावेळीं या सुलतानांनीं

* आदिलशाही सुलतानांची वंशावळी पुढें दिल्याप्रमाणें आहे:—

(१) युसफ आदिलशहा,
|
(२) इस्माएल आदिलशहा,
|
(३) इब्राहिम आदिलशहा,
|
(४) अल्ली आदिलशहा,
|
(५) इब्राहिम आदिलशहा, (दुसरा)
|
(६) महंमुद आदिलशहा,
|
(७) अल्ली आदिलशहा, (दुसरा)
|
(८) शिकंदर आदिलशहा.

ज्या कित्येक इमारती व दुसरीं कामें बांधिलीं, तीं अद्यापपर्यंत त्यांचे वैभवाची, त्यांचे कौशल्याची व त्यांचे पराक्रमाची साक्ष देत आहेत! तेव्हां या भागांत, प्रथम विजापूरचे राजघराण्याचा इतिहास, त्यांचे भर-भराटीचे काळाअखेरपर्यंत नेऊन पोंचवितों; त्या पुढील कथाभाग जो महाराष्ट्रीयांचे इतिहासांत सामील झाला आहे, तो अर्थातच जेथच्या तेथेंच दिला जाईल.

युसफ आदिलशहा हा मूळ तुर्कस्थानांतील राजघराण्यांतला असून, त्यास त्याचे भावानें ठार मारण्याबद्दल हुकूम केल्यावरून, त्यास त्याचे आईनें गुपत्तणें इराणांत पाठवून दिलें व तेथेंच तो सतरा वर्षांचा होईपर्यंत वाढला असें ह्मणतात. यानंतर, तो इराणांतून निघून गल-बतांत बसून दाभोळचे बंदरांत आला व तेथून एका व्यापाऱ्याचे मार्फत त्यानें आपणांस, तुर्की गुलाम ह्मणून बेदर येथें महंमद गवान वजीर यास विकविलें. असें करण्याचें कारण असें सांगतात कीं, आपला राजवंशांतील जन्म लोकांस समजून येऊन, आपला घात होऊं नये असें होतें. तें कांहींही असो; बेदर येथें वजीराचे वाड्यांत युसफ आल्यावर त्याचें सुस्वरूप, त्याची ईभ्रतदार वागणूक, व त्याची हुषारी ही वजीराचे लवकरच ध्यानांत येऊन, त्यानें त्यास कांहीं घोडेस्वारांचा नाईक केलें. यापुढें केरळचे राजावर स्वारी करण्याक-रितां, निजाम उल्मुल्क ह्मणून कोणी सरदार सुलतानानें पाठविला असतां, त्याजबरोबर युसफ आदिलखान हाही गेला व त्यानें केरळचा किल्ला घेतांना मोठें शौर्य दाखविलें. या प्रसंगीं निजाम उल्मुल्क हा जखम लागून मरण पावल्यामुळें, त्याचे सैन्याचें आधिपत्य आदिलखानाकडेसच आलें व तोच तें विजयी सैन्य बरोबर घेऊन बेदर येथें माघारा आला. यापुढें त्याचा अधिकाधिक उत्कर्ष होत जाऊन, त्याजवर वजीर महंमद गवान याची अधिकाधिकच मर्जी बसत चालली. त्याचे पोटीं संतान नव्हतें, ह्मणून तो आदिलखान यासच आपला पुत्र ह्मणून समजूं लागला. यामुळें, महंमद गवानाचे मरणा-नंतर त्याची सर्व जिनगी व त्याचे सर्व अधिकार आदिलखानासच प्राप्त

झाले व पुढें तो लवकरच मागें सांगितल्याप्रमाणें, बेदर शहर सोडून आपले विजापूरचे सुभेदारीकडे निघून आला, व तेथेंच त्यानें आदिलशाहीची स्थापना केली. ( १४८९ ).

युसफ आदिलशहा विजापुरास आल्यावर, त्यास प्रथमारंभीं पुष्कळच अडचणी प्राप्त झाल्या. कासीम बेरिद, ज्यानें मागील भागांत सांगितल्याप्रमाणें ब्राह्मणीराज्याचा सर्व कारभार आटोपून घेऊन, महंमुदशहा ब्राह्मणी यास केवळ नामधारी सुलतान करून ठेविलें होतें, त्यानें आदिलशहाचा नाश करून, त्याचा मुलुख जिंकून घेण्याची मसलत चालविली. त्यानें विजयानगरचा प्रतिनिधि तिमराज याशीं असें बोलणें लाविलें कीं, 'तुह्मीं जर विजापूरचे मुलखावर स्वारी करून याल व रायचूर, मुद्गल वगैरे किल्ले हस्तगत कराल, तर महंमुदशहाकडून आह्मीं ते तुह्मांकडेसच ठेवूं.' त्यानें, अहंमदनगरचा नवीन सुलतान मलिक बेहरी यासही, अशाच थापा देऊन त्यानें आदिलशहावर स्वारी करून यावें अशी खटपट केली व तो स्वतः मोठी फौज घेऊन व महंमुदशहा यासही बरोबर ठेवून, त्यानें बेदराहून कूच केलें. या प्रचंड कटापुढें आपलें अर्थातच कांहीं चालणार नाहीं, असें पाहून, आदिलशहानें तिमराज यास कांहीं मुलुख किंवा रोख पैसा देऊं करून त्यास माघारें लाविलें ; व नंतर त्यानें बेरिदाचे फौजेवर चाल करून त्याचा नलदुर्ग येथें पराभव केला व त्यास आपले मुलुखाकडे पळून लाविलें. दोघां शत्रूंची अशी वाट लागल्यावर, मलिक बेहरी हा अर्थातच आपले प्रांतांत आपली फौज घेऊन निघून गेला.

येणेंप्रमाणें आदिलशहानें, कासीम बेरिदानें रचिलेला व्यूह कांहीं चातुर्यानें व कांहीं शौर्यानें मोडून टाकिला ; परंतु थोडेच दिवसांनीं विजयानगरचे तिमराजाबरोबर त्यास लढाईचा प्रसंग पुनः आला. तिमराज हा मागील खेपेस परत गेला खरा ; परंतु त्यास रायचूर, मुद्गल वगैरे किल्ल्यांबद्दल बेरिदानें जी लालुच दाखविली होती, ती त्याचे मनांतून गेली नव्हती. यामुळें त्यानें ते किल्ले घेण्याकरितां आदिलशहाचे मुलखावर पुनः प्रचंड स्वारी केली.

त्याची फौज पुष्कळ असल्यामुळें, त्यानें आदिलशाहाचा प्रथमदर्शनींच पराभव केला व त्याचे फौजेची अगदीं दाणादाण करून टाकिली ; परंतु यानंतर विजयानगरचे लोक जयाचे घमेंडींत चढून चोहोंकडे अव्यवस्थितपणें पसरून लूट गोळा करण्याचे कामांत गुंतले असतां, आदिलशहानें त्यांजवर एकाएकीं असा निकरानें हल्ला केला कीं, ते सर्व घाबरून, मिळविलेली लूट, स्वतःचें सामानसुमान, खजीना वगैरे सर्व जागचे जागीं टाकून, आपले मुलुखांत पळून गेले. या वेळीं आदिलशहास फारच मोठी लूट मिळाली ह्मणून सांगतात. या स्वारींत, तिमराज यानें विजयानगरचा बालराजा जो आपणांबरोबर आणिला होता, त्यासही मोठी जखम लागून तिजपासून तो राजधानीस पोहोंचल्यावर थोड्याच दिवसांनीं मरण पावला. ( १४९३. )

आदिलशहा हा महंमुदशहापासून स्वतंत्र झाला खरा ; तथापि तो आपमतलबास्तव त्यास कधीं कधीं साहाय्यही करी. सन १४९३ सालीं गोवें येथील सुभेदार बहादुरखान गिलानी हा, इतर सरदारांप्रमाणें स्वतंत्रपणें वागायास लागून, त्यानें समुद्रकांठचे मुलखांची लुटालूट मांडली. त्यानें गुजराथचे सुलतानाचे ताब्यांतीलही कित्येक ठाणीं लुटल्यावरून, त्या सुलतानानें महंमुदशहाकडे त्याजबद्दल कागाळी केली व असें सांगून पाठविलें कीं, " या गोष्टीचा बंदोबस्त न होईल तर, मी स्वतः तुमचे मुलुखांतून त्याजवर स्वारी करून त्याचें पारिपत्य करीन. " यावरून कासीम बेरिदानें, महंमुदशहाचे नांवानें आदिलशहाचें साहाय्य मागितलें व शहानें या स्वारीकरितां ९००० घोडेस्वारांची कुमक पाठविली. शेवटीं बहादुरखान गिलानी याजबरोबर लढाई होऊन तींत तो ठार मारला गेला. ( १४९४. )

याचे पुढील सालीं, कलबुर्गें येथील सुभेदार दस्तुर दिनार यानें, बहादुरखान गिलानी याचेप्रमाणेंच स्वतंत्र होण्याचा यत्न चालविला असतां, आदिलशहानें महंमुदशहाचे पक्षास मिळून त्यास साहाय्य केलें. दस्तुर दिनार हा मूळ एक हबशी खोजा असून, तो त्यावेळचे अस्वस्थ स्थितीमुळें बरेच मोठे योग्यतेस चढला होता. त्यास अहंमदनगरचा

सुलतान मलिक अहंमद याचें साहाय्य मिळाल्यामुळें, त्यास बराच जोर आला होता; तथापि आदिलशहा व कासीम बेरिद यांचे फौजेपुढें त्याचें कांहीं चालेनासें होऊन, तो शेवटीं त्यांस शरण आला. मग कांहीं वेळ दस्तुर दिनारास त्याचे पूर्वीचेच प्रांतावर ठेवावें किंवा त्यास तेथून अजीबात काढून टाकून तो प्रांत आदिलशहास द्यावा याबद्दल वाटाघाट होऊन, शेवटीं दुसऱ्या तऱ्हेचाच निकाल लागल्यावरून, आदि-लशहाची व दस्तुर दिनाराची मोठी लढाई झाली व तींत दिनार हा पडला. यानंतर आदिलशहा यानें कलबुर्गें, सागर व दिनार याचे ताब्यांतील दुसरे किल्ले व त्याखालचे मुलूख हे सर्व आपल्या ताब्यांत घेतले. ( १४९९. )

आदिलशहा याचे मनांत, सुनी धर्म सोडून शिया धर्माचा प्रसार करण्याबद्दल फार दिवसांपासून विचार घोळत होता. तो आतां एकदां तडीस न्यावा असें त्यास वाटलें. त्यानें सन १५०२ सालीं आपले सर्व सरदार, मानकरी, विद्वान् लोक व कामगार यांस बोलावून आणून त्यांचा मोठा दरबार भरविला व तेथें त्यांस तो ह्मणाला कीं, ‘ मी लहान असतां, पैगंबर माझे स्वप्नांत आला होता व त्यानें मला राज्यप्राप्ति होईल ह्मणून सांगितलें. त्यावेळीं मी त्यास असा नवस केला कीं, दैवयोगानें तसा योग घडून आला, तर मी आपले राज्यांत शिया धर्म चालू करीन. या गोष्टीस पुष्कळ वर्षें झालीं; तथापि स्वप्नांत सांगितल्याप्रमाणें तो योग आतां आला आहे; तेव्हां तुमचें याबद्दल काय ह्मणणें असेल तें कळवावें. ’ शहाचें हें भाषण ऐकून दरबारांतील लोकांस बराच विचार पडला. कांहींकांनीं शहास ह्मटलें कीं, ‘ हिंदुस्थानांत शिया धर्माची प्रवृत्ति मुळींच नाहीं व अहंमदनगर, गोवळकोंडें व वऱ्हाड येथील सुलतान हे सर्व सुनी पंथाचे आहेत. महंमूदशहा हा जरी बलहीन झाला आहे, तरी त्यास लोक अजून दक्षिणेचा बादशहा ह्मणून समजतात व तोही सुनी पंथाचाच आहे. तेव्हां प्रस्तुतचे धर्मांतरानें कदाचित् एकादें अनिष्ट उद्भवण्याचा संभव आहे. ’ परंतु याच सुमारास इराणचे बादशहानें आपले राज्यांत

शिया धर्म सुरू केल्याची बातमी आदिलशहास लागल्यामुळें, त्यास धैर्य येऊन त्यानें नवीन धर्माची प्रवृत्ति आपले मुलुखांत करण्याचा निश्चय केला. त्यानें एक चांगला दिवस पाहून, त्याविषयीं तो विजापूरचे किल्ल्यांतील मोठ्या मशीदींत गेला, व तेथें त्यानें सर्वांस शिया पंथानें चालावें व त्याचे सर्व संस्कार करावे अशी आज्ञा केली.

आदिलशहानें येणेंप्रमाणें धर्मांतर केल्यामुळें, कासीम बेरिदाचा मुलगा अमीर बेरिद, जो कारस्थानें रचण्याचे कामांत आपले बापाहूनही अधिक हुषार होता, त्यास नव्या उलाढाली करण्यास अर्थातच चांगलें फावलें. त्यानें लागलीच अहंमदनगर, गोवळकोंडें व वऱ्हाड येथील नवीन सुलतानांस पत्रें पाठवून, सुनीपंथाचे राजांचा एक कट केला, व या वेळीं आपण सर्वांनीं एकचित्त होऊन, धर्मभ्रष्ठ जो आदिलशहा याची खोड मोडिली पाहिजे, असें त्यांचे मनांत त्यानें भरवून दिलें. त्या सर्वांनीं एकविचारें चालण्याकरितां, महंमुदशहास श्रेष्ठपणा देऊन त्यास त्यांनीं आपले पक्षाचें आधिपत्य दिलें व चोहोंकडून आदिलशहाचे मुलखावर एकदम चाल केली. आपणांविरुद्ध झालेला हा प्रचंड कट पाहून, आदिलशहा घाबरला व या संकटांतून आपली सुटका सहसा होत नाहीं, असें त्यास पक्कें वाटलें. शेवटीं निराश होऊन, तो बरोबर ६०८० घोडेस्वार घेऊन दौलताबादेकडे उत्तरेस, निजामशहाचा मुलुख लुटीत व जाळीत त्वरेनें निघाला. आदिलशहानें आपले मुलुखाचा खराबा चालविला असें पाहून, अहंमद निजामशहा हा, विजापुरावरील आपला रोंख सोडून आदिलशहाचेच पाठीस प्रथम लागला. येणेंप्रमाणें दोघा सुलतानांची कांहीं वेळ अशी झटापट होऊन शेवटीं आदिलशहा हा, वऱ्हाडचा सुलतान अल्लाउद्दीन इमादशहा, ज्यास त्यानें आपली एक मुलगी दिली होती, त्याचेकडे आश्रय घेण्याकरितां गेला; परंतु इमादशहानें त्यास अशी शहाणपणाची सल्ला सांगितली कीं, 'तूर्त मला तुझे पक्षास उघडपणें येऊन मिळतां येत नाहीं; तथापि तुझे विरुद्ध रचलेला कट मी मोडून टाकण्याची तजवीज करितों. तूं सध्यां विजापुरास शिया पंथ बंद ठेवण्यास हुकूम पाठवून दे; ह्मणजे हें वावटळ

बरेंच शांत होईल व हा कट मोडेपर्यंत तूं खानदेशचे सुलतानाकडे आश्रयास जाऊन रहा.' आदिलशहासही ही मसलत बरी वाटली व तो त्याप्रमाणें वागण्यास तयार झाला.

इकडे इमादशहानें गुप्तपणें अहंमद निजामशहा व कुतुब उल्मुल्क (गोंवळकोंड्याचा भावी सुलतान) यांजकडे पत्रें पाठवून त्यांस लिहिलें कीं, "अमीर बेरिद हा मोठा कावेबाज मनुष्य आहे. त्यास धर्माची ह्मणजे श्रद्धा आहे असें नाहीं. तर आपणांमध्यें तंटे लावून महंमुदशहाचे नांवाखालीं आपली सत्ता वाढवावी हा त्याचा हेतु आहे. तेव्हां आपण त्यास साहाय्य न होतां, आपापले ठिकाणीं बळकटी धरून रहावें यांतच आपला निभाव आहे." अहंमदनगर व गोवळकोंडें येथील सुलतानांनीं हीं पत्रें वाचतांच, त्यांचे डोळे उघडले व ते एके दिवशीं रात्रीं एकाएकीं आपल्या छावण्या उठवून, महंमुदशहा किंवा अमीर बेरिद यांस न विचारतां, आपापले मुलुखांत चालते झाले. असें झाल्यावर बेरिद हा एकटा पडतांच, त्याचे फौजेवर आदिलशहानें एके दिवशीं एकाएकीं मोठा निकराचा हल्ला करून, त्यास आपले मुलुखांत पळवून लाविलें व त्याची सर्व छावणी लुटून घेतली. (१५०२).

येणेंप्रमाणें अमीर बेरिदाचे कटाचा नाश झाल्यावर, आदिलशहा हा पुनः आपले राजधानीस परत आला, व तेथें त्यानें पुनः शिया धर्माचा प्रचार सुरू केला. यानंतर त्यानें यापुढें आठ वर्षें सुरळीतपणें राज्य केलें; मात्र शेवटीं १५१० या सालीं, पोर्तुगीज लोकांनीं त्याचे प्रांतांतील गोवें शहर हें घेतल्यामुळें, त्यास त्याजवर स्वारी करावी लागली. हींत त्यास यश आलें; परंतु या पूर्वींच त्यास पांथरीचा आजार झाला होता, त्यांतच त्यास या स्वारीचे कष्ट पडल्यामुळें, त्याची प्रकृति विशेष बिघडून, तो यानंतर लवकरच मरण पावला. (१५१०).

युसफ आदिलशहा हा बराच शूर, मसलती व शहाणा असा सुलतान होऊन गेला. त्यास विद्येचा व गाण्याचा मोठा शोक असे

व यामुळें त्याचे दरबारांत तज्ज्ञ लोकांस चांगला आश्रय मिळे. यास धर्मवेड अगदीं नव्हतें, ह्मणून, अमुकच धर्म पाळा, ह्मणून त्याचा प्रजेस जुलूम मुळींच नव्हता. त्याचें व्यायामाचे कामीं बरेंच लक्ष असे. त्यानें सरकारी दफ्तर मराठी भाषेंत ठेवण्याचा उपक्रम घातला, व त्याची मराठे लोकांवर मोठी भक्ति असे असें सांगतात. त्यानें मुकुंदराव ह्मणून कोणी मराठा सरदार होता, त्याची बहीण आपली बायको केली असून, तिजपासून त्यास एक मुलगा—इस्माएल आदिलशहा—व तीन मुली झाल्या. त्यांपैकीं एक त्यानें बुऱ्हाणनिजामशहास दिली व दुसरी मागें लिहिल्याप्रमाणें, वऱ्हाडचा सुलतान अल्लाउद्दीन इमादशहा यास दिली, व तिसरीही अहंमदशहा ब्राह्मणी ( दुसरा ) यास दिली. या सुलतानाचे कारकीर्दीपासून विजापूरचे राज्यांत मराठे लोकांचें महत्व वाढण्यास प्रारंभ झाला असें ह्मटल्यास हरकत नाहीं.

२ युसफ आदिलशहा याचे मागून, त्याचे गादीवर त्याचा मुलगा इस्माएल आदिलशहा हा बसला. त्या वेळीं त्याचें वय केवळ ९ वर्षांचें होतें. तो मोठा होईपर्यंत, राज्याचा कारभार कमालखान ह्मणून मुख्य प्रधान होता त्यानें चालवावा, असें माजी शहानें मरतेसमयीं सांगितलें होतें, त्याप्रमाणें कांहीं दिवस ही वहिवाट चालली; परंतु प्रधानाचे मनांत हळू हळू दुष्ट वासना उत्पन्न होऊन, लहान सुलतानास पदच्युत करून किंवा त्यास ठार मारून टाकून, आपणच सर्व राज्य बळकवावें असा त्यानें विचार चालविला. त्यानें अमीर बेरिदाबरोबर स्नेह जोडून त्याजबरोबर अशी मसलत ठरविली कीं, बेरिदानें आपला बेत सिद्धीस नेण्यास मदत करावी व त्याजबद्दल त्यानें त्यास कलबुर्गें, अलंद, नळदुर्ग वगैरे तहत भीमेचे कांठापर्यंतचा मुलूख सोडून द्यावा. शिवाय लोकांनीं आपणास चांगलें ह्मणावें ह्मणून, कमालखानानें शियापंथ बंद करून सुनी धर्म पुनः चालू केला; व पुष्कळ लोकांस सरदाऱ्या व मोठमोठे हुद्दे दिले. सुलतानाचे संरक्षणासाठीं जे ३००० परदेशी शिपाई होते, ते सर्व सुलतानाचे बाजूचे असल्यामुळें, त्यानें त्यांपैकीं फक्त ३०० ठेविले व बाकी सर्वांस काढून टाकिले. यानंतर त्यानें

नवीनच शिपाई चाकरीस ठेवण्यास लागून, आपले पक्षाची अशी २० हजार फौज तयार केली.

येणेंप्रमाणें आपले दुष्ट बेताची सिद्धता करून, कमालखान हा आतां आपले सिंहासनारोहणाचे तयारीस लागला. त्यानें एके दिवशीं मोठा दरबार भरवून, त्यांत आपला हेतु सर्वांस उघडपणें सांगितला. तेथें त्याचे पक्षाचे लोक पुष्कळ असल्यामुळें, त्यांनीं तेव्हांच आपला रुकार त्या कामास दिला व त्याकरितां त्यांनीं एक चांगला दिवस मुकरही केला. लहान सुलतान व त्याची आई, ज्यांस कमालखानानें यापूर्वींच किल्ल्यांत कोंडून ठेविलें होतें, त्यांस ह्या गोष्टींचें वर्तमान कळल्यावर, आपण ह्या संकटांतून कसे पार पडतों, याबद्दल त्यांस मोठी काळजी उत्पन्न झाली. शेवटीं त्यांचे पदरीं युसफ तुर्क ह्मणून कोणी फारा दिवसांचा शिपाई होता, त्यानें अशी मसलत काढली कीं, प्रधानाची कांहीं तरी मिषानें गांठ घेऊन त्याचा वध केल्याशिवाय हें अरिष्ट टळणार नाहीं. ह्मणून त्यानें राणीकडून कमालखानास असा निरोप पाठविला कीं, ‘ युसफ तुर्क हा मक्केस यात्रेकरितां जात असल्यामुळें, तो आपली भेट घेऊन तिकडे जाऊं ह्मणत आहे; तेव्हां त्यास मुलाखत अवश्य व्हावी. ’ यावेळीं कमालखानास कोणी ज्योतिषांनीं असें सांगितलें होतें कीं “ राज्याभिषेकाचे दिवसाचे आदले पंधरवड्यांत तुह्मांस कांहीं अनिष्ट ग्रह आहेत. तो काळ एकदांचा पार पडला पाहिजे. ” त्यावरून कमालखान हा कपाळशूळाचें ढोंग करून, त्यावेळीं आपले वाड्यांत फारशी कोणाची गांठ न घेतां बंदोबस्तानेंच होता; तथापि राणीचा निरोप ऐकून त्यानें तुर्कास भेटीस येण्यास सांगून पाठविलें. युसफ तुर्क हा बोलण्यांत मोठा हुषार असल्यामुळें, त्यानें खानाचे औदार्याच्या, शौर्याच्या वगैरे कांहीं गोष्टी काढून त्यानें त्यास बरेंच चांगलें खुषींत आणिलें. मग शेवटीं यात्रेस जाण्याची आपली इच्छा प्रदर्शित करून, तो मोठे अदबीनें उभा राहिला. कमालखानानें परवानगी आहे असें ह्मणून, त्यास विडा देण्यास हात पुढें केला; इतक्यांत तुर्क मोठे लीनतेनें पुढें होऊन, त्यानें आदरपूर्वक

आपला रुमाल पुढें पसरिला व तीच संधि साधून त्यानें तत्क्षणींच मोठे चलाखीनें, रुमालाखालीं दडविलेला आपला खंजीर, खानाचे पोटांत खुपसला ! प्रधानाचा तर तत्काळ प्राण गेला; परंतु त्याचे शिपायांनीं लागलीच धांवत येऊन, युसफ तुर्कास तेथल्या तेथेंच तत्क्षणीं ठार केलें.

कमालखानाचा येणेंप्रमाणें वध झाल्याची बातमी त्याचे बायकोस कळतांच, तिनें न घाबरतां लवकरच जिकडल्या तिकडे स्थिर स्थावर करून, नवरा मेल्याची बातमी पसरूं दिली नाहीं. तिनें लागलेंच कमालखानाचे प्रेतावर पोषाख घालून, गिरद्या, लोड वगैरे मांडून त्यांचे आधारानें त्यास आपले वाड्याचे एका सज्जांत बसविलें व खानानें, हत्यारबंद होऊन येऊन मुजरा करण्यास सर्वांस लवकर बोलाविलें आहे, ह्मणून शिपायांस निरोप पाठविला. तसेंच तिचा मुलगा सफदरखान यानेंही किल्ल्याचे दरवाजे बंद करून, ५००० लोकांसहवर्तमान तो इस्माएल आदिशहा व त्याची आई यांस कैद करण्याकरिता त्यांचे वाड्याकडे निघाला.

आपले वाड्याकडे सफदरखान चाल करून येत आहे असें पाहून, इस्माएल आदिलशहाचे आईनें आपला एक विश्वासु खोजा किल्ल्यांत असलेल्या परदेशी शिपायांकडे पाठविला व त्यांस तिनें त्वरेनें बोलावून आणिलें. त्यांनीं मोठे शौर्यानें लढून राजवाड्याचा चांगला बचाव केला; परंतु इतक्यांत प्रधानपुत्रानें मोठमोठ्या तोफा आणून त्या राजवाड्यावर चालविण्यास आरंभ केला, व त्यांचेयोगानें वाड्याचा थोरला दरवाजा फोडून तो आंत शिरला; तथापि याचे पूर्वींच किल्ल्याबाहेरील परदेशी शिपायांस आंतील दंग्याचें वर्तमान कळून, त्यांपैकीं सुमारें दोनशें लोक किल्ल्याचे भिंतींवरून दोर टाकून आंत आले असून, ते राजवाड्यांतील शिबंदीस येऊन मिळाले होते. यामुळें, सफदरखान हा वाड्यांत शिरतांच त्याजवर व त्याचे लोकांवर परदेशी शिपायांनीं बाणांचा व गोळ्यांचा असा कांहीं भडिमार केला कीं, सफदरखानाचे लोक त्यापुढें कचरले व खानाचे डोळ्यास इजा होऊन, तोसुद्धां मागें हटून भिंतीशीं टेंकून उभा राहिला. इतक्यांत इस्माएल-

शहानें त्यास वरचे गच्चीवरून पाहून, त्यानें त्याचे अंगावर एक मोठा दगड लोटून दिला. त्यासरसा सफदरखान हा ठार झाला. तो खालीं पडतांच त्याचे सर्व शिपाई मागें पळून गेले व शहा आणि त्याची आई यांवरील आलेलें संकट एकदम नाहींसें झालें. ( १५११ ). युसफ तुर्काचे स्वामिभक्तीमुळें, आपलें जीवित व राज्य हीं राहिलीं, ही गोष्ट इस्माएलशहा यापुढें कधीं विसरला नाहीं. तुर्क जेथें ठार मारला गेला, तेथें शहानें एक कबर बांधिली व तो कृतज्ञता बुद्धीनें तेथें महिन्यांतून एक वेळ तरी जात असे. अद्यापही विजापूरचे मुसलमान लोक या तुर्काचें नांव काढून, त्याचे स्वामिभक्तीविषयींची मोठी तारीफ करितात!

वर लिहिल्याप्रमाणें इस्माएल आदिलशहा हा संकटांतून मुक्त झाल्यावर, त्यानें प्रथम दक्षणी व हबशी शिपायांस बडतर्फ केलें व तुर्क, मोंगल, आरब वगैरे परदेशी लोकांस नोकरीस ठेवण्यास आरंभ केला. तो वयानें लहान होता; तथापि त्यांत हिंमत व दृढनिश्चय हीं विलक्षण होतीं. त्यानें लागलींच कलबुर्गें, सागर वगैरे प्रांतांवर फौज पाठवून, ते अमीर बेरिदापासून परत जिंकून घेतले. यावरून बेरिदानें अहंमदनगर, गोवळकोंडा व वऱ्हाड येथील सुलतानांचा पुनः एक वेळ कट करून, आदिलशाही सफई बुडवून टाकण्याची मसलत चालविली. वरील सुलतानांनीं आपापल्या फौजा पाठवून दिल्यावरून, त्यांचेसहवर्तमान अमीर बेरिद हा महंमुदशहा व त्याचा मुलगा अहंमद यांस बरोबर घेऊन, विजापूरावर चालून आला. आदिलशहानें शत्रूंस आपले मुलखांत बरेंच आंत येऊं देऊन, त्यांजवर अल्लापूर येथें एकाएकीं हल्ला केला. या लढाईंत अमीर बेरिदाचा अगदीं पराभव झाला व त्यास बरेंच सामानसुमान टाकून पळून जावें लागलें. महंमुदशहा व त्याचा मुलगा हे आदिलशहाचे स्वाधीन झाले व त्यानें त्यांचा योग्य आदर केला. ( १५१४ ). यानंतर थोडे दिवसांनीं, आदिलशहानें आपली बहीण बिबिसती, जी यापूर्वींच राजपुत्र अहंमद यास देऊं केली होती, तिचें लग्न मोठे समारंभानें कलबुर्गें येथें लाविलें व नंतर

त्यांजबरोबर ५,००० फौज देऊन त्यांस बंदोबस्तानें बेदर शहरास रवाना केलें. विजापूरची फौज येत आहे असें पाहून, अमीर बेरिद हा, बेदर शहर सोडून पळून गेला; परंतु विजापूरची फौज आपले मुलुखांत परत जातांच, बेरिद हा पुन: परत आला व त्यानें पूर्ववत् महंमुदशहावर आपला अंमल बसविला.

वर लिहिल्याप्रमाणें कांहीं दिवस विजापुरास धांदल चालली असतां, विजयानगरचा प्रतिनिधि तिमराज यानें, आपला हात मारून घेण्यास आळस केला नाहीं. त्यानें रायचूर व मुगदल हे प्रांत काबीज करून घेतले; परंतु १५१९ या सालीं इस्माएल आदिलशहानें, आपले राज्यांत नीट व्यवस्था लागली असें पाहून, तिमराजापासून आपले प्रांत पुन: परत घेण्याचा विचार केला, व त्याप्रमाणें तो आपणाबरोबर ७००० निवडक परदेशी शिपायांची फौज घेऊन, कृष्णेचे कांठीं आला; परंतु तिमराजानें अगोदरच उताराच्या सर्व जागा धरून ठेवून जागजागीं पुष्कळ फौज ठेविली होती. इतक्या अडचणी असतांही आदिलशहाची हिंमत न खचतां, त्यानें नदी ओलांडून शत्रूंवर हल्ला करण्याचा निश्चय केला; परंतु नावा, ताफे वगैरे गोष्टींची तयारी होण्यापूर्वींच एके दिवशीं तो दारूचे धुंदींत असतां, हत्तीवरून व १०० नावा तयार झाल्या तेवढ्यावरूनच फौज उतरून नेण्याचा त्यानें हुकूम केला व सुमारें २००० लोक पलीकडचे तीरास नेऊन उतरविले; परंतु शत्रूंकडे ३०,००० लोक असल्यामुळें, त्यांचेपुढें या लहानशा फौजेचा अर्थातच निभाव लागला नाहीं, व शेवटीं आदिलशहास आपली फौज माघारी आणावी लागली. या मोहिमेंत त्याचे १००० लोक ठार झाले व तो नदींतून उतरून परत येत असतां, त्याचा हत्ती प्रवाहाचे ओढींतून मोठे प्रयासानें पार पडला!

आदिलशहानें, आपली दुसरी बहीण ही, अहंमदनगरचा सुलतान बुऱ्हाणनिजामशहा यास दिली व तें लग्न सोलापूर येथें १५२४ या सालीं मोठे समारंभानें झालें. यावेळीं त्यानें बहीणीस अंदण ह्मणून, सोलापूरचा किल्ला व त्याचे खालचा परगणा हीं देण्याचें ठरविलें होतें;

परंतु तो प्रांत कबूल केलेल्यावेळीं निजामशहाचे स्वाधीन न केल्यामुळें, दोघां सुलतानांमध्यें लढाई सुरू झाली, व तींत अखेर निजामशहाचाच पराभव झाला ( १४२९ ). यापुढें तीन वर्षांनीं निजामशहा व अमीर बेरिद हे एकत्र होऊन, त्यांनीं पुनः विजापूरचे मुलुखावर स्वारी केली; परंतु त्यांच्या फौजा राजधानीपासून वीस कोसांवर आल्या असतां, त्याजवर आदिलशहाचा सरदार असदखान यानें एकाएकीं हल्ला करून, त्यांचा अगदीं मोड करून टाकला, व त्यांचेकडील तोफा, हत्ती वगैरे पुष्कळ लढाऊ सामान काबीज केलें ( १५२८ ). येणें-प्रमाणें सोलापूरचे या अंदणाचे किल्ल्यावरून, विजापूर व अहंमदनगर येथील सुलतानांची जी एकदां आकस पेटली, ती दुसरे सुलतानांचें समूळ राज्य नाहींसें होईपर्यंत, ह्मणजे सुमारें शंभर वर्षेपर्यंत चालली होती व तिचेमुळें दोन्ही राज्यांत वरचेवर मोठमोठ्या लढाया होऊन, त्यांचे योगानें तीं दोन्हींही बरींच बलहीन होऊन गेलीं!

असो; आदिलशहाचे मनांत पुष्कळ दिवसांपासून अमीर बेरिदाची चांगली खोड मोडावी असें होतें; परंतु त्याजबरोबर सध्यांच लढाई करण्याचें कारण झालें, तें असें. बुऱ्हाण निजामशहा व अमीर बेरिद यांचा असदखानानें अगदीं मोड करून टाकला ह्मणून जें नुकतेंच वर लिहिलें आहे, त्यानंतर निजामशहावर थोडेच दिवसांत दुसरें एक मोठें संकट चालून आलें. त्याचे राज्यावर गुजराथचे सुलतानानें स्वारी करून त्याची पुष्कळ खराबी केली; परंतु यावेळीं त्याचा मेहुणा इस्माएलशहा यानें, आपलें वैर तूर्त एकीकडे ठेऊन त्याचे मदतीस कांहीं फौज पाठवून दिली. या फौजेंतील लोकांस अमीर बेरिदानें फितूर करण्यास खटपट केल्याचें वर्तमान ऐकून, आदिलशहास मोठा संताप आला व त्यानें निजामशहास पत्र लिहिलें कीं "मी आतांच बेरिदाशीं युद्ध करून त्याची खोड मोडणार आहे; तूं यावेळीं मला साहाय्य केलें पाहिजे; तुला तसें करितां येत नसेल तर तूं त्यास तरी साहाय्य करूं नकोस ह्मणजे बस्स आहे." या दोन अटींपैकीं निजामशहानें दुसरी कबूल केल्यावरून आदिलशहा लागलाच बेरिदावर स्वारी करून

गेला. शत्रूचें सैन्य आपणावर चालून येत आहे असें पाहून, बेरिद हा बेदरचे किल्ल्यांत आपले पुत्रांस ठेऊन, तो स्वतः उदयगिरी येथें निघून गेला. कारण, त्याचें आतां वय फार झालें असल्यामुळें, त्यास लढाईचे कष्ट सोसवेनासे झाले होते. इकडे आदिलशहानें बेदरावर चाल करून, तेथील किल्ल्यास वेढा दिला. यावेळीं, अमीर बेरिदाच्या पुत्राचें व आदिलशहाचें मोठें युद्ध झालें. किल्ल्यांतून बाहेरील फौजेवर वरचेवर हल्ले होत; परंतु विजापूरचे लोक ते सर्व मागें हटवीत. एके वेळीं आदिलशहाचा रोख पाहून, त्याजवर बेरिदाचे दोन पुत्र चालून आले; परंतु शहानें त्या दोघांसही ठार केलें. शेवटीं आतां निभाव लागत नाहीं असें पाहून, बेरिदानें वऱ्हाडचा सुलतान अल्लाउद्दीन इमाद-शहा यास बोलावून आणून, त्याचे मध्यस्थीनें कांहीं तरी तह करावा, ह्मणून यत्न चालविला. त्यावरून इमादशहा बेदर येथें येऊन तहाचें बोलणें सुरू झालें असतां, अमीर बेरिद हाही आपले फौजेसह वऱ्हाडचे सुलतानाचे छावणी शेजारीं छावणी करून राहिला. येथें तो बराच बेसावधपणें वागूं लागला. कारण त्यास असें वाटलें कीं, इमादशहाचे छावणीजवळ आपण आहों, तेव्हां आतां आपण अगदीं निर्भय आहों; परंतु विजापूरचा सरदार असदखान यानें त्याची पाळद ठेवून, व तो एके रात्रीं दारू पिऊन अगदीं धुंद होऊन पडला आहे, व त्याचे पहाऱ्यावरचे शिपाईही गाफल आहेत अशी संधि पाहून, तो आपणां-बरोबर कांहीं लोक घेऊन, त्याचे छावणींत शिरला व बेरिद हा पलं-गावर दारू पिऊन गुंग होऊन पडला होता, त्यास तसाच अलगद उचलून, त्यानें त्यास आपले छावणींत आणिलें. त्यास पाहतांच आदिलशहानें त्याचा दुसरे दिवशीं शिरच्छेद करण्याचा हुकूम दिला; परंतु बेरिदानें शहाचे पाया पडून फार काकुलतीनें विनवणी केल्यावरून, व बेदरचा किल्ला व ब्राह्मणी सुलतानाचा खजीना, हे सर्व तुमचे स्वाधीन करितों असें त्यानें कबूल केल्यावरून, शहाचा राग अंमळ कमी झाला. मग त्यानें बेरिदास, किल्ला खालीं करून देण्याबद्दल आपले पुत्रास निरोप पाठविण्यास सांगितलें; परंतु त्यानें बापास असें उलट सांगून पाठविलें कीं, “ आपला आतां वृद्धापकाळ होऊन घडी भरत

आशी आहे, तेव्हां थोडे दिवस वाचण्याकरितां येवढा किल्ला शत्रूंचे स्वाधीन करणें ह्मणजे मूर्खपणा होय!" हा निरोप ऐकून आदिल-शहास बापलेकांचे लबाडीचा संशय येऊन, त्यानें ज्या बुरुजावर बेरिदाचा मुलगा होता तिकडे त्यास नेऊन, तेथें त्यास हत्तीचे पायीं देण्यास हुकूम केला. बेरिदाचे मुलानें आपले बापाची ती अवस्था पाहून त्यास वाईट वाटलें. तो किल्ला सोडून देण्यास कबूल झाला; परंतु त्याचें ह्मणणें येवढेंच पडलें कीं, "माझे मुलाबाळांस त्यांचा झाडा वगैरे न घेतां, त्यांस शहानें मुकाट्यानें किल्ल्याबाहेर पडूं द्यावें." आदिलशहा या गोष्टीस कबूल झाला; परंतु तेवढे सवडींत, बेरिदाचे मुलानें, ब्राह्मणी सुलतानांचे खजि-न्यांतील जुनें मौल्यवान् जवाहीर पांघरुणांत वगैरे लपवून, बरेंचसें लांब-विलें! बेरिदाचे मुलानें किल्ला खालीं करून देतांच, विजापूरची फौज त्यांत शिरली. तेथें गेल्यावर आदिलशहा यानें अल्लाउद्दीन इमाद-शहास आंत बोलावून, ते दोघे एकत्र ब्राह्मणी सुलतानांचे तक्तावर बसले. त्याचे पुढें खजीन्यांतील सर्व द्रव्य व मौल्यवान् चिजा आणिल्या असतां, इस्माएलशहानें त्यांतून एक रत्नजडित अत्तरदानी इमादशहास दिली; परंतु आपण स्वत: कांहींएक घेतलें नाहीं. त्यानें तेथील द्रव्य कांहीं आपले शिपायांस व कांहीं गोरगरिबांस वांटून दिलें. यानंतर अमीर बेरिद यास, इमादशहाचे रदबदलीवरून, त्यानें आपले सैन्यांत ३००० घोडेस्वारांची असामी करून देऊन, त्याचा बहुतेक सर्व मुलुख आपले ताब्यांत घेतला ( १५२९ ).

यापुढें कांहीं दिवसांनीं, विजयानगरचे राज्यांत अव्यवस्था झाली आहे अशी संधि पाहून, आदिलशहानें तिकडे स्वारी करून रायचूर व मुदगल हे किल्ले पुन: परत जिंकून घेतले. ते विजयानगराकडे सुमारें सतरा वर्षें राहिले होते. या मोहिमेंत अमीर बेरिदानें बरेंच साहाय्य केल्यावरून, आदिलशहानें त्यास सोडून देऊन बेदर शहरही त्यास परत दिलें; मात्र त्याजपासून कल्याणी व कंधार हे दोन्ही किल्ले मी सहा महिन्यांचे आंत तुमचे स्वाधीन करीन, असें कबूल करून घेतलें; पतुंर बेरिद हा मोकळा होतांच, किल्ले स्वाधीन करण्याची त्यानें

टाकाटाळ चालविली. त्यानें बुऱ्हाण निजामशहास मध्यस्थी घालून किल्ल्यांची बाब काढून टाकावी, ह्मणून त्याजकडून आदिलशहास पत्र लिहविलें; परंतु या पत्रव्यवहारांत, मेहुण्यामेहुण्यांचेंच तिसरे ठिकाणीं भांडण लागून, त्यांमध्यें पुन: युद्ध सुरू झालें. अखेर दोघां सुलतानांची मोठी लढाई होऊन, तींत निजामशहाचा पूर्वीप्रमाणेंच पुन: पराजय झाला व त्याच्या पुष्कळ तोफा व इतर सामान विजापूरकरांचे हातीं लागलें. यानंतर थोडे दिवसांनीं उभयतां सुलतानांचा तह होऊन, त्यांत मुख्यत्वेंकरून असें ठरलें कीं, आदिलशहानें गोवळकोंड्याचा मुलुख, व निजामशहानें वऱ्हाडचा मुलुख, हे जिंकून घ्यावे. त्यांत एकमेकांनीं एकमेकांस अडथळा करूं नये.

वर लिहिलेल्या तहाप्रमाणें, आदिलशहानें १५३३ या वर्षीं, कुतुबशहाचे ( गोवळकोंड्याचे ) मुलुखावर स्वारी केली. हिचें कारण असें झालें कीं, चार वर्षांपूर्वीं त्याचें, अमीर बेरिदाबरोबर युद्ध चाललें असतां, कुतुबशहानें बेरिदाचे मदतीस आपली फौज पाठविली होती. यामुळें आदिलशहास त्याचा फार राग होता. प्रस्तुतचे स्वारींत आदिलशहानें गोवळकोंड्यापर्यंत चाल करून, त्या किल्ल्यास वेढा घातला. यावेळीं त्याचे मदतीस अमीर बेरीद हाही आला होता; परंतु वेढ्याचें काम चालत असतां, इस्माएल आदिलशहास एकाएकीं मोठा ताप येऊन तो मरण पावला ( १५३४ ). हा सुलतान एकंदरींत मोठा पाणीदार, शूर व मोठे मनाचा असा होता. तो राज्यकारभारांत व न्याय मनसुब्याचे कामांत मोठा वाकबगार व चोख असा असे ह्मणून लिहिलें आहे. त्याचे फौजेची व्यवस्था उत्तम असे व त्यामुळें त्याचे शिपाई त्याजवर फार खूष असत. त्यास विद्येची चांगली अभिरुचि असे, व तो विद्वान् लोकांचा मोठा मान ठेवी. यामुळें विजापूरचे इतिहासकारांनीं या शहाच्या गुणांचें फार वर्णन केलें आहे.

३ इस्माएल आदिलशहाचे मागून, त्याचा वडील मुलगा मल्लुआदिलशहा हा त्याचे गादीवर बसला; परंतु तो फार दुर्व्यसनी असल्या-

मुळें, त्यास माजी शहाचा वजीर असदखान व त्याची आई बुबुजीखान यांनीं पदच्युत करून, त्याचे डोळे काढले; व त्याचा धाकटा भाऊ इब्राहीम यास तक्तावर बसविलें. त्यानें गादीवर बसतांच, प्रथम शिया धर्म बंद करून, सुनी धर्म पुनः आपले राज्यांत सुरू केला, व सरकारी दफ्तर जें फारशी भाषेत मध्यंतरीं ठेवूं लागले होते, तें पुनः मराठी भाषेत ठेवण्यास त्यानें हुकूम केला. त्याचप्रमाणें शिया-धर्माचे इराणी वगैरे परदेशी शिपायांस काढून टाकून, त्यांचे ऐवजीं दक्षिणी व हबशी लोकांस त्यानें ठेविलें. यापूर्वीं मराठे लोकांस फौजेंत फारसे ठेवीत नसत; परंतु या वेळेपासून त्यांस सरकारी घोडे देऊन, त्यांस बारगीर ह्मणून ठेवण्यास, इब्राइम आदिलशहानें सुरुवात केली. येणेंप्रमाणें सरकारी दफ्तर मराठींत ठेवूं लागल्यामुळें, ब्राह्मण, परभू, शेणवी वगैरे लोकांचा शिरकाव राज्यकारभारांत, आणि बारगीर ठेवूं लागल्यामुळें, मराठे, कुणबी वगैरे लोकांचा शिरकाव फौजेंत होऊं लागला, व तेणेंकरून यापुढें महाराष्ट्रीय लोकांचें विजापूरचे राज्यांत दिवसेंदिवस अधिकाधिक वजन वाढूं लागलें.

असो; विजापूराकडे येणेंप्रमाणें वर्तमान चाललें असतां, विजयानगरचा प्रतिनिधि तिमराज, ज्यानें राजघराण्यांतील कोणातरी मुलास गादीवर बसवून, तो वयांत येण्यापूर्वींच त्यास विषप्रयोग करून, दुसऱ्यास गादीवर चढवावें व तेणेंकरून आपला अधिकार कायम ठेवावा, असा क्रम चालविला होता, तो शेवटीं मरण पावला व त्याचा मुलगा रामराज हा त्याचा अधिकार चालवूं लागला. या नवीन प्रतिनिधीनेंही आपले बापाचाच कित्ता वळवून, विजयानरचे गादीवर एका लहान मुलास बसवून देऊन, आपले हातीं सर्व राज्यसूत्र ठेविलें; परंतु रामराज हा मलबार प्रांतांत स्वारीवर गेला असतां, त्याचे मागें राजपुत्राचा चुलता भोजतिरमल ह्मणून होता, त्यानें बंड उपस्थित केलें, व बरेच सरदारांस आपले पक्षास ओढून घेऊन, रामराजाचा पराभव केला. यानंतर भोजतिरमल ह्यानें, प्रतिनिधीचा अधिकार आपणच घेऊन कांहीं वेळानें, त्यानें आपले पुतण्यास ठार केलें

व विजयानगरची गादीही बळकाविली. या दुष्ट कृत्यामुळें, भोजतिरमलाचे पुष्कळ सरदार त्यास सोडून देऊन, ते रामराजास पुनः सामील झाले, व त्यांनीं भोजतिरमलाचा नाश करण्याची मसलत चालविली.

वरील बातमी भोजतिरमलास लागतांच त्यानें, घाबरून विजापूरचा सुलतान इब्राहीम आदिलशहा यास पुष्कळ द्रव्य देण्याचें कबूल करून, त्याचें साहाय्य मागितलें. त्यावरून इब्राहीमशहा हा लागलाच विजयानगरावर चालून गेला; परंतु मुसलमान लोक आपले राज्यांत येणार हें पाहून, विजयानगरचे सरदारांनीं भोजतिरमलाशीं सख्य करून घेऊन, त्याचेकडून आदिलशहास कबूल केलेला पैसा देऊन टाकिला, व त्यास आपले मुलुखांत परत दवडिलें; परंतु तो कृष्णानदी ओलांडून गेला नाहीं, तोंच विजयानगरचे सरदारांनीं पुनः भोजतिरमलावर उठून त्यांनीं त्यास ठार केलें, व विजयानगरचे राजघराण्यांतील आतां कोणी पुरुष उरला नसल्यामुळें, सर्व सरदारांचे अनुमतानें रामराज हाच स्वतः गादीवर बसला. ही बातमी इब्राहीमशहास लागल्यावर, त्यानें आपला वजीर असदखान यास आडोनीकडे लढाई करण्यास पाठविलें; परंतु लवकरच रामराजाचा आणि आदिलशहाचा तह झाला (१५३५).

असदखानाचे दरबारांत कित्येक शत्रु होते, त्यांनीं आदिलशहाचे मनांत भरवून दिलें कीं, वजीरानें विजयानगरचे राजापासून पुष्कळ द्रव्य घेऊन, त्यास अधिक अनुकूल असा तह करून दिला. ही गोष्ट असदखानास समजल्यावर, त्या निस्पृही वजीरानें आपले जागेचा राजीनामा देऊन, तो आपले बेळगांवाकडील जहागिरीकडे निघून गेला. शहाची व वजीराची ही जी कुरबूर झाली, ती ऐकून इब्राहीमशहाचे प्रतिस्पर्धी व शत्रु जे बुऱ्हाण निजामशहा व अमीर बेरिद, यांनीं त्याबद्दल सर्व दक्षिणेंत टिमकी वाजवून, त्यांनीं अशीही अफई उठविली कीं, असदखान यानें आह्मांस बेळगांवचा किल्ला देण्याचें कबूल केलें आहे. यानंतर निजामशहा व अमीर बेरिद ह्यांनीं सोला-

पूर परगणा जिंकून ते बेळगांवाकडे चालले. अमदखानानें त्यांची लबाडी जाणून त्यांस उलट फसविण्याचा निश्चय केला. ते बेळगांवाकडे आल्यावर, तो त्यांस आपले फौजेसुद्धां जाऊन मिळाला. यामुळें आपलें लबाडीचें काम फत्ते झालें असें पाहून, बुऱ्हाण निजामशहा व बेरिद यांस मोठा आनंद झाला, व त्यांनीं विजापूरचे मुलखावर चाल करून, तेथें फारच धुमाळी मांडली, व तेणेंकरून इब्राहीम आदिलशहाची अशी कांहीं तारंबळ उडवून दिली कीं, तो आपली राजधानी सोडून कलबुर्ग्यास आश्रय घेण्यास गेला. तो निघून जातांच, शत्रूंनीं विजापूरास लागलाच वेढा घातला.

इब्राहीम आदिलशहाची अशी स्थिति झाली असतां, तींतून, त्याचा विश्वासु वजीर अमदखान यानें त्याची मोठे युक्तीनें सुटका केली. त्यानें वऱ्हाडचा सुलतान अल्लाउद्दीन इमादशहा यास पत्र लिहून, त्याची फौज इब्राहीमशहाचे मदतीस आणविली. ती येतांच आदिलशहास धीर येऊन, त्यानें शत्रूंशीं सामना करण्यास आरंभ केला, व अखेर निजामशहास त्याचे मुलखांत पिटकून लाविलें. याच सुमारास अमीर बेरिद हाही मरण पावला. त्यामुळें निजामशहाचा पक्ष विशेषच निर्बल होऊन, त्यानें अखेर आदिलशहाशीं तह केला. त्यांत असें ठरलें कीं, सोलापूर व त्या खालचे परगणे हे बुऱ्हाण निजामशहानें इब्राहीम आदिलशहास परत द्यावे, व त्यांवर त्यानें पुनः आपला हक्क सांगूं नये. येणेंप्रमाणें इब्राहीमशहा व बुऱ्हाणशहा यांचेमधील पहिली लढाई संपली.

वरील लढाईमध्यें बुऱ्हाण निजामशहाची जी फजीती झाली तिचेमुळें त्यास चैन पडत नव्हतें. त्यानें इमादशहाचा व आदिलशहाचा कांहीं कारणामुळें बिघाड झाला असें पाहून, विजापूरचे मुलखावर पुनः स्वारी केली. त्यानें यावेळीं अमीर बेरिदाचा मुलगा अली बेरिद याची तर मदत घेतलीच होती; परंतु त्याशिवाय त्यानें गोवळकोंड्याचा सुलतान जमशीद कुतुबशहा व विजयानगरचा राजा रामराज यांचेंही साहाय्य घेतलें होतें. यामुळें विजापूरचे मुलखावर एकदम चोहोंकडून हल्ले सुरू होऊन, इब्राहीम आदिलशहावर पुनः बिकट प्रसंग आला.

यावेळीं त्यानें, असदखानाचा सल्ला घेतला व त्याचे सांगण्यावरून, बुऱ्हाण निजामशहास सोलापूर व त्याचे खालील परगणे परत देऊन टाकून, त्याशीं तह केला. त्याचप्रमाणें रामराजासही कांहीं अल्पस्वल्प देऊन, त्यास परत लाविलें. मग बाकी राहिलेला जो कुतुबशहा, त्याचें पारिपत्य करण्याचा विचार करून, असदखानानें त्याजवर चाल केली व त्याचे पाठीस लागून, तो गोवळकोंड्यास जाऊन पोहोंचेपर्यंत त्यानें त्याची पिच्छा सोडिली नाहीं. ( १५४३ ).

येणेंप्रमाणें, बुऱ्हाण निजामशहास सोलापूरचे परगणे मिळूनही तो तृप्त झाला नाहीं. त्यानें रामराजाबरोबर कारस्थानें चालवून, पुन्हां उलाढाली चालविल्या. अखेर, तो बरोबर मोठी फौज घेऊन भीमा नदीचे कांठीं ऊरजान गांवाजवळ येऊन उतरला. त्यास सामना देण्याकरितां, इब्राहीम आदिलशहाही पुढें सरसावून, उभय सैन्यांचें फार मोठें युद्ध झालें. त्यांत बुऱ्हाण निजामशहाचा अगदीं मोड होऊन, त्याचे पुष्कळ हत्ती, घोडे, तोफा वगैरे सामान विजापूरकरांचे हातीं लागलें. या लढाईमध्यें, इब्राहीमशहा व असदखान यांनीं, फार पराक्रम केला, ह्मणून लिहिलें आहे; परंतु या जयामुळें आदिलशहा हा असा चढून गेला कीं, तो आपले प्रजेवर जुलूम करून तीस फार पीडा करूं लागला. यामुळें सर्व लोक त्यावर अगदीं बेदील होऊन गेले. अशा स्थितींत बुऱ्हाण निजामशहानें पुनः विजापूरचे राज्यावर हल्ला करून, सहा महिन्यांत आदिलशहाचा दोनदां पराभव केला व चोहोंकडे अशी धामधूम करून सोडिली कीं, इब्राहीमशहाची आतां धडगत नाहीं असें सर्व लोक ह्मणूं लागले. या संकटाचे वेळीं आदिलशहास अशी शंका येऊं लागली कीं, आपले सरदार व कामगार हे शत्रूस अनकूळ झाले असल्यामुळें, आपली अशी दुर्दशा होत आहे. ह्मणून त्यानें कित्येक मुसलमान व हिंदु कामगारांस ठार केलें, व अशींच दुसरीं भ्रम झाल्यासारखीं दुष्ट कृत्यें तो करूं लागला.

सुलतानाची प्रकृति अशी जुलमी, संशयखोर व चेतावल्यासारखी झाली असतां, विजापूरचे कित्येक लोकांनीं त्यास पदच्युत करून,

त्याचा धाकटा भाऊ अबदुल्ला यास गादीवर बसविण्याचा विचार चालविला; परंतु तो पूर्ण सिद्ध होण्याचे अगोदरच त्याबद्दलची बातमी कोणी आदिलशहास दिली. यामुळें त्यानें अधिक चवताळून, संशय आलेले लोकांचा एकदम शिरच्छेद करण्यास हुकूम केला; तथापि या कचाटींतून अबदुल्ला निसटून, गोंव्यास तेथील पोर्तुगीज गव्हरनराकडे आश्रय मागण्याकरितां पळून गेला व तेथून त्यानें बुऱ्हाण निजामशहा व जमशीद कुतुबशहा यांशीं पत्रव्यवहार सुरू करून, त्यांनीं आपणांस साहाय्य करावें ह्मणून खटपट चालविली. तसेंच असदखान वजीर, जो सुलतानाचे संशयखोर वृत्तीस कंटाळून, बेळगांवचे आपले जहागिरीकडे या पूर्वींच पुनः निघून गेला होता, त्यासही आपले कटांत ओढण्याचा उद्योग, अबदुल्लानें निजामशहाचे मार्फत चालविला; परंतु असदखानाचें मन या स्वामिद्रोहाकडे मुळींच वळत नाहीं असें पाहून, या कटाची बरीच नाउमेद झाली व यानंतर लवकरच त्याचे मृत्यूचें वर्तमान ऐकून तर, अबदुल्लाची मसलत अगदींच ढासळून गेली. (१५४९). असदखानाचे मरणसमयीं वय सुमारें ९० वर्षांचें होतें. त्याचा पराक्रम, शहाणपण, त्याची स्वामिभक्ति व एकंदर चांगली वागणूक, यांविषयीं विजापूरचे सर्व मुसलमान इतिहासकारांनीं त्याची फार प्रशंसा केली आहे. सारांश, त्याची योग्यता, ब्राह्मणी सुलतानांचा वजीर महंमद गवान याचे खालचीच, अशी त्यांनीं धरिली आहे.

यानंतर अल्ली बेरिद याचा, बुऱ्हाण निजामशहास कांहीं कारणावरून राग येऊन, त्यानें त्याचे कल्लचाणीचे किल्ल्यास वेढा घातला. बेरिदानें आपले मदतीस इब्राहीम आदिलशहास बोलाविलें. अखेर दोन्ही सुलतानांची लढाई होऊन, तींत आदिलशहाचा पराभव झाला. इब्राहीमशहाचे यापुढील दिवस फार वाईट स्थितींत गेले. बुऱ्हाण निजामशहानें रामराजाशीं तह करून, त्यांनीं आपापसांत आदिलशहाचें राज्य वांटून घेण्याचा बेत केला व त्याप्रमाणें रामराजानें दक्षिणेकडून स्वारी करून, रायचूर व मुद्गल हे किल्ले घेतले व निजामशहा

सोलापूरचे परगणे काबीज केले; परंतु इतक्यांत बुऱ्हाण निजामशहास एकाएकीं दुखणें येऊन, तो १५५३ यासालीं मरण पावल्यामुळें, इब्राहीमशहाविरुद्ध केलेला बेत तूर्त तितकाच राहिला.

बुऱ्हाण निजामशहाचे मागून, त्याचा मुलगा हुसेन निजामशहा यानेंही, इब्राहीमशहाविरुद्ध मसलती चालविल्या. ह्मणून आदिलशहानें, हुसेनशहाचा भाऊ अल्ली, जो त्याजपासून पळून विजापूरास येऊन राहिला होता, त्याचा पक्ष घेऊन अहंमदनगराकडे चाल केली. शेवटीं दोघां सुलतानांचे फौजांची गांठ सोलापुरापाशीं पडून, तेथें त्यांची मोठी लढाई झाली. तींत, इब्राहीमशहाचा असा कांहीं मोड झाला कीं, त्यास तेथून आपले मुलखांत पळून यावें लागलें. यानंतर थोडेच दिवसांनीं, त्याचा सरदार सैफ ऐन उल्मुल्क, जो यापूर्वी निजामशहाचे पदरीं असून तेथून आदिलशहाचे चाकरीस राहण्यास आला होता, त्यानेंही बंड करून, इब्राहीमशहाचा अगदीं पराजय केला व त्यास विजापूरांत कोंडिलें. अशी अगदीं वाईट दशा प्राप्त झाली असतां, आदिलशहानें निरुपाय होऊन, विजयानगरचे रामराजास १२ लक्ष होन पाठवून देऊन, त्याची कुमक मागितली. त्याबरोबर त्या राजानें, आपला भाऊ व्यंकटाद्रि यास पाठवून, सैफ ऐन उल्मुल्क याचा अगदीं मोड केला व आदिलशहास संकटांतून मुक्त केलें.

यापुढें इब्राहीम आदिलशहा हा फार दिवस वांचला नाहीं. त्यास अनेक व्याधि उत्पन्न होऊन, त्यांत त्याचे फार हाल झाले. अगोदरच तो तऱ्हेवाईक, जुलमी व संशयखोर असा होता, व त्यांत त्यास, दुखणें असें त्रासदायक झाल्यामुळें, तो अगदीं पिसाळून वेड्या वेड्यासारखें करूं लागला. वैद्य औषधें देत; परंतु त्यांपासून गुण येत नाहीं, तेव्हां ते लबाडी करितात असा त्यास वहीम येऊन, त्यांपैकीं त्यानें कित्येकांस हत्तीचे पायीं दिलें! त्याची अशी स्थिति झाल्यावर, त्यास औषधही देण्यास कोणी धजेना. अखेर या विपत्तींत व यातनेंत त्याचा अंत झाला. ( १५५७ ).

४ इब्राहीम आदिलशहाचे मागून, त्याचा मुलगा अल्ली आदिल-

लशहा हा त्याचे गादीवर बसला. त्यास पहिल्यापासून शिया पंथाविषयीं भक्ति वाटत असे; ह्मणून गादीवर बसतांच त्यानें त्या पंथाची पुनः स्थापना केली. विजापूरचे राज्यांत येणेंप्रमाणें धर्मांतर वरचेवर होत चालल्यानें, लोकांमध्यें चळविचळ विशेष झाली, व तेणेंकरून राज्यकारभार एकयंत्रीं चालण्यास अडचण पडूं लागली. अल्ली आदिलशहानें असदखान याचा पुत्र कीश्वरखान यास आपली वजीरी सांगितली, व त्याजवर त्याचा मोठा विश्वास असे. इब्राहीम आदिलशहाचे तऱ्हेवाईक अमलामुळें, त्याचें राज्य डबघाईसच आलें होतें; परंतु विजयानगरचे राजाचे मदतीनें तें शेवटीं शेवटीं साधारण बरेंच सांवरलें. अल्ली आदिलशहानेंही पाहिलें कीं, निशामशहाबरोबर टक्कर देण्यास रामराजाची दोस्ती आपणांस अगदीं अवश्य आहे; ह्मणून, रामराजाचा पुत्र या सुमारास मेला होता, तेव्हां त्याचें शांतवन करण्याचे निमित्तानें, तो विजयानगरास बरोबर फक्त १०० स्वार घेऊन गेला. तेथें रामराजानें त्याचा मोठा सत्कार केला, व परस्परांनीं परस्परांस संकटसमयीं मदत करावी असा त्यानें त्याशीं तह केला.

यानंतर लवकरच अल्ली आदिलशहानें, हुसेन निजामशहाकडे आपला वकील पाठवून, यापूर्वी इब्राहीमशहापासून बुऱ्हाणशहानें सोलापूर व त्या खालचे पांच परगणे घेतले होते, ते परत देण्याविषयीं सामोपचारानें मागणी केली; परंतु हुसेन निजामशहानें तीस अगदीं राग येण्यासारखें उत्तर दिलें. त्यावरून दोघां सुलतानांमध्यें लवकरच लढाई सुरूं झाली. अल्ली आदिलशहानें, रामराजास आपले मदतीस बोलाविलें. तो येतांच विजापूरकरांच्या व विजयानगरवाल्यांच्या फौजा एकत्र होऊन, त्या निजामशहाचे मुलखांत लुटालुट करीत व देश ओस पाडीत चालल्या. हुसेन निजामशहाचे हातून त्यांस मुळींच अडथळा करवेना; ह्मणून तो अहंमदनगर शहर सोडून पैठणास पळून गेला, व कांहीं वेळानें त्यानें, अल्ली आदिलशहास कल्लचाणीचा किल्ला देऊन त्याशीं तह केला ( १५५८ ).

हा तह होऊन, विजापूरच्या व विजयानगरच्या फौजा आपापल्या मुलखांत गेल्यावर, हुसेन निजामशहानें, आपले झालेले अपमानाबद्दल सूड उगविला पाहिजे असें मनांत आणून, त्यानें युद्धाची पुनः तयारी चालविली. त्यानें गोंवळकोंड्याचा इब्राहीम कुतुबशहा व वऱ्हाडचा दुरिया इदामशहा यांशीं तह करून, विजापुरावर पुनः स्वारी केली. यावेळीं अल्ली आदिलशहानें अर्थातच पुनः रामराजाची कुमक मागितली. तो लागलीच ५०,००० फौजेनिशीं कृष्णानदी ओलांडून आला, व पूर्ववत् विजापूरकर व विजयानगरकर यांनीं निजामशहाचा पुनः धुव्वा उडवून दिला. कुतुबशहा हा दोन डगरीवर हात ठेवणारा मनुष्य होता. त्यानें झालेला हा रंग पाहून, निजामशहाची बाजू सोडून, तो आदिलशहाकडे जाऊन मिळाला. या दगाबाजीमुळें तर हुसेनशहाची फारच त्रेधा उडून गेली व त्यास जुन्नराकडे पळून जावें लागलें. इकडे शत्रूंनीं त्याचे राजधानीस वेढा घालून, सभोंवतालचा सर्व मुलुख अगदीं उध्वस्त करून टाकिला ( १५५९ ).

इब्राहीम आदिलशहानें, सैफ ऐन उलमुल्क याचें बंड मोडण्याकरितां, रामराजाची मदत घेतली, तेव्हांपासून विजयानगरकरांचें माहात्म्य वाढतच होतें; परंतु वर सांगितलेल्या ज्या दोन स्वाऱ्या अहंमदनगरावर त्यांनीं केल्या, त्यांत तें विशेषच दिसून आलें. मागें, महंमदशहा, मुजाईतशहा, अहंमदशहा वगैरे ब्राह्मणी सुलतानांनीं, विजयानगरावर स्वाऱ्या करून लाखों हिंदूंची कत्तल केली, त्यांचीं देवळें पाडलीं, त्यांचीं तीर्थस्थानें बाटविलीं या गोष्टींचा राग विजयानगरकरांचे मनांत धुमसत होताच, तो त्यांनीं आतां निजामशाहीचे स्वारींत पूर्ण प्रकट केला. त्यांनीं जागोजाग मुसलमानांच्या मशीदी, दरगे, कबरी पाडून टाकिल्या. मोठमोठ्या इमारती जमीनदोस्त केल्या किंवा जाळून टाकिल्या. मशीदींतून घोडे बांधिले किंवा तेथें कलावंतीणींचे नाच, तमाशे केले, व कुराणषरीफची भारी अमर्यादा केली. आपला दोस्त जो आदिलशहा त्याजबरोबरही विजयानगरकर हे मगरूरीनें व बेपर्वाईनें वागूं लागले. कूच करतांना त्यांनीं, नेहमीं चांगल्या

चांगल्या जागा आपल्या लष्कराकरितां बळकवाव्या, व कधीं कधीं तर आदिलशाहाचे लोकांचे तंबू उपटून टाकून त्याजागीं त्यांनीं आपले रोवावेत! अशा तऱ्हेनें वरील दोन स्वाऱ्यांत स्वतःचा व स्वतःचे धर्माचा हिंदूंनीं केलेला अपमान पाहून, अल्ली आदिलशहास राग येई; परंतु निरुपायास्तव त्यास तो सर्व गिळून राहणें भाग पडे!

असो; येणेंप्रमाणें अल्ली आदिलशाहाचे मनांत विरुद्ध भाव येऊं लागून, रामराजास कसा तरी आपले मुलखांत लवकर दवडण्याचे तो विचारास लागला. याच वेळीं पावसाळाही लागण्याचा सुमार झाला होता. यामुळें रामराजाही विजयानगराकडे जाण्याविषयीं आतुर झाला होता. तेव्हां तूर्त अहमदनगरचा वेढा उठवून, आदिलशहा व रामराजा हे आपापले मुलखाकडे आपापल्या फौजा घेऊन परतले. वाटेंत सोलापूरचा किल्ला लागला. तो घेण्याचा आदिलशहाचा प्रथम विचार होता; परंतु रामराजाचें उत्तरोत्तर चढाईचें वर्तन, त्यानें महंमदी धर्माची चालविलेली विटंबना व त्याचे फौजेची दांडगाई हीं पाहून, आदिलशहाचा वजीर कीश्वरखान यानें त्यास ह्मटलें कीं, 'हा किल्ला आतांच जर घेतला, तर रामराजा तो आपलेकडेसच ठेवील. त्यास आलीकडे असें वाटूं लागलें आहे कीं, आपल्यावांचून आदिलशहाचें कांहीं चालणार नाहीं. तेव्हां तूर्त त्यास सामोपचारानें आपले राजधानीकडे जाऊं द्यावें. किल्ला आणखी एकादेवेळीं घेतां येईल.' आदिलशहास वजीराचें हें बोलणें पसंत पडलें व त्याप्रमाणें त्यानें, रामराजास वरून स्नेहभाव दाखवून, त्यास आपले मुलखांत जाण्यास निरोप दिला; परंतु रामराजाची फौज अनावर झाली असल्याकारणानें, ती जातां जातां आदिलशहाचे राज्यांत सुद्धां लुटालूट करीत गेली असें ह्मणतात.

वर लिहिलेल्या रामराजाच्या व त्याच्या फौजेच्या कृत्यांवरून अल्ली आदिलशहाचे मनांत त्याचेविषयीं द्वेष उत्पन्न झालाच होता; परंतु रामराजानें जेव्हां विजापूरचे मुलखावर फारसें कारण नसतां, फौज पाठवून त्यांतील यातगीर व बागलकोट हीं दोन्हीं ठाणीं बळकाविलीं, तेव्हां अल्ली आदिलशहा हा फारच रागावला. त्यानें

आपले मुख्य मुख्य मुत्सद्यांचा विचार घेऊन असें ठरविलें कीं, ‘ निजामशहा, कुतुबशहा, इमादशहा व बरीदशहा या सर्वांनीं एकत्र होऊन व रामराजावर स्वारी करून, त्याचा समूळ नाश केल्याशिवाय, मुसलमानलोकांची सत्ता दक्षिणेंत राहणार नाहीं. तो एका दोघा सुलतानांस ह्मणजे भारीच आहे ; तेव्हां सर्वां पांचांचा कट झाल्यावांचून ही गोष्ट साध्य होणार नाहीं. मागें ब्राह्मणी सुलतान होते, तेव्हां विजयानगरची येवढी प्रतिष्ठा कधीं वाढली नाहीं ; परंतु आलीकडे आपल्या मुसलमान सुलतानांमध्येंच चुरस व द्वेष हीं वाढून, त्यांमध्यें लढाया वारंवार होऊं लागल्याकारणानें, या हिंदु राजाचें प्राबल्य वाढलें आहे व तेणेंकरून तो आपले मुलूख हिसकावून घेऊन, आपले धर्माची अप्रतिष्ठा करीत आहे. तेव्हां धर्माचा मुख्य विचार मनांत धरून, आपणांस आपापसांतील कलह बंद केले पाहिजेत व या कुराणद्वेष्ट्या नास्तिक हिंदुराजाचा प्रथम नाश केला पाहिजे. मग या पायीं राज्य व प्राण हे दोन्हीही गेले तरी बेहेत्तर आहे. ’

येणेंप्रमाणें अली आदिलशहाचा व त्याचे सरदारांचा निश्चय होऊन, त्यांनीं प्रथम इब्राहीम कुतुबशहाचा मनोदय पाहण्याकरितां, त्याजकडे कीश्वरखान यास पाठविलें. त्यानें आदिलशहाचा हेतु कुतुबशहास कळवितांच, तोही त्या बेतास एकदम अनुकूल झाला. कारण, रामराजानें त्याचे मुलुखांतीलही पानगल व गंटूर हे किल्ले नुकतेच जिंकून घेतले असल्यामुळें, तो त्याजवर चरफडतच होता. त्यानें अली आदिलशहाचा पक्का निश्चय पाहून, या कटास हुसेन निजामशहाही मी मिळवून आणून देतों, अशी त्यानें आपली जिमा दिली. कीश्वरखानास ही गोष्ट पसंत पडतांच, कुतुबशहानें आपला वकील हुसेन, निजामशहाकडे पाठविला व त्यास झालेली हकीगत कळविली. निजामशहाचे राज्याची विजयानगरवाल्यांनीं नुकतीच जी दुर्दशा केली होती, तिजवरून तो रामराजाचा सूड उगिवण्याबद्दल उत्सुक होताच. त्यास हा कट होत आहे असें पाहून फार आनंद झाला व ‘ धर्माचे बाबींत मी दुसरा कोणताही विचार मनांत आणीत नाहीं ’ असें त्यानें कुतुबशहाचे

वकीलास ह्मटलें. आदिलशहाविषयींचें आपलें सर्व वैर नाहींसें झालें हें दाखविण्याकरितां, त्यानें, त्यास आपली मुलगी चांदबिबी ही देऊन, तीस अंदण ह्मणून सोलापूरचा किल्ला व त्याचे खालचे पांच परगणे—ज्यांचे संबंधानें विजापूरकर व अहंमदनगरकर सुलतानांचें इस्माएल आदिलशहापासून एकसारखें भांडण चाललें होतें, ते एकदांचे देऊन टाकण्याचेंही त्यानें कबूल केलें. हुसेन निजामशहाची ही पालटलेली वृत्ति पाहून, अल्ली आदिलशहानेंही आपली बहीण, हादी सुलताना, ही हुसेनशहाचा मुलगा मूर्तिजा यास देऊं केली. येणेंप्रमाणें आदिलशहा व निजामशहा यांच्या आपापसांत सोयरिका ठरवून व राजकीय प्रकरणांसंबंधानें करार मदार होऊन, दोन्हीं लग्नें मोठ्या समारंभानें झालीं व यापुढें लवकरच रामराजाचा नाश करण्याकरितां, त्याचे राज्यावर प्रचंड स्वारी करण्याची आदिलशहा, निजामशहा, कुतुबशहा व बरीदशहा यांनीं तयारी चालविली. ( १५६४ ).

लढाईस कांहींतरी कुरापत काढण्यासाठीं आदिलशहानें आपला वकील रामराजाकडे पाठवून, त्याजपाशीं एतगीर, मुदगल, रायचूर व बागलकोट हे किल्ले परत मागितले; परंतु रामराजास आपणावर चालून येणारे वावटळाची कल्पना नसल्यामुळें, त्यानें आदिलदशहाचे वकीलाची निर्भर्त्सना करून त्यास परत लाविलें. हें वर्तमान शहास कळतांच, ते एकदम आपापल्या फौजा घेऊन कृष्णेच्या कांठीं तालिकोट येथें येऊन उतरले. इकडे रामराजानेंही आपला एक भाऊ यलतमराज याजबरोबर २०,००० स्वार, ५०० हत्ती, १,००,००० पायदळ इतकी फौज देऊन, त्यास कृष्णानदींतील सर्व उताराच्या जागा धरून, मुसलमान लोकांस आलीकडे येऊं देऊं नये ह्मणून पुढें पाठविलें. त्यानें आपला दुसरा भाऊ व्यंकटाद्रि याजबरोबर दुसरें जंगी सैन्य देऊन, लढाई जुंपलीच तर यलतमराज यास त्यानें मदत करावी ह्मणून रवाना केलें, व आपण स्वतः आणखी तिसरी मोठी फौज गोळा करून मागून निघाला. येणेंप्रमाणें दोन्ही पक्षांची लढाईची मोठी कडेकोट तयारी झाली. या युद्धांत सुलतानांची व रामराजाची

जी कडाक्याची लढाई होणार होती, ती कमीजास्त मुलखासाठीं ह्मणून नव्हे, तर यापुढें दक्षिणेंत, मुसलमानांचें प्राबल्य असावें किंवा हिंदूंचें असावें, यासाठीं ती होणार होती; व ह्मणून दोन्ही बाजूंचे लोकांनीं या युद्धांत आपणांस यश मिळावें, ह्मणून त्यांचे हातून जितकी खटपट होईल तितकी त्यांनीं चालविली!

रामराजानें नदींतील उतारांच्या सर्व जागा अडविल्या असल्यामुळें, मुसलमान लोकांस पलीकडे जाण्याची प्रथम फारच अडचण झाली. शेवटीं त्यांनीं अशी युक्ति केली कीं, आपली सर्व फौज घेऊन नदीचे वरचे बाजूस जावें, व तेथून फौज उतरण्याची गुलकावणी दाखवावी; ह्मणजे कदाचित् विजयानगरचे लोक आपले मागोमाग दुसरे तीरानें येतील, व तितक्यांत संधि साधून आपण मागें उलटून त्यांचे उतारांवरूनच जितके लोक नेतां येतील, तितके पलीकडचे तीरावर उतरून न्यावे. याप्रमाणें मुसलमान लोकानीं करून पाहतां, खरोखरच त्यांस तें इतकें चांगलें साधलें कीं, त्यांचें बहुतेक सर्व सैन्य पलीकडचे तीरावर उतरून गेलें, व त्यांनीं आपली छावणी, रामराजाचे छावणीपासून पांच कोसांवर ठोकिली! शत्रूंची ही शिताफी पाहून विजयानगरकरांना आश्चर्य वाटलें; परंतु रामराजानें न डगमगतां, आपल्या भावांस माघारें बोलावून एकदम प्रचंड संग्रामाचीच तयारी केली. त्यानें यलतमराज, यास उजवे बाजूवर व व्यंकटाद्रीस डावे बाजूस उभे करून, आपण स्वतः मध्यभागीं उभा राहिला, व आघाडीस दोन हजार लढाऊ हत्ती व तोफखाना ठेविला. मुसलमानांनीं फौजेकडे उजवे फळीवर अल्ली आदिलशहा, व डावीवर इब्राहीम कुतुबशहा आणि बरीदशहा हे असून, मध्यभागीं हुसेन निजामशहा हा उभा होता. या प्रसंगीं प्रथम विजयानगरकरांनीं हल्ला सुरू केला. रामराज हा सिंहासनावर बसून, जे कोणी शिपाई पराक्रम करतील, त्यांस मुठीच्यामुठी रुपये, होन, मोहरा वांटीत होता. त्या योगानें हिंदूंस उत्तेजन येऊन, त्यांनीं असा जोराचा मारा चालविला कीं, त्यापुढें मुसलमान फौजेची मोठी धांदल उडून गेली, व आदिलशहा व कुतु-

बशहा हे कचरून मागें हटण्याचा विचार करूं लागले. हुसेन निजामशहानें मात्र धीर सोडला नाहीं. त्यानें शत्रूंचा मारा तसाच सोसून, आपले तोफखान्याची फळी फोडूं न देतां, तसाच तो पुढें पुढें चाल करीत चालला. त्याजपाशीं निरनिराळ्या टप्याच्या ६०० तोफा असून, त्यांजवर, चुलीबी रूमीखान, ह्मणून कोणी फार कुशल तुर्की गोलंदाज होता. त्यांनीं रामराजाचे फौजेचा मध्यभाग गांठून, त्याजवर तीन टोळ्यांनिशीं चाल केली. रामराजानें हें पाहून त्यांचे अंगावर त्यानें आपलें प्रचंड पायदळ पाठविलें, व त्यांनींही आपले पराक्रमाची पराकाष्ठा केली; परंतु निजामशहानें शत्रू अगदीं जवळ येऊन भिडले असें पाहून, त्यांजवर थैल्यांत तांब्याचा खुर्दा घालून, व तो तोफांतून उडवून असा एकाएकीं भडिमार केला कीं, त्या-सरसे विजयानगरकरांचे पांच हजार शिपाई एकदम रणभूमीवर मरून पडले, व बाकी राहिलेले निराश होऊन मागें हटूं लागले. इत-क्यांत कीश्वरखानानें त्यांजवर बाजूनें हल्ला सुरू केला. त्यामुळें त[illegible] त्यांची अगदींच धांदल उडून जाऊन, ते अस्ताव्यस्त असे पळूं लागले रामराजानें झालेला प्रकार पाहून, तोही रणांतून पळून जाऊं लागला परंतु तो ७० वर्षांचा ह्मातारा असल्यामुळें, त्यास तसें सहज करित[illegible] आलें नाहीं. तो घोड्यावर चढत असतांच, त्यास मुसलमानांनीं पक[illegible]डलें व हुसेन निजामशहाकडे नेलें. त्यानें त्यास पहातांच, तत्क्ष[illegible] त्याचें डोकें कापून व तें एका लांब भाल्यावर लावून, चोहोंकडे फि[illegible]विलें! आपला राजा मेला हें पाहतांच, विजयानगरकरांचे फौजे[illegible] अधिकच गाळण होऊन, ती आतां सर्वच रण सोडून पळूं लाग[illegible] तिचे मागें मुसलमान लोक लागले व त्यांनीं तिची अगदीं कत्तल उ[illegible]विली. या लढाईंत एकंदर एक लक्ष हिंदूंची फौज ठार झाली [illegible] लिहिलें आहे. यलतमराज हा या युद्धांत पडला, व रामराज[illegible] सर्व खजीना व लढाईचें सर्व सामानसुमान मुसलमान लोकांचे ह[illegible] लागलें. ही लढाई संपतांच, चारी शहा, विजयानगरावर एकदम [illegible] करून गेले. तेथें त्यांनीं सर्व शहर लुटून त्याचा बहुतेक अ[illegible] विध्वंस केला व त्यांत पुनः वस्ती होऊं नये, अशी त्याची दु[illegible]

करून टाकिली. येणेंप्रमाणें विजयानगरचें राज्य, जें मागें सांगितल्याप्रमाणें १३३९ या वर्षीं बुक्क राजाकडून स्थापन होऊन, प्राचीन हिंदु राज्यांचे नमुनेदाखल ह्मणून सुमारें सव्वादोनशें वर्षेंपर्यंत बरेंच चांगले भरभराटींत चाललें होतें व जें, सर्व देश मुसलमान लोकांचे हातीं गेला असतां, हिंदुधर्म, हिंदुविद्या, हिंदुकला वगैरे गोष्टींचें आश्रयस्थान होऊन राहिलें होतें, त्याजवर अखेर वरील चमत्कारिक प्रसंग येऊन त्याचा कालचक्राखालीं चुराडा होऊन गेला!*

तालिकोटची लढाई होऊन $ विजयानगरचा विध्वंस झाल्यावर, चौघे शहा आपापले मुलखांकडे परत आले. रामराजाची वरचढाई व त्यानें महंमदी धर्माची केलेली विटंबना, या दोन गोष्टींनींच काय तें आदिलशहाचे व निजामशहाचे पिढीजादा बनलेलें हाडवैर कांहीं वेळ

---

* रामराजावरील या स्वारीचें वर्णन वाचून, यापुढें सुमारें दोनशें वर्षांनीं उत्तरहिंदुस्थानांत भाऊसाहेबांनीं केलेल्या स्वारीचें स्मरण, इतिहासज्ञ वाचकांस सहज होण्यासारखें आहे. रामराजाप्रमाणें भाऊसाहेबांविरुद्ध मुसलमान राजांनीं केलेला कट, दक्षिणेंतील सुलतानांचे सैन्याप्रमाणेंच अबदालीचे फौजेचें यमुनानदी एकाएकीं धाडसानें उतरून येणें, तालिकोटप्रमाणेंच पानिपत येथील बडा संग्राम व अखेर रामराजाप्रमाणें भाऊसाहेबांचा पराभव व त्यांचे व त्यांचे पुतण्याचे देहांची विटंबना इत्यादि हृदयद्रावक गोष्टींचें साम्य सहज ध्यानांत येतें!!

$ विजयानगर हें तुंगभद्रेच्या दक्षिण तीरावर होतें. हल्लीं येथें असंख्य देवळांचे अवशेष मात्र राहिले असून, त्यांवर जंगल वाढलें आहे, व त्यांत माकडें व वानर यांची वस्ती आहे. नदी किनाऱ्यावरून जो रस्ता जातो, त्याच्या पश्चिमेस मुख्य देवळें आहेत. त्यांपैकीं एक वितलाचें आहे. त्याची बांधणी व सौंदर्य हीं वेरुळाचे लेण्यांची बरोबरी करितात. सुंदर खोदीव नक्षीचें काम केलेले असे, एकाच दगडाचे १४ पासून २० हात उंचीचे खांब असून, त्यांवर फरशांची गच्ची आहे. पंपापति विरूपाक्षाचें दुसरें एक भव्य देवालय आहे. याशिवाय याच नमुन्यांचीं वीरभद्र व गणपति यांचींही देवळें आहेत. गणपतीचे देवालयापुढें २० हात उंचीची नृसिंहाची मूर्ति आहे. याशिवाय राजवाड्याचे व हत्तीमहालाचे अवशेष आहेत.

मोडकांचा इतिहास.

नाहींसें होऊन त्यांचा कट झाला होता; परंतु रामराजाचा नाश होतांच त्यांमधील वैरभाव व प्रतिस्पर्धा ही पुनः सुरू झाली. विजयानगरचे स्वारीहून परत आल्यावर थोडेच दिवसांनीं, हुसेन निजामशहा हा मरण पावला ( १५६९ ); व त्याचे मागें त्याचा मुलगा मूर्तिजा निजामशहा हा लहान असल्यामुळें, त्याची विधवा राणी खुजा सुलताना ही राज्यकारभार पहात आहे, तेव्हां आपलें राज्य वाढविण्यास ही संधि बरी आहे असें पाहून, अल्ली आदिलशहा दक्षिणेकडे फौज घेऊन निघाला. तिकडे रामराजाचा नाश झाल्यानंतर, त्याचा भाऊ व्यंकटाद्रि यानें, पेणकोंड येथें आपली गादी नेऊन सभोंवतालचा थोडाबहुत प्रांत संभाळिला होता; परंतु बाकी सर्व मुलखांत जागजागीं जे जहागीरदार होते, तेच स्वतंत्र संस्थानिक होऊन बसले होते. अशी स्थिति पाहून, अल्ली आदिलशहानें प्रथम व्यंकटाद्रीवर स्वारी केली; परंतु त्यानें, अहंमदनगरचे राणीकडे कुमक मागून तिजकडून विजापुरावर चाल करविली, व तेणेंकरून आदिलशहास आपले राजधानीचे संरक्षणार्थ परत आपले मुलखांत जावें लागलें.

यानंतर, निजामशाहींत बरीच अव्यवस्था आहे असें पाहून, अल्ली आदिलशहानें, आपला सरदार कमाल कीश्वरखान याजबरोबर २० हजार फौज देऊन, त्यास मूर्तिजा निजामशहाचे मुलखावर पाठविलें, व त्यानें त्याचा कांहीं भाग जिंकून घेऊन, त्याचे संरक्षणासाठीं एक नवीन मजबूत किल्लाही बांधिला, व तेथें दारूगोळा वगैरे लढाऊ सामान चांगलें जय्यत ठेविलें; परंतु थोडेच दिवसांनीं मूर्तिजा निजामशहा, जो यावेळीं बराच प्रौढ झाला होता, त्यानें आपले आईचे हातांतील कारभार काढून घेऊन राज्यांत चांगला बंदोबस्त केला व कमाल कीश्वरखानावर स्वारी केली. अल्ली आदिलशहानें, कीश्वरखानाचे मदतीस आणखी फौज पाठविली; परंतु त्याचें कांहीं न चालून, शेवटीं कीश्वरखान लढाईत पडला व विजापूरची फौज पराजय पावून, मोठे कष्टानें आपले मुलखांत परत आली. यानंतर थोडा वेळपर्यंत अल्ली आदिलशहा व मूर्तिजा निजामशहा यांचें युद्ध चालून, शेवटीं त्या

दोघांमध्यें असा तह ठरला कीं, ' विजापूरवाल्यानें विजयानगराचे नष्ट झालेल्या राज्याचा प्रांत आपले मुलखास जोडून घ्यावा; त्यास अहंमदनगरवाल्यानें प्रतिबंध करूं नये व त्याचप्रमाणें वऱ्हाडप्रांत जो इमादशाही घराण्यास एकीकडे गुंटाळून ठेऊन, तिचा वजीर तोफलखान यानेंच बळकावला होता, तो त्याजपासून निजामशहानें जिंकून घेऊन, आपले राज्यास जोडावा व त्यास आदिलशहानें अडथळा करूं नये. ' ( १५६९ ).

वर लिहिल्याप्रमाणें दोन्ही सुलतानांचा तह झाल्यावर, अल्ली आदिलशहानें दक्षिणेकडे स्वारी करून, विजयानगरचे राज्यापैकीं आडोनी, तोरगल, धारवाड, बंकापूर वगैरे किल्ले व त्यांचे खालचे प्रांत हे जिंकले व त्यानें आपला अंमल पेणकोंड्यापर्यंत बसविला. शेवटीं पेणकोंड्यासही त्यानें वेढा घातला; परंतु व्यंकटाद्रीनें, आदिलशाही फौजेंतील हदियातम नांवाचे बरगी सरदारास फितूर करून, त्याचेकडून विजापूरवाल्यांस असा त्रास दिला कीं, आदिलशहास पेणकोंड्याचा वेढा उठवून परत आपले मुलखाकडे जाणें भाग पडलें. ( १५७२ ). यापुढें बरगी लोकांचा उपद्रव विजयानगरचे जवळील प्रांतांत फारच झाल्यावरून ते युद्धानें आपणांस आटोपत नाहींत असें पाहून, अल्ली आदिलशहानें त्यांतील मुख्य मुख्य सरदारांस आपले पदरीं मोठमोठ्या जागा देण्याचें वचन देऊन त्यांस विजापूरास आणविलें व पुढें कांहीं दिवस त्यांच्यांशीं चांगले रीतीनें वागल्याचें दाखवून शेवटीं त्यानें त्यांतील बहुतेकांस ठार मारिलें. ( १५७८ ).

अल्ली आदिलशहा हा, यापुढें स्वतः फारसा राज्याचें कामकाज पाहीनासा होऊन, त्यानें आपला सर्व कारभार मुस्तुफाखान ह्मणून त्याचे विश्वासाचा कोणी सरदार होता, त्याजवर सोंपविला व तो आपला सर्व वेळ ऐषआरामांत घालवूं लागला. त्यानें विजयानगरचा मुलूख सहज रीतीनें जिंकला जात नाहीं असें पाहून, तेथील संस्थानिकांसच त्यांचे अधिकारांवर कायम केलें व त्यांनीं आपणांस खंडणी

देत जावी, असा त्यांजपासून ठराव करून घेतला. त्याचप्रमाणें आपणांस पोटीं पुत्र नाहीं, ह्मणून त्यानें आपला पुतण्या इब्राहीम यास आपला वारस ह्मणून ठरविलें. येणेंप्रमाणें सर्व व्यवस्था करून, अल्ली आदिलशहा हा चैनींत दिवस घालवीत असतां, त्याचे एका खोजानें त्याचा एके दिवशीं खून केला. ( १५८० ).

अल्ली आदिलशहास मोठमोठ्या इमारती बांधण्याचा वगैरे बराच षौक असे. त्यानें आपले मरणानंतर आपलें प्रेत पुरण्याकरितां, रोझा अल्ली, ह्मणून एक भव्य कबर बांधण्याचें काम चालविलें होतें; परंतु त्याचे मरणानंतर तें तसेंच अर्धें राहून गेलें. या कबरींत त्याचें प्रेत मोठे समारंभानें पुरलें. या इमारतीशिवाय, अल्ली आदिलशहानें जुम्मा मशीद ह्मणून एक फार मोठी मशीद बांधिली. ती संपूर्ण तयार होऊन तींत पांच हजार लोकांस एकदम निमाज पढतां यावा, एवढी ती मोठी आहे. शहराचा तट, जो यापूर्वीं युसफ आदिलशहा व इब्राहीम आदिलशहा यांनीं साधारण मजबुतीचा असा बांधला होता, तो या शहानें मोठा विस्तीर्ण, मजबूत व पूर्ण असा केला. त्याचप्रमाणें त्यानें पाण्याचे नळ बाहेरून बांधून आणून, राजधानींत रस्तोरस्तीं पाणी आणून सोडिलें व तेणेंकरून लोकांस मोठें सुख केलें. एकंदरींत अल्ली आदिलशहा, हा विजापूरचे जे सुलतान झाले, त्यांमध्यें बऱ्याच योग्यतेचा होता यांत संशय नाहीं.

५ अल्ली आदिलशहाचे मरणानंतर, त्यानें ठरविल्याप्रमाणें त्याचा पुतण्या इब्राहीम आदिलशहा ( दुसरा ) हा त्याचे गादीवर बसला. त्यावेळीं हा केवळ ९ वर्षांचा असल्यामुळें, राज्यकारभार, त्याची चुलती चांदबिबी ही, कामीलखान वजीराचे साहाय्यानें करूं लागली; परंतु कामीलखान, यास चालू स्थिति पाहून आपणच राज्याधिकार बळकवावा अशी लवकरच दुष्ट बुद्धि उत्पन्न झाली, व तो राणीस जुमानीनासा झाला. यावरून तिनें कीश्वरखान नामक सरदारास बोलावून आणून त्याचेकडून कामीलखानास पदच्युत करण्याची मसलत केली.

वजीर किल्ल्यांत काम करीत बसला असतां, तेथें एकाएकीं कांहीं हत्यारबंद शिपाई घेऊन कीश्वरखान गेला; परंतु कामीलखानानें आपणांवर आलेलें संकट पाहून तो मोठे त्वरेनें एका खिडकींतून किल्ल्यावरून खालीं उतरून गेला व त्यानें अहंमदनगरचा रस्ता धरला; परंतु कीश्वरखानाचे लोकांनीं त्यास वाटेंतच गांठून ठार केलें.

येणेंप्रमाणें कामीलखानाचा नाश करून, कीश्वरखानानें राणीची कामगिरी बजावली, व त्यावरून तिनें त्यासच आपली दिवाणगिरी सांगितली; परंतु थोडेच दिवसांत कीश्वरखानही कामीलखानाप्रमाणें बेइमानपणें वागूं लागला. त्यानें चांदबिबीवर, मूर्तिजा निजामशहा-बरोबर तूं फितूर चालविला आहेस असा दोषारोप करून, तीस साता-ऱ्याचे किल्ल्यांत कैद करून ठेविलें. त्याचप्रमाणें विजयानगरचे प्रांतावरील सुभेदार मुस्तफाखान, जो सर्व सरदारांमध्यें भारी होता व जो आपणां-विरुद्ध बंड करील ह्मणून वजीरास धाक वाटत होता, त्याचा वध कर-ण्याकरितां त्यानें सुलतानाचे शिक्क्याचें पत्र बंकापूर येथें पाठविलें व मुस्तफाखान निमाज पढत असतां, त्याचा खून करविला. यानंतर कीश्वरखान यानें पाहिजे त्यास ठार मारण्याचा किंवा कैद करण्याचा क्रम चालविला; परंतु शेवटीं, एकलासखान ह्मणून कोणी हबशी सरदार होता, त्यानें दुसऱ्या सरदारांशीं कट करून, वजीराचा पाडाव करण्याकरितां विजापुरावर चाल केली. इकडे राजधानींतील लोकही कीश्वरखानाचे जुलमास त्रासले असल्यामुळें, तेही त्याची उघडपणें निर्भत्सना करूं लागले. अशा स्थितींत, आपली धडगत नाहीं असें समजून, कीश्वरखान एके दिवशीं एकाएकीं अहंमदनगराकडे पळून गेला. तेथेंही त्याचा नीट जम न बसल्यामुळें, तेथून तो निघून गोवळकोंड्यास गेला; परंतु तेथें त्यास, कोणी, बंकापूरचा सुभेदार मुस्तफाखान याचे मित्रांनीं ठार करून, त्याचा सूड उगविला.

कीश्वरखान हा विजापुराहून पळून गेल्यावर, एकलासखान हबशी ह्यानें चांदबिबीस कैदेंतून काढून विजापुरास आणिलें व आपण तिचे

हाताखालीं वजीरीचें काम करूं लागला. त्यानें, कीश्वरखानानें नेम-लेल्या कामगारांस काढून टाकून, आपलेतर्फेचे नवीन लोक लाविले. यावेळीं विजापूरचे दरबारांत दक्षिणी व हबशी या लोकांमध्यें तंटे माजले असल्यामुळें, पेशवाईची जागा, ऐन उलमुल्क हबशास द्यावी किंवा अबदुल हसन दक्षणी यास द्यावी, याबद्दल मोठी दुही माजली. दोन्ही पक्षांच्या लोकांच्या वारंवार चकमकी उडून राजधानींत नेहमीं धूम चाले. अशी स्थिति झाली असतां, मूर्तिजा निजामशहा व कुली कुतुबशहा यांनीं, विजापुरावर स्वारी करण्याचा विचार केला. त्यांनीं आपले मदतीस वऱ्हाडांतून सय्यद मूर्तिजा याजबरोबर सैन्य बोलाविलें; व या तिन्ही फौजा एकत्र होतांच त्यांनीं कांहीं सैन्यानिशीं शहापूरचे किल्लयास वेढा घातला व बाकी सर्व सैन्य विजापुरावर चालून गेलें. तेथें यावेळीं इतकी अव्यवस्था झालेली होती कीं, तेथें ३००० सुद्धां फौज गोळा होईना! दोन्ही शहांनीं अर्थातच विजापुरास वेढा घातला व तें शहर घेण्याची मोठी तयारी केली. इतक्यांत, शहराचा तटही पावसामुळें एका ठिकाणीं कोसळून खालीं पडला, व ऐन उल्मुल्क व अंकुशखान, जे बाहेरून शहराचे बचावाकरितां ८००० हजार घोडे स्वारानिशीं आले होते, त्यांचा आणि एकलासखान यांचा बेबनाव होऊन, ते दोघे सरदार शत्रूंस जाऊन मिळाले! येणेंप्रमाणें आदिल-शाही अगदीं डबघाईस आली असतां, तिची या संकटांतून सुटका मोठे चमत्कारिक रीतीनें झाली. वऱ्हाडचा सेनापति सय्यद मूर्तिजा, याचे मनांत उभयता शहांस जय मिळून त्यांचे मुलख आणखी वाढावेत असें वाटत नसल्यामुळें, त्यानें ऐन उल्मुल्क व अंकुशखान यांस चार शहाणपणाच्या गोष्टी सांगून त्यांस आपले शहरांत परत लाविलें. इकडे एकलासखान यानेंही पाहिलें कीं, आपण हेका धरिला, तर सर्व राज्य आतांच बुडतें, ह्मणून त्यानें राणीकडून अबदुल हसन यास पेशवाईचीं वस्त्रें दिलीं, व तेणेंकरून दक्षिणी व हबशी लोकांचा तूर्त तंटा मिटविला. राजधानींत येणेंप्रमाणें एकी होतांच, विजापूरवाल्यांनीं मोठे परिश्रम करून, तटाचा पडलेला भाग पुनः बांधून काढिला व ते शत्रूंशीं मोठे निकरानें लढूं लागले.

इतक्यांत अबदुल हसन यानें कर्नाटकांतून बरगी सरदारांस बोलावून आणून, त्यांचेकडून शत्रूंचे सैन्यांत रसद पोहोंचेनाशी केली व त्यांचे लष्करांत धान्याची टंचाई पाडली. यामुळें उभयतां शहा विजापूरचा वेढा उठवून ते आपापले मुलखांत परत जाण्यास निघाले. निजामशहास विजापूरवाल्यांनीं आडविलें नाहीं; परंतु कुतुबशहाचे पाठीस आदिलशहाचा सरदार दिलावरखान हबशी हा लागला, व तो आपले राजधानीस पोहोंचेपर्यंत त्यानें त्याची पाठ सोडिली नाहीं. कुतुबशहाचा पराभव करून, दिलावरखान विजापुरास परत आल्यावर त्यास गर्व चढून, त्यानें वजीरीची जागा पटकावण्याची हांव धरिली. त्यानें एकलाखानास कैद करून, त्याचे डोळे काढिले, व अबदुलहसन यास ठार केलें, आणि नंतर आदिलशाहीचा सर्व कारभार तोच करूं लागला. ( १५८१ ).

येणेंप्रमाणें विजापुरास एका मागून एक असे तीन वजीर, एका वर्षा सव्वा वर्षांत होऊन गेले. त्या सर्वांस राज्याधिकाराचा लोभ उत्पन्न होऊन, त्यांचा थोडेच वेळांत पाडाव झाला. त्यांचे मागून चवथ्यानें दिलावरखान हा जो वजीर झाला, तोही त्यांचेच वर्गातला होता; परंतु तो अधिक हुषार व धूर्त असल्यामुळें, त्याची दिवाणगिरी सुमारें आठ वर्षेंपर्यंत टिकली. त्यानें प्रथमारंभींच अली आदिलशहाचे वेळची बहुतेक सर्व परदेशी शिपायांची फौज काढून टाकून, त्यांच्याऐवजीं दक्षिणी फौज चाकरीस ठेविली. शिया धर्माची प्रवृत्ति मोडून, सुनी धर्म पुनः चालू केला, व राज्यांतील सर्व बखेडा मोडून, चोहोंकडे स्वस्थता केली. त्यानें मलबार प्रांतांत व विजयानगरचे प्रांतांत फौजा पाठवून, तेथील संस्थानिकांकडे बरेच दिवस थकलेली खंडणी वसूल केली, व राज्याचें उत्पन्नही चागलें वाढविलें. त्यानें इब्राहीम आदिलशहा याची बहीण खुदीजा सुलताना हिचें लग्न, मूर्तिजा निजामशहाचा मुलगा मिरान हुसेन, यांशीं करून दिलें; ( १५८४ ) तथापि दिलावरखान यास आपला कारभार सुयंत्र चालावा असें वाटत असल्यामुळें, त्यानें युक्तीनें खुदीजा सुलतानाचे पाठराखीस ह्मणून

तिची चुलती चांदबिबी हीस पाठवून दिलें, व तेणेंकरून लहान आदिलशाहाचे कळकळीचें माणूस असें त्याजजवळ कोणी राहूं दिलें नाहीं!

यापुढें दोन वर्षांनीं दिलावरखानानें इब्राहीम आदिलशाहाचें लग्न, महंमद कुली कुतुबशाहाचे बहिणीबरोबर मोठे समारंभानें शहादुर्ग येथें लावून दिलें ( १५८६ ). याचवर्षी अहंमदनगरचा सुलतान मूर्तिजा निजामशहा ह्यास भ्रम होऊन, तो वेड्यावेड्यासारखें करूं लागला. त्याचें, त्याचा मुलगा मिरान हुसेन यांशीं वांकडें येऊन, ते एकमेकांचा जीव घेण्याचा उद्योग करूं लागले. शेवटीं राजपुत्रानें संधि साधून बापास कैद केलें, व त्याचे हाल हाल करून त्याचा प्राण घेतला; परंतु या दुष्ट कृत्याचें राजपुत्रास लवकरच फळ प्राप्त झालें. कारण, अहंमदनगरास त्याचें हें अघोर कृत्य व त्याचें यापुढील निंद्य आचरण, हीं लोकांस न आवडल्यामुळें, तो लवकरच पदच्युत केला जाऊन, ठार मारला गेला. ( १५८८ ). त्याचे मागून मूर्तिजा निजामशहाचा भाऊ बुऱ्हाण ह्मणून होता, त्याचा मुलगा इस्माएल यास गादीवर बसवून, जमालखान ह्मणून कोणीएक हुषार सरदार होता, तो वजीर होऊन राज्यकारभार चालवूं लागला.

येणेंप्रमाणें अहंमदनगरास अशी गडगड उडून गेली असतां, वर सांगितलेला बुऱ्हाण, ज्यानें मूर्तिजा निजामशहास वेड लागलें असें पाहून बंड केलें, व ज्याचा त्यांत मोड झाल्यामुळें, तो प्रथम बेदर, नंतर विजापूर व अखेर अकबर बादशहा यांकडे मदत मागण्याकरितां गेला होता, त्यानें अहंमदनगरचे गादीवरून आपला पुत्र इस्माएलशहा यास काढून टाकून, ती आपणांसच मिळावी ह्मणून खटपट चालविली. त्यानें पुनः विजापूरचा दिलावरखान, खानदेशचा सुलतान अल्लीखानशहा यांस अकबर बादशहाचीं पत्रें आणून त्यांची मदत मागितली. त्यावरून विजापूरच्या व खानदेशच्या फौजा, या जमालखानावर चालून जाऊन, त्यांनीं जमालखानाचा पराजय केला, व त्यास ठार केलें,

आणि इस्माएल निजामशहास पदच्युत करून, त्याचा बाप बुऱ्हाण यास गादीवर बसविलें. ( १५९१ ).

यावेळीं इब्राहीम आदिलशहा हा वीस वर्षांचा झाला होता; तथापि तो केवळ दिलावरखानाचे हातांतल्याचसारखा होता. त्यास स्वातंत्र्य ह्मणून अगदीं नव्हतें. सर्व राज्यकारभार दिवाणानें आटोपला असून, त्यानें शहाचे तैनातीस सर्व आपले तर्फेचीं माणसें लावून दिलीं होतीं; तथापि इब्राहीमशहा हा जात्याच हुषार असल्यामुळें, त्यानें या पारतंत्र्यांतून आपली सुटका करून घेतली. त्यानें ऐन उल्मुल्काकडे संधान लावून, एके दिवशीं रात्रीं तो गुप्तपणें राजधानींतून बाहेर पडला, व त्याचे छावणींत जाऊन मिळाला. ही बातमी दिलावरखानास समजतांच, तो आपणाबरोबर फौज घेऊन ऐन उल्मुल्काचे छावणीकडे आला. ऐन उल्मुल्काचा तरी वेळेवर रंग पाहून त्याप्रमाणें वागण्याचा विचार होता. वजीर आपले छावणीजवळ आला असें पाहून, त्याजवर हल्ला करण्यास ऐन उल्मुल्कास आदिलशहानें सांगितलें; परंतु तो कांकूंच करूं लागला. हें त्याचें वर्तन पाहून, दिलावरखान हा आपलें सैन्य मागें ठेवून, फक्त शंभर स्वार व चार हत्ती येवढेच बरोबर घेऊन आदिलशहाकडे गेला, व त्यांस खोंचून बोलला कीं, "महाराजांनीं रात्रींच कूच केलें हें फार वाईट केलें. असो; परंतु आतां आपले छावणीकडे परत जाण्यास सरकार मुकत्यारच आहेत!" या भाषणाचा आदिलशहास अतिशय राग येऊन, त्यानें आपले शिपायांस वजीरास ठार करण्यास हुकूम केला. त्यासरसें एकानें पुढें होऊन, दिलावरखानास वार केला, व बाकीचेही त्यासरसे पुढें सरसावले. वजीरानें तत्काळ आपले फौजेकडे जाऊन तीस शहावर हल्ला करण्यास हुकूम केला; परंतु तसें करण्यास ते लोक कां कूं करूं लागले, व जे कित्येक सरदार वजीराचे राजद्रोही वर्तनामुळें नाराज झाले होते, ते तर शहास उघडपणें जाऊन मिळाले. हा घडलेला प्रकार पाहून, दिलावरखान हा पळून प्रथम बेदरास व नंतर अहंमदनगरास गेला.

अहंमदनगरास आल्यावर, दिलावरखानानें बुऱ्हाण निजामास भर देऊन, त्याजकडून विजापूरचे मुलखावर स्वारी करविली; परंतु इतक्यांत इब्राहीमशहानें दिलावरखानास कपटानें एक पत्र पाठवून व त्यास पुनः वजीरी देतों अशी लालुच दाखवून, त्यास विजापुरास आणिलें, व तो तेथें आल्याबरोबर त्यानें त्याचे डोळे काढून त्यास साताऱ्याचे किल्ल्यांत कैदेंत टाकिलें. येणेंप्रमाणें दिलावरखानाचा बंदोबस्त केल्यावर, इब्राहीमशहानें बुऱ्हाण निजामशहावर चाल करून, त्याचा सोलापूर येथें पराभव केला; परंतु थोडेच दिवसांत दोन्ही शहांचा तह करमाळें येथें होऊन, त्यांचा मिलाफ झाला ( १५९१ ).

यानंतर दोन वर्षांनीं, इब्राहीमशहाचा धाकटा भाऊ इस्माएल, ज्यास त्यानें बेळगांवचे किल्ल्यांत प्रतिबंधांत ठेविलें होतें, त्यानें तेथील अधिकाऱ्यास वश करून घेऊन किल्ला आपले ताब्यांत घेतला, व ऐन उल्मुल्क वगैरे दुसरे सरदारांस फितुर करून त्यानें मोठें बंड माजविलें. शेवटीं इब्राहीम आदिलशहानें त्याजवर हामीदखान नामक सरदारास पाठवून त्याचा पराजय केला, व असें कृत्य करण्याबद्दल इतरांस दहशत बसावी, ह्मणून त्यानें इस्माएल याचा शिरच्छेद केला व ऐन उलमुल्क याचें डोकें तोफेंत घालून उडवून दिलें ( १५९३ ). या बंडांत बुऱ्हाण निजामशहाचें साहाय्य होतेंच; परंतु तें मोडतांच त्याचें सैन्य आपले मुलखांत परत गेलें, व यापुढें लवकरच त्या दोघां सुलतानांचा पुनः तह झाला; परंतु याचे पुढील सालीं बुऱ्हाण निजामशहा हा मरण पावून, त्याचे गादीवर त्याचा मुलगा इब्राहीम निजामशहा हा येतांच, त्यानें पुनः विजापुरावर स्वारी केली. त्याजवर आदिलशहानें आपला सरदार हामिदखान यास पाठविलें, व अखेर या दोघां सैन्यांची लढाई होऊन, तींत इब्राहीम निजामशहा हा पडला व त्याचे फौजेचा अगदीं पराभव झाला ( १५९४ ).

या पुढें इब्राहीम आदिलशहाचे कारकीर्दीचा निराळा असा वृत्तांत नाहीं. कारण, नुकताच वर सांगितलेला इब्राहीम निजामशहा हा लढाईंत पडल्यामुळें, त्याचे गादीवर कोणास बसवावें, याबद्दल निजाम-

शाही सरदारांमध्यें दोन पक्ष उत्पन्न होऊन, त्यांतील एकानें दिल्लीचे अकबर बादशहाचा मुलगा मुराद याची कुमक मागितली व तेणेंकरून अहंमदनगरचे राज्यांत प्रथम मोंगलांचा व नंतर इब्राहीम आदिलशहाचा संबंध पडून, यापुढें दिल्लीची बादशाही, अहंमदनगरची निजामशाही व विजापूरची आदिलशाही या तिघांचा इतिहास एकच होऊन गेला. यामुळें यापुढील जो इतिहास, ह्मणजे राजपुत्र मुराद याची अहंमदनगरावरील स्वारी, चांदबिबी हिनें राजधानीचें मोठें शौर्यानें केलेलें संरक्षण, तिचे कुमकेस इब्राहीम आदिलशहानें पाठविलेले सैन्याचा सुपें येथें झालेला पराभव, चांदबिबी ही मारली जाऊन, अहंमदनगर मोंगलांचे हातीं जाणें, तसेंच यापुढें प्रसिद्ध हबशी सरदार मलिकंबर याचे हातून निजामशाहीचें झालेलें पुनरुज्जीवन, मलिकंबर व इब्राहीम आदिलशहा यांचें वैमनस्य, त्यांच्यामधील लढाया, त्यांमध्यें मलिकंबर याची झालेली सरशी वगैरे गोष्टी, या विशेषेंकरून निजामशाहीचे प्रकरणांतलि असल्यामुळें, त्या अर्थातच पुढील निजामशाहीचे भागांत दिल्या आहेत.

असो. तेव्हां आतां येथें फक्त इब्राहीम आदिलशहाचे कारकीर्दीतीलच विशेषशा ज्या गोष्टी सांगायाच्या राहिल्या, त्या सांगून त्याचें प्रकरण संपवितों. वर लिहिल्याप्रमाणें इब्राहीम आदिलशहाचे फौजेचा सुपें येथें पराभव झाल्यावर, मोंगल बादशहाचें सामर्थ्य फार आहे, तेव्हां त्याशीं लढाई करून आपला निभाव लागणार नाहीं असें त्यानें पाहून, अकबर बादशहा १६०३ या सालीं बऱ्हाणपुरास आला असतां, त्यानें त्याजकडे नजराणे वगैरे पाठवून त्याशीं तह केला व यानंतर पुढील सालीं त्यानें आपली कन्या अकबर बादशहाचा पुत्र डानियल यास दिली, व तो लग्नविधि पैठण येथें मोठे समारंभानें केला. या सोयरीकीनें मोंगल बादशाहीचा व आदिलशाहीचा संबंध विशेष दृढ झाला, व यापुढें त्या दोघांचा सलोखा आदिलशहाचे मरणापर्यंत तसाच चालला. येणेंप्रमाणें १६०३ पासून पुढें इब्राहीमशहाचे मागील

बाकी राहिलेलीं सुमारें तेवीस वर्षें, आपली राज्यव्यवस्था नीट करून रयतेस सुख होईल अशा तजविजी करण्यांत घालविलीं. त्यानें अकबर बादशहाचा प्रधान तोदरमल्ल याचे पद्धतीप्रमाणें, आपले मुलखांतील जमिनींची मोजणी व प्रतिबंदी करून, त्यांचे धारे कायम केले. तसेंच न्याय मनसुबीचे कामांतही त्यानें चांगलें लक्ष घातलें. त्यानें गादीवर बसतांच शियाधर्म सोडून सुनीधर्म चालू केला. तरी अमुकच धर्म पाळा ह्मणून त्याची कोणास सक्ती नसे. त्यानें धर्म किंवा ज्ञाति ही कांहीं मनांत न आणतां, मोठमोठे हुद्यांवरून मराठे लोकांस व ब्राह्मणांस नेमावें. त्यास मोठमोठ्या व सुंदर इमारती बांधण्याचा मोठा नाद असल्यामुळें, त्याचे कारकीर्दीत विजापूर शहरांत पुष्कळ नवीन नवीन उत्तम इमारती बांधण्यांत आल्या व तेणेंकरून त्यास पुष्कळ शोभा आली. त्यानें बांधलेले कामापैकीं, इब्राहीम रोझा ह्मणून त्याची स्वतःची कबर आहे, ती फारच मोठी व सुंदर आहे. इब्राहीम आदिलशहास चित्रकलेचा व गाण्याचाही मोठा षौक असे. एकंदरींत विजापूरचे सर्व सुलतानांमध्यें, हा खरोखरच फार मोठा होऊन गेला व याचेवेळीं आदिलशाहींतील प्रजेस जितकें सुख झालें व तिची भरभराट झाली, तितकी इतरांचेवेळीं झाली नाहीं असें ह्मणण्यास हरकत नाहीं !

इब्राहीम आदिलशहाचीं शेवटलीं तेवीस वर्षें साधारणपणें शांततेत गेलीं खरीं; तरी भोंवतालचे राजांबरोबर त्याच्या एक दोन लढाया झाल्या. त्यानें सन १६१९ त बरीदशाहीवर स्वारी करून, तिचा सर्व मुलख जिंकून आपले राज्यास जोडला. तसेंच त्याची मलिकंबराशीं आकस पडल्यामुळें, त्याजबरोबरही त्याच्या दोन तीन लढाया झाल्या. सन १६२३ त मोंगलांचे फौजेचे मदतीस आदिलशहानें आपली फौज पाठविली असतां, त्या दोघांचाही मलिकंबर यानें नगरापासून पांच कोसांवर भातोडी ह्मणून गांव आहे, तेथें पूर्ण पराभव केला. या लढाईत आदिलशाहाचे रेंदुल्लाखान वगैरे बरेच सरदार मलिकंबरचे हातीं लागले, व त्यानंतर विजापूरचे मुलखांत शिरून त्यानें, इब्राहीमशहानें

विलें होतें, त्याजवर तोफांचा भडिमार करून तेथील बहुतेक इमारतींचा नाश केला! मलिकंबरचें पारिपत्य करण्याकरितां इब्राहीमशहानें यापुढें मोठी तयारी चालविली; परंतु मलिकंबर हा १६२६ या सालीं एका-एकीं मरण पावल्यामुळें ही लढाई बंद पडली. यापुढें लवकरच इब्राहीम-शहाही मरण पावला ( १६२७ ). त्याचे मागून त्याचा मुलगा महंमद आदिलशहा हा त्याचे गादीवर बसला. त्यावेळीं त्याचे राज्यांत बरीच अबादानी असून खजीना भरपूर भरलेला होता, व राज्यांतील फौजही ८० हजार घोडेस्वार व दोन लाख पायदळ इतकी होती, असें विजापुरचे मुसलमान इतिहासकारांनीं लिहिलें आहे.

यापुढील आदिलशाहीचा वृत्तांत, हा आपला मुख्य जो महाराष्ट्राचा इतिहास, त्यामध्यें सामील होत असल्याकारणानें, तो येथेंच ह्मणजे, इब्राहीम आदिलशहा ( दुसरा ) याचे कारकीर्दीपर्यंतच थांबवून, आतां शेवटीं आदिलशाहीचा विस्तार, तिची राज्यव्यवस्था, तिचें वैभव व तिचा महाराष्ट्रीय लोकांचे अभ्युदयाशीं असलेला संबंध, याविषयीं थोडेंसें लिहून, हा भाग संपवितों. ब्राह्मणी राज्याची समाप्ति होऊन, त्याचे जागीं जीं पांच स्वतंत्र राज्यें उत्पन्न झालीं, त्या सर्वांत परा-क्रम, ऐश्वर्य व अधिक काळपर्यंत टिकणें या सर्व गोष्टींचे संबंधानें आदिलशाहीचा नंबर पहिलाच होय. ह्या राज्याचा विस्तार उत्तरेस नीरा नदीपासून दक्षिणेस तुंगभद्रानदीपर्यंत असून, त्यांत आडोनी आणि नंदीहाल ह्या प्रांतांचा समावेश होत असे. पश्चिमेस त्याची सीमा बाणकोटापासून रामास भुशिरापर्यंत होती. तसेंच पूर्वेकडे त्याची मर्यादा रायचूर, एतागिरी, मुलखेड व बेदर या प्रांतांपर्यंत असून, त्याचे पलीकडे गोवळकोंड्याचें राज्य असे. त्याचे अंमळ उत्तरेस निजामशाहीमध्यें व तिच्यामध्यें अक्कलकोट, नलदुर्ग आणि कल्याणी इत्यादि परगणे होते, व त्याबद्दल सोलापूरचे किल्ल्याप्रमाणें दोन्ही राज्यांमध्यें वारंवार लढाया होत असत.

आदिलशाहीचे राज्यव्यवस्थेसंबंधानें फारशी माहिती सांपडत नाहीं; तथापि जी थोडी मिळते ती येणेंप्रमाणें आहे. सर्व राज्याचे प्रथम

सरकार ह्मणून मोठमोठे विभाग केले असत. यापुढें प्रत्येक सरकारचे परगणा, महाल व तालुका असे विभाग असत. कधीं कधीं यांपैकीं कांहीं विभाग हिंदु अधिकाऱ्याकडे असल्यामुळें, त्यास प्रांत किंवा देश असेंही ह्मणत असत. सर्व मुलुखांतील वसूल गोळा करण्याकरितां मक्त्यानें मामलती देण्याची वहिवाट असे व या कधीं परगण्यापुरत्या व कधीं कधीं नुसत्या एकादे खेड्यापुरत्याही असत. या मक्तेदारांवर आमिल ह्मणून कोणी एक अधिकारी असे व त्याचेकडे परगण्यांतील बंदोबस्त राखणें व पैशाचे देवघेवीचे खटल्यांचा इनसाफ करणें हीं कामें असत. वतनासंबंधाचे खटले पंचायत नेमून तोडीत असत. या आमिलांवर एक सर आमिल किंवा मोकासदार ह्मणून अधिकारी असे. त्यास त्याचे प्रांतांतील उत्पन्नापैकींच कांहीं हिस्सा, त्याचा पगार ह्मणून ठरविला असे असें दिसतें. हे मोकासदार कधीं कधीं वीस वीस वर्षेपर्यंतसुद्धां टिकत व त्यांचे मागें त्यांची जागा त्यांचे मुलांसही कधीं कधीं मिळे. हा मोठा हुद्दा नेहमीं मुसलमानांसच मिळे असाही कांहीं नियम नसे; तो कधीं कधीं हिंदूंससुद्धां देत असत. या मोकासदारांवर कोठें कोठें सुभा ह्मणून एक वरिष्ठ अधिकारी नेमीत असत व सर्व सनदा, सरकारी देणग्यांचीं बक्षीसपत्रें वगैरे कागद हे याचेच नांवानें होत असत.*

विजापूरचे सैन्यांत प्रथम प्रथम तुर्क, आरब, इराणी, हबशी वगैरे परदेशी शिपायांचा बराच भरणा असे; परंतु पुढें कांहीं सुलतानांनीं त्यांस चाकरींतून काढावें व दुसऱ्यांनीं त्यांस पुनः ठेवावें, असें वारंवार होत गेल्यानें, त्यांची संख्या उत्तरोत्तर कमी कमी होत गेली, व त्यांचे जागीं मराठे लोकांचा भरणा होत चालला. या लोकांचे दोन वर्ग असत. एक शिलेदार व दुसरे बारगीर. पहिल्यांचा घोडा, हत्यारें वगैरे सामान त्यांचें स्वतःचें असे व त्यांस सरकारांतून उक्ता पगार मिळे. बारगीरांस सरकारांतून सर्व सामान मिळत असून, त्यांस फक्त त्यांचे चाकरीबद्दल पगार मिळे. या दोघांसही सरकार पाहिजे तेव्हां

* ग्रांट डफ.

चाकरीस ठेवी व पाहिजे तेव्हां काढून टाकी. या दोहोंशिवाय नेहमींची व विशेष कायमची अशी मराठ्यांची फौज ह्मटली ह्मणजे, आदिलशाहीचे पदरीं जे मराठे जहागीरदार असत, त्यांची होय. या जहागीरदारांस त्यांचे फौजेचे तैनातीकरितां गांव किंवा परगणे लावून दिले असत व त्यांबद्दल प्रत्येकानें अमुक फौज लढाईचे वेळीं सुलतानाचे चाकरीस पाठवावी, असा त्यांच्याशीं ठराव केला असे. मराठे लोकांची लढण्याची रीति ह्मटली ह्मणजे, शत्रूवर मोठे जमावानें चालून जाऊन किंवा त्यांस मैदानांत गांठून सामना करण्याची फार करून नसे; तर लहान मोठ्या टोळ्या करून शत्रूवर वरचेवर हल्ले करून, व त्यांची दाणा वैरण चालली असतां ती लुटून, त्यांस पराकाष्टेचा त्रास द्यावा, व तेणेंकरून त्यांस जेरीस आणावें अशी असे. याखेरीज आदिलशाहींतील बहुतेक किल्ल्यांवरूनही मराठे लोकांचीच शिबंदी असे. फक्त कांहीं मोठमोठे किल्ले मात्र खुद्द सुलतानांचे स्वाधीन असत व त्यांजवरील किल्लेदार हे त्यांचे विश्वासांतील लोक असत. येणेंप्रमाणें आदिलशाहीची साधारपणें व्यवस्था असे.

असो. आतां तिचे वैभवाविषयीं थोडेसें लिहितों. मागें लिहिल्याप्रमाणें ब्राह्मणी राज्याचे मागें स्वतंत्र झालेल्या पांच राज्यांपैकीं पराक्रम, वैभव व एकंदर राज्याची भरभराट ह्यांचे संबंधानें आदिलशाहीच सर्वांत वरचढ असे. तिच्या सुलतानांचें, इराणचा शहा वगैरे बाहेरचे मोठमोठ्या राजांबरोबर दळणवळण असे. इस्माएल आदिलशहाचेवेळीं इराणचा शहा इस्माएल सफवी यांजकडून त्यास वकिलाबरोबर मौल्यवान् नजरा येऊन, इराणचे शहानें आदिलशहास बरोबरीचे स्वतंत्र राजाप्रमाणें पत्र लिहिलें होतें. त्याचप्रमाणें बाहेरील देशांतून महंमदी धर्माचे मोठमोठे साधु, व्यापारी, कारागीर, इत्यादि लोक विजापुरास वारंवार येत असत. आदिलशाही सुलतानांपैकीं बरेचजणांस सुंदर सुंदर इमारती वगैरे बांधण्याचा षौक असल्यामुळें, विजापुरास पुष्कळ मोठमोठ्या मशीदी, कबरी, दर्गे, महाल वगैरे बांधले गेले; तसेंच किल्ल्याचे कोटाचें काम हेंही फार मजबूत व उत्तम असें

झालें. याशिवाय शहराबाहेरून पाण्याचे नळ बांधून आणून, शहरांतें जागजागीं खेळविण्यासाठीं हौद, कारंजीं वगैरे चांगलीं सुंदर कामें करण्यांत आलीं. यांपैकीं विशेष नांव घेण्यासारखीं कामें ह्मटलीं ह्मणजे, मागें सांगितलेली अल्ली आदिलशहानें बांधलेली जुमा मशीद, इब्राहीम आदिलशहानें बांधलेला इब्राहीम रोझा, तसेंच यापुढें त्याचा मुलगा महंमद आदिलशहा याचा बोळघुमज व शहराचा कोट हीं होत. हीं हल्लींही बरेच चांगले स्थितींत असून, त्यांची थोडीबहुत मरामत करून इंग्रज सरकारानें तीं नीट राहण्याची व्यवस्था ठेविली आहे. आदिलशाहीचे या *अवशेषांवरूनही तिचे मुळचे सामर्थ्याची, कौशल्याची व वैभवाची बरीच कल्पना येण्यासारखी आहे!

आतां शेवटीं या शाहीचा महाराष्ट्रीयांचे अभ्युदयाशीं जो संबंध आहे, त्याविषयीं दोन शब्द लिहून हा भाग संपवितों. हा भाग वाचला असतां, मागील भागांतल्याप्रमाणें, कित्येक ब्राह्मणी सुलताना-प्रमाणें आदिलशाही सुलतानांनीं, कोणी हिंदुप्रजेचीं सरसकट कत्तल केली किंवा त्यांचीं देवळें पाडलीं किंवा त्यांची पवित्र क्षेत्रें बाटविलीं, असा कोठें उल्लेख आढळत नाहीं. एवढ्यावरून वरील जुलमाचे प्रकार अगदीं घडले नसतील, असें जरी ह्मणतां येणार नाहीं, तरी ते ब्राह्मणी राज्यांतलेपेक्षां पुष्कळ कमी झाले असतील यांत संशय नाहीं. शिवाय, उत्तरोत्तर मुसलमान लोकांचा व हिंदूंचा पूर्वीपेक्षां अधिक परिचय पडून, हिंदूंचे खरे गुण मुसलमान लोकांचे अधिक लक्षांत येऊं लागल्यामुळें, वरील प्रकार अर्थातच कमी होत गेले असतील. येणेंप्रमाणें आदिलशाहींत मुसलमान लोक हिंदु लोकांस बऱ्या रीतीनें वागवूं लागल्यामुळें, हिंदु लोकांस तें राज्य बरें वाटूं लागलें असेल खरें; तथापि मुसलमान लोकांनीं यामागें जीं जुलमाचीं व दुष्टपणाचीं कृत्यें

* या इमारतींचें बरेंच चांगलें वर्णन, रा० सीताराम रामचंद्र गाईकवाड यांचे "विजापूर वर्णन" नामक पुस्तकांत दिलें आहे. त्यावरून वाचकांस त्यांचे विषयींची बरीच चांगली कल्पना होण्यासारखी आहे. तें वाचण्याची आह्मी आपले वाचकांस शिफारस करितों.

केलीं ह्मणून सांगितलीं आहेत, त्यामुळें हिंदुंचे मनांतील आपले राज्यकर्त्यांविषयींचा मूळचा दोष अगदीं गेला असेल असें नाहीं, व त्याच कृत्यांची कधीं कधीं कमी अशा मानानें तरी पुनरावृत्ति झाल्यानें, त्यांचा तो रोष पुन: पुन: जागृत होत असेल यांत संशय नाहीं. तसेंच त्या लोकांचें व विशेषेंकरून मराठे लोकांचें सामर्थ्य व पराक्रम हीं जसजशीं वाढूं लागलीं व त्यांचे कामगिरीचा सरकारास उपयोग होऊं लागला, तसतसें त्यांस आपले स्वत:चे योग्यतेविषयीं, आपले धर्माविषयीं, आपले स्वजातीयांविषयीं विशेष अभिमान वाटूं लागून, मुसलमान लोकांविषयींचा त्यांचे पोटांतील रोष हा वृद्धि पावला असेल यांत नवल नाहीं. ब्राह्मणी सुलतानांचे वेळीं मराठे लोकांचा फौजेंत समावेश असे; परंतु त्यांस फार झालें तर दोनशें किंवा तीनशें घोडेस्वारांच्या मनसबा मिळत असत; परंतु हल्लीं विजापूरचे राज्यांत त्या लोकांची योग्यता व कर्तबगारी हीं अधिकाधिक लक्षांत येऊन, त्यांस कोणास १२ हजार घोडेस्वारांचीही मनसब मिळूं लागली ! येणेंप्रमाणें हिंदुलोकांतील एका वर्गाचें विजापूरचे लष्करांत बरेंच महत्व वाढत चाललें असतां, दुसरे वर्गाचा शिरकाव राज्यकारभारांत होऊन, विजापूरचे दरबारांतील मोठमोठे हुद्यांचीं कामें त्यांजकडे येऊं लागलीं. विजापूरचें दप्तर मराठींत ठेवण्याची वहिवाट सुरूं झाल्यामुळें, अर्थातच ब्राह्मण, परभू, शेणवी वगैरे पांढरपेशी लोकांनीं, हलक्या कारकुनांच्या जागेपासून तों वकील, कारभारी वगैरे उंच उंच हुद्यांपर्यंत बऱ्याच जागा भरून टाकल्या !

येणेंप्रमाणें आदिलशाहींत महाराष्ट्रीय लोकांचें महत्व निरनिराळे मार्गांनीं वाढत चाललें असतां, त्यांचे पोटांतील मुसमान लोकांविषयींचा रोष तो कायमच होता. हीच स्थिति उत्तरोत्तर अधिकाधिक होत गेल्यानें, तिजपासून अर्थातच यापुढें महाराष्ट्रीय लोकांचा जो उदय झाला, त्यास बरेच अंशीं साहाय्य झालें, हें वाचकांचें सहजच लक्षांत येईल.

---

# भाग ४.

## निजामशाही.

१ निजामशाहीचा मूळ पुरुष जो अहंमद निजामशहा त्याची हकीगत. तो स्वतंत्र शहा होतो. त्याजवर महंमुदशहा ब्राह्मणी (दुसरा) हा आपल्या फौजा पाठवितो. त्यांचा पराभव. अहंमद निजामशहा, अहंमदनगर ह्मणून नवीन शहर वसवून तें आपली राजधानी करतो. तो युक्तीनें दौलताबादेचा प्रांत हस्तगत करतो. त्याचे कारभाराचें वर्णन. त्याचा मृत्यु. २ त्याचे मागून त्याचा मुलगा बुऱ्हाण निजामशहा हा त्याचे गादीवर बसतो. शहा लहान असल्यामुळें, राज्यकारभार वजीर मुकमलखान हा शहाणपणानें व इमानानें चालवितो. पात्री गांवासंबंधानें वजीराचा इमादशाहीशीं तंटा. निजामशाहीवर गुजरथचा सुलतान बहादूरशहा याची स्वारी. दोघांचा तह होऊन भेट होते. बुऱ्हाणशहा शिया धर्म चालू करतो. त्याचा मृत्यु. ३ निजामशाहीचे गादीवर हुसेन निजामशहा बसतो. त्याचे कारकीर्दीचा वृत्तांत मागील भागांत दिला असल्यामुळें, तो येथें पुन: दिला नाहीं. ४ हुसेनशहाचे मागून त्याचा मुलगा मूर्तिजा निजामशहा हा त्याचे गादीवर येतो. तो वऱ्हाड प्रांतावर स्वारी करून, तो सर्व सर करितो. त्याचें आणि त्याचा वजीर चंगीजखान यांचें वांकडें येतें. चंगीजखानाचा अन्यायानें वध होतो. त्याबद्दल मूर्तिजा निजामशहास फार पश्चात्ताप होऊन, तो राज्यकारभार सोडून देतो. त्यास वैराग्य प्राप्त होऊन, त्यांत त्यास भ्रमही होतो. तो हलके नोकरांचे व फकीरांचे नादीं लागतो. तो आपला पुत्र मिरान हुसेन यास ठार मारण्याचा यत्न करितो; परंतु तो फसून, राजपुत्रच निजामशहास हाल हाल करून ठार करितो. ५ मिरान हुसेन हा शहा होतो; परंतु तो दुर्व्यसनी निघून, दुष्ट कृत्यें करण्यास आरंभ करितो. त्यामुळें त्याचा वजीर मिरजाखान हा त्यास कैद करून ठार करितो, व त्याचे गादीवर त्याचा चुलत भाऊ इस्माएलशहा यास बसवून, आपणच राज्य चालवितो. अहंमदनगर येथें दक्षिणी शिपायांचें बंड होतें. त्यांचा पुढारी जमालखान हा होतो. तो मिरझाखानास ठार करितो, व आपण वजीर होतो. ६ मूर्तिजा निजामशहा याचा भाऊ व इस्माएलशहाचा बाप बुऱ्हाण, हा आपणास गादी मिळण्यासाठीं, अकबर बादशहा व विजापूरचा वजीर दिलावरखान यांचें साहाय्य घेऊन जमालखानाचा पराभव करितो, व इस्माएलशहास

च्युत करून आपण निजामशाहीचे तक्तावर बसतो. त्याचे मरणानंतर त्याचा लगा इब्राहीम निजामशहा हा गादीवर येतो; परंतु तो लवकरच लढाईंत पडतो. इब्राहीमशहाचे मागें त्याचे गादीबद्दल तंटे उत्पन्न होऊन निरनिराळे पक्ष उठतात. ापैकीं एका पक्षाचा मुख्य मिआन मंजु हा, अकबर बादशहाचा पुत्र मुराद ची कुमक मागतो, व 'माझे प्रतिस्पर्ध्यांस जर तुह्मीं जिंकाल, तर तुमचे ाधीन अहंमदनगर करून देईन' असें वचन देतो. त्याप्रमाणें मोंगल चाल रून येतात, व कबूलीप्रमाणें राजधानी स्वाधीन करून देण्याबद्दल नेट लावितात. आन मंजू हा चांदबिबीचे स्वाधान अहंमदनगर शहर करून, आपण आदिलशहा कुतुबशहा यांची मदत मागण्याकरितां दक्षिणेकडे जातो. दोन्ही शहांच्या ौजा शहादुर्ग येथें गोळा होतात, व त्या अहंमदनगरावर चाल करण्याची तयारी रितात. इतक्यांत राजपुत्र मुराद हा जलदी करून अहंमदनगरावर हल्ला रितो. चांदबिबी त्याशीं मोठे शौर्यानें लढते व मोंगलांचा हल्ला परत करिते; रंतु अखेर ती नाइलाज होऊन, मोंगलांस वऱ्हाड प्रांत देऊं करून त्यांस परत ावते; परंतु ते वाटेनें जातां जातां निजामशाहींतील कित्येक गांवें लुटीत ल्यावरून, आदिलशाही, कुतुबशाही व निजामशाही अशा तिन्ही फौजा एकत्र ोऊन त्या मोंगलांवर सुपें येथें हल्ला करितात; परंतु त्यांत त्यांचा पूर्ण पराभव ोतो. चांदबिबी व तिचा वजीर नेहंगखान यांचेमध्यें तंटे माजतात. अक- र बादशहा हा स्वत: दक्षिणेंत येतो. तो राजपुत्र डानियल यास अहंमद- गर घेण्यास पाठवितो. नेहंगखान जुन्नराकडे पळून जातो व चांदबिबीचा खून ोतो. यानंतर मोंगल लवकरच अहंमदनगर शहर घेतात, व अल्पवयी बहादूर नेजामशहास, मोंगल कैद करून त्यास ग्वालेरचे किल्ल्याकडे पाठवितात. येथें नेजामशाहीचा शेवट झाल्यासारखा दिसतो; परंतु मलिकंबर व मिआन ाजू हे दोन सरदार, निजामशाहीची गादी परिंड्यास नेऊन तिजवर मूर्तिजा नेजामशहा (दुसरा) यास बसवितात. त्या दोघां सरदारांमध्यें वांकडें येतें. ालिकंबर हा मोंगलांबरोबर तह करितो. थोडे वेळांत निजामशाहींत त्याचें र्चस्व होतें. तो हळू हळू मोंगलांपासून सर्व मुलुख परत जिंकून घेतो. त्याची राज्यव्यवस्था. त्याची जमाबंदी. निजामशाहीची पुन: भरभराट होते. राज- पुत्र शहाजहान याची मलिकंबरावरील पहिली स्वारी. मलिकंबर यास, मोंगलांस अहंमदनगर व बाकी मुलुख परत द्यावा लागतो. मलिकंबर पुन: मोंगलांस नर्मदानदीचे पार हांकून लावितो; परंतु राजपुत्र शहाजहान हा त्याचा पुन: पराभव करितो व त्याचा पुष्कळ प्रांत पटकन जिंकून घेतो. शहाजहान याचें बंड. त्यामुळें मलिकंबरास पुन: मोंगलांची पिछेहाट करण्यास संधि फावते.

तो मोंगलांचा व इब्राहीम आदिलशहा या दोघांचा पराभव करितो. त्याचा मृत्यु.
निजामशाहीचा वृत्तांत येथें तूर्त थांबवितों. या शाहीचा विस्तार, तिचें वैभव व
तिचा महाराष्ट्रीय लोकांचे अभ्युदयाशीं असलेला संबंध, याविषयीं थोडेंसें निरूपण.

मागील भागांत, आदिलशाहीचा इतिहास, सन १६२६ पर्यंत आणून पोहोंचविला आहे. त्याप्रमाणेंच या भागांत, निजामशाहीचाही वृत्तांत त्याच काळापर्यंत पोंचविण्याचा विचार आहे. कारण, या दोन्ही शा-हींचा या पुढील वृत्तांत, आपला मुख्य विषय जो महाराष्ट्राचा इतिहास, त्यांत सामील झाला आहे. तसेंच आदिलशाही व निजामशाही यांचा इतिहास समकालीन असल्यामुळें, त्या दोहींच्या लढाया, तह वगैरे संबंधाची हकीगत एकच असणारी आहे. ह्मणून ज्या गोष्टींचें एकदा आदिलशाही प्रकरणांत कथन झालें आहे, त्यांचें या भागांत पुन कथन करण्याची गरज नाहीं. मात्र ज्या गोष्टी निजामशाहीचे संबंधाच्या आहेत, त्या या भागांत घातल्या आहेत. असो; एवढें सांगून या भागांतील मुख्य विषय जो निजामशाहीचा वृत्तांत, त्यास आतां आरंभ करितों.

१ मागें दुसरे भागांत महंमदशहा ( दुसरा ) ब्राह्मणी याच वजीर महंमद गवान याचे विरुद्ध कट रचून त्याचा नाश करणा जो निजाम उल्मुल्क ह्मणून सांगितला आहे, त्याचा मुलगा मलि अहंमद हा निजामशाहीचा मूळ स्थापनकर्ता होय. निजाम उल्मुल हा स्वतः मूळचा हिंदु असून, त्याचा बाप वऱ्हाड प्रांतांतील पा ह्मणून एक खेडें आहे, तेथील कुलकर्णी होता. पुढें हा कुलक आपले लहान मुलासह विजयानगरास गेला असतां, त्या राज्या अहंमदशहा वली नामक ब्राह्मणी सुलतानानें स्वारी केली व त त्यानें जे कित्येक हिंदु कैद करून बेदर शहरास आणिले, त्य वरील कुलकर्ण्याचा लहान मुलगा हाही होता. त्यास सुलतान बाटवून आपले पदरीं गुलाम ह्मणून ठेविलें, व त्याचें मूळचें न तिमाप्पा हें बदलून त्यास हसन असें नवीन नांव ठेविलें; तथा या मुलाचें बापाचें नांव बहिरू असल्यावरून, त्यास मलिक ह

हिरी असें लोक ह्मणूं लागले. पुढें त्याची बुद्धि व हुषारी ही
लतानाचे नजरेस येऊन, त्यानें त्यास एक हजार घोडेस्वाराच्या
थकाची सरदारी सांगितली, व त्याचें नांव साजरें करण्याकरितां,
याची नेमणूक बहिरी ससाण्याचे शिकारखान्यावर केली. याप्रमाणें
न्हीं अर्थानीं हसन याचें नांव बहिरी असेंच राहिलें. यानंतर
यास, महंमद गवान याचे शिफारसीवरून, तेलंगणचा सुभेदार कसें
मिलें व त्यानें बनावट पत्र तयार करून वजिराचा नाश कसा केला,
ं यामागें दुसरे भागांत सांगितलेंच आहे. आतां त्यापुढील त्याचा
लगा जो मलिक अहंमद, याचा वृत्तांत येथें सांगतों.

मलिक अहंमद हा, बीड, जुन्नर वगैरे आपले बापाचे जहागिरींचें
काम पहात असतां, त्यानें त्या प्रांतांतील कित्येक मराठे किल्लेदार, जे
महंमद गवान यानें नेमिले असल्यामुळें, ते त्याचे वधानंतर त्याचे
बापाचा अधिकार मानीनातसे झाले होते, त्यांजवर स्वारी केली व
शिवनेरी, चंदन, वंदन, लोहगड, तोरणा, कोंडाणा, पुरंदर वगैरे
मावळांतील बहुतेक किल्ले सर केले. यानंतर त्यानें कोंकणांत उतरून
तेथील दंडा राजापूर येथील किल्ल्यास वेढा दिला; परंतु इतक्यांत
महंमुदशहा ब्राह्मणी ( दुसरा ) याचे दरबारांत पुनः उलटापालटी
होऊन, मागें सांगितल्याप्रमाणें निजाम उल्मुल्काचा वध झाला;
यामुळें मलिक अहंमद यानें दंडा राजापूरचे वेढ्याचें काम सोडून
देऊन, तो त्वरेनें जुन्नरास माघारा आला व तेथें थोडेच दिवसांनीं
त्यानें आपले बापाचे सर्व किताब धारण करून, तो स्वतंत्रतेनें वागूं
लागला ( १४८६ ).

मलिक अहंमदाची खोड मोडण्याकरितां, महंमुदशहा ब्राह्मणी
( दुसरा ) यानें त्याजवर झैन उद्दीन व शेख मौलिद या दोन सरदारांस
बरोबर फौजा देऊन पाठविलें; परंतु त्यांचें त्यानें कांहीं चालूं दिलें
नाहीं. झैन उद्दीन बेसावध आहे असें पाहून, मलिकानें त्याचे
चाकणचे किल्ल्यावर एकाएकीं छापा घालून तो हस्तगत केला व
झैन उद्दीन यास ठार केलें. यानंतर लवकरच त्यानें शेख मौलिद

याशीं लढाई करून त्याचाही पाडाव केला. येणेंप्रमाणें आपले
दोन्ही सरदारांचा पराभव झाला असें पाहून, महंमुदशहा ब्राह्मणी
यानें अझमत उल्मुल्क या सरदाराबरोबर १८ हजार स्वार देऊन
त्यास मलिक अहंमदावर पाठविलें; परंतु मलिकानें या सैन्यास टाकून
एकाएकीं बेदर शहरावर चाल केली, व तेथील पाहेरकरी शिपायांस
वश करून घेऊन त्यानें तेथील आपले कुटुंबांतील स्त्रिया व विरुद्धप
क्षाचे कांहीं सरदारांच्याही स्त्रिया, अशा दोघांस हस्तगत करून ते
माघारा जुन्नराकडे गेला! मलिकाचें हें धाडसपणाचें कृत्य, व त्याचे
उलट अझमत उल्मुल्काची गैर हुषारी पाहून, महंमुदशहानें अझमत
उल्मुल्क यास काढून टाकून, त्याचे जागीं जहांगीरखान या नवीन
सरदारास नेमिलें; परंतु त्यासहीं यश न येऊन, त्याचा बिणगर
या गांवीं मलिक अहंमदाचे हातून पूर्ण पराभव झाला, आणि तो व
त्याचं आणखी दुसरे बरेच सरदार लढाईंत पडले. यावेळीं ब्राह्मणी
सुलतानाचे हत्ती, घोडे वगैरे बरेंच लढाऊ सामान, मलिक अहंम
दाचे हातीं लागलें. .आपणास हा मोठा जय प्राप्त झाला; तेव्ह
बिणगर या गांवची जागा आपणांस मोठी यशस्वी आहे, असें
मलिकास वाटून, त्यानें तेथें एक बाग व वाडा बांधिला व
जुन्नर सोडून देऊन आपली राजधानी तेथेंच करण्याचा त्यानें
निश्चय केला. यापुढें लवकरच त्यानें श्वेतछत्र धारण करून ते
आपणास निजामशहा असें ह्मणवूं लागला (१४८९).

येणेंप्रमाणें ब्राह्मणी सुलतानाचा पराभव करून अहंमद निजाम
शहा हा निर्धास्त झाला असतां, तो आपलें राज्य वाढविण्याचे
खटपटीस लागला. त्यानें प्रथम चौल बंदराजवळचें राजपुरी बंद
घेऊन सर्व कोंकण प्रांत सर केला. त्यानंतर दौलताबादचा सुभा जो
त्याचे प्रांताला लागूनच होता, तो घेण्याचे तो उद्योगास लागला
दौलताबाद येथें मलिक वज्जी ह्मणून कोणी सुभेदार असून, ते
इतर सरदारांप्रमाणेंच ब्राह्मणी सुलतानापासून स्वतंत्र झाला होता
परंतु त्यास त्याचा भाऊ मलिक अश्रफ हा शत्रु उत्पन्न
होऊन, त्यानें त्यास ठार केलें व त्याचा सुभा बळकावला

मलिक वज्जी हा अहंमदशाहाचा मेहुणा असल्यामुळें, त्यानें मलिक अश्रफाचें पारिपत्य करून, त्याजपासून त्याचा सुभा हिसकावून घेण्याची तयारी चालविली. त्यानें यापूर्वी निश्चय केल्याप्रमाणें बिणगर येथें नवीन राजधानी बांधण्यास सुरुवात करून, तीस त्यानें आपले नांवावरून अहंमदनगर असें नांव दिलें, व तेथून आतां त्यानें आपली फौज पाठवून, दौलताबादेचा सुभा वर्षांतून दोनदां ओस पाडण्याचा क्रम चालविला. कारण, दौलताबादेचा किल्ला फार मजबूत असल्याकारणानें, तो हल्ला करून एकाएकीं साध्य होईल असा नव्हता. तेव्हां सभोंवतालचे प्रांताचा असा वारंवार विध्वंस केला असतांच, तो स्वाधीन होईल असें अहंमदशाहास वाटलें ( १४९४ ).

येणेंप्रमाणें आपले प्रांताची खराबी वर्षाचेवर्षी चालविली असें पाहून, मलिक अश्रफानें गुजराथचा सुलतान महंमुदशाहा बेगर याचें साहाय्य मागितलें, व त्यास असें कबूल केलें कीं, “ मी तुमचा मांडालिक राजा होऊन, तुह्मांस दरसाल खंडणी देत जाईन. ” यावरून गुजराथचा सुलतान हा बरोबर फौज घेऊन, तो खानदेशांतून येण्यास निघाला; परंतु त्यास मध्यंतरीं दुसरेंच कांहीं काम निघाल्यामुळें, खानदेशांतील सुलतानाची खंडणी जी त्यास मुख्यत्वेंकरून वसूल करावयाची होती, ती प्राप्त होतांच, तो पुढें दौलताबादेकडे न येतां, तसाच माघारा आपले मुलुखाकडे गेला. येणेंप्रमाणें अश्रफाची कुमकेबद्दलची निराशा झाली असतां, त्यानें गुजराथचे सुलतानाबरोबर लावलेलें बोलणें किल्ल्यांतील शिबंदीस कळलें, व त्यांस ती गोष्ट अगदीं न आवडल्यामुळें, त्यांनीं अहंमद निजामशाहास निरोप पाठविला कीं, “ आह्मीं दौलताबादेचा किल्ला तुमचेच स्वाधीन करून देतों. ” हा निरोप पोहोंचतांच अहंमदशाहा ताबडतोब आपले फौजेसह किल्ल्याजवळ येऊन दाखल जाहला, व त्यामुळें अश्रफ अगदीं घाबरून गेला; परंतु तितक्यांतच अश्रफास एकाएकीं कांहीं दुखणें होऊन तो थोडेच दिवसांत मरणही पावला. यामुळें किल्ल्यांतील लोकांनीं अहंमदशाहास कबूल केल्याप्रमाणें, किल्ला त्याचे स्वाधीन केला, व यापुढें हा बळकट

किल्ला निजामशाहीचा शेवट होईपर्यंत त्या शाहीकडेसच राहिला. ( १४९४).

वर लिहिल्याप्रमाणें अहंमद निजामशहा हा स्वतंत्र होऊन त्याजकडे मुलुखही बराच झाला. त्यानें अहंमदनगर ह्मणून नवीन वसविलेली राजधानीही लवकरच मोठे भरभराटीस येऊं लागली. त्यानें आपले राज्याची चांगली व्यवस्था लावून तो प्रजेचे हिताकडे पुष्कळ लक्ष देऊं लागला. याचे राज्यांतील बंदोबस्ताचें वर्णन मुसलमान इतिहासकारांनीं फार केलें आहे; त्यांतील एकानें ह्मटलें आहे कीं, " याचे मुलुखांत इतका बंदोबस्त असे कीं, त्यांत कोणीही काठीस सोनें बांधून फिरलें तरीही त्यास कोणीं लुटण्याची भीति नसे!" अहंमदशहाचें स्वतःचें आचरण फार शुद्ध असें व परस्त्रीचा त्यास विटाळही नसे. याचेच कारकीर्दींत प्रथम दक्षिणेंत द्वंद्वयुद्ध खेळण्याची चाल सुरू झाली असें ह्मणतात. हा शहा १५०८ या सालीं मरण पावला*.

---

* निजामशाहीची वंशावळ पुढें दिल्याप्रमाणें आहे.

( १ ) अहंमद निजामशहा

- ( २ ) बुऱ्हाण निजामशहा ( पहिला )
  - ( ३ ) हुसेन निजामशहा.
    - ( ४ ) मूर्तिजा निजामशहा ( पहिला. )
      - (५) मिरान हुसेन निजामशहा.
    - ७ बुऱ्हाण निजामशहा ( दुसरा. )
      - (८) इब्राहीम निजामशहा
        - (९) अहंमद निजामशहा (दुसरा) जो इब्राहीमशहाचा पुत्र नव्हे, पण त्याचे मागून गादीवर माल बसतो; परंतु कांहीं दिवसांनीं तो निजामशाही वंशांतील नव्हे ह्मणून ठरतो.
        - (१०) बहादूर निजामशहा.
      - (६) इस्माएल निजामशहा
- शहाअली ( यास गादी मिळाली नाहीं. )
  - ११ मूर्तिजा निजामशहा ( दुसरा. )

२. अहंमद निजामशहाचे मागून त्याचा मुलगा बुऱ्हाण निजामशहा हा त्याचे गादीवर बसला. तो सात वर्षांचा अगदीं अल्पवयी असल्यामुळें, त्याचा कारभार त्याचे बापाचा पेशवा मुकमलखान यानें चालविला. हा पेशवा एकंदरींत चांगला हुषार, इमानी व सरळबुद्धीचा असा मनुष्य होता. त्यानें लहान शहाकडून चांगले प्रकारें विद्याभ्यास करून त्यास ह्यानें राज्यकारभारांत बरेंच तरबेज केलें; तथापि वजीराचे कांहीं शत्रु होते, त्यानीं वऱ्हाडचा सुलतान अल्लाउद्दीन इमादशहा यास मिळून, त्याजकडून त्यांनीं अहंमदनगरावर स्वारी करविली. अखेर मुकमलखान व इमादशहा ह्यांचे फौजांची गांठ राणुरी शहरापाशीं पडून, त्यांची तेथें बरीच मोठी लढाई झाली. तींत इमादशहाचा पूर्ण पराभव होऊन त्याचे हत्ती, घोडे वगैरे सामान निजामशहाचे हातीं लागलें. यानंतर इमादशहा हा पळून माघारा एलिचपुराकडे गेला; परंतु त्याचे पाठीस निजामशाही फौजा लागल्यामुळें, त्यानें खानदेशचे सुलतानाचे मध्यस्थीनें मुकमलखानाबरोबर तह केला. (१५१०).

निजामशहाचें मूळ घराणें हिंदु असून, ते वऱ्हाडांतील पात्री या गांवचे कुलकर्णी होते असें मागें सांगितलेंच आहे. आपले घराण्यांतील एक पुरुष बाटून मुसलमान झाला खरा; परंतु त्यास अहंमदनगरचें राज्य प्राप्त झालें आहे असें पाहून, पात्री या गांवचे कुलकर्णी हे बुऱ्हाण निजामशहाचे दरबारीं आले व त्यांनीं शहास विनंति केली कीं, 'आमचे गांवचे पुरातन हक्क आमचे आह्मांस मिळवून द्यावे.' त्यावरून मुकमलखान यानें वऱ्हाडांतून पात्री गांव बदलून देऊन त्याबद्दल निजामशाहींतील दुसरा एकादा गांव घ्यावा ह्मणून इमादशहाकडे बोलणें लाविलें; परंतु तें त्यानें मान्य केलें नाहीं, व तें गांव कदाचित् मुकमलखान जबरदस्तीनें घेईल अशी शंका मनांत धरून, इमादशहानें त्या गांवीं मजबूत किल्ला बांधून त्याचा बंदोबस्त केला; परंतु मुकमलखान यानें किल्ल्याचे आंतील व्यवस्थेचा बारीक शोध ठेवून योग्य संधि पाहून, त्याजवर एकाएकीं हल्ला केला व तो किल्ला काबीज केला.

सन १५२३ या सालीं, मागें तिसरे भागांत सांगितल्याप्रमाणें, बुऱ्हाण

निजामशहाचें लग्न इस्माएल आदिलशहाचे बहिणीबरोबर लागलें; व याच लग्नांत सोलापूरचा किल्ला व त्या खालचा परगणा हे आंदण देण्यांत येऊन, ते निजामशहाचे ताब्यांत वेळेवर न दिल्यावरून दोघां सुलतानांची लढाई जुंपली, व यापुढें सुमारें शंभर वर्षें याच सरहद्दीवरील किल्ल्यावरून त्यांच्या पुन:पुन: झटापटी होत गेल्या! या लढायांची हकीकत आदिलशाहीचे भागांत दिलीच आहे, ह्मणून तिची येथें द्विरुक्ति करीत नाहीं.

यापुढें इमादशहानें पात्री येथील किल्ल्यावर छापा घालून तो काबीज केल्यावरून, बुऱ्हाणशहानें त्यास वेढा घालून तो पुन: हस्तगत करून घेतला, व यानंतर लवकरच त्यानें माहूरचाही किल्ला घेतला. आपले दोन्हीं किल्ले निजामशहानें घेतले असें पाहून, इमादशहानें खानदेशचा सुलतान महंमदखान फिरुकी यास आपले मदतीस बोलावून, त्यानें निजामशहावर स्वारी केली; परंतु बुऱ्हाण निजामशहानें दोघांही सुलतानांचा पराभव करून त्यांचे हत्ती, घोडे वगैरे बरेंच लढाऊ सामान काबीज केलें. येणेंप्रमाणें हीही मसलत फसली असें पाहून, इमादशहानें गुजराथचा सुलतान बहादूरशहा यास पात्री व माहूर हे किल्ले देऊं करून, त्यास आपले मदतीस बोलाविलें. त्यावरून बहादुरशहा हा सुलतानपूर, नंदुरबार या वाटेनें दक्षिणेंत प्रचंड सैन्य बरोबर घेऊन निघाला. शत्रूंची ही जंगी तयारी पाहून, निजामशहानेंही आदिलशहा, बरीदशहा व कुतुबशहा यांचें साहाय्य मागितलें; परंतु त्यांजकडून त्यास तें विशेषसें मिळालें नाहीं. शेवटीं गुजराथचे प्रचंड सैन्यापुढें बुऱ्हाणशहाचा टिकाव न लागून, त्यास अहंमदनगर सोडून जुन्नराकडे मागें हटावें लागलें. बहादूरशहा हा यानंतर कांहीं वेळ अहंमदनगरास येऊन राहिला व तेथें त्यानें आपला विजयदर्शक ह्मणून 'काळा मनोरा' या नांवाचा एक उंच मनोरा बांधिला; परंतु अहंमदनगरास त्यास चैन पडेनासें झाल्यामुळें, तो थोडेच दिवसांनीं तें शहर सोडून बालेघाटांत जाऊन राहिला. बहादूरशहा निघून गेल्यावर निजामशहानें पुन: अहंमदनगर घेतलें व शत्रूंवर लहान मोठ्या टोळ्यानिशीं वरचेवर हल्ले करून त्यांस त्रास देण्यास

ारंभ केला. याचवेळीं त्यानें कंबरसेन ह्मणून एक हुषार, प्रामाणिक
मसलती असा ब्राह्मण होता त्यास आपला पेशवा केला. त्याचे
ल्लचानें इमादशहा व महंमदशहा फिरुकी ( खानदेशचा सुलतान )
ांस बहादूरशहाचे कटांतून फोडिलें, व त्यामुळें गुजराथचे फौजेचें बळ
अर्थातच कमी झालें. यापुढें लवकरच पावसाळाही सुरू झाल्यामुळें,
बहादूरशहानेंही थोडक्यांत गोडी असें पाहून, बुऱ्हाणशहा यानें, त्याचें
सार्वभौमस्व कबूल करतांच, तो आपली फौज घेऊन परत गुजराथेंत
ोला. तो निघून गेल्यावर, बुऱ्हाणशहानें पात्री व माहूर येथील
केल्ले, जे त्यानें इमादशहास प्रथम त्यास कटांतून फोडण्याकरितां देऊं
केले होते, ते देण्यास टाळाटाळच केली ( १५२९ ).

यापुढें बहादूरशहानें माळवा प्रांत सर केला. हें वर्तमान ऐकून,
त्याबद्दल आनंद प्रदर्शित करण्याकरितां ह्मणून, बुऱ्हाणनिजामशहानें
१५३० या सालीं, उंची उंची नजराणे शहा ताहीर या नांवाचे एका
साधूबरोबर बहादूरशहाकडे पाठविले; परंतु बहादूरशहा येवढ्याच
गोष्टीनें संतुष्ट होईना. त्यानें, बुऱ्हाणशहानें आपले भेटीस यावें अशी
इच्छा दर्शविली. त्यावरून शेवटीं निजामशहा बहादूरशहाची बऱ्हा-
णपुरास गांठ घेण्याकरितां निघाला; परंतु वाटेंत त्यास असें समजलें
कीं, "गुजराथेचा सुलतान हा, कोणी राजा त्याचे भेटीस गेला
असतां, तो स्वतः गादीवरून उठत नाहीं, व भेटीस जाणारे राजास
तो तेथें उभें करितो ;" यामुळें बुऱ्हाणशहास बहादूरशहाचे भेटीस
जाण्याचें मोठें संकटच पडलें; परंतु यावेळीं शहा ताहीर या साधूनें,
आपले धन्याचे मानहानीचा प्रसंग एका चमत्कारिक युक्तीनें टाळिला.
तो निजामशहाबरोबर बहादूरशहाचे भेटीस त्याचे दरबारीं गेला असतां,
त्यानें पैगंबराचा जांवई जो अल्ली, त्यानें जातीनें लिहिलेली कुराणाची
प्रत आपले डोक्यावर घेतली, व ती मी घेऊन येत आहे असें ताहीर
यानें बहादूरशहास अगोदरच कळवून ठेविलें. यामुळें, बहादूरशहा
हा अर्थातच कुराणाचे त्या पवित्र प्रतीस मान देण्याकरितां मसनदीव-

रून उठून उभा राहिला, व तेणेंकरून निजामशहाचा अपमान व्हाव-याचा तो अर्थातच चुकला!

याचप्रसंगीं, बुऱ्हाणशहानें बहादूरशहाचे भेटीचा लाभ झाला ही मोठीच गोष्ट झाली असें दाखवून, व त्याचेपाशीं लीनतेनें वागून त्याचें मन इतकें सुप्रसन्न केलें कीं, बहादूरशहानें त्यास निरोप देणेसमयीं, आपले कंबरेची तलवार व जंबिया हीं काढून बुऱ्हाणशहाचे कंबरेस बांधिली, व यापूर्वीं तो त्यास फक्त बुऱ्हाण निजाम उल्मुल्क असें जें ह्मणत असे, तें नांव सोडून देऊन, त्यास त्यानें आतां बुऱ्हाण निजामशहा असें ह्मटलें. त्याचप्रमाणें सर्व दक्षिण देश तुह्मांस दिला आहे, असेंही त्यानें यावेळीं बुऱ्हाणशहास कळविलें. याप्रसंगीं संभाजी चिटणीस ह्मणून कोणी मराठा होता, त्यानें निजामशहाचे वकीलीची उत्तम कामगिरी बजाविली, ह्मणून त्यानें त्यास प्रतापराव असा किताब दिला व त्याची दरबारांतील मुख्य मुख्य कामगारांत गणना केली.

यापुढें १५३२ सालीं अमीर बेरिदाचेसंबंधानें, बुऱ्हाणशहा व इस्माएल आदिलशहा यांची लढाई होऊन, शेवटीं त्यांमध्यें, मागील भागांत सांगितल्याप्रमाणें असा ठराव झाला कीं, आदिलशहानें कुतुबशहाचा प्रांत, व निजामशहानें वऱ्हाड प्रांत घ्यावा; त्यांत एकमेकांनीं एकमेकांस अडथळा करू नये. यानंतर पांच वर्षांनीं ह्मणजे १५३७ सालीं, शहा ताहीर याचे सांगण्यावरून, बुऱ्हाणशहानें आपले राज्यांत शिया धर्माची प्रवृत्ति सुरूं केली. याचे पूर्वीं विजापूरचा सुल्तान इब्राहीम आदिलशहा ( पहिला ) यानें आपले मुलुखांत शिया धर्म बंद करून, सुनी धर्म पुन: चालू केला असल्यामुळें, आदिलशहाची व निजामशहाची अर्थातच चुरस पडली. तेव्हां कांहीं दिवसांनीं इब्राहीमशहा व त्याचा वजीर आसदखान यांचेमध्यें कांहीं कुरबुर झाल्याची संधि पाहून, बुऱ्हाणशहानें त्याचा कसा फायदा करून घेतला व आदिलशहाचे प्रांतावर स्वारी करून त्याची कशी दुर्दशा केली, आसदखानाचे स्वामिभक्तीमुळें आदिलशहाचें संकट कसें निवारण झालें, व त्यानें उलटें निजामशहाचा पराभव करून त्यास त्याचे मुलुखांत कसें

रून लाविलें; तसेंच बुऱ्हाणशहानें पुन: कुतुबशहा व अमीर बेरीद चें साहाय्य घेऊन विजापूरावर चाल केली असतां, त्याचा उदगीन गांवीं पुन: कसा जबरदस्त पराभव झाला; परंतु अखेर विजयानग- ा राजा रामराज याची कुमक घेऊन स्वारी केली असतां इब्राहीम ादिलशहाची पुन: कशी दुर्दशा उडाली, वगैरे कथाभाग तिसरे ागांत नुकते आलेच आहेत, ह्मणून त्यांची येथें पुनरुक्ति करीत नाहीं.

यापुढें बुऱ्हाण निजामशहानें अमीर बेरीद याचा पुत्र अलीबेरीद याचे लखावर स्वारी करून आबशाचा, कंदारचा, कल्याणीचा व परांड्याचा असे किल्ले काबीज केले. तसेंच शेवटीं शेवटीं त्यानें खुद्द विजापुरास वेढा देऊन ी राजधानी घेण्याचा उद्योग चालविला; परंतु मध्यंतरींच त्यास ोटशूळाची व्यथा जडल्यामुळें, त्यास वेढा उठवून अहंमदनगरास परत ावें लागलें. तेथें आल्यावरही त्यास आराम न पडून तो थोडेच दिवसांनीं मरण पावला. (१५५३).

३ बुऱ्हाण निजामशहाचे मागून त्याचा मुलगा हुसेन निजामशहा हा त्याचे गादीवर बसला. याचे कारकीर्दीतील मुख्य मुख्य ज्या गोष्टी—ह्मणजे त्याचा भाऊ अली याचा पक्ष उचलून इब्राहीम अदि- लशहा हा सोलापुरावर चाल करून आला असतां, त्या शहराजवळ हुसेनशहानें आदिलशहाचा पूर्ण केलेला पराभव, त्यानंतर इब्राहीम आदिलशहा मरण पावून त्याचा मुलगा अली आदिलशहा हा गादीवर आला असतां, त्यानें विजयानगरचे रामराजाबरोबर दोस्ती संपादन करून निजामशाहीवर केलेल्या दोन प्रचंड स्वाऱ्या व तेणेंकरून हुसेन- शहाची झालेली अगदीं दुर्दशा, त्याचप्रमाणें शेवटीं मुसलमान सुलतानां- मधील कलहांमुळें रामराजाची वृद्धिंगत झालेली शक्ति व तिचे भरांत त्यानें मुसलमानी धर्माची केलेली अप्रतिष्ठा, यामुळें सर्व सुलतानांमध्यें एकदम एकी होऊन, त्यांनीं रामराजाचा केलेला पाडाव, या मागें तिसरे भागांत आल्याच आहेत, ह्मणून त्या येथें पुन: सांगण्याची गरज नाहीं. त्यापुढें विजयानगरचा विध्वंस करून हुसेन निजामशहा आपले

राजधानीस परत आला असतां, त्याचे अनियमित व अव्यवस्थित रहाणीमुळें, त्यास आजार होऊन तो लवकरच मरण पावला (१५६५).

४ त्याचे मागून त्याचा मुलगा मूर्तिजा निजामशहा हा त्याचे गादीवर बसला. तो लहान असल्यामुळें त्याची आई खुजा सुलताना ही राज्याचा कारभार पाहूं लागली; परंतु तिचे हातून तो नीट होत नसल्यामुळें, राज्यांत बराच गोंधळ झाला. ही संधि पाहून अल्ली आदिलशहानें कीश्वरखानाबरोबर फौज देऊन त्याजकडून निजामशाहीचा कांहीं भाग बळकाविला व तेथें एक मजबूत किल्ला बांधिला; परंतु थोडेच दिवसांत मूर्तिजा निजामशहा हा वयांत येऊन त्यानें आपले आईपासून अधिकार काढून घेतला व तो, तो स्वतःच वहिवाटूं लागला. त्यानें कीश्वरखानावर स्वारी करून त्यास ठार केलें व त्याचा किल्ला हस्तगत केला. मूर्तिजा निजाम शहाची ही हुषारी पाहून आदिलशहानें त्याच्याबरोबर लवकरच तह केला. यावेळीं त्या दोघांमध्यें असें ठरलें कीं, अल्ली आदिलशहानें विजयानगराकडील मुलुख हस्तगत करावा; त्यास निजामशहानें अडथळा करूं नये. तसेंच निजामशहानें वऱ्हाडप्रांत व बरीदशाहीचा मुलुख हे जिंकून घ्यावे व त्यास आदिलशहानें अडथळा करूं नये.

या तहाप्रमाणें मूर्तिजा निजामशहानें प्रथम वऱ्हाडप्रांतावर स्वारी केली, व तेथें तोफालखान ह्मणून कोणी इमादशहाचा वजीर असून, त्यानेंच सर्व सत्ता बळकाविली होती, त्यास एलिचपुराहून हांकून लाविलें. त्यावरून तोफालखानानें अकबर बादशहाकडे कुमकेबद्दल अर्ज केला. अकबर बादशहानें निजामशहास निरोप पाठवून वऱ्हाडास उपद्रव देऊं नये ह्मणून कळविलें; परंतु मूर्तिजा निजामशहानें मोंगल बादशहाचे ह्मणण्याकडे लक्ष न देऊन वऱ्हाडप्रांत सर्व जिंकून घेतला व तोफालखान व इमादशाही वंशाचा शेवटला सुलतान यांस कैदेंत ठेविलें. या स्थितींत ते दोघेही थोडेच दिवसांत मरण पावले, व या वेळेपासून इमादशाही बुडून जाऊन वऱ्हाडप्रांत निजामशाहीस जोडला गेला ( १५७२ ).

येणेंप्रमाणें वऱ्हाडप्रांत सर केल्यानंतर, मूर्तिजा निजामशहानें बरीद-शाहीचें राज्य मोडून तिचाही मुलुख आपले राज्यास जोडण्याचा विचार चालविला; परंतु त्याच्या या मसलती सिद्धीस नेण्यास, त्यास त्याचा वजीर चंगीजखान ह्मणून कोणीएक शूर, हुषार व विश्वासु असा मुत्सद्दी होता, त्याचें मुख्य साहाय्य असे. यामुळें आपल्यावर होणारे स्वारीचा बेत जेव्हां बरीदशहास समजला, तेव्हां तिचे निवारणार्थ त्यानें कांहीं लोक निजामशहाचे दरबारीं पाठवून, त्याजकडून मोठे युक्तीनें वजीराविषयीं सुलतानाचे मनांत असें भरवून दिलें कीं, बरीदशाहीवर स्वारी करण्याबद्दल वजीर सल्ला देत आहे. त्यांत त्याचा अंतस्थ हेतु असा आहे कीं, सुलतान तिकडे फौजा घेऊन गेला ह्मणजे, इकडे वऱ्हाडप्रांत आपणच बळकावून बसावें. निजामशहास ही गोष्ट प्रथम खरी वाटेना; परंतु बरीदशहाचे लोकांनीं चोहोंकडून सुलतानाचे कानांवर चंगीजखाना-विरुद्ध अशा कांहीं बनावट गोष्टी रचून आणिल्या कीं, त्यांचेयोगानें मूर्तिजा निजामशहाचे मनांत वजीराविषयीं पक्का अंदेशा आला, व त्यानें वजीर आजारी पडल्याची संधि साधून, त्यास वैद्याकडून औषध ह्मणून विषाचा पेला पाठवून दिला. त्या इमानी वजीरानें नाइलाज ह्मणून मुकाट्यानें तो प्याला; परंतु त्यापूर्वी त्यानें "शत्रूंनीं मजवर हा केवळ खोटा आरोप आणिला असून, त्यामुळें हकनाहक माझा वध होत आहे; आपणांस खऱ्या गोष्टी पुढें मागें समजल्यावांचून राहणार नाहींत; परंतु मग त्याचा कांहीं उपयोग नाहीं; तथापि ईश्वर तुह्मांस सुखी ठेवो." अशा मतलबाचें पत्र लिहून, तें त्यानें निजामशहास देण्यास सांगितलें!

चंगीजखानाचा वध झाल्यानंतर, त्यानें पत्रांत लिहिल्याप्रमाणें कांहीं दिवसांनीं मूर्तिजा निजामशहास वजीराचेसंबंधाचा खरा प्रकार कळून आला. त्यास आपण केलेल्या कृत्याबद्दल अतिशय वाईट वाटलें. त्याचे मनास ती गोष्ट इतकी लागून गेली कीं, त्यानें यापुढें राज्य-कारभार टाकून देण्याचाही निश्चय केला. त्यानें एके दिवशीं दरबार भरवून तेथें तो प्रसिद्धपणें असें बोलला कीं, 'मी आतां राज्यकारभार

वाहण्यास अगदीं अयोग्य झालों आहें. माझी सदसद्विचारशक्ति नष्ट होऊन मला न्यायान्याय, खरेंखोटें, चांगलेंवाईट यांची पारख करण्याचें सामर्थ्य राहिलें नाहीं. माझे हातून चंगीजखानास व्यर्थ शासन झालें, त्याबद्दल ईश्वर मजवर खरोखर कोप करील. मी यापुढें पैगंबराचा वंशज जो मीर काजी बेग याजवर राज्यकारभार सोंपवून, मी एकांतवासांत राहून परमेश्वराचे भजनांत आपलें आयुष्य घालविणार.' येणेंप्रमाणें मूर्तिजा निजामशहानें बहुतेक राज्यत्याग करून, तो कोणी स्त्री किंवा पुरुष यांचा अगदीं विटाळ न घेतां, राजवाड्याचे एका चौकांत अक्षयीं एकांतांत काळ घालवूं लागला. त्याचेकडे प्रवेश काय तो साहेबखान ह्मणून एका नोकराचा मात्र होत असे!

येणेंप्रमाणें मूर्तिजा निजामशहास वैराग्य प्राप्त झाल्यासारखें दिसूं लागलें; परंतु त्यांत भ्रमाचाही थोडाबहुत अंश होता. त्याची साहेबखानावर इतकी मर्जी बसली कीं, त्याचेवांचून त्यास अगदीं करमेना; परंतु यामुळें साहेबखान इतका चढून गेला कीं, तो पाहिजे तशीं जुलमाचीं अनन्वित कृत्यें करूं लागला, व त्याचें निवारण सलाबतखान वजीर याचे हातूनसुद्धां होईना! शेवटीं एकदां तो रुसून बेदरास निघून गेला असतां व निजामशहानें त्याजबद्दल अगदीं घोष घेतला असतां, वजीरानें साहेबखानाचा खून करविला व सुलतानास त्याचे वाईट नादापासून मुक्त केलें.

साहेबखान मारला गेल्यावर, मूर्तिजा निजामशहाची मर्जी फत्तेशहा नांवाचे एका फकीरावरच बसली. त्यास त्यानें खजिन्यातील उत्तम उत्तम रत्नेंच देण्यास सलाबतखान वजीरास हुकूम केला. वजीरानें शहाचें वेडेपण जाणून, फकीरास खऱ्याऐवजीं खोटींच रत्नें दिलीं; परंतु ही गोष्ट शहास कळून येतांच, त्यानें खजिन्यांतील सर्वच रत्नें आपणासमोर आणविलीं व तीं त्यानें विस्तवांत टाकून दिलीं. या गोष्टीमुळें लोक निजामशहास आतां वेड लागलें असें ह्मणूं लागले.

परंतु शहास वेड लागल्याचें याहूनही विशेष चिन्ह ह्मटलें ह्मणजे, तो यापुढें लवकरच आपला पुत्र मिरान हुसेन याचा जीव घेण्याचा

यत्न करूं लागला हें होय. त्यानें एके दिवशीं, राजपुत्र आपले खोलींत निजला आहे असें पाहून, त्याचे बिछान्यास आग लावून दिली व खोलीचें दार बाहेरून लावून घेतलें! यावेळीं राजपुत्र खोलींत जळून मरावयाचा; परंतु फत्तेशहा फकीरानें खोलीचें दार उघडून त्यास बाहेर काढिलें. येणेंप्रमाणें राजपुत्राचा या खेपेस मृत्यु टळला; परंतु त्याला मारून टाकण्याबद्दलचा हट्ट निजामशहा हा सोडीना. त्यानें सलाबतखानास वजीरीवरून काढून, मिरझाखान ह्मणून कोणी सरदार होता त्यास वजीर केलें होतें. त्यास पुत्राचा वध करण्याबद्दल वरचेवर हुकूम पाठवावा; परंतु वजीरानें वरून वरून होय होय ह्मणून, त्यानें आंतून विजापुराहून कुमक आणून, निजामशहास पदच्युत करून, राजपुत्र मिरान हुसेन यास गादीवर बसविण्याची मसलत चालविली. ही बातमी शहास लागतांच, त्यानें सलाबतखानास पुनः वजीरी देण्याचें कबूल करून, त्यास आपलें साहाय्य करण्यास बोलाविलें; परंतु तो येण्यापूर्वींच मिरझाखान व मिरान हुसेन यांनीं किल्ल्यांतील फौज फितूर करून घेऊन ते राजवाड्यांत शिरले. राजपुत्रानें शहास कैद करून त्यास एके हमामखान्याचे खोलींत कोंडून, तीस बाहेरून आग लावून दिली. त्यामुळें तेथें तो धुरानें जीव कोंडून लवकरच मरण पावला. येणेंप्रमाणें मूर्तिजा निजामशहाचा फार वाईट रीतीनें १५८६ या सालीं, त्याचे दुष्ट पुत्राचे हातून शेवट झाला!

९ मूर्तिजा निजामशहाचे मागून, त्याचा पुत्र मिरान हुसेनशहा हा अर्थातच त्याचे गादीवर बसला. त्यानें मिरझाखानास आपला दिवाण केलें; परंतु मिरझाखानाचे मनांत, आपले सुलतानास आपले मुठींत ठेऊन, आपण स्वतः कारभार करावा असें होतें. मिरान हुसेनशहानें आपले बापास कशा कारणानें ठार मारिलें, त्यावरून त्याचे दुष्ट स्वभावाची कल्पना होण्यासारखी आहेच. त्यास गादी प्राप्त होतांच त्यानें अनन्वित कृत्यें करण्यास आरंभ केला. त्यानें आपले वयाची बरीच ज्वान मंडळी गोळा करून, त्यांचे समागमें तो नेहमीं दारू

पिऊन शहरांतून हिंडे, व कधीं कधीं वाटेंत भेटणारे लोकांच्या तो अशा कांहीं कुचेष्टा करी कीं, त्यांत कित्येकांस मोठा अपाय होई किंवा ते बिचारे प्राणासही मुकत! राजधानींतील कोणा पुरुषाचा जीव किंवा कोणा स्त्रीची अब्रू हीं सुरक्षित राहतील, असा कोणास भरंवसा वाटेनासा झाला! शेवटीं मिरझाखानाचें आणि सुलतानाचें वांकडें येऊन, ते एकमेकांचा नाश करण्याचे उद्योगास लागले. इतक्यांत वजीराचा डाव साधून त्यानें मिरान हुसेनशहास कैद केलें, व त्याचा चुलत भाऊ ह्मणजे मूर्तिजा निजामशहाचा भाऊ बुऱ्हाण, ज्यानें त्याचे कारकीर्दींत बंड केलें होतें व तें मोडल्यानंतर जो अकबर बादशहाचा आश्रय मागण्याकरितां त्याजकडे गेला होता, ह्मगून मागील भागांत सांगितलें आहे, त्याचा धाकटा मुलगा इस्माएल, जो केवळ बारा वर्षांचा मुलगा होता, त्यास गादीवर बसविलें; परंतु वजीरानें केलेल्या या कृत्यावरून दक्षिणी व हबशी शिपायांनीं राजधानींत मोठा दंगा केला. वजीरास वाटलें कीं, मिरान हुसेनशहाचा वध करून, तो झालेला एकदां लोकांस कळला ह्मगजे, दंगा करणारे लोक निराश होऊन गप्प बसतील; परंतु त्याचा हा तर्क अगदीं चुकीचा झाला. त्यानें शहास ठार करून, त्याचें डोकें बुरुजावर लावतांच दक्षिणी शिपायांनीं दंगा अधिकच माजविला. त्यांत जमालखान ह्मणून एक सरदार होता, तो त्यांचा प्रमुख झाला. त्यानें वजीरास पकडून त्याची गाढवावरून सर्व शहरभर धिंड काढली, व नंतर त्याचें डोकें मारून त्याचे शरीराचे चार तुकडे केले व ते राजधानींतील चार निरनिराळ्या ठिकाणीं रस्त्यांत ठेऊन दिले. यापुढें जमालखानानें बहुतेक परदेशी शिपायांची कत्तल करून बाकीच्यांस हद्दपार केलें, व तो स्वतः वजीर झाला. ( १५८८ ).

६ मिरान हुसेनशहाचे मागून इस्माएलशहा, ज्यास मिरझाखानानें गादीवर बसविलें ह्मणून मागें लिहिलें आहे, त्यासच जमालखानानें हातीं धरलें व त्याचे नांवानें तो राज्य चालवूं लागला. जमालखान हा जात्या बराच हुपार होता. तो मेहदी ह्मणून एका नवीनच महंमदी

ाचा असल्या कारणानें, त्या पंथाचा प्रसार व्हावा ह्मणून त्यानें
ज्यकारभारांत त्या पंथाचेच लोक घेण्यास आरंभ केला; परंतु त्याची
ता फार दिवस चालली नाहीं. मागें तिसरे भागांत सांगितल्याप्रमाणें,
माएलशहाचा बाप बुऱ्हाण, जो अकबर बादशहाचे आश्रयास जाऊन
हिला होता, त्यानें त्या बादशहाचे मदतीनें खानदेशचा सुलतान
लीखान व विजापूरचा वजीर दिलावरखान यांचेपासून कुमक आणून,
जामशाहीवर स्वारी केली व जमालखानाचा पराभव केला. जमाल-
ान हा लढाईंत पडल्यामुळें, बुऱ्हाण यास सहजच गादी प्राप्त होऊन,
ानें आपला मुलगा इस्माएलशहा यास कैदेंत ठेविलें. ( १५९१ ).

बुऱ्हाण निजामशहा ( दुसरा ) यानें फक्त तीन वर्षें राज्य केलें.
ाचे कारकीर्दीतील मुख्य मुख्य गोष्टींची हकीगत, मागील भागांत
ब्राहीम आदिलशहाचे प्रकरणांत आलीच आहे; तेव्हां तिची द्विरुक्ति
येथें करण्याचें प्रयोजन नाहीं. या शहाचे मागून त्याचा मुलगा
इब्राहीम निजामशहा हा बसला ( १५९४ ); परंतु त्यानें पुरते
चार महिने राज्य केलें नाहीं, तोंच त्यानें विजापूरचे मुलुखावर स्वारी
केली असतां तो लढाईंत पडला, व त्याचें सैन्य पराभव पावून अहंमद-
नगरास परत आलें. हाही वृत्तांत मागील भागांत आलाच आहे.

७ इब्राहीम निजामशहा मरण पावल्यानंतर त्याचा वजीर मिआन
मंजू दक्षिणी यानें, त्याचा पुत्र बहादूर यास कैदेंत ठेऊन, अहंमद ह्मणून
कोणी निजामशाही वंशांतील मुलगा आहे, असें त्यास वाटत होतें,
त्यास त्यानें गादीवर बसविलें; परंतु अहंमद हा खरा वारस नाहीं
असें एकलासखान वगैरे हबशी सरदारांनीं ठरवून, त्यांनीं आपली
निराळी फळी केली, व खरा वारस, बहादूर, जो मंजूनें कैदेंत ठेविला
होता, त्याचे वयाचाच एक तोतया सुलतान उभा केला. हबशांनीं
हळू हळू दहा बारा हजार फौज गोळा केली व दिवसानुदिवस त्याचीच
सरशी अधिकाधिक दिसूं लागली. यामुळें, मिआन मंजू यानें घाब-
रून जाऊन, अकबर बादशहाचा पुत्र मुराद, जो गुजराथ प्रांतावर
होता, त्यास, “ तुह्मीं यावेळीं आह्मांस कुमक केल्यास, आह्मीं तुमचे

स्वाधीन अहंमदनगर करून देऊं" ह्मणून निरोप पाठविला. मोंगलांस तरी दक्षिणेंतील राज्यांत हात घालण्यास, अशीच कांहीं तरी संधि पाहिजे होती. ती वर लिहिल्याप्रमाणें येतांच, राजपुत्र मुराद हा एकदम फौज घेऊन अहंमदनगराकडे निघाला; परंतु तो राजधानीजवळ येऊन पोहोंचण्यापूर्वींच, हबशी सरदारांमध्यें भांडणें लागून, त्यांचा मंजूनें अगदीं पाडाव केला होता. तेव्हां अर्थातच मोंगलांचे फौजेचें आतां कांहीं प्रयोजन राहिलें नव्हतें! ह्मणून निरोपाप्रमाणें राजधानी स्वाधीन करून देण्याबद्दल त्यांनीं मंजूचे मागें नेटा लाविला असतां, त्यानें ती गोष्ट नाकबूल केली, व मोंगलाबरोबर लढाई करण्याची त्यानें तयारी चालविली. राजधानींत धान्याचा पुरवठा व दारूगोळा वगैरे सामान यथास्थित होतेंच. तें सर्व मंजूनें चांदबिबीचे स्वाधीन करून, तिचे हाताखालीं अनसारखान ह्मणून आपले विश्वासाचा एक सरदार नेमून, तो स्वतः आबशाचे किल्ल्याकडे आदिलशाहा व कुतुबशाहा यांची कुमक मागण्याकरितां गेला. तो निघून गेल्यावर, चांदबिबी हिनें बहादूरशहाचे नांवानें द्वाही फिरवून, ती स्वतः कारभार करूं लागली. तिनें अनसारखानास ठार मारून, त्याचे जागीं आपले विश्वासाचा महंमदखान ह्मणून वजीर नेमिला, व मोंगलापासून आपले राजधानीचें संरक्षण करण्याची कडेकोट तयारी चालविली ( १५९४ ).

याचेळीं बहादूरशहा याचेशिवाय, निजामशाहीचे तक्ताबद्दल हक्क सांगणारे असे तिघेजण होते. एक, मिआन मंजू यानें सुलतान ह्मणून प्रसिद्ध केलेला मुलगा अहंमद, दुसरा, एकलासखान यानें पुढें केलेला तोतया, व तिसरा, नेहंगखान हबशी ह्या नांवाचे सरदारानें हातीं धरलेला पहिला बुऱ्हाण निजामशहा याचा मुलगा शहाअली. या चार निरनिराळ्या पक्षांनीं निजामशाही अगदीं निर्बल झाली असतां, तिचे राजधानीशीं मोंगलांच्या फौजा येऊन भिडल्या; तथापि इतक्या संकटांतही धैर्य न सोडतां, चांदबिबीनें आपलें काम दृढनिश्चयानें चालविलें. तिनें नेहंगखान हबशी व शहाअली यांस पत्र पाठवून, त्यांस आपल्या फौजांनिशीं राजधानींत येण्यास सांगितलें. त्याप्रमाणें ते दोघे

कडे जाण्यास निघाले असतां, मोंगलांनीं त्यांस मध्येंच गांठून त्यांज-
र हल्ला केला. नेहंगखान यानें शत्रूंची फळी फोडून कांहीं लोकां-
ह अहंमदनगरांत प्रवेश केला; परंतु शहाअल्ली जो ७० वर्षांचा
ातारा होता, त्यास तसें करितां न येऊन, तो या चकमकींत पडला.

इकडे या सुमारास आदिलशहाच्या व कुतुबशहाच्या फौजा, मि-
ान मंजू याचे सांगण्यावरून, शहादुर्ग येथें गोळा झाल्या होत्या.
ांगल अहंमदनगरास वेढा देऊन बसला, व तो प्रथम निजामशाही-
ा मुलूख सर करून घेऊन हळू हळू आपले राज्यांवरही झडप
ाल्णार, असा धाक दोन्ही शहांस पडून, त्यांनीं आपापल्या फौजा
वरेनें उत्तरेकडे पाठविल्या. त्यांस एकलासखान हाही येऊन मि-
ळाला. त्यास आतां असें वाटूं लागलें कीं, मोंगलांनीं राज्य घेण्या-
ेक्षां, आपल्यापैकींच कोणी तरी निजामशाहीचे तक्तावर राहिलें तरी
बरें! येणेंप्रमाणें शहादुर्ग येथें निजामशाहीचे संरक्षणार्थ बरीच मोठी
फौज गोळा होऊन, ती अहंमदनगराकडे कूच करण्याचे तयारीस
लागली. ही बातमी राजपुत्र मुरादास लागतांच, त्यास अशी भीति
पडली कीं, दक्षिणेंतील राजांचा कट झाला तर, त्यापुढें आपला निभाव
लागणार नाहीं; ह्मणून शहादुर्गाहून फौज येण्याचे अगोदरच आपण
अहंमदनगरावर हल्ला करून तें काबीज करावें हें बरें. ह्मणून त्यानें
त्या शहराचे तटाचे एका बाजूकडील तीन बुरुजाखालीं सुरुंग पाडून
तट पाडावा व तो पडल्या बरोबर शहरावर हल्ला चढवावा, असा हुकूम
केला. इकडे शहरांतील लोक हे कांहीं स्वस्थ बसले नव्हते. शत्रूंनीं
पाडलेल्या सुरुंगापैकीं दोघांसमोर त्यांनीं आंतून दुसरे सुरुंग पाडून
ते निरुपयोगी केले; मात्र त्यांना तिसरा सुरुंग लवकर सांपडला नाहीं;
परंतु तोही अखेर सांपडून त्यांतील दारु काढण्याचे कामास ते लोक
लागले असतां, मोंगलांनीं त्या सुरुंगास बत्ती दिली. त्यासरसे
शेकडों लोक त्या धक्यानें मेले व तटाचा कांहीं भाग पडून त्यास
खिंड पडली. ती पडतांक्षणींच मोंगलांनीं राजपुत्र मुराद याचे हुकुमा-
वरून एकदम मोठा हल्ला केला व ते त्या खिंडींतून शहरांत घुसण्यास

पाहूं लागले. इकडे निजामशाही शिबंदी जी येवढा वेळ बऱ्याच शौर्यानें लढली, तिनें झालेला प्रकार पाहून, तिजपैकीं कांहींजण शहरांतून पळून जाऊं लागले; परंतु चांदबिबीनें तें पाहतांच तिनें आपले अंगावर चिलखत घातलें, तोंडावर बुरखा घेतला, व हातांत तरवार घेऊन ती मोठ्या आवेशानें तटास पाडलेल्या खिंडीकडे धांवली, व 'मी मेल्याशिवाय शहर शत्रूचे हातीं लागूं देणार नाहीं' असें ती ह्मणाली. राणीचें हें शौर्य व निग्रह पाहून जे सरदार व शिपाई निराश होऊन पळून जात होते, त्यांस धीर येऊन ते माघारे फिरले, व त्यांनीं मोंगलांशीं पुनः लढण्यास प्रारंभ केला. ही झटापट सर्व दिवसभर चालली; परंतु चांदबिबीनें मोंगलांस खिंडींतून ह्मणून आंत येऊं दिलें नाहीं. पुढें रात्र पडल्यावरही तिनें विश्रांति मुळींच न घेतां, सर्व लोकांस खपवून रात्रोरात्र ती खिंड आठ नऊ फूट बांधून काढली. या प्रसंगीं तिचें हें अद्भुत कृत्य पाहून मोंगलांनींसुद्धां तोंडांत बोटें घातलीं, व अजूनही दक्षिणेंत बायकांचे शौर्याच्या गोष्टी निघाल्या असतां, चांदबिबीचें नांव प्रेमानें लोक प्रथम काढितात.

असो; वर लिहिल्याप्रमाणें मोंगलांचा राजधानीवरील हल्ला परत हटविल्यावर, चांदबिबीनें शहादुर्गाकडील फौजेस लवकर येऊन मिळण्याविषयीं वरचेवर निरोप पाठविले. तेव्हां राजपुत्र मुराद यास वाटलें कीं, यावेळीं झालें तितकें बस आहे. अहंमदनगर ह्मणजे आजच मिळतें असें नाहीं, तेव्हां त्यानें चांदबिबीशीं बोलणें लाविलें कीं, 'आह्मांस वऱ्हाड प्रांत द्याल, तर आह्मीं हिंदुस्थानांत परत जातों.' चांदबिबीनें पाहिलें कीं, शहादुर्गची फौज येऊन दाखल होण्यास अजून दिवस लागतील, व शहरांत तर शिबंदीची व सामानसुमानाची तूट पडत चालली आहे; शिवाय शहादुर्गचे फौजेचे हातून मोंगलांचा ह्मणजे पराजयच होईल हीही कांहीं खात्री नाहीं; तेव्हां थोडक्यांत वऱ्हाड प्रांतावरच जर शत्रूची समजूत होत असेल, तर कांहीं वाईट नाहीं. ह्मणून तिनें लागलींच मोंगलांचें ह्मणणें मान्य करून त्यांशीं तह ठरविला, व त्याप्रमाणें त्यांच्या फौजा अहंमदनगराहून उठून वऱ्हाडाकडे गेल्या.

मोंगल निघून गेल्यावर थोडेच दिवसांनीं मागून आदिलशहा व कुतुबशहा ह्यांच्या फौजा येऊन ठेपल्या; परंतु आतां त्यांचें प्रयोजन राहिलें नव्हतें.

यानंतर जिकडे तिकडे अंमळ स्वस्थता होतांच, चांदबिबीनें बहादुरशहास कैदेंतून काढून आणून त्यास तक्तावर बसविलें, व महंमदखान यास पेशवा नेमून, त्याचे मदतीनें ती राज्यकारभार चालवूं लागली; परंतु महंमदखान यानें लवकरच सर्व सत्ता आपण बळकावण्याचा यत्न चालू करून, तो चांदबिबीस मुळींच जुमानीनासा झाला. यावरून तिनें, आपला पुतण्या इब्राहीम आदिलशहा यास पत्र लिहून त्याचेकडून कुमक आणिली. इब्राहीमशहाचा सरदार सोहलखान यानें येऊन अहंमदनगरास वेढा घातला व महंमदखानास शहरांत कोंडून धरिलें. यावरून महंमदखानानें वऱ्हाड प्रांतांत मोंगलांचा सेनापति खानखनान होता, त्यास निरोप पाठविला कीं, "तुह्मीं जर मला मदत कराल, तर मी अहंमदनगर तुमचे स्वाधीन करून देईन." परंतु हें वर्तमान किल्ल्यांतील शिबंदीस कळतांच, ती महंमदखानावर उठली व तिनें त्यास कैद करून चांदबिबीचे स्वाधीन केलें. यामुळें तिची सत्ता पूर्वीप्रमाणें चालू होऊन, तिनें महंमदखानाचे जागीं नेहंगखानास पेशवा नेमिलें.

इकडे मोंगलांची फौज मागें लिहिल्याप्रमाणें वऱ्हाडाकडे जी गेली, तिनें तो प्रांत तर घेतलाच; परंतु निजामशाहींतील पात्री वगैरे गांवेंही तिनें लुटून घेतलीं. ही बातमी चांदबिबी व इब्राहीमशहा यांस कळतांच, त्यांनीं सोहलखानाबरोबर कांहीं विजापूरची, कांहीं निजामशाहीची व कांहीं कुतुबशाहीची अशी तिन्ही राज्यांची मिळून साठ हजार फौज मोंगलांशीं लढण्याकरितां रवाना केली. तिची शत्रूशीं, सुपें या गांवीं गांठ पडून, तेथें दोहों सैन्यांचें बरेंच मोठें युद्ध झालें. या प्रसंगीं, निजामशाही व कुतुबशाही फौजांचा, मोंगलांचे जुने कट्टे शिपायांपुढें अगदींच निभाव लागला नाहीं. फक्त सोहलखान व त्याचे विजापूरचे शिपाई यांनीं त्यांच्याशीं बरीच टक्कर दिली; परंतु

अखेर मोंगलांची सरशी होऊन सोहलखान यास शहादुर्ग येथें माघारें परतून यावें लागलें. ( १५९७ ).

येणेंप्रमाणें मोंगलांनीं दक्षणी फौजांचा पराभव केला असतां, इकडे अहंमदनगरास नेहंगखान, ज्यास मागें सांगितल्याप्रमाणें चांदबिबीनें पेशवा केलें होतें, त्यानें महंमदखानाप्रमाणेंच दंगा करण्यास आरंभ केला. तो राणीचें मुळींच ऐकेनासा होऊन, त्यांमध्यें फार तंटे माजले. ते मिटवून टाकून निजामशाहीची स्थिरता व्हावी, म्हणून इब्राहीम आदिलशहानेंही दोहोंपक्षांची समजूत पाडण्याचा पुष्कळ यत्न केला; परंतु तो सर्व व्यर्थ झाला. याच सुमारास राजपुत्र मुराद हा शहापूर येथें मरण पावल्यामुळें, त्याचे जागेवर अकबर बादशहानें आपला धाकटा मुलगा डानियल यास नेमिलें, व त्याचे हाताखालीं खानखनान या सरदारास दिलें. बादशहा स्वतः बऱ्हाणपुरास आला, व त्यानें अशारगडास वेढा दिला व डानियल यास अहंमदनगरावर चालून जाण्यास सांगितलें. ( १५९९ ).

यावेळीं निजामशाहीस अति निकृष्टावस्था प्राप्त झाली होती, हें निराळें सांगावयास नकोच. मोंगलांचे वरचेवर चालू असलेले हल्ले, राज्यांत झालेल्या दुफळ्या, कोणाचा कोणावर नाहीं भरंवसा, अशा स्थितींत उमेद राहण्यास एक मात्र गोष्ट होती, ती, अर्थातच चांदबिबी-सारख्या विलक्षण हुषार व पराक्रमी अशा स्त्रीचें यावेळीं असणें, ही होय; परंतु जेथें सर्वच गोष्टी प्रतिकूळ, तेथें एके बिचारे स्त्रीनें काय करावें? मोंगल राजधानीवर चालून येत असतां, नेहंगखान हा त्यांस आड-विण्याकरितां बिडाहून पुढें सरसावला; परंतु त्यांनीं त्याचा रोंख चुकवून ते थोडासा फेरा घेऊन अहंमदनगरावर येऊन उतरले. नेहंगखानानें कांहीं वेळ चांदबिबीशीं सल्ला करण्याची खटपट केली; परंतु त्याचें कांहींच न जुळल्यामुळें, नेहंगखान हा जुन्नराकडे निघून गेला, व मोंगलांनीं अहंमदनगरास वेढा देऊन तटाखालीं सुरुंग पाडण्यास आरंभ केला. यावेळीं चांदबिबीचा ज्यावर विश्वास बसेल, असा कोणी सरदारच राहिला नव्हता. तेव्हां तूर्त राजधानीची आशा सोडून

देऊन बालराजास घेऊन जुन्नरास जावें असें तिला वाटलें; परंतु ही सल्ला तिचे हातांखालील हमीदखान खोजा यास न आवडून, तो ' राणी मोंगलांस सामील होऊन, किल्ला त्यांचे स्वाधीन करून देत आहे ' असें रस्त्यांनीं ओरडत चालला. तें ऐकून कित्येक अविचारी दक्षणी शिपायांस तें खरें वाटून, ते हमीदखानास पुढें करून राणीचे महालांत शिरले, व त्यांनीं तिला ठार केलें. येणेंप्रमाणें हिंदुस्थानचे इतिहासांतील सुप्रसिद्ध अशी ही विलक्षण स्त्री, जिनें प्रथम विजापूरास आपला पुतण्या इब्राहीम आदिलशहा ( दुसरा ) याचे बाळपणीं राज्यकारभार चालविला, व पुढें जिनें तेथून अहंमदनगरास आल्यावर कांहीं वर्षें आपले भावाचा नातु बहादुरशहा याचा पक्ष धरून, निजामशाही राखण्यास वर लिहिल्याप्रमाणें मोठा प्रयत्न केला, ती अखेर मूर्ख व अविचारी लोकांचे हातून मरण पावली!

असो. चांदबिबी मरण पावल्यावर, मोंगलांनीं शहरचे तटाखालीं सुरुंग पाडून त्यास पुष्कळ खिंडी पाडिल्या व तें शहर लवकरच हस्तगत केलें. बहादुरशहा हा मोंगलांचे हातीं लागतांच, त्यांनीं त्यास, निजामशाही छत्रचामरादि राजचिन्हें व जडजवाहीर यांसह, अशीरगडास अकबर बादशहाकडे पाठवून दिला. त्यानें, निजामशहास ग्वाल्हेरचे किल्ल्यांत कैद करून ठेवण्यास पाठवून दिलें, व निजामशाही मुलुख, खानदेश व वऱ्हाड हे तीन एकत्र करून, तो सर्व प्रांत, राजपुत्र डानियल याचे ताब्यांत दिला. येथें निजामशाहीचे अस्तित्वाचा पहिला भाग संपला. ( १५९९ ).

८ निजामशाही आतांच संपूर्ण नष्ट व्हावयाची, व तसें झालें असें प्रथम मोंगलांस वाटलें; परंतु अहंमदनगर हस्तगत होऊन बहादूरशहाची ग्वाल्हेरीस रवानगी झाल्यावर, लवकरच अकबर बादशहास, आपला थोरला मुलगा सेलिम यानें उत्तरहिंदुस्थानांत बंड केलें आहे, अशी बातमी लागल्यामुळें तो तिकडे निघून गेला, व यानंतर त्यास एकामागून एक अशाच प्रकारच्या दुसऱ्या विवंचना प्राप्त होऊन, अखेर तो लवकरच १६०५ या सालीं मरण पावला. या गोष्टीमुळें

निजामशाही सरदारास बरीच संधि सांपडून, त्यांनीं आपले राज्याची पुनः बरीच जुळवाजुळव केली. त्यांनीं, शहाअली, जो ७० वर्षांचे वयाचा असून नेहंगखानाबरोबर अहंमदनगरावर चालून येत असतां मध्येंच मोंगलांबरोबर चकमक होऊन तींत पडला ह्मणून मागें लिहिलें आहे, त्याचा मुलगा मूर्तिजा यास गादीवर बसवून, त्यांनीं निजामशाहीची गादी तूर्त परिंड्याचे किल्ल्यावर नेली. या कृत्यांत दोन सरदार — एक मलिकंबर ह्मणून हबशी व दुसरा मिआन राजु दक्षणी — असे प्रमुख होते. ते प्रथम एक विचारानें चालत असल्यामुळें, मोंगलांचे फौजेस ते दाद देईनासे होऊन त्यांचे ताब्यांत बराच मुलुख परत आला; परंतु कांहीं वेळानें त्यामध्यें अति स्पर्धा उत्पन्न होऊन त्यामध्यें फूट पडतांच, मोंगलांचा सरदार खानखनान यानें मलिकंबरावर चाल करून त्याचा नांदेड येथें चांगलाच पराभव केला; परंतु मलिकंबरानें लवकरच तहाचें बोलणें लावल्यावरून, खानखनानही त्या गोष्टीस कबूल झाला. कारण मलिकंबराचा यावेळीं जरी पराभव झाला होता; तथापि त्याची हुशारी व पराक्रम हीं खानखनानाचे लक्षांत चांगलीं आलीं होतीं.

मलिकंबर हा, मूर्तिजा निजामशहा ( दुसरा ) यास साधारणपणें नामधारी सुलतानाप्रमाणेंच वागवीत असे; यामुळें त्यानें स्वतंत्र होण्याची खटपट चालविली. त्यानें मिआन राजूस त्याबद्दल लिहून, त्याचेकडून मलिकंबरावर हल्ला करविला व त्यास बरेंच जेरीस आणिलें. मलिकंबरानें खानखनानाची मदत मागितली व तेणेंकरून त्यानें कांहीं वेळानें राजूचा अगदीं मोड करून, त्यास दौलताबादेकडे पळून लाविलें. यानंतर त्यानें, त्यास दौलताबादेसही गांठून किल्ल्यास वेढा घातला; परंतु इतक्यांत राजूनें खानखनानाकडे संधान लावून त्याचे मध्यस्थीनें मलिकंबराशीं तह ठरविला. निजामशहानें आपणाविरुद्ध केलेली ही खटपट, अर्थातच मलिकंबरास आवडली नाहीं; ह्मणून त्याचे मनांत प्रथम त्यास गादीवरून काढून टाकून, दुसरे राजपुत्रास बसविण्याचें आलें; परंतु इब्राहीम आदिलशहानें त्या दोघांची

मजूत घालून, वजीर व सुलतान यांचें नीट सख्य केलें. यापुढें
६०७ या सालीं मलिकंबर यानें राजूवर पुनः स्वारी करून त्याचा
राभव केला, व त्यास कैद करून त्याचा सर्व मुलुख आपले
ाब्यांत आणिला.

येणेंप्रमाणें, मलिकंबर या हबशी सरदाराचें निजामशाहींत जें वर्चस्व
थापन झालें, तें तसेंच किंवा त्याहून जास्तच सुमारें वीस वर्षं त्याचे
रणकालपर्यंत चाललें. इतके काळांत त्यानें निजामशाहीचें संरक्षण
लें, येवढेंच नाहीं; तर मोंगलांनीं तिचा जो मुलूख जिंकून घेतला होता,
ोही त्यानें परत घेतला. प्रथम अहंमदनगर हें मोंगलांनीं घेतलें
असल्यामुळें, त्यानें दौलताबादेजवळ खडकी ह्मणून एक नवीन शहर
सविलें व तेंच त्यानें निजामशाहीची राजधानी केली. पुढें अकबर
ादशहा मरण पावून त्याचे तक्तावर त्याचा वडील मुलगा जहांगीर
ादशहा हा बसला असतां, त्याचा पुत्र खुसरू यानें उत्तर हिंदुस्थानांत
ंड माजविल्यामुळें, जहांगीर बादशहास दक्षिणेकडील मुलुखाचे व्यवस्थे-
कडे लक्ष देण्यास मुळींच होईनासें झालें. तसेंच राजपुत्र डानियल
याचे मरणानंतर, दक्षिण प्रांतावर खानखनान ह्मणून जो मोंगलांचा
सुभेदार होता, त्याचें आणि त्याचे हाताखालील अंमलदारांचें वांकडें
आल्यावरून, दक्षिणेंतील सुभेदारींतही पुष्कळ अव्यवस्था झाली होती.
येणेंप्रमाणें मोंगलांचे बादशाहींत फुटाफूट झाल्याची संधि साधून,
मलिकंबर यानें, इब्राहीम आदिलशहाशीं सख्य करून, त्याचे
मदतीनें खानखनानावर हल्ला केला, व अहंमदनगर शहर परत घेतलें
व मोंगलांस बऱ्हाणपुरापर्यंत मागें हांकून लाविलें.

मोंगलांस आपले प्रांतांतून हांकून लाविल्यानंतर, मलिकंबर हा आपले
मुलुखाची व्यवस्था व सुधारणा करण्याचे कामास लागला. त्यानें
मक्तयानें मामलती देऊन वसूल करण्याची वहिवाट बंद केली. उत्तर
हिंदुस्थानांत तोडरमल्ल यानें जमाबंदीची जी नवीन पद्धत घालून दिली,
तिचेंच मलिकंबर यानें दक्षिणेंत अनुकरण केलें. त्यानें सर्व जमिनीची
मोजणी व प्रतबंदी करून, शेतांतील उत्पन्नाची कांहीं वर्षांची सरासरी

काढून, त्यानें प्रत्येक शेताचें नक्त देणें ठरविलें. कित्येक, लोकांस त्यानें कांहीं वर्षांचे कौल दिले व तेणेंकरून पडित जमिनी लागवडीस आणिल्या. जमाबंदीचें हें सर्व काम, तो मुसलमान अधिकाऱ्यांचे हाताखालीं ब्राह्मण कारकून देऊन त्यांजकडून करवीत असे. त्याच-प्रमाणें मुलुखांत बंदोबस्त ठेवून व न्यायमनसोब्याचीं कामें चालवून त्यानें प्रजेस पुष्कळ सुख केलें. अशा व्यवस्थेनें निजामशाही मुलुखांत लवकरच चांगली अबादानी होऊन, राज्याचा पुष्कळ वसूल वाढला, व तें चांगलें भरभराटीस येऊं लागलें.

येणेंप्रमाणें मलिकंबरानें निजामशाहींत पुनः जीव आणिला असतां, उत्तर हिंदुस्थानांतही तितके काळांत जहांगीर बादशहानें आपले मुलाचें बंड मोडून मुलखांत पुनः बरीच व्यवस्था केली; व यानंतर दक्षिणेंतील कारभाराकडे हळू हळू त्याचें लक्ष लागूं लागलें. त्यानें खानखनान यास परत बोलाविलें, व त्याचे जागीं खान जहान लोदी या हुषार नवीन कामगाराची नेमणूक केली, व आपला पुत्र परवीज याज-बरोबर सैन्य देऊन, त्यास निजामशाहीचा मुलूख पुनः जिंकण्यास पाठविलें. तसेंच गुजराथचा सुभेदार अबदुल्लाखान यासही, आपली फौज घेऊन राजपुत्र परवीज यास मदत करण्यास जाण्याविषयीं त्यानें हुकूम केला; परंतु या दोन्ही सैन्यांचा मिलाफ होण्यापूर्वीच, मलिकं-बरानें मोठे युक्तीनें गुजराथचे फौजेस गांठून तिचा पूर्ण पराभव केला. परवीज याची फौज जी मागून आली, तिनें अबदुल्लाखानाचे पराभवाचें वर्तमान ऐकून, ती एकटी पुढें जाण्यास कचरली, व तिनें बऱ्हाणपुरासच मुक्काम केला. ( १६१२ ).

या मोहिमेंत प्रथमच मराठे लोकांचे फौजेचा पराक्रम विशेष दिसून आला. विजापूरचे फौजेंत, या लोकांचा भरणा याचे पूर्वीपासून होत चालला होता ह्मणून मागें सांगितलें आहेच. त्याप्रमाणें निजामशाहीं-तही तो होत होता; परंतु त्यांचा विशेष फैलाव मलिकंबर यानें केला. मराठे लोकांनीं या प्रसंगीं, शत्रूंची दाणावैरण बंद करून, त्यानंतर वरचेवर लहान मोठ्या टोळ्यांनीं हल्ले करून व त्यांचें सामानसुमान

लुटून त्यांस अगदीं जेरीस आणिलें. या त्यांचे कामगिरीमुळें, त्यांची दिवसानुदिवस अधिकाधिकच प्रतिष्ठा वाढून, निजामशाहींत हळू हळू त्यांचा एक प्रबळ पक्ष होऊं पाहूं लागला!

वर लिहिल्याप्रमाणें मलिकंबर यानें मोंगलाचा पराभव केल्यावर, जहांगीर बादशहानें पुढें पांच वर्षें दक्षिणप्रांत घेण्याविषयीं फारशी हालचाल केली नाहीं; परंतु १६१७ या सालीं त्यानें आपला धाकटा मुलगा शहाजहान, ज्यानें नुकतीच उदेपूरचे मोहिमेंत पुष्कळ हुषारी दाखविली होती, त्यास दक्षिणेचे फौजदार नेमून, तो प्रांत पुनः जिंकण्यास रवाना केलें, व बादशहा हाही कारण पडल्यास राजपुत्राचें साहाय्य करण्यास ह्मणून दक्षिणेकडे येऊन, तो मांडु येथें छावणी करून राहिला. शहाजहान हा तर जातीनें हुषार होताच; परंतु बादशहा जवळ असल्यामुळें, राजपुत्राचे हाताखालील इतर सरदारही आपापलीं कामें विशेष झटून करूं लागले. मोंगलांनीं इब्राहीम आदिलशहा, ज्यास कांहीं अंशीं मलिकंबरचा झालेला उत्कर्ष व तेणें-करून त्याचें कांहीं अंशीं चढाईचें वर्तन, हीं सहन होईनाशीं झालीं होतीं, त्यास निराळा फोडून आपलासा करून घेतला. यामुळें मलिकंबर याचा, राजपुत्र शहाजहान याचेपुढें टिकाव न लागून, त्याचा पूर्ण पराभव झाला, व त्यास, मोंगलांस अहंमदनगर व त्याचे भोंवतालचा मुलूख जो त्यानें जिंकून घेतला होता, तो सर्व त्यांस परत देऊन त्यांशीं तह करावा लागला.

यापुढें तीन वर्षेंपर्यंत मलिकंबर व मोंगल हे साधारणपणें स्वस्थच होते; परंतु १६२० या सालीं मलिकंबर यानें पुनः मोंगलांचे प्रांतावर स्वारी करून त्यांस नर्मदेचे पार मांडूपर्यंत हांकून लाविलें. यामुळें जहांगीर बादशहानें पुनः आपला मुलगा शहाजहान याजबरोबर मोठी फौज देऊन त्यास मलिकंबरावर पाठविलें. त्यानें मलिकंबरास प्रथम नर्मदेचे आलीकडे हटविलें, व त्यानंतर दोहों पक्षांची एक मोठी लढाई होऊन, तींत मलिकंबर याचा पूर्ण पराभव झाला. या प्रसंगीं मागील खेपेप्रमाणें मराठे सरदारांनीं आपली बाजू चांगली संभाळली होती, व

त्यांचेपैकीं सिंदखेडचा देशमूख लुकजी जाधवराव, व मराठी राज्याचे स्थापनकर्ते **शिवाजी महाराज** यांचे वडील शहाजी राजे, या दोघांनीं विशेष पराक्रम केला ह्मणून लिहिलें आहे. *

याचे पुढील सालीं ह्मणजे १६२१ त तर, मलिकंबर याची विशेषच तारंबळ उडाली. त्यानें योग्यतेस चढविलेल्या मराठे सरदारांपैकीं विशेष प्रमुख जो वर लिहिलेला लुकजी जाधवराव, यास मोंगलांनीं २४००० ची मनसब व १५००० घोडेस्वारांचें पथक देऊं करून, व त्याचे इतर नातेवाईक व इष्टमित्र यांसही त्याचेप्रमाणेंच लहान मोठ्या नेमणुका करून देण्याचें कबूल करून, त्यास मलिकंबरापासून फोडून आपले पक्षाकडे ओढून घेतलें. मलिकंबर यानें आपला पक्ष निर्बल झालासें पाहून, त्यानें निरुपायास्तव मोंगलांस पुन अधिक प्रांत सोडून देऊन त्यांच्यांशीं तह केला. ( १६२१ )

मलिकंबराची ही दुर्बलावस्था फार दिवस राहिली नाहीं. जहांगीर बादशहाची राणी नूरजहान हिचे कारस्थानांनीं, त्याचे पहिले राणीचा पुत्र जो शहाजहान, याजवरून त्याचें प्रेम उतरून जाऊन तो त्याचे अवकृपेंत आला. त्यानें सन १६२३ या सालीं बादशहा विरुद्ध बंड उपस्थित केलें. यामुळें मोंगलांचे दक्षिणेतील मुलखांत पुनः अव्यवस्था उत्पन्न झाली, व मलिकंबर यांस पुनः एकवेळ आपली सत्ता वाढविण्यास फावलें. इब्राहीम आदिलशहा, ज्यास प्रथम निजामशाहीची उडालेली तारंबळ पाहून तसाच प्रसंग हळू हळू आपलेही राज्यावर येईल, अशी भीति वाटली होती व त्यामुळे त्यानें मलिकंबरास मोंगलांविरुद्ध साहाय्य केलें होतें, त्यास आता मलिकंबराचा झालेला उत्कर्ष पाहून त्यास असें वाटूं लागलें कीं, निजामशाहीचे हबशी वजीराची अशीच सरशी चालूं दिली, तर कदाचित् आपले राज्यांतीलही कोणी सरदार त्याचेप्रमाणेंच करूं पाहतील. तेव्हां कांहीं अशा विचारानें, व कांहीं मोंगलांची शक्ति फार मोठी आ

* ग्रांटडफ.

व त्यांचे बरोबर युद्ध केल्यानें, नफा होण्यापेक्षां आपला तोटाच होण्याचा संभव अधिक आहे, असें मनांत आणून, इब्राहीम आदिलशहानें मलिकंबरास सोडून, तो मोंगलांस जाऊन मिळाला; परंतु मलिकंबर यानें, मोंगल व आदिलशहा या दोघांसही दाद लागूं दिली नाहीं. त्या दोघांचीं सैन्यें अहंमदनगरावर चालून आलीं असतां, मलिकंबर यानें त्यांस अहंमदनगरापासून पांच कोसांवर भातोडी ह्मणून गांव आहे, तेथें गांठून त्या दोघांचाही पराभव केला, व आदिलशहा-कडील रेणदुल्ला वगैरे सरदार कैद करून ठेविले. या जयानें मलिकं-बरास इतकी उमेद आली कीं, त्यानें पुढील सालीं ( १६२४ ) विजापूरचे मुलुखावर स्वारी करून, इब्राहीम आदिलशहानें मोठे हौसेनें आपले राजधानीजवळच नवरसपूर ( तोरवा ) ह्मणून जें एक सुंदर शहर वसविलें होतें, त्याजवर तोफांचा भडिमार करून, तें सर्व उध्वस्त केलें.

यानंतर मलिकंबर फार दिवस वांचला नाहीं. तो १६२९ या सालीं एकाएकीं मरण पावला. त्याची बुद्धि, त्याचें शौर्य व त्याची कर्तबगारी यांचेयोगानेंच काय तो निजामशाहीस पुनः जीव येऊन, ती वीस वर्षेपर्यंत अधिक टिकली. हबशी ह्मणजे बहुतेक रानटी लोक, अशी वास्तविक स्थिति असतां, मलिकंबर हा इतका चांगला व हुषार असा निपजला, ही चमत्काराचीच गोष्ट खरी. याचें नांव महाराष्ट्राचे इतिहासांत, विशेषेंकरून त्याचे जमाबंदीचे पद्धतीवरून, पुष्कळ वर्षे राहील यांत कांहीं संशय नाहीं.

मागील भागांतील आदिलशाहीचा वृत्तांत ज्याप्रमाणें १६२६ सालीं इब्राहीमशहा ( दुसरा ) याचे मरणापर्यंत आणून तेथें थांबविला आहे; त्याप्रमाणें निजामशाहीचाही वृत्तांत, येथें १६२९ या सालीं मलिकंबर याचे मरणापर्यंतच थांबवितों. कारण, या दोन्हीही शाह्यांचा यापुढील इतिहास, आपले या ग्रंथाचा मुख्य कथाभाग जो महाराष्ट्रीयांचा अभ्यु-दय, त्यांत अगदीं सामील होऊन गेला आहे, व तो अर्थात यापुढील कथानुरोधानें सांगण्यांत येईलच.

असो; आतां हा भाग संपविण्यापूर्वीं, मागील दोन भागांप्रमाणें या भागांत निजामशाहीचा विस्तार, तिचें वैभव व तिचा महाराष्ट्रीय लोकांचे अभ्युदयाशीं असलेला संबंध, या गोष्टींविषयीं थोडक्यांत लिहितों. निजामशाहीचा विस्तार, मूर्तिजा निजामशहाचे वेळीं अतिशय झाला असतां, तींत वऱ्हाड, ( हल्लींचें ) औरंगाबाद, जालना वगैरे प्रांतांचा समावेश होत असून, तिचा दक्षिणेस जुन्नर व पुणें येथपर्यंत मुलूख पसरला होता. तसेंच, पश्चिमेस कोंकणांत तिचे ताब्यांत कल्याण प्रांत असून, तिचा अंमल बाणकोटपासून वसईपर्यंत चालत होता.

निजामशाहीची शक्ति व तिचें वैभव हीं अर्थातच आदिलशाहीचेपेक्षां कमी होतीं, व तींही कमी काळपर्यंत टिकलीं. शिवाय आदिलशहाप्रमाणें निजामशहास एकंदरींत सुंदर व भव्य मशीदी, दर्गे वगैरे बांधण्याचा षौक फार कमी असल्यामुळें, अहंमदनगरास आज काळाला, विजापूरचे बोळ घुमट किंवा इब्राहीम रोझा यांचेप्रमाणें मोठमोठ्या इमारती राहिल्या नाहींत; तथापि निजामशाहीचे वैभवाचे अवशेष ह्मणून ज्या मशिदी किंवा महाल किंवा बागा राहिल्या आहेत, त्यांची संख्या बरीच आहे. यांपैकीं मुख्य इमारत ह्मटली ह्मणजे चांदबिबी हिचा महाल होय. याचे खालोखाल फरहादखानी मशीद, जामे मशीद, दुधिया मशीद, काळी मशीद, दगडी मशीद, गेरी गुमट, शहासवाद गुमट, मेंगणी महाल, कविजंग महाल, बागरोजा हीं आहेत. यांपैकीं बहुतेक मशिदींतून हल्लीं कलेक्टर कचेरी, जड्ज कचेरी, जेल, इस्पितळ वगैरे सरकारी ऑफिसें आहेत.

निजामशाहीचे राज्यव्यवस्थेसंबंधाची निराळी अशी माहिती नाहीं. मागील भागांत आदिलशाहीची जी दिली आहे, तीच निजामशाहीविषयींही आहे. मात्र आदिलशाहीपेक्षां निजामशाहींत पहिल्यापासूनच एकंदर हिंदु लोकांचें प्राबल्य अधिक होतें, असें या भागांतील मागील हकीगतीवरूनही कळून येण्यासारखें आहे. प्रथम निजाम-

शाहीचा मूळ पुरुष जो बेहरी, तो मूळचा ब्राह्मण असल्यामुळें, त्यास व त्याचेपुढें त्याचे वंशजांसही आपले सजातीयांविषयीं अर्थातच अधिक कळकळ वाटत असेल यांत नवल नाहीं. बुऱ्हाण निजामशहा (पहिला) याचा दिवाण कुवरसेन ह्मणून कोणी हिंदूच होता, व त्यानेंही त्याची चाकरी मोठे हुषारीनें व इमानानें करून, त्यास त्यानें पुष्कळवेळां संकटांतून काढिलें, ह्मणून मागें लिहिण्यांत आलेंच आहे. यानंतर मलिकंबर याचेवेळीं तर मराठे लोकांची योग्यता इतकी वाढली कीं, निजामशाहींत हळू हळू त्यांचा एक स्वतंत्र व प्रबळ असा पक्षच बनला. मागें ब्राह्मणी सुलतानांचेवेळीं हिंदु लोकांस काय त्या दोनशें, तीनशें घोडेस्वारांच्या मनसबा मिळत असत; आदिलशाहींत हें मान बदलून, तें मागील भागांत सांगितल्याप्रमाणें बारा हजारांपर्यंत येऊन ठेपलें; परंतु निजामशाहींत तर तें याहूनही चढून, तें नुकतेंच वर लिहिल्याप्रमाणें चोवीस हजारांवर येऊन बसलें! यावरून हिंदूंचें व विशेषेंकरून त्यांतील एका ज्ञातीचें—मराठे लोकांचें—महत्व दिवसानुदिवस कसें वाढत गेलें, व शेवटीं निजामशाहीचीं जीवितसूत्रेंही तिचे हातीं कशीं येत गेलीं, हें चांगलें लक्षांत येण्यासारखें आहे. यापुढें हीच स्थिति अधिकाधिक होत जाऊन, निजामशाहीचे ऱ्हासाचा संबंध मराठे लोकांचे अभ्युदयाशीं कसा जडला, हें या पुढील भागांत सांगण्यांत येईलच.

---

## भाग ५.

### महाराष्ट्रीय लोकांचा उदय—शहाजी राजे.

१ मागील चार भागांचा सारांश. २ महाराष्ट्राचा विकास. हिंदुस्थानांतील इतर राष्ट्रांचे विकासाहून याचा विशेष. तो अनेक व्यक्ति व अनेक ज्ञाति यांचे पराक्रमाचें फळ होय. तो धार्मिक, सामाजिक व राजकीय अशा राष्ट्रोन्नतीचे सर्व अंगांनीं होतो. ३ या विकासाचे कारणांचा विचार. देशस्वरूप—कोंकण, सह्याद्रीचे बिकट घांट, त्यांतील डोंगरी किल्ले, त्यांतील एकंदरींत निरोगी हवापाणी—त्यांचा महाराष्ट्राचे इतिहासावर झालेला परिणाम. धर्मसमजुतींत बदल होऊन, महाराष्ट्रांत भक्तिमार्ग नामक नवीन धर्मपंथाचा प्रसार. त्याचे योगानें महाराष्ट्रांत उत्पन्न झालेली चळवळ. महाराष्ट्र भाषेंत पौराणिक ग्रंथ व थोर पुरुषांचे पोवाडे लिहिण्याची प्रवृत्ति व तिचे परिणाम. तत्कालीन राजकीय स्थिति. ४ महाराष्ट्रीय लोकांपैकीं मराठे ह्मणून ज्ञाति ही प्रथम उदय पावते. तिचे उत्पत्तीविषयीं लोकांची समजूत. तिचें साधारण स्वभाववर्णन. ५ तिचीं विजापूरचे आदिलशाहींतील मुख्य मुख्य घराणीं. ६ तिचीं निजामशाहींतील घराणीं. लुकजी जाधवराव. ७ भोसले यांची मूळपीठिका. मालोजी भोसले यास जाधवरावाचे शिफारसीवरून निजामशाहींत शिलेदारीची नौकरी मिळते. त्याची दिवसानुदिवस बढती. मालोजीस शहाजी ह्मणून पुत्र होतो. शिमग्यांत एके दिवशीं, मालोजी शहाजीस बरोबर घेऊन जाधवराव याचे घरीं गेला असतां, तेथें जाधवरावाची कन्या जिजाबाई व शहाजी यांचेमध्यें चमत्कारिक विनोदाचा प्रकार घडतो. तो जाधवराव व त्याची बायको यांस आवडत नाहीं; परंतु मालोजीस, जाधवरावाची कन्या जिजाबाई ही, आपला पुत्र शहाजी यास करून, त्या घराण्याशीं आपला शरीरसंबंध करावा याविषयीं आकटा लागते. त्यास देवीचा दृष्टांत होतो. तो पुष्कळ द्रव्य संपादन करून दानधर्म करूं लागतो. त्याची निजामशाहींत योग्यता वाढते, व त्यास निजामशहाकडून जहागीरी व राजे हा किताब मिळतात. अखेर शहाजी व जिजाबाई यांचा मोठे समारंभानें विवाह होतो. ८ मलिकंबर याचे मृत्यूनंतर त्याचा मुलगा फत्तेखान हा, दुसरा मूर्तिजा निजामशहा याचा वजीर होतो; परंतु त्याचा निजामशहाशीं बेबनाव झाल्यामुळें तो कैदेंत पडतो, व

त्याचे जागीं तकरीबखान हा वजीर होतो. लुकजी जाधवराव याचा विश्वासघातानें मृत्यु. मोंगल बादशहाचा दक्षिण प्रांतावरील सुभेदार खान जहान लोदी याचें बंड. त्यास निजामशहा आश्रय देतो. मोंगल निजामशहाचे फौजेचा पूर्ण पराभव करितात. त्यावरून निजामशहा हा घाबरून जाऊन, फत्तेखानास कैदेंतून काढून त्यास वजीरी देतो. फत्तेखान निजामशहाचा खून करून मोंगलांस निजामशाहीचा सर्व मुलुख देऊं करतो. ९ शहाजी राजे यांचें मोंगलांशीं वांकडें पडून, ते, विजापूरचा सुलतान महंमद आदिलशहा याशीं, दौलताबादचे किल्ल्यासंबंधानें कारस्थान करितात. मोंगल लोकांचा सरदार मोहबतखान हा दौलताबादचे किल्ल्यावर हल्ला करून तो घेतो; परंतु थोडेच वेळांत शहाजहान बादशहा हा आपला मुलगा सुजा यास दक्षिणेचे सुभ्यावर पाठवून देऊन, मोहबतखान यास दुय्यम करितो. मोहबतखानाचें चित्त कारभारांतून उडतें. १० दक्षिणेचे सुभ्यांत अव्यवस्था उत्पन्न होते. यामुळें शहाजी राजे यांस, निजामशाहीचे गादीवर पुनः दुसरे एका लहान राजपुत्रास बसवून, तिचा बहुतेक मुलख मोंगलांपासून परत जिंकून घेण्यास संधि सांपडते. सुलतान सुजा व मोहबतखान हे, शहाजी राजे यांजवर, परिंड्याचे किल्ल्याजवळ हल्ला करितात; परंतु तो फसून जाऊन, राजे हे मोंगलांच्या फौजांस बुऱ्हाणपुरापर्यंत मागें पिटून लावितात. ११ शहाजहान बादशहा, शहाजी राजे व विजापूरकर यांजवर वेगवेगळाल्या फौजा पाठवितो. दोहोंपक्षांचें बऱ्याच निकराचें युद्ध होतें. अखेर विजापूरचा सुलतान महमंद आदिलशहा हा, मोंगल बादशहाबरोबर तह करितो, व शहाजी राजे हे त्याचे पदरीं जहागीर घेऊन राहतात. त्यांचे आयुष्यांतील मर्दुमकीचा भाग येथें संपतो.

१ येथवर, मागील चार भागांत महाराष्ट्रीय लोकांचा अभ्युदय होण्यापूर्वी सुमारें तिनशें वर्षांत झालेला वृत्तांत—ह्मणजे महाराष्ट्रदेश हा मुसलमान लोकांकडून पूर्ण पादाक्रांत होऊन जाऊन, तेथें अखेर ब्राह्मणी राज्य कसें स्थापन झालें; त्याचे तक्तावर एकामागून एक अठरा सुलतान बसून ते बहुतेक बरेच पराक्रमी असल्यामुळें, त्याचा विस्तार कसा अधिकाधिक होत गेला; तसेंच तें चालू असतां ब्राह्मणी सुलतानांचे हातून कित्येक वेळां हिंदु लोकांच्या झालेल्या कत्तली, त्या लोकांचे देवळांचा, पवित्र क्षेत्रें वगैरेंचा घडलेला विध्वंस, त्यांचे धर्माची झालेली विटंबना इत्यादि गोष्टींचे योगानें हिंदु लोकांचे मनांत

मुसलमान लोकांविषयीं द्वेष व हाडवैर हीं कशीं उत्पन्न झालीं; त्यापुढें ब्राह्मणी राज्य मोडून जाऊन, त्याचे जागीं पांच लहान मोठीं मुसलमानांचींच स्वतंत्र राज्यें झालीं असतां, त्यांमध्यें स्पर्धा व द्वेष हीं उत्पन्न झाल्या कारणानें, परस्परांच्या एकसारख्या लढाया सुरू होऊन तीं लवकरच कशीं निर्बळ झालीं; व शेवटीं अशा दुर्बलावस्थेंत त्यांजवर, उत्तरेकडून मोंगलांच्या स्वाऱ्या सुरू होऊन, त्यांचे ऱ्हासास आरंभ झाला असतां, यापूर्वीं अगदीं पादाक्रांत झालेल्या महाराष्ट्रीय लोकांचें डोकें हळू हळू वर निघायास लागून त्यांपैकीं मराठे ह्मणून एका ज्ञातीचें प्राबल्य आदिलशाहींत व त्याहूनही विशेष अधिक असें निजामशाहींत कसें वाढत गेलें इतका—सांगण्यांत आला. आतां यापुढें आपले इतिहासांतील विशेष मनोरंजक व महाराष्ट्रीय वाचकांचें हृदय उचंबळविणारा असा जो कथाभाग, ज्यांत, मोंगल बादशहांचा व दक्षिणेंतील निजामशहा, आदिलशहा व कुतुबशहा यांचा बडा संग्राम सुरू झाला असतां त्यांत अखेर दोन्ही पक्षांचा पाडाव होऊन, परमेश्वराचे अतर्क्य लीलेनें तिसरे ठिकाणीं महाराष्ट्राचाच उदय झाला असें संविधानक आहे, त्यास प्रारंभ करितों.

२ मागें पहिले भागांत सांगितल्याप्रमाणें मुसलमान लोकांनीं सर्व हिंदुस्थान देश एका टोंकापासून दुसरे टोंकापर्यंत सर करून टाकिला असतां, त्यांत थोड्या बहुत अवकाशानें तीन ठिकाणीं पुनः हिंदु स्वराज्यें स्थापन झालीं—रजपुतस्थानांत रजपूत लोकांचें, पंजाबांत शीकलोकांचें व महाराष्ट्रांत महाराष्ट्रीय लोकांचें—परंतु या तिहींपैकीं महाराष्ट्राचा विकास जसा सर्व अंगांनीं पूर्ण होऊन तो बराच काळ टिकला, तसा बाकी दोहोंचा प्रकार झाला नाहीं. महाराष्ट्राचा उदय हा एकाच अलौकिक पुरुषाचे पराक्रमानें झाला नाहीं; तो तसाच एका ज्ञातिविशेषाचे हुषारीनें व अक्कलेनें झाला नाहीं; तर तो अनेक ज्ञाति एकामागून एक उदयास येऊन, त्यांतील अनेक अलौकिक पुरुषांचे बाहुबलाचें व बुद्धिवैभवाचें फल होय. तसेंच हा उदय केवळ एकाच दिशेनें ह्मणजे अनेक तलवारबहाद्दर शिपाई किंवा बडे अक्कलवान मुत्सद्दी

निपजून फक्त राजकीयसंबंधानेंच झाला असें नाहीं; तर तो इतर राष्ट्राप्रमाणें सर्व अंगांनींही झाला. ज्यावेळीं मागें सांगितल्याप्रमाणें जाधवराव वगैरे मराठे सरदारांचें प्राबल्य निजामशाहीचे फौजेंत व दरबारांत वाढत चाललें होतें, त्याचवेळीं महाराष्ट्रीय लोकांचे धर्म समजुतींत, त्यांचे विद्येंत, त्यांचे आचारविचारांत, त्यांचे रहाटींत वगैरे अनेक गोष्टींत बदल होत चालला होता! जेणेंप्रमाणें एकादा वृक्ष वाढीस लागला असतां, त्याची वृद्धि सर्व अंगांनीं दृष्टीस पडूं लागून, त्यास पुष्पफळांचे भर एकामागून एक असे येतात; परंतु असा आल्हादप्रद विकास कांहीं वेळ झाल्यानंतर तो सर्व बंद होऊन, तो वृक्ष पुन: निर्फल व निस्तेज दिसूं लागतो, त्याप्रमाणें आमचे महाराष्ट्राचा यावेळेपासून उदय होऊं लागून, त्यांत मराठे, ब्राह्मण, परभू, धनगर, वगैरे अनेक ज्ञाति एकामागून एक वैभवास चढून, त्यांत अनेक रणबहादर वीर, अनेक अक्कलवान मुत्सद्दी, अनेक धर्मशुद्धि करणारे साधू, अनेक कवि, अनेक लोकसमजुतींत बदल करणारे असे पुरुष एकसारखे उत्पन्न झाले. तेव्हां हें आमचे राष्ट्राचें अभ्युदय प्रकरण किती उपयोगाचें, किती मनोवेधक व किती आल्हादकारक होण्यासारखें आहे, याची कल्पना आमचे वाचकांस सहज करितां येईल!

३ आतां हा महाराष्ट्राचा अभ्युदय यावेळीं होण्यास कोणकोणत्या गोष्टी कारणभूत झाल्या याविषयीं आपण विचार करूं. यांपैकीं प्रथम, महाराष्ट्रदेशाचें स्वरूप हें एक होय. या देशाचा आकार साधारण त्रिकोणाकृति आहे. त्याचे उत्तरेस सातपुड्या पर्वताची ओळ असून, पश्चिमेस आरबी समुद्र आहे; परंतु पूर्व व दक्षिण या बाजूकडील त्याच्या सीमा इतक्या नीट व स्पष्ट अशा नाहींत. महाराष्ट्राचा पूर्वेकडील विस्तार नागपुरापलीकडे वैनगंगानदीपर्यंत आहे. तेथून वर्धानदी, माणिकदुर्ग, माहूर अशा वळणा वळणानें त्याची पूर्व सीमा होऊन, तेथून मागें पुढें गेलेली अशी वांकडी रेषा गोंवें शहरापर्यंत येऊन मिळून त्याची दक्षिण मर्यादा झाली आहे.

महाराष्ट्र देशाचे मुख्य दोन विभाग आहेत—एक कोंकण व दुसरा देश. कोंकणप्रांत हा आरबी समुद्र व सह्याद्रि पर्वत यांचेमध्यें असून, त्याचा दक्षिणोत्तर विस्तार कारवारापासून तापी नदीपर्यंत आहे. हा प्रदेश एकसारखा सपाट मुळींच नसून, पुष्कळ ठिकाणीं तर तो फारच उंच सखल असा आहे. शिवाय ठिकठिकाणीं मोठे मोठे उंच डोंगर, दाट व निर्जन अरण्यें, हीं असून, त्यांमधून जागजागीं लहान मोठ्या नद्या व असंख्य ओहोळ गेले आहेत. कोंकणांतील रस्ते ह्मणजे अगदीं अरुंद आहेत, व विशेषेंकरून जों जों सह्याद्रीपर्वताकडे वर येऊं लागावें, तों तों तर हे रस्ते इतके बिकट व वरचढीचे झाले आहेत कीं, त्या वाटांनीं घोड्यासमुद्धां चढण्याची पंचाईत पडते! या घांटांमधून चाललें असतां, चार चार पांच पांच हजार फूट उंचीचे पर्वत एकामागें एक आपणांस दिसूं लागतात. त्यांजवर बहुतेक ठिकाणीं अगदीं कीर्र झाडी लागून गेली असते; तथापि कित्येक ठिकाणीं तर काळ्या व भिन्न पाषाणांखेरीज दुसरें कांहींएक दृष्टीस पडतच नाहीं. तेथें मोठ्या राखट झुडपाचें देखील मूळ आंत शिरूं शकत नाहीं. पुणें शहराचे दक्षिण बाजूकडील घांटांत जो देखावा दृष्टीस पडतो, तो खरोखर अवर्णनीय आहे! तेथें नेहमीं हिरवेंगार गवताचा गालीचाच जणूं काय पसरला आहे, असा पहाणारांस भास होतो. याशिवाय नुकताच पावसाळा सरून जाऊन डोंगरांवरून लहान मोठे स्वच्छ उदकाचे शेंकडों ओहोळ वहात चालले आहेत, व मधून मधून सूर्याचे किरण प्रचंड काळ्या पांढऱ्या ढगांतून परावर्तन पावून ते पर्वतशिखरांस अनेक चित्रविचित्र रंगांनीं सुशोभित करीत आहेत, अशावेळीं तेथील वनश्रीची जी विलक्षण शोभा व जें अपरंपार वैभव दृष्टीस पडतें, तें वर्णन करण्यास खरोखरच कठीण आहे!

कोंकण प्रांताचें साधारण स्वरूप जरी वर लिहिल्याप्रमाणें अगदीं डोंगराळ व खरखीत असें आहे, तरी त्यांतील कांहीं भाग फारच सुपीक आहेत. घांटमाथा ह्मणून मावळ, खोरीं व मुरीं हीं मिळून जो प्रदेश सह्याद्रि पर्वताचे माथ्यावर आहे, व जो जुन्नरपासून कोल्हापूर-

पर्यंत पसरला आहे, तो भरवस्तीचा मुलूख असून, तेथील दैन्यांतील सर्व जमीन लागवडीस आणलेली आहे. येथील लोक ज्यांस मावळे असें ह्मणतात, ते स्वभावानें अगदीं साधेभोळे व कोणाचे वाटेस न जाणारे असें आहेत; तथापि ते मोठे राकट व कष्टाळू असे आहेत. शिवाजी महाराजांनीं प्रथम प्रथम स्वराज्याचा जयध्वज जो उभारिला, तो याच लोकांचे पराक्रमावर होय!

सह्याद्रिपर्वत चढून देशाकडे येऊं लागलें असतां मध्यें जे घांट लागतात, त्यांमध्यें व त्यांचे आसपासचे डोंगरांवर जे किल्ले आहेत, ते महाराष्ट्राचा इतिहास समजून घेणारांनीं अवश्य पाहण्यासारखे आहेत. त्यांची रचना साधारणपणें अशी आहे कीं, डोंगरांचे शिखरांवर मोठमोठे उंच नीट असे खडपे असून, त्यांच्या बहुतेक बाजू आयत्याच तुटलेल्या असल्यामुळें, त्यांवर चढून जाणें अगोदरच मुष्किलीचें असतें. मग त्यांतून कोठें कोठें कड्याची बाजू सखल असेल, तर तिजवर थोडासा तट चढवून दिल्यानें किंवा कोठें ती एकसारखी तुटलेली नसेल तेथें ती तासून काढल्यानें, हे किल्ले केवळ दुर्गमच झाले आहेत. या बहुतेक किल्ल्यांतून फारच उत्कृष्ट पाण्याचे जिवंत झरे आहेत व कित्येकांत लहान मोठीं तळीं बांधलीं असून, त्यांत पावसाळ्यांत पाण्याचा सांठा करण्याची सोय आहे. या घांटामधील प्रदेशांत चातुर्मासांत पावसाची एकसारखी झड असल्यामुळें, तेथील ओढ्यांस अक्षयीं पूर येत असतो. ह्मणून येथें पर्जन्यकाळांत फौजफांटा नेण्याआणण्याची बिलकुल सोय नसते. शिवाय अति पर्जन्यवृष्टीमुळें येथील हवा अशी कांहीं सर्द व हुडहुडी भरविणारी थंडगार असते कीं, ज्यांस ती नवीनच आहे, त्यांस ती मुळींच सोसत नाहीं. सारांश, सह्याद्रीचे घांटांचा हा प्रदेश युद्धाचे कामास जसा मजबूत आहे, तसा सर्व जगांत दुसरा भाग क्वचितच असेल!*

हे घांट चढून वर आलें असतां, आपणांस देश लागतो, व येथून

* ग्रांटडफ.

आपण जों जों पूर्वेकडे जावें, तसतसा भोंवतालचा प्रदेश आपणांस अधिकाधिक सपाटीचा लागतो ; तथापि या देशांत पूर्वपश्चिम अशा मुख्य चार डोंगरांच्या ओळी आहेत—एक चांदुरची, दुसरी अहंमद-नगरची, तिसरी पुण्याचे दक्षिणची व चवथी सातान्याजवळील महादेवाची.

महाराष्ट्र देशाचें साधारण स्वरूप ह्मटलें ह्मणजे डोंगराळच खरें, व त्यामुळें हिंदुस्थानांतील इतर प्रदेशांपेक्षां येथील जमीन, तिची लागवड व तिचें उत्पन्न हीं अर्थातच कमी आहेत; तथापि येथील दऱ्यांतून पाण्याची विपुलता असून तें चांगलें सतेज आहे. तसेंच येथील हवे-सारखी निरोगी हवा सर्व हिंदुस्थानांत दुसरे कोठेंही सांपडत नाहीं*. महाराष्ट्रांतील मुख्य मुख्य नद्या ह्मटल्या ह्मणजे नर्मदा, तापी, गोदा-वरी, भीमा व कृष्णा ह्या होत. या नद्यांचे आजूबाजूस जी जमीन आहे ती फार सुपीक आहे, व तेथील पिकांपेक्षां अधिक सुरेख पिकें या देशांत दुसरे कोठेंही सांपडायाचीं नाहींत. तसेंच गोदावरी, भीमा, नीरा व मान या नद्यांचे टापूंत जी घोड्यांची जात आहे, ती साधारण लहानसुरी आहे; परंतु राकटपणा, चपळाई व मोठाल्या मजला मारण्याचा दम, या गोष्टींमध्यें सर्व दक्षिण हिंदुस्थानांत तिची बरोबरी करणारी दुसरी जात नाहीं. महाराष्ट्रीय लोकांचे इतिहासाशीं या गोष्टीचा किती संबंध आहे, हें पुढील प्रकरणावरून कळून येईल.

येणेंप्रमाणें महाराष्ट्राचा अभ्युदय होण्यास ज्या कित्येक गोष्टी कारणीभूत झाल्या, त्यांपैकीं पहिली जी देशस्वरूप, तिजविषयीं झालें. आतां आपण, दुसरी गोष्ट—कीं यावेळीं महाराष्ट्रीय लोकांचे धर्म-समजुतींत बदल झाल्यानें, त्यांचे मनास जी नवीन तरतरी प्राप्त झाली—तिजविषयीं दोन शब्द लिहूं. सर्व देशांतून धर्मशुध्यर्थ कमीजास्त काळानें जशा उलाढाली झाल्या आहेत, तशाच आपल्या या भरतखं-डांतही वेळोवेळीं झाल्या आहेत. फार प्राचीनकाळापासून या देशांत जो वैदिक धर्म चालू होता, त्यांतील कर्ममार्गाचें विशेष प्राधान्य कालां-

* ग्रांटडफ.

तरानें कित्येक लोकांस रुचेनासें होऊन, ख्रिस्ती शकाचेपूर्वी सातवे शतकांत, गौतमबुद्ध यानें नवीनच धर्मपंथ स्थापन केला. त्यांत त्यानें कर्ममार्ग गौण ठरवून, ज्ञानमार्गास विशेष महत्व दिलें. या नवीन धर्माची चळवळ या देशांत बरेच दिवस चालली होती; ती इतकी कीं, एके वेळीं हाच धर्म या सर्व देशभर पसरेल, असा अदमास दिसूं लागला होता; परंतु कांहीं काळानें या बौद्ध धर्मासही ग्लानि प्राप्त होऊन, श्रीमत् शंकराचार्य यांचे परिश्रमानें, पुन: वैदिक धर्माची प्रवृत्ति मोठे जारीनें सुरू झाली. या उलटापालटींत वैदिक धर्माचें पूर्वीचें नांव राहिलें खरें; परंतु बौद्ध धर्माचे संसर्गानें, त्यांत त्या धर्माचीं बरींच तत्वें मुकाट्यानें घुसलीं, व तीं अर्थातच सामान्य लोकांचे लक्षांत आलीं नाहींत! यांत मुख्य दोन गोष्टी सांगण्यासारख्या आहेत. एक, प्राचीन वैदिक धर्मांत मुक्तीचीं मुख्य साधनें ह्मणून सांगितलेलीं जीं यज्ञयागादि कर्में, तीं बहुतेक लोप पावलीं, व त्यांचे जागीं मोठमोठे भजनांचे मेळे व प्रेमळ हरिकीर्तनें हीं आलीं. दुसरी गोष्ट ही कीं, ब्राह्मणांची पूर्वीची योग्यता कमी करण्याचा यत्न कोठें फारसा झाला नाहीं; परंतु बाकी इतर खालच्या ज्ञातींची योग्यता मुकाट्यानें वाढत चालली. प्राचीन वैदिक धर्मांतील मुख्य मत—कीं शूद्रांस मुक्ति मिळायाची ती कदाचित् ब्राह्मणसेवेचे मार्गानेंच मिळायाची; एरवीं त्यास ती स्वतंत्र रीतीनें कधीं मिळायाची नाहीं—यांत पुष्कळ अंतर पडलें. बौद्ध धर्माची प्रवृत्ति मध्यंतरीं पडून, तिचे योगानें ज्ञातिभेद बराच शिथिल झाल्यामुळें, शूद्रांस आतां स्वतंत्र मुक्तिमार्ग प्राप्त झाला. तो अर्थातच प्राचीन वैदिक धर्मांतील कर्ममार्ग किंवा बौद्धधर्मांतील ज्ञानमार्ग हे नव्हत, तर तो निराळाच भक्तिमार्ग ह्मणून त्यांचे आटोक्यांत आला. या नवीन पंथांत केवळ शूद्रांचाच समावेश होऊं लागला असें नाहीं, तर त्यांत हळू हळू एके बाजूनें अति उच्च मानिलेल्या अशा ब्राह्मण ज्ञातीचा व दुसरे बाजूनें महार, मांग अशा अति नीच ज्ञातींचाही प्रवेश होऊं लागला! या पंथांत, ज्यास भागवत धर्मपंथ ह्मणतात, त्यांत रामदासासारखे ब्राह्मण, तुकारामबोवासारखे वैश्य, ज्ञानदेवासारखे संन्यासीपुत्र, नामदेवासारखे शिंपी, चोख्यामेळ्यासारखे अंत्यज असे निरनिराळ्या

जातींचे लोक प्रमुख होऊं लागले. इतकेंच नव्हे, तर या पंथांत जनाबाई, कर्माबाई, मिराबाई अशा कित्येक स्त्रियाही उत्तम साधु होऊन पुढें सरसावल्या!!

या नवीन धार्मिक चळवळीस, महाराष्ट्र भाषेचा झालेला नूतन उदय व तींत प्राचीन पौराणिक व इतर ग्रंथांचे आधारें होऊं लागलेले जे विवेकसिंधु, ज्ञानेश्वरी, एकनाथी भागवत, मुक्तेश्वरी, भारत इत्यादि ग्रंथ, यांनींही फारच साहाय्य केलें. यूरोपखंडांत ज्याप्रमाणें लातिन व ग्रीक भाषांत मूळ असलेल्या बायबल वगैरे धर्मग्रंथांचीं इंग्रजी वगैरे जनभाषामध्यें भाषांतरें होऊं लागतांच, लवकरच, तेथील सोळावे शतकांतील प्रसिद्ध धर्मक्रांतीस प्रारंभ झाला, त्याप्रमाणें महाराष्ट्र भाषेंत सामान्य लोकांस समजण्याजोगे एकनाथी भागवत वगैरे ग्रंथ होऊं लागल्यामुळें, महाराष्ट्रांतील धार्मिक चळवळीस बाराच जोर आला. सामान्य लोकांस ठळक ठळक व मनोरंजक अशा पौराणिक कथा वरील ग्रंथांचे योगानें साधारणपणें माहित होत चालल्या, व तेणेंकरून महाराष्ट्रीय लोकांचे मनांस धार्मिक अशी नवीनच तरतरी येत चालली. नवीन मोठमोठे साधु व त्यांचे भजनांचे मेळे बनत चालले व मोठ्या योग्यतेस चढणारा प्रत्येक मनुष्य आपणास कोणी तरी साधुपुरुष आपला गुरु करूं लागला व तो जें सांगेल, त्याजवर विश्वास ठेवून त्याप्रमाणें चालूं लागला.

परंतु वर सांगितलेल्या या नवीन ग्रंथ रचनेपेक्षांही महाराष्ट्रीय लोकांचीं व त्यांतूनही विशेषत: त्यांतील नवीन बांड तरुण वीर मंडळींचीं मनें उचंबळविण्यास कारणभूत अशी महाराष्ट्र भाषेंतील नवीनच पोवाड्यांची पद्यरचना ही झाली. ही कविता अगदीं सोपी, रसाळ व चित्तवृत्ति सहज उचंबळविणारी असल्यामुळें, ती सामान्य लोकांस विशेष आवडत असेल यांत संशय नाहीं. शिवाय हिचा विषयही वीररसमय असल्यामुळें, जाधव, मोहिते, शिरके वगैरे मराठे वीरांनीं केलेल्या अद्भुत पराक्रमांचे पोवाडे, भाटांचे किंवा गोंधळ्यांचे

किंवा मराठ्यांचे तोंडून ऐकून, तिचे योगानें महाराष्ट्र वीरांचें बाहु-स्फुरण सहजच होत असेल, हें सांगणें नको!

येथवर महाराष्ट्रीय लोकांचे अभ्युदयासंबंधाच्या तीन कारणभूत गोष्टी—देशस्वरूप, भागवत धर्म, व महाराष्ट्र भाषेंतील पौराणिक ग्रंथ व पोवाडे—यांविषयीं झालें. आतां, शेवटली व या तिहींहून अधिक महत्वाची गोष्ट—तत्कालीन राजकीय स्थिति—तिजविषयीं लिहितों. मागील चार भागांतून ही स्थिति महाराष्ट्राचे निरनिराळ्या भागांत कमी जास्त मानानें कसकशी पालटत गेली, हें मधून मधून सांगण्याचा आह्मीं यत्न केलाच आहे. त्यावरून ती वाचकांचे लक्षांत साधारणपणें येऊन चुकली असेल; तथापि ती सर्व एकेठिकाणीं जुळून येथें दाखविली असतां विशेष बरें होईल, असें समजून ती येथें तशी देतों. प्रथम महाराष्ट्राचा स्वातंत्र्यनाश होण्यापूर्वी, रामदेव जाधव याचेवेळीं राजाचा अंमल विशेष जोरदार नसून, निरनिराळे जहागीरदार, वतनदार, देशमुख, देशपांडे वगैरे लोक त्याचा अधिकार जुमानीत नसावेत, अशी स्थिति असावीशी वाटतें. यामुळें मुसलमान लोकांच्या स्वाऱ्या जेव्हां महाराष्ट्रावर होऊं लागल्या, तेव्हां तेथील लोकांचे हातून शत्रूंस ह्मणण्यासारखा अडथळा झाला नाहीं व अखेर त्यांचे स्वातंत्र्याचा नाश होऊन, त्यांचा सर्व देश प्रथम दिल्लीचे बादशहांचे, नंतर ब्राह्मणी सुलतानांचे व त्यामागून आदिलशहा, निजामशहा, कुतुबशहा वगैरे छोटेखानी दक्षणी मुसलमान शहांचे, ताब्यांत गेला. प्रथम रामदेवाचा पुत्र शंकरदेव याचा पाडाव होऊन, सर्व महाराष्ट्रदेश दिल्लीचे बादशाहीस जोडिला गेला असतां, तिचे प्रचंड शक्तीपुढें महाराष्ट्रीय लोकांचें कांहींच न चालून, त्यांचे स्वातंत्र्य परत मिळविण्याचे सर्व यत्न निष्फळ झाले. दिल्लीचे बादशाहीचे मोठमोठ्या सैन्यांशीं मैदानांत सामना करण्याचें धैर्य उत्तरोत्तर अर्थातच त्यांस होईना; तथापि ते अगदीं हतवीर्य होऊन बसले असें नाहीं. विशेषत: सह्याद्रि पर्वताचे प्रदेशांतील लोकांनीं, बिकट जाग्यांतून आश्रय धरून व त्या प्रांतांतील डोंगरी किल्ले स्वाधीन ठेऊन, बादशाही सैन्यांवर लहान

मोठ्या टोळ्यांनिशीं एकाएकीं हल्ले करावेत; त्यांस दाणावैरण वगैरे मिळूं देऊं नये; तसेंच ते तीं कोठें गोळा करून नेत असले, तर त्यांजवर वरचेवर छापे घालून, तीं त्यांनीं लुटून न्यावीं, असा त्यांस या लोकांनीं अतोनात त्रास द्यावा. अशा रीतीनें कोंकणप्रांत व सह्याद्रीचा घांटप्रदेश हे बादशाही फौजांकडून पूर्णपणें कधीं जिंकले गेले नाहींत, व ते जिंकून घेण्याची अडचण मुसलमान बादशहांस कळून आल्यामुळें, कोंकणांतील किल्लेदार वगैरे लोकांनीं आपणांस कांहीं करभार देण्याचें कबूल केलें ह्मणजे, तेवढ्यावरच बादशहा स्वस्थ रहात असत, व हे प्रांत पूर्ण सर करण्याचे खटपटीस ते पडत नसत. अशी या प्रांतांची स्थिति असल्यामुळें, दिल्लीचे बादशाहींत कांहीं घोटाळा उत्पन्न झाला कीं, या प्रांतांतील लोकांनीं धामधूम करण्यास कधीं राहूं नये. दिल्लीचा बादशहा महमंद तघलघ याचेवेळीं, जाफरखान यानें ज्यावेळीं बंड उत्पन्न करून ब्राह्मणीराज्य स्थापन झालें, त्यावेळीं महाराष्ट्रीय लोकांनीं अर्थातच जाफरखान यास मदत केली व त्यानेंही स्वतंत्र राज्यस्थापन केल्यावर, त्यांपैकीं कित्येकांस मनसबी, जहागिरी वगैरे देऊन, त्यांस आपलेसें करून घेतलें. यापुढें ब्राह्मणी सुलतानांची जसजशी शक्ति वाढत चालली, तसतशी त्यांनींही कोंकणप्रांत वगैरे सर करण्याची खटपट चालविली. अल्लाउद्दीनशहा ( दुसरा ) याचे-वेळीं मलिक उत् तुजार यानें कोंकणप्रांतांत उतरून, तेथील शिरके वगैरे स्वतंत्र मराठे राजांस जिंकून घेऊन, त्यांस बाटविण्याचा यत्न केला असतां, तुजार याचा कसा नाश झाला हें मागें सांगितलेंच आहे. यापुढें ब्राह्मणीराज्य लयास जाण्याचे सुमारास, या मराठे पाळेगारांस कांहींकांस जिंकून व कांहींकांस आपलेसें करून घेऊन, महंमद गवान यानें, त्यांजकडेसच त्यांचे डोंगरी किल्ले व त्याखालचे प्रांत ठेऊन, त्यांस कसें स्वस्थ ठेविलें होतें हेंही दुसरे भागांत सांगण्यांत आलें आहे. त्यानंतर ब्राह्मणी राज्य मोडून जाऊन, आदिलशाही, निजामशाही वगैरे निरनिराळीं स्वतंत्र लहान मोठीं राज्यें स्थापन झालीं असतां, तुर्क, आरब, इराणी वगैरे परदेशी शिपायांची संख्या फौजांतून कमी होत जाऊन, त्यांचे जागीं मराठे लोकांचा भरणा उत्तरोत्तर कसा होत

चालला व हे लोक जसजसे सरकारचीं कामें चांगले रीतीनें बजावीत चालले, तसतसें त्यांचें माहात्म्यही कसें वाढत चाललें, ह्याविषयीं तिसरे व चवथे भागांत निरूपण केलेंच आहे. येणेंप्रमाणें महाराष्ट्रीय लोकांचा यावेळीं उदय होण्यास चवथें व सर्वांत मोठें कारण जी—तत्कालिन राजकीय स्थिति—तिजविषयीं झालें.

४ आतां, सर्व महाराष्ट्रीय लोकांमध्यें राष्ट्रोन्नति करण्यास प्रथम जी मराठेज्ञाति पुढें सरसावली, तिचे उत्पत्तीविषयीं लोकांचा असा समज आहे कीं, ही दक्षिणेंतील कुणबी स्त्रिया व उत्तरेकडील रजपूत लोक यांचे संयोगापासून उत्पन्न झाली असावी. हिचे अंगीं उभय ज्ञातींचे बरेच चांगले गुण मिश्र होऊन आले आहेत. मराठे लोक हे रजपूत लोकांप्रमाणें शूर, धाडसी व हिंमतवान असे आहेत; परंतु त्यांप्रमाणें ते आळशी किंवा अविचारी असे नाहींत. रजपूत हा आपले वास्तविक हिताहिताकडे लक्ष न देतां, पुष्कळदां केवळ मानापमानाच्या लहानशा गोष्टीकरितां आपला प्राणही खर्ची घालण्यास मागें पुढें पहात नाहीं; परंतु मराठा हा अधिक व्यावहारिक शहाणा असून, तो आपला मतलब बहुतेक जाऊं देत नाहीं. तो शूद्रांप्रमाणें मोठा मेहनती, राकट व नेटानें काम करणारा असा असतो. त्याचे शरीराचा बांधा रजपूताप्रमाणें सुरेख किंवा डौलदार असा नसतो खरा, परंतु तो मजबूत व बळकट गांठीचा असा असतो. त्याची रहाणी अगदीं साधी, अशी असते. त्याचा पोषाख ह्मटला ह्मणजे डोक्यास लहानसें पागोटें, अंगांत कुडतें, कंबरेस काचा, व पायांत चोळणा येवढाच कायतो असायाचा. त्याचें खाणें ह्मटलें ह्मणजे ज्वारी किंवा बाजरीची भाकर व त्याच्याशीं तोंडीं लावण्यास कांदा हेंच असतें. तिसऱ्या जिनसाची ह्मणून त्यास गरज लागत नाहीं!

मराठे शिपायाचें लढण्याचें मुख्य हत्यार ह्मटलें ह्मणजे, त्याचा भाला होय. याशिवाय त्याचेपाशीं त्याची तलवार व कधीं कधीं बंदूकही असे. त्याचा घोडा दिसण्यांत सुरेख असा नसायाचा; परंतु त्याचेप्रमाणेंच तो मोठा राकट, मजबूत व चपळ असा असे व त्याचे बळावरच त्याच्या मोठमोठ्या मजला होत असत.

येणेंप्रमाणें मराठा शिपायांत शौर्य, धाडस, धिमेपणा, साधी रहाणी, वगैरे वर लिहिलेले बरेच गुण असत ; परंतु त्यांतील मोठा दुर्गुण ह्मटला ह्मणजे, त्यांचे अंगची विलक्षण चुरस होय. वतनासंबंधानें भाऊबंदीचे तंटे हे मराठे ज्ञातींत नेहमीं एकसारखे चालायाचे ; व त्यांत कोणी ह्मणजे हार खाईल, असें बहुधा व्हावयाचें नाहीं. या बाबींत, त्यांचें सर्व शहाणपण व समजूत हीं अगदीं नाहींशीं व्हावयाचीं. तिचे-पायीं, मागें पहिले भागांत सांगितल्याप्रमाणें, स्वराज्य जरी गेलें तरी बेहेत्तर आहे, अशी त्यांची कांहीं विलक्षण आकस असे ! या त्यांचे वेडेपणाचे स्वभावाचा ब्राह्मणी सुलतान व त्यांचे मागून त्यांचे अधि-कारास चढलेले असे जे आदिलशहा व निजामशहा, हे चांगला फायदा करून घेत. त्यांनीं मोठे युक्तिप्रयुक्तीनें, मराठे लोकांत वतनासंबंधानें भाऊबंदकीचे तंटे लावून देऊन, त्यांमध्यें नेहमीं दुही ठेवावी व तेणें-करून त्यांनीं आपला पगडा दोन्हीही पक्षांवर चालवावा.

येणेंप्रमाणें * आदिलशाही व निजामशाही यांस उतरती कळा लागून, त्यांस पूर्ण पादाक्रांत करण्याचा, दिल्लीचे मोंगल बादशहांचा प्रचंड यत्न चालू झाला असतां, ज्या विलक्षण मराठे ज्ञातीनें, या दोघाही युद्ध करणारे परदेशस्थ व परधर्मी लोकांस जिंकून टाकून, प्रथम महा-राष्ट्रास पारतंत्र्यापासून सोडवून त्यास स्वराज्य, स्वधर्म, स्वदेश-विद्या, स्वदेश-कलाकौशल्य यांचा सुखसोहाळा दाखविला, त्यांची साधारण स्थिति होती. या लोकांचीं कांहीं सरदार घराणीं, कित्येक पिढ्यांपासून आदिलशाहीचे व कांहीं निजामशाहीचे आश्रयास होतीं. त्यांपैकीं प्रथम आदिलशाहीचे पदरीं जीं घराणीं होतीं, त्यांतील मुख्य मुख्य येथें सांगतों.

९ विजापूरचा पहिला सुलतान युसफ आदिलशहा, याचे कारकीर्दींत मोरे या नांवाचा कोणी १२,००० मराठे शिबंदीचा सरदार होता. यानें नीरा व वारणा या नद्यांमधील मुलुख सुलतानास सर करून देऊन, तेथील शिरके, गुजर, महाडीक वगैरे जुने मराठे पाळेगारांचा

* एलफिन्स्टन् व ग्रांटडफ.

पुंडावा अगदीं मोडून टाकिला. या कामगिरीबद्दल त्यास सुलतानानें, चंद्रराव हा किताब देऊन, त्यास जावळी येथील जहागिरी दिली. पुढें त्याचा मुलगा यशवंतराव मोरे, यानेंही आदिलशाहीची चाकरी चांगले इमाने इतबारें बजावल्या कारणानें व विशेषत: बुऱ्हाण निजामशहाबरोबर युद्ध चाललें असतां, परिंड्याचे लढाईत, यशवंतरावानें चांगली कुमक केल्यावरून, त्यास त्याचा किताब व जहागीर हीं विजापूर सरकारांतून वंशपरंपरें मुकर झालीं. हीं त्याचे घराण्याकडे यापुढें सात पिढ्या चाललीं.

मोरे यांचे खालोखाल, विजापूरकरांचे पदरीं फलटण येथील जहागीरदार निंबाळकर हे होत. या घराण्यांत यावेळीं, व्यंकोजी नाईक, ज्यांचें विशेष प्रसिद्ध नांव जगपाळ असें होतें, तो मुख्य होता. याची बहीण दीपाबाई, ही मराठी राज्याचे स्थापनकर्ते जे **शिवाजी महाराज,** त्यांची आजी होय.

या दोन प्रमुख मराठे घराण्यांशिवाय, मान परगण्याचे देशमुख घाटगे, मसवारचे देशमुख माने, कापशी व मुधोळ येथील देशमुख घोरपडे, जतचे देशमुख डफळे व वाडीचे देशमुख सावंत अशीं आदिलशाहीचे पदरचीं मुख्य मुख्य मराठे सरदारांचीं घराणीं होतीं.

६ अहंमदनगरचे निजामशाहीचे पदरीं जीं मराठे सरदारांचीं घराणीं होतीं, त्यांत दोन विशेष प्रमुख होतीं—एक जाधवरावांचें व दुसरें भोसल्यांचें. पहिले घराण्यांत, मागें चौथे भागाचे शेवटीं शेवटीं सांगितलेला जो लुकजी जाधवराव, हा यावेळीं प्रमुख होता. तो प्राचीन देवगिरीचे जाधवांचे राजघराण्यांतील आहे, असा साधारण लोकांचा समज होता. त्याजकडे वऱ्हाडांतील सिंदखेडची देशमुखी असून, त्यास निजामशाही सरकारांतून १०,००० घोडेस्वारांची मनसब होती; परंतु कांहीं वेळानें, ह्मणजे १६२१ या सालीं, यानें मागें लिहिल्याप्रमाणें निजामशाहीचा पक्ष सोडून देऊन, तो मोंगलांचे पक्षास जाऊन मिळाला व त्याबद्दल त्यांजकडून त्यास २४ हजारांची मनसब व १५ हजार घोडेस्वारांचे पथक इनकें मिळालें. सारांश, या वेळचे सर्व मराठे

सरदारांमध्यें लुकजी जाधवराव याचे इतका बलाढ्य व वजनदार सरदार, दोन्ही आदिलशाही व निजामशाही यांमध्यें दुसरा नव्हता.

७ लुकजी जाधवराव याचे खालोखाल नांव घेण्याजोगा मोठा मराठा सरदार ह्मटला ह्मणजे, मालोजी भोसले हा होता. भोसले यांचें घराणें फार जुनें असून तें चांगलें प्रतिष्ठित असे. ते आपणांस उदेपूरचे राजघराण्यांतले ह्मणून ह्मणवीत असत; परंतु मध्यंतरीं त्यांस काळ प्रतिकूळ आल्यामुळें, ते दक्षिणेंत येऊन, बरींच वर्षें साधारण मध्यम स्थितींतच राहिले होते. मालोजीचा बाप बाबाजी भोसले याजकडे वेरूळ व त्याचे आसपासचे कांहीं गांवांची पाटीलकी होती. मालोजी हा, प्रथम लुकजी जाधवराव याचे पदरीं कांहीं दिवस बारगीर ह्मणून राहिला होता, व तेथें त्यानें आपले यजमानाची चांगली मर्जी संपादन केली. यानंतर जाधवराव याचे लक्षांत मालोजीची हुषारी व योग्यता हीं अधिकाधिक येत जाऊन, त्यानें १५७७ या सालीं, त्यास सुलतान मूर्तिजा निजामशहा (पहिला) यास भेटविलें, व त्याबद्दल मोठी शिफारस करून, त्यास त्यानें सरकारी सैन्यांत शिलेदारी देवविली. यापुढें मालोजी भोसले यानें आपली पागा वाढवून, तो सरकारच्या मोठमोठ्या कामगिऱ्या बजावूं लागला. यामुळें, त्याची दिवसानुदिवस अधिकाधिक योग्यता वाढत चालली. त्यास नुकतेंच मागें सांगितल्याप्रमाणें, व्यंकोजी निंबाळकर याची बहीण दीपाबाई ही दिली होती; परंतु त्यास तिजपासून बरेच दिवस संतति झाली नाहीं. शेवटीं, अहंमदनगर येथें शहा शरीफ ह्मणून कोणी पीर होता, त्यास नवस केल्यावरून, दीपाबाईस १५९४ या सालीं मुलगा झाला. त्याचें नांव, पीराचे नांवावरूनच, शहाजी असें ठेविलें. यानंतर दीपाबाईस पुढील सालीं आणखी एक दुसरा मुलगा झाला व त्याचेंही नांव शरफजी असें ठेविलें.

मालोजीचा वडील मुलगा शहाजी, हा लहानपणापासून फार सुरेख असून, तो दिसण्यांत मोठा चलाख व हुषार असा असे. सन १५९९ सालीं, हा पांच वर्षांचा असतां त्यास बरोबर घेऊन, मा-

लोजी हा जाधवराव याचे घरीं रंगपंचमीचे सणानिमित्त, त्याचे मानकरी व आप्त हे गोळा झाले होते, तेथें गेला. मालोजीवर जाधवरावाचा पहिल्यापासून मोठा लोभ असल्यामुळें व मुलगाही दिसण्यांत हुषार असल्यामुळें, जाधवरावानें त्यास ममतेनें बोलावून, आपले जवळ आपली तीन वर्षांची मुलगी बसली होती, तिचे शेजारीं बसविलें. जाधवरावाची मुलगी जिजा, हीही मोठी सुरेख होती. ह्या मुलांचें स्वरूप व समवयस्कता पाहून, जाधवरावास समाधान वाटून, तो लडिवाळपणानें आपले मुलीस ह्मणाला, " जिजाऊ, तुला हा नवरा हवा कां ? खरोखर हा जोडा चांगला शोभतो. " याचवेळीं तीं मुलेंही एकमेकांवर मौजेनें गुलाल फेंकूं लागलीं. यामुळें जमलेल्या मंडळीस त्याचें मोठें कौतुक वाटून, ते सर्व हसूं लागले; परंतु इतक्यांत, मालोजी हा मध्येंच उभा राहून जमलेल्या मंडळींकडे पाहून ह्मणाला, " पहा हो, जाधवराव हे आमचे आज व्याही झाले ! आतां हा निश्चय बदलणार नाहीं. " हें ऐकून कित्येकांनीं माना डोलविल्या, व बाकीचे लोक स्तब्ध राहिले. जाधवराव यास आश्चर्य वाटून तो कांहीं बोलला नाहीं; परंतु या चमत्कारिक प्रसंगानें एकंदर सभेचा विरस झाला.

हा प्रकार बरा झाला नाहीं असें जाधवराव यास वाटून, तो, ही सर्व गोष्ट थट्टेवर नेण्याचा आव घालूं लागला. त्यानें दुसरे दिवशीं मालोजी यांस जेवावयास बोलाविलें असतां, मालोजीनें उत्तर केलें कीं, " तुह्मीं काल ठरलेला शरीरसंबंध कबूल करीत असाल, तरच आह्मीं तुमचे घरीं जेवायास येऊं; नाहींतर नाहीं. " ही विलक्षण अट जाधवराव यास अर्थातच आवडली नाहीं ; परंतु त्याचे बायकोस तर ह्या गोष्टीचा फारच राग आला. जाधवराव मनसबदार यांचे श्रीमान् घराण्याशीं, मालोजी भोंसल्यासारख्या शिलेदारानें सोयरीक करूं पहाणें, ह्मणजे तिला त्याचें मोठेंच धाडस वाटूं लागलें ! परंतु या शरीरसंबंधापासून, जाधवरावासारखे छपन्न मनसबदार ज्याचे सेवेंत नित्य तत्पर राहतील, जो गोब्राह्मणांस यवनांचे त्रासापासून सोडवून, या भरतभूमीवर पुनः हिंदुपद स्थापन करील, व ज्याचे मागें त्याचे पुत्रपौत्र

व पंतप्रधान व दुसरे सरदार हे दिल्लीचें बादशाहीचें तक्त फोडून त्याचा नाश करतील, असा शककर्ता पराक्रमी राजा निपजणार आहे, हें त्या बिचारे देशमुखिणीस काय ठाऊक ?

जाधवरावाशीं सोयरीक जोडण्याविषयीं मालोजीस तर आतां चुरसच लागली. आपणापाशीं पैसा नसल्यामुळें ती आपणांस घडत नाहीं, या गोष्टीनें तो फार उद्विग्न झाला. असें सांगतात कीं, तो एके दिवशीं संध्याकाळीं वेरूळ येथील आपले बगिचांत एकटाच सचिंत असा बसला असतां, त्यास त्याचे कुलस्वामिनी देवीचा साक्षात्कार झाला. ती दृश्य होऊन त्यास ह्मणाली, ‘ तूं एवढी चिंता कसली करतोस ? तुझा इष्ट हेतु सफळ होईल. बागेंत जें मोठें वारूळ आहे, त्याचे खालीं अपरंपार द्रव्य संचय आहे, तो तूं घे. या शरीर संबंधापासून तुझे कुळांत एक अवतारी पुरुष उत्पन्न होईल. तो, गो-ब्राह्मणांस छळणारे व देवळांचा उच्छेद करणारे यवनांचें पारिपत्य करून, महाराष्ट्रांत हिंदुपद पुनः स्थापन करील. हा शककर्ता राजा होऊन, त्याचें राज्य त्यामागें सत्तावीस पिढ्यांपर्यंत चालेल. ’ असें बोलून देवी अंतर्धान पावली. मग दुसरे दिवशीं साक्षात्काराची प्रतीति पाहण्याकरितां, मालोजीनें बगिच्यांतील वारूळ खणून काढलें; तों तेथें त्यास खरोखरच अतोनात द्रव्य सांपडलें. मग त्यानें तें तेथून काढून, चांभारगोंदें येथें शेषेनाईक पुंडे ह्मणून कोणी सावकार होता, त्याचे जवळ नेऊन ठेविलें. या द्रव्याचा विनियोग मालोजीनें धर्मादायाकडे फार केला. श्रीशिखर महादेव याची यात्रा मोठी भरत असे; परंतु तेथें पाण्याचा तोटा असल्यामुळें यात्रेकरूंस फार त्रास होई. याकरितां मालोजीनें तेथें एक मोठा तलाव बांधिला. त्याचप्रमाणें वेरूळ येथील कृष्णेश्वराचे देवालयाचा त्यानें जीर्णोद्धार केला. शिवाय जागोजाग लहान मोठीं देवळें, विहिरी व तळीं बांधून व इतर धर्मादाय कृत्यें करून त्यानें मोठा लौकिक संपादन केला. इकडे जाधवरावाचे सोयरिकीबद्दल त्याची खटपट चालू होतीच. त्यानें आपला मेहुणा व्यंकोजी ( जगपाळ ) नाईक निंबाळकर यास मध्यस्थ घालून, निजाम-

शाहींत पांच हजार घोडेस्वारांची मनसब व मालोजी राजे हा नवीन किताब हीं संपादन केलीं. त्याचप्रमाणें शिवनेर व चाकण हे दोन किल्ले व त्यांचे भोंवतालचा मुलुख ह्यांचें काम त्यानें मिळवून, पुणें व सुपें हे परगणे, जहागीर, ह्मणून आपणांस करवून घेतले. येणेंप्रमाणें मालोजी हा मनसबदार होऊन, त्याची प्रतिष्ठा मोठी वाढत चालली असतां, जाधवरावाच्यानें त्याची सोयरीक आतां सहसा नाकबूल करवेना. शिवाय, सुलतानानेंही या कामांत अंमळ मन घातल्यामुळें, हा शरीरसंबंध जुळून येऊन, अखेर सन १६०४ या सालीं शहाजी व जाधवरावाची कन्या जिजाबाई ह्यांचें लग्न मोठ्या थाटानें झालें. या समारंभास निजामशाहींतील मोठमोठे उमराव आले असून, खुद्द सुलतान हाही आला होता.

८ या वेळीं निजामशाहीचे तक्तावर मूर्तिजा निजामशहा ( दुसरा ) हा असून, त्याचे वजीरीचें काम मलिकंबर हा चालवीत होता. त्यानें तें काम, चौथे भागांत सांगितल्याप्रमाणें, मोठे हिंमतीनें, हुषारीनें व शहाणपणानें चालवून, तो अखेर १६२६ या सालीं मरण पावला. त्याचे मागें, त्याचा वडील मुलगा फत्तेखान हा वजीरीचें काम पाहूं लागला; परंतु त्याचे अंगीं, त्याचे बापाचे गुण किंवा हुषारी हीं बिलकुल नव्हतीं. तसेंच मूर्तिजा निजामशहा हाही आतां मोठा झाला असल्यामुळें, तोही वजीराचे मुठींत राहण्यासारखा राहिला नव्हता. तेव्हां थोडेच काळांत, सुलतान व फत्तेखान यांचा बेबनाव होऊन, सुलतानानें तकरीबखान या नांवाचे एका हलक्या सरदाराची मदत घेऊन, वजीरास कैदेंत टाकिलें, व तकरीबखान यास त्यानें वजीरीचें काम दिलें ( १६२९ ). या कृत्यामुळें, सुलतानाचा एकदम चोहोंकडे धाक बसला, व लुकजी जाधवराव, जो यापूर्वी मोंगलांस जाऊन मिळाला होता, तोही सुलतानास शरण येऊन, त्याशीं पुनः रदबदलीचें बोलणें लावूं लागला; परंतु सुलतानानें त्यास युक्तीनें दौलताबादेचे किल्ल्यांत बोलावून आणून, त्यास विश्वासघातानें ठार केलें.* जाधवरावाची

* लुकजी जाधवराव यांची छत्री सिंदखेड येथें लोक अद्यापपावेतों दाख-

ही बातमी, त्याची बायको व भाऊ जगदेवराव यांस कळतांच, ते आपली फौज घेऊन सिंदखेडास पळून गेले. यानंतर ते पुनः मोंगलांस जाऊन मिळाले, व त्याजकडून जगदेवराव यास ५००० घोडेस्वारांचें पथक व त्यांची वडिलोपार्जित जाहगीर हीं मिळालीं. यापुढें जाधव हे मोंगलांस सोडून कधीं दुसरे कोणा पक्षास मिळाले नाहींत.

इकडे दक्षिणेंत मलिकंबर याचे मृत्युनंतर, वर लिहिल्याप्रमाणें उलटापालट झाली असतां, उत्तर हिंदुस्थानांतही याचवेळीं दुसरी घडामोड झाली. दिल्लीचा बादशहा जहांगीर हा, १६२७ या सालीं मरण पावून, त्याचे गादीवर त्याचा मुलगा शहाजहान, ज्यानें बापाविरुद्ध बंड केलें असून त्यांत त्याचा पराजय झाला व या नंतर तो कांहीं वर्षेंपर्यंत बंडखोर ह्मणून रानावनांतून पळत होता ह्मणून मागें सांगण्यांत आलें आहे, तो बसला. यावेळीं दक्षिणेंतील सुभ्यावर, मागें चौथे भागांत सांगितलेला खान जहान लोदी हाच होता. हा सुभेदार आफगाण जातीचा असून, तो मूळ हिंदुस्थानांत शिपाईगिरीकरितां आला होता; परंतु तो थोडेच वेळांत आपले शौर्यानें व एकंदर हुषारीनें वाढत जाऊन, शेवटीं दक्षिणेचे सुभेदारीवर चढला होता. त्याचे मनांत, मोंगल व दक्षिणेंतील सुलतान यांचें युद्ध चालल्यामुळें, त्या प्रांतांत जो घोंटाळा चालला होता, त्यांतच एकादी संधि साधून, आपण एकादें स्वतंत्र राज्य स्थापन करावें, असा विचार बरेच दिवस घोळत होता; या गोष्टीचा संशय शहाजहान बादशहा यास होताच; यामुळें त्यानें लोदी यास दक्षिणेचे सुभ्यावरून काढून माळव्याचे सुभ्यावर बदललें व त्यास प्रथम आपले भेटीस आग्र्यास येण्यास बोलाविलें. तेथें लोदी हा आला असतां शहाजहान बादशहानें त्याचा मोठा मान केला; परंतु खानास मध्यंतरीं कांहीं दग्याचा संशय येऊन, तो एकाएकीं आग्रा येथून निघून २००० निवडक शिपायांनिशीं

वितात. ही लहान इमारत सुमारें ७०० चौ० फुटांची आहे. लोकांचे अज्ञानामुळें तिचें विशेषसें महत्व कोणास वाटत नाहीं; व ती साधारण वाईट स्थितींतच आहे.

आपले दक्षिणेचे सुभ्याकडे चालता झाला. ( १६२८ ). बादशहानें ताबडतोब त्याचे मागें फौजा रवाना केल्या; परंतु लोदी हा मोठ्या झपाट्यानें कूच करून बुंदेलखंड, गोंडवन वगैरे बिकट मुलूक ओलांडून दक्षिणेंत निजामशाहींत बागलण प्रांतांत उतरला. त्यानें मूर्तिजा निजामशहा याची मदत मागितली व ती, तो, नवीन वजीर तकरीब-खान याचे सल्लयानें ताबडतोब देण्यास तयार झाला. त्याचप्रमाणें निजामशाहींतील कित्येक देशमुख व जहागीरदार ह्यांनींही लोदीस साहाय्य केल्यामुळें, बादशाही फौजांचा पराजय होऊन, लोदी हा त्यांचे हातीं लागेना. शहाजहान बादशहास, खानाचे अंगची हुशारी माहीत असल्यामुळें, तो दक्षिणेतील निजामशहा, आदिलशहा व कुतुबशहा वगैरे सुलतानांस मिळाला असतां, आपले बादशहास किती त्रास होणारा आहे हें तो जाणून होता. ह्मणून तो लागलाच दक्षिणेचे मोहिमेवर स्वतः च बरोबर मोठें सैन्य घेऊन निघाला. त्यास, या प्रांतांतील लोकांचा लढण्याचा प्रकार माहीत होता; ह्मणून त्यानें आपल्या सैन्याच्या तीन निरनिराळ्या टोळ्या करून, त्या त्यानें तीन दिशांनीं फेंकिल्या; आणि जे ह्मणून लोदी यास आश्रय देतील, यांचा मी समूळ नाश करीन, अशी त्यानें सर्वांस दहशत घातली.

बादशहाचे सैन्याच्या तीन टोळ्यांपैकीं एकीवर अझीमखान ह्मणून एक हुषार सरदार होता. त्यानें, लोदी यास जागोजाग हुसकावून लावून, त्यास निजामशाहींतून दक्षिणेकडे पळवून लाविलें. निजामशा-हींतील ज्या जहागीरदार, देशमुख वगैरे लोकांनीं लोदी याचा पक्ष स्वीकारला होता, त्यांमध्यें शहाजीराजे हे प्रमुख होते. त्यांनीं खान जहान लोदी हा निघून गेला व मोंगलांचे बादशाही फौजांपुढें आपला निभाव लागणार नाहीं असें मनांत आणून, ते अझीमखानाचे मार्फत शहाजहान बादशहास शरण गेले. बादशहानें त्यांस आपले पदरीं चाकरीस ठेऊन घेऊन, त्यांजकडे ६००० ची मनसब व ५००० घोडेस्वारांचें पथक हीं सांगितलीं व त्यांची वडिलो-पार्जित जहागीर व तिजशिवाय आणखी कांहीं प्रांत हे त्यांस दिले.

त्यांचा चुलतभाऊ केळोजी व त्यांचे आणखी दुसरे कांहीं आप्त यांस, त्यांचेप्रमाणेंच बादशहाकडून लहान लहान मनसबा मिळाल्या (१६२९).

खान जहान लोदी हा जो निजामशाहींतून पळून गेला, तो विजापूरचे दरबारीं आपणांस आश्रय मिळेल तर पहावा, ह्मणून तिकडे गेला. या वेळीं विजापूरचा सुलतान इब्राहीम आदिलशहा ( दुसरा ), हा नुकताच ( १६२७ ) या वर्षी मरण पावून, त्याचे गादीवर त्याचा मुलगा महंमद आदिलशहा हा आला होता. या नवीन शहास, खान जहान लोदी यानें, निजामशहा व तुह्मी एकत्र होऊन मोंगलाशीं सामना द्यावा, व त्यांस दक्षिणेंत येऊं देऊं नये, ह्मणून पुष्कळ उत्तेजन देऊन सांगितलें; परंतु महंमदशहा हा स्वभावतः लढाऊ नसून, त्याची विशेष भक्ति, नवीन सुंदर इमारती वगैरे ख्यालीखुशालीचे गोष्टींकडे असल्यामुळें, त्यानें लोदी याचें बोलणें मनावर घेतलें नाहीं. यामुळें, लोदी हा पुनः एकवार दौलताबादेस मूर्तिजा निजामशहाकडे परत आला. लोदी हा निजामशाहींत आल्याची बातमी अझिमखानास लागतांच, तो तसाच दौलताबादेकडे फौज घेऊन मोठ्या त्वरेनें आला. त्याची आणि निजामशाही फौजांची त्या शहराजवळच मोठी लढाई झाली, व तींत निजामशहाचा पूर्ण पराभव झाला. यानंतर लोदी हा निराश होऊन, बुंदेलखंडांत तेथील रानटी व कडवे जातींत आपणांस आश्रय मिळेल तर पहावा, या आशेनें तिकडे गेला; परंतु तेथेंही बादशाही फौजांनीं त्याचा अगदीं निकट पाठलाग केल्यामुळें, व बुंदेली लोकही त्याजवर उलटल्यामुळें, तो जिवावर उदार होऊन, मागें लागलेल्या बादशाही फौजेवर तुटून पडला. त्याचे शिपाई आतां अगदीं थोडे उरले होते; तथापि तेवढ्यांतही मोठी मर्दुमकी करून, हा अफगाण सरदार शेवटीं पुष्कळ ज़खमा लागून युद्धांत पडला ( १६३० ).

खान जहान लोदी, हा बुंदेलखंडांत निघून गेल्यावर, इकडे अजिमखान यानें निजामशाहींतील प्रांतांचे प्रांत जिंकण्याचा झपाटा लाविला. त्याजपुढें निजामशाही सैन्याचें कांहीं चालेना. मोंगलांनीं

दौलताबाद घेतल्यानंतर, ते धारूरचे किल्ल्यावर चाल करून गेले, व त्यांनीं तोही काबीज केला. असा प्रकार चालत असतां, आपलें सर्व राज्य आतां जातें असें मूर्तिजा निजामशहास भय पडून व या सर्व अनर्थास कारण, आपला नवीन वजीर तकरीबखान हा होय, असें त्यास वाटून, त्यानें फत्तेखान यास कैदेंतून काढून आणून त्यास पुनः आपला वजीर केलें, आणि विजापूरचे सुलतानास कांहीं मुलूख देऊं करून, तो आपणांस या कठीण प्रसंगीं मदत करील तर पहावें, या खटपटीस तो लागला ( १६३१ ).

विजापूरचा सुलतान महंमद आदिलशहा, हा मागें सांगितल्याप्रमाणें आपले बापाचे मागून १६२७ या सालीं गादीवर बसला. या वेळीं त्याचें वय सुमारें १६ वर्षांचें होतें. त्याचें राज्य चांगलें भरभराटींत असून, त्याचे खजीन्यांत पैसा पुष्कळ शिल्लक होता. त्याजपाशीं ८०,००० लढाऊ घोडा असून, सुमारें दोन लक्ष पायदळ होतें असें ह्मणतात; तथापि हा सुलतान स्वभावतः लढाऊ नसून, त्यास आपण होऊन लढाई उकरून काढण्याची इच्छा नसे. त्याची विशेष आवड मोठमोठ्या सुंदर मशीदी वगैरे बांधण्याकडेसच असे; तथापि मोंगल निजामशाहीचा मुलूख झपाट्यानें काबीज करीत चालले हें पाहून, त्याचेही मनांत त्यांजविषयीं भीति उत्पन्न होऊं लागली. या पूर्वीच, खान जहान लोदी याचा सल्ला ऐकून त्या गोष्टीस आपण इलाज केला नाहीं, याचें त्यास आतां वाईट वाटूं लागलें. अहंमदनगर व विजापूर येथील सुलतानांचें पहिल्यापासून वैर असेच; परंतु मलिकंबर यानें निजामशाहीचा सर्व कारभार आटोपून, निजामशहास नांवाचा मात्र सुलतान करून टाकिल्यापासून, विजापूरचे सुलतानांस निजामशाहीचें विशेषच वैषम्य वाटूं लागलें होतें. यामुळें, मलिकंबराबरोबर मोंगलांचें युद्ध चाललें असतां, महंमद आदिलशहा याचा बाप इब्राहीम आदिलशहा, याणें मोंगलांबरोबर असें बोलणें ठरविलें होतें कीं, ' जर मला निजामशाहीचे कोंकणांतील प्रांत व सोलापूरचा किल्ला, व माझे राज्यास लागून असलेले धारूर वगैरे पांच किल्ले दिले, तर मी तुह्मांस निजा-

मशाहीचा मुलूख जिंकण्यास मदत करीन.' इब्राहीम आदिलशहाचे मागें, त्याचा मुलगा महंमदशहा यासही ही गोष्ट मान्य होती; परंतु मोंगलांचा एकाएकीं उत्कर्ष होऊं लागलेला पाहून, त्यांस तो वरील कामांत आतां मनापासून मदत करीना. त्यानें आपला सरदार रेंदुल्लाखान यास सैन्य बरोबर देऊन पाठविलें मात्र; परंतु तो आंतून मूर्तिजा निजामशहा याजबरोबर मोंगलाविरुद्ध गुप्त मसलत करूं लागला; परंतु दोघा सुलतानांचा कांहीं बेत ठरण्याचे अगोदरच, अजीमखान व रेंदुल्लाखान यांचे सैन्यांचा कांहीं कारणावरून तंटा होऊन, त्यांची लढाई जुंपली व तींत विजापूरकरांचा पराजय झाला.

इकडे मूर्तिजा निशामशहा आणि त्याचा वजीर फत्तेखान यांचा पुनः कज्जा होऊन, फत्तेखान यानें सुलतानास व त्याचे पक्षाचे सर्व सरदारांस ठार मारिलें; आणि मोंगल बादशहास असें सांगून पाठविलें कीं, "तुमचेसाठीं मी हें सर्व कृत्य केलें, आणि तुमची आज्ञा होईपर्यंत, तूर्त मी मयत सुलतानाचा मुलगा गादीवर बसविला आहे." बादशहानें हा अर्ज ऐकून घेऊन, फत्तेखानास सांगितलें कीं, 'निजामशाहीचे दौलतींतील उत्तम उत्तम हत्ती व जवाहीर हे जर तुह्मीं आमचे स्वाधीन कराल, तर अद्याप जिंकावयाचा राहिलेला मुलूख आह्मी लहान सुलतानाकडे ठेऊं!! फत्तेखानानें हें बोलणें कबूल केल्यावरून, त्याचा बादशहानें मोठा मान केला, व त्यास कांहीं मुलूख जहागीर ह्मणून दिला; परंतु या मुलुखांतच, बादशहानें शहाजीराजे यांस यापूर्वीं जो मुलूख जहागीर ह्मणून दिला होता, त्यांतील कांहीं भाग होता.

येणेंप्रमाणें निजामशाहीची एकाएकी निराळ्याच तऱ्हेनें वासलात लागल्या कारणानें महंमद आदिलशहास मोंगलांशीं एकट्यानेंच सामना देणें भाग आलें. अजीमखान हा एकदम विजापूरचे राज्यांत शिरून, चोहोंकडे मुलूख उजाड करीत खुद्द विजापुरावर चालून गेला व त्यानें राजधानीस वेढा दिला; परंतु विजापूरकरांनीं मोंगललोकांस दाणागोटा पाहाच न देऊन व हरप्रकारें लढाई लांबवून, त्यांस परत जाणें भाग पाडिलें. इतक्यांत अजीमखान यास बादशहानें परत

बोलाविल्यामुळें, तो मोहबतखान, ज्यास बादशहानें खान जहान लोदी याचे मागें दक्षिणेचा सुभेदार नेमिलें होतें, त्याचे स्वाधीन सैन्य करून आपण निघून गेला. १६३१.

९ पुढील सालीं मोहबतखान हा विजापुरावर पुनः स्वारी करण्याचे तयारींत होता. इतक्यांत निजामशाहीचे नवीन जिंकलेले मुलुखांत, नवीनच एक राजकारण उपस्थित झालें. बादशहानें आपणांस पूर्वी जहागीर ह्मणून दिलेल्या मुलुखांपैकींच, कांहीं भाग त्यानें फत्तेखानास काढून दिला. या गोष्टीनें शहाजीराजे यांस फार वैषम्य वाटलें, व ते आतां, मुरार जगदेव ह्मणून कोणी विजापूरचे सुलतानाचा कारभारी होता, त्याचे मार्फत सुलतानाशीं कारस्थान करूं लागले. शहाजीराजे यांनीं आदिलशहास असा निरोप पाठविला कीं, 'फत्तेखान याचे ताब्यांत दौलताबादचा किल्ला आहे, त्याचा चांगला बंदोबस्त नसून, खानावर त्याची सरदार मंडळी नाइराज आहे; याकरितां विजापुराहून सैन्याची जर कुमक होईल, तर हा जबरदस्त किल्ला आह्मीं तुमचे स्वाधीन करून देऊं.' हें बोलणें महंमद आदिलशहा याचे विचारास येऊन, त्यानें ताबडतोब आपलें सैन्य दौलताबादेकडे रवाना केलें.

विजापुराकडील ही खबर फत्तेखानास समजतांच, त्यानें मोंगलांचा सुभेदार मोहबतखान यास सांगून पाठविलें कीं, 'तुह्मीं जर यावेळीं आपलें सैन्य पाठवून मला मदत कराल, तर दौलताबादेचा किल्ला मी तुमचेच स्वाधीन करून देतों.' यावरून मोहबतखान यानें आपली फौज दौलताबादेकडे रवाना केली; परंतु ती किल्ल्याजवळ येऊन पोहोंचण्याचे पूर्वींच, विजापूरचें सैन्य तेथें अगोदर दाखल झालें होतें. यामुळें, दोहों सैन्यांचें लागलींच मोठें तुंबळ युद्ध जुंपलें. शहाजी राजे यांनीं या वेळीं मोठा पराक्रम केला; परंतु अखेर मोंगलांचीच सरशी होऊन, विजापूरचे सैन्यास मागें हटावें लागलें; तें तेथून निघून दौलताबादेपासून आठ कोसांवर जाऊन तळ देऊन राहिलें.

आपला हेतु फसला हें पाहून, विजापूरकरांनीं फत्तेखानाशींच आतां बोलणें सुरू केलें कीं, 'किल्ला मोंगल लोकांस देऊन टाकण्यांत तुझा

फार तोटा आहे; त्यापेक्षां तूं शहाजीराजे यांस जहागीर देऊन, आपले पक्षास घेशील व किल्ला मोंगलांचे हातीं लागूं देणार नाहींस, तर आम्हीं तुला मदत करूं व आपला पहिला करार कायम ठेवूं.' फत्तेखानास हें नवीन बोलणें रुचलें. शेवटीं, त्याचा आणि विजापूरकरांचा संकेत ठरून, दोघांनीं एकदम दोहोंकडून मोंगलांवर तोफांचा भडिमार सुरूं केला. फत्तेखानाचे ह्या बेइमानानें, मोहबतखानास त्याचा फारच राग आला. त्यानें एकीकडे विजापूरचे सैन्यास तोंड देऊन दुसरीकडे मोठा कडेकोट बंदोबस्त करून, किल्ल्यांत सैन्याची कुमक किंवा दारूगोळा किंवा दाणागोटा कांहींएक पोहोचूं दिलें नाहीं, आणि किल्ल्यावर जबरदस्त मारा चालविला. किल्ल्यांतील लोकही फार हुषारीनें लढले; परंतु त्यांची अन्नसामग्री सरल्यामुळें, त्यांस ५८ दिवसांचे अखेरीस, किल्ला मोंगलांचे स्वाधीन करून द्यावा लागला. फत्तेखानाचे हातांतून सर्व अधिकार निघून जाऊन, त्यास फक्त कांहीं उक्ता पैसा द्यावा व या उपर त्यानें मोंगल बादशहाचे पदरीं रहावें असें ठरलें. त्यानें, जो राजपुत्र गादीवर बसविला होता, त्यास ग्वाल्हेर येथील किल्ल्यांत, त्याचे मागील बहादूर निजामशहाप्रमाणें कैदेंत टाकून दिलें, व आतां निजामशाही खास बुडाली असें मोंगलांस वाटलें. (१६३३).

नवीन जिंकलेले प्रांतांत बंदोबस्ताकरितां, आपले हाताखालचा सरदार खान दौरान यास ठेऊन, मोहबतखान हा स्वतः विजापूरचे सैन्याचा पाठलाग करीत चालला. दोहों सैन्यांच्या कित्येक चांगल्या चकमकी झाल्या; परंतु निकराची लढाई कोठेंच झाली नाहीं. शेवटीं, १६३३ सालचे अखेरीस, शहाजहान बादशहानें आपला दुसरा मुलगा सुलतान सुजा यास दक्षिणेचा सुभेदार ह्मणून पाठवून देऊन, मोहबतखान यास त्याचे हाताखालीं दुय्यम केलें. या नवीन व्यवस्थेनें मोहबतखानाचें मन उतरून जाऊन, त्याचे हांतून विजापूरकरांबरोबरीची लढाई पूर्वींप्रमाणें विशेष जोरानें चालेना.

येणेंप्रमाणें विजापूरचे सैन्याबरोबर लढाई चालत असतां, इकडे शहाजीराजे यांची खोड मोडण्याकरितां, मोंगलांनीं त्र्यंबकेश्वर येथील किल्लेदार ह्मालदार खान याशीं भेद करून, त्यानें शहाजीराजे यांचें कुटुंब जिजाबाई व त्यांचीं मुलेंमाणसें जीं या वेळीं वैजापुरास रहात होतीं, तीं पकडावीं अशी मसलत चालविली. त्याप्रमाणें खान यानें अकस्मात छापा घालून आपली मसलत फत्ते केली; परंतु या पूर्वींच मोंगलांचे पक्षास जाऊन मिळालेले जगदेव जाधवराव व दुसरे कांहीं मराठे सरदार यांनीं मध्यें पडून मोंगलांस असें सांगितलें कीं, " शहाजी राजे व जिजाबाई यांचा बेबनाव होऊन, राजे यांनीं तीन वर्षांमागेंच मोहिते यांचे घराण्यांतील मुलगी तुकाबाई ही दुसरी बायको केली आहे; पहिलीचें ते नांवदेखील घेत नाहींत; तेव्हां आतां तिची अप्रतिष्ठा होणें ह्मणजे ती केवळ आमचे कुळाचीच अप्रतिष्ठा होय." या रदबदलीवरून, जिजाबाईसाहेब व त्यांचीं मुलें माणसें यांची सुटका झाली. ( १६३३ ).

१० यापुढें मोहबतखान हा दुय्यम झाल्याकारणानें, त्याचें लढाईंत किंवा कारभारांत विशेष चित्त राहिलें नाहीं, ह्मणून वर नुकतें सांगितलेंच आहे. यामुळें निजामशाहीचे नवीन जिंकलेले मुलखांत, पुनः बंदोबस्त नाहींसा झाला. ही संधि पाहून शहाजीराजे यांनीं, निजामशाहींत पुनः जीव घालण्याचा यत्न सुरू केला. वास्तविक यावेळीं, दौलताबादेचा किल्ला हा मोंगलांचे स्वाधीन होऊन जाऊन, फत्तेखान हा अधिकारावरून दूर झाला होता व त्यानें गादीवर बसविलेला लहान सुलतान ह्यास, ग्वाल्हेरचे किल्ल्यांत कैदेंत ठेविलें होतें; व तेणेंकरून राजे यांनीं हातीं घेतलेला उद्योग पुष्कळच कठीण होता हें सांगणें नकोच; तथापि त्यांनीं मोठे हिंमतीनें निजामशाही घराण्यांतील आणखी एका राजपुत्रास हातीं धरून, त्यास तक्तावर बसविलें; जागोजागचे किल्ले काबीज करून, भोंवतालचा मुलूख लहान सुलतानाचे नांवें आपल्या ताब्यांत आणिला; आणि कांहीं ब्राह्मण अंमलदार नेमून त्यांनीं तेथें आपला अंमल चालू केला. शहाजी राजे यांजवर

मोंगलांच्या कांहीं लहान सहान फौजा चालून आल्या; परंतु त्यांचें त्यांनीं कांहीं चालूं दिलें नाहीं. शेवटीं याच सुमारास सुलतान सूजा व मोहबतखान यांनीं विजापुरकराकडे असलेल्या परिंड्या किल्ल्यास वेढा दिला असतां तो त्यांस मिळाला तर नाहींच; परंतु त्यांस आपलें सैन्य ब्र्हाणपुरापर्यंत मागें हटवून न्यावें लागलें. (१६३४).

मोंगलांचे या अपजयामुळें तर शहाजी राजे यांस विशेषच जोर आला. त्यांनीं चोहोंकडून सैन्य गोळा करून, निजामशाहीकडे पूर्वीपासून कोंकणपट्टीचा जो भाग होता तो, व देशावर उत्तरेस चांदुरचे डोंगरांपासून, दक्षिणेस नीरानदीपर्यंत अहंमदनगरापावेतों सर्व मुलूख पुनः सर केला; परंतु शहाजहान बादशहास या गोष्टीचें वर्तमान न पोहोंचल्यामुळें ह्मणा, किंवा त्यापासून आपले राज्यास विशेष धोका आहे असें त्यास त्यावेळीं वाटलें नाहीं ह्मणून ह्मणा, कसेंही असो; त्यानें सुलतान सुजा व मोहबतखान यांस परत बोलावून, दक्षिणप्रांताची तूर्त एवढीच व्यवस्था केली कीं, खानदेश, जालना व व्र्हाड हे प्रांत एकत्र करून त्यांजवर खान दौरान यास नेमिलें व निजामशाहींतील नवीनच जो मुलूख मिळाला, त्याजवर खान जुमान यास नेमिलें, व त्या दोघांवर सुलतान सुजा याचे जागीं औरंगजेब यास नेमिलें. बादशहानें खान दौरान व खान जुमान यांस, निजामशाहीचा पश्चिमेकडील जो भाग अजून जिंकावयाचा राहिला होता तो जिंकून, शहाजीराजे यांनीं चालविला पुंडावा बंद करावा, असा हुकूम दिला होता; परंतु ही नवीन व्यवस्था होईपर्यंत शहाजीराजे यांनीं पुष्कळच मोठें सैन्य जमविलें असून, त्यांस आदिलशहाचा दिवाण मुरारपंत व त्याचा सेनापती रेंदुल्ला यांची मदत असल्यामुळें, ते मोंगलांचे फौजांस मुळींच दाद देईनात.

११ शहाजहान बादशहानें जेव्हां ही खबर ऐकिली, तेव्हां त्यास पराकाष्ठेचा राग आला. त्यास असें वाटलें कीं, निजामशाही ही बुडाली असून व तिचे राजघराण्यांतील राजपुत्र ग्वाल्हेरीस कैदेंत ठेविले असून, तिचा मुलूख अद्याप आपले ताब्यांत येत नाहीं, याचा

अर्थ काय? ह्मणून त्यानें पुनः एक मोठी फौज गोळा करून दक्षिणेकडील मोहिमीची तयारी चालविली, व तिजवर स्वतः जाण्याचा विचार केला. त्यानें प्रथम विजापूरचा सुलतान महंमद आदिलशहा याजकडे वकील पाठवून त्यास कळविलें कीं, ' तुह्मीं निजामशाहींतील जे किल्ले घेतले आहेत, ते सर्व, त्यांचे तोफा, दारूगोळा वगैरे सरंजामासुद्धां आह्मांकडे परत करावे. तसेंच परिंड्याहून तुह्मीं ' मुलुख मैदान' ह्मणून जी प्रचंड तोफ विजापुरास नेली आहे, ती आमची आह्मांस परत आणून द्यावी; परंतु विशेषेंकरून शहाजी व दुसरे मराठे सरदार जे निजामशाही मुलुखांत दंगा करीत आहेत, त्यांस कोणते प्रकारें मदत करूं नये. याप्रमाणें जर तुह्मीं कराल, तर तुह्मांस सोलापूरचा किल्ला व त्याचे भोंवतालील मुलूख व निजामशाहीकडे होती ती कोंकणपट्टी हें सर्व आह्मीं तुह्मांस देऊं; परंतु असें न कराल, तर तुमचे राज्यावर आह्मीं एकदम स्वारी करून तुमचा फडशा पाडूं.' विजापूरचा सुलतान, बादशहाचे या लालचीनें किंवा त्याचे धमकावणीनें मुळींच वळला नाहीं. त्यानें शहाजी राजे यांस आपली कुमक तशीच चालू ठेविली. ( १६३४ ).

आदिलशहा हा आपलें बोलणें मान्य करीत नाहीं हें पाहून, शहाजहान बादशहा हा आपलें प्रचंड सैन्य घेऊन, दक्षिणेकडे निघाला. त्याचे सैन्यांत घोडाच ४८,००० निवडक असा होता. त्यानें आपल्या सैन्याच्या चार टोळ्या करून, त्यांपैकीं दोन शहाजीराजे यांजवर, व दोन विजापूरचे सुलतानावर अशा रवाना केल्या; तथापि गोंवळकोंड्यांचा सुलतान हाही या युद्धांत शिरेल असा बादशहास संशय वाटून, त्यानें दुसऱ्या दोन टोळ्यांपैकीं एकीस नांदेड येथेंच कांहीं दिवस मुक्काम करून रहाण्यास हुकूम केला; परंतु गोंवळकोंड्याचे सुलतानानें आपले करभाराची मागील फेड तावडतोब करून दिल्यावरून मोंगलांचे या टोळीचा सरदार खान दौरान हा पूर्वी ठरल्याप्रमाणें विजापुराकडे जाण्यास निघाला ( १६३५ ). त्यानें खानदेशापासून कूच करून बेदर व कलबूर्गा इकडील बाजू रोंखली. त्यानें

वाटेनें जातांना कित्येक किल्ले काबीज केले व भोंवतालील देश लुटून व जाळून फस्त केला. विजापूरचे सैन्यानें, या टोळीवर वरचेवर छापे घालून व दाणागोटा त्यांस पोंहोंचूं नये अशी तजवीज करून, त्यांस पुष्कळ अडथळा केला; परंतु खान दौरान यानें त्यास न जुमानतां, त्यानें विजापुरावर चाल केली; तथापि शत्रूंचा हा रोख पाहून, महंमद आदिलशहानें शहराबाहेरील तलाव, विहिरी वगैरे कोरडीं करून टाकून, व दहा दहा कोस सभोंवतालील मुलुखांतील दाणावैरण सर्व नाहींशी करून टाकिल्यामुळें, खान दौरान यानें विजापूर शहरावर हल्ला करण्याचा बेत सोडून देऊन, त्यानें आदिलशाहीचा मुलूखच उध्वस्त करण्याचा सपाटा लाविला. त्याचप्रमाणें मोंगल सैन्याची दुसरी टोळी—जिची विजापुरावर जाण्यासाठींच पहिल्यापासून योजना होती—तिचा सरदार सय्यद खान जहान, हाही विजापूरचे राज्यांत लुटालूट करीत व गांवचे गांव जाळीत चालला.

इकडे शहाजीराजे यांचेवर ज्या दोन टोळ्या पाठविल्या होत्या, त्यांपैकीं शाहीस्तेखान याचे टोळीनें चांदूर, नाशीक इकडील वीस, पंचवीस किल्ले घेतल्यानंतर, शाहीस्तेखान यानें कांहीं फौज दुसरे आणखी किल्ले घेण्यासाठीं ठेऊन देऊन, आपणही विजापूरचे राज्यांत शिरला, व नलदुर्गचा किल्ला घेऊन, तो सोलापूर व बेदर यांमधील मुलूख व्यापून बसला.

शहाजीराजे यांचेवर जी दुसरी टोळी पाठविली होती, तिजवर खान जुमान हा मुख्य होता. तो खुद्द राजे यांजवरच चालून आला असतां, त्याजबरोबर राजे यांनीं बराच वेळ झुंज खेळली; परंतु त्यांस शेवटीं अहंमदनगर, चांभारगोंदें व बारामती हे निजामशाहीचे मुलूख सोडून, विजापूरचे राज्यांत नीरा नदीचे पलीकडे मिरज, कोल्हापूर-कडे पळून जावें लागलें. त्यांचे पाठीशीं खान जुमान हा होताच; परंतु विजापूरचे राज्यांत आल्यावर, तेथील सैन्याचे मदतीनें मोंगलांवर वरचेवर हल्ले करून व त्यांचा रोख चुकवून, राजे यांनीं खान जुमानास बरेंच जेरीस आणिलें. यावरून बादशहानें राजे यांचा व्यर्थ

पाठलाग न करितां, विजापूरचे राज्यांतील कोल्हापूर, मिरज, रायबाग हाच मुलूख उध्वस्त करण्यास खान जुमानास हुकूम केला.

विजापूरचा सरदार रंदुल्लाखान, हा मोंगलांबरोबर चांगला लढला. त्यानें सय्यद खान जहान याचे टोळीवर वरचेवर हल्ले करून, व दुसऱ्या अन्य तऱ्हेनें जेरीस आणून, त्यास अखेर खान दौरान याचे टोळीशीं मिळून राहण्यास भाग पाडलें; तथापि मोंगलांचे सैन्यांनीं लुटालूट करून व गांवचे गांव जाळून टाकून बराच मुलूख उध्वस्त केल्यामुळें, विजापूरचा सुलतान महंमद आदिलशहा ह्यानें, अखेर निरुपाय होऊन मोंगलांशीं तहाचें बोलणें लाविलें, व या गोष्टीस बादशहाही कबूल झाला ( १६३८ ).

ह्या तहांतील मुख्य कलमें जीं ठरलीं तीं येणेंप्रमाणें :—

' परिंडा व सोलापूर येथील किल्ले व त्यांचे सभोंवतालील मुलूख हीं महंमद आदिलशहा यास द्यावीं; सोलापूराचे पूर्वेस नळदुर्ग, कल्याण व बेदर हेही प्रांत त्याजकडेसच असावेत; परंतु या प्रांतांबद्दल विजापूरचे सुलतानानें मोंगल बादशहास दरसाल वीस लक्ष होन द्यावे. शहाजी भोसले हा जर आपले ताब्यांतील सर्व किल्ले, त्यांचे तोफा वगैरे सरंजामासुद्धां स्वाधीन करून देईल, तर बादशहा त्यास माफी देऊन उपद्रव करणार नाहीं; परंतु तो जर तसें न करील, तर विजापूरचे सुलतानानें त्यास आपले राज्यांतून काढून देऊन, तो दिल्लीचे बादशहाप्रमाणें आपलाही दुस्मान आहे असें समजलें पाहिजे. '

वरील तहानें विजापूरचे राज्याची मर्यादा बरीच वाढली. कोंकणांत कल्याण प्रांत मिळाल्यानें, वसईचे नदीपर्यंत व पूर्वेस भीमा आणि नीरा यांमधील मुलूख प्राप्त झाल्यानें, चाकणापर्यंत महंमद आदिलशहाचा अंमल पसरला. परिंडा येथील प्रचंड तोफही त्याजकडेसच राहिली.

येणेंप्रमाणें विजापूरचे सुलतानाशीं तह झाल्यामुळें, शहाजीराजे यांचा जोर अगदीं तुटला. त्यांचे मागें खान जुमान हा पुनः लागून, त्यानें त्यांचे कोंकणांतील बहुतेक सर्व किल्ले घेतले. यामुळें निरुपाय

होऊन, राजे हे शहाजहान बादशहास शरण गेले; आणि आह्मांस पुनः आपले चाकरीस घ्यावें ह्मणून त्यांनीं अर्ज केला; परंतु बादशहानें उत्तर केलें कीं, 'आह्मीं आपले पदरीं तुह्मांस ठेवूं इच्छित नाहीं; तथापि तुह्मांस वाटेल तर, तुह्मीं विजापूरचे सुलतानाचे पदरीं रहावें. यावरून शहाजीराजे यांनीं, ज्या निजामशाहीचे तर्फेनें त्यांनीं मोंगलाबरोबर सुमारें सतरा वर्षें निकरानें युद्ध चालविलें होतें, ती यापुढें कायम राखण्याची व्यर्थ आशा सोडून देऊन, ते अखेर विजापूरचे सुलतानाचे पदरीं येऊन राहिले. ज्या लहान सुलतानास, राजे यांनीं हातीं धरिलें होतें, त्यास बादशहानें मागील दोन सुलतानांप्रमाणें ग्वाल्हेरचे किल्ल्यांत नेऊन टाकिलें, आणि येथें निजामशाहीचा अखेर शेवट झाला. (१६३७).

महंमद आदिलशहा यानें, शहाजी राजे यांजकडे त्यांची निजामशाहींतील पुणें व सुपें ह्या प्रांताची जहागिरी तशीच चालू ठेविली, आणि त्यांस प्रथम भीमा व नीरा या नद्यांमधील मुलूख जो त्यास निजामशाहीपैकीं नवीन प्राप्त झाला होता, त्याची व्यवस्था लावण्याकरितां, मुरार जगदेव त्याचे मदतीस दिलें. राजे यांस त्या प्रांताची चांगली माहिती असल्याकारणानें, त्यांनीं हें काम मोठें उत्कृष्ट रीतीनें बजाविलें. त्याबद्दल मुरारपंतांनीं त्यांचे हुशारीबद्दल मोठी तारीफ करून, सुलतानाजवळ त्यांची फार शिफारस केली. यामुळें, या सुमारास महंमद आदिलशहा हा कर्नाटक प्रांतांत जें सैन्य पाठवीत होता, त्याजवर त्यानें रँदुल्लाखान याचे हाताखालीं, राजे यांस दुय्यम ह्मणून नेमून पाठविलें. ही मोहीमही राजे यांनीं उत्तम रीतीनें फत्ते केली; त्यावरून सुलतान हा संतुष्ट होऊन, त्यानें त्यांस कर्नाटकांत, कोल्हार, बंगरूळ, बाराकोटा, बाळापूर, शिरकट ह्या प्रांतांची जहागीर व कऱ्हाड प्रांतांतील बावीस गांवांची देशमुखी हीं दिलीं. यापुढें राजे हे विजापूरचे सुलतानाचीच इमानानें चाकरी करून स्वस्थ राहिले.

येथें शहाजीराजे यांचे आयुष्यांतील मोठे मर्दुमकीचा व विशेष उन्नत असा भाग संपला. त्यांनीं मलिकंबर याचेबरोबर १६२० या

सालीं मोंगलांशीं लढाई खेळून, तींत प्रथम जें नांव मिळविलें, तेव्हां-पासून सुमारें वीस वर्षेंपर्यंत, निजामशाहीचे तर्फेनें त्या लोकांबरोबर मोठे निकरानें झुंज देत राहून, अखेर निजामशहाचा नाश झाल्यावर ते निरुपाय होऊन, दक्षिणेंतील दुसरे शाहीचे पदरीं रहावयास गेले. हा त्यांचा वीस वर्षांचा इतिहास, शिवाजी महाराजांचे जनकास पूर्ण शोभण्यासारखा आहे. ज्याप्रमाणें शिकंदर बादशहाचे पराक्रमास, त्याचा बाप मासिडोनियाचा राजा फिलीप, याचे सर्व जन्माचा खटाटोप उपयोगीं पडला, त्याचप्रमाणें महाराष्ट्र हिंदु पातशाहीचे स्थापन कर्ते जे शिवाजी महाराज, त्यांस त्यांचे वडील शहाजीराजे यांचा पूर्व-वयांतील मोंगलांबरोबरचा वर सांगितलेला निकराचा सामना पूर्ण प्रोत्साहक होऊन, त्यांचे हातून यापुढें महाराष्ट्रांत जी मोठी राज्य-क्रांति घडून आली, तिचा तो आरंभच झाला असें ह्मणण्यास हरकत नाहीं.

---

# भाग ६.

## शिवाजी महाराज — त्यांचा जन्म व त्यांचे पहिले पहिले पराक्रम.

१ शहाजी राजे यांची गृहस्थिति. २ शिवाजी महाराजांचा जन्म. त्यांस राजे यांचेपासून बरीच वर्षे दूर रहाणें भाग पडतें. त्यामुळें त्यांस त्यांची आई जिजाबाईसाहेब यांचाच विशेष लळा लागतो. त्या आपले उपदेशानें बालमहाराजांचे महत्वाकांक्षेच अंकूर वृद्धिंगत करितात. ३ शहाजी राजे व शिवाजी महाराज यांची अखेर भेट झाली असतां, त्या वेळची महाराजांचे मनाची स्थिति, ती राजे यास पसंत पडत नाहीं. ते महाराजांस बोध करितात ; परंतु तो त्यांचे मनांत उतरत नाहीं. त्यांचेविषयींची एक चमत्कारिक आख्यायिका. ४ शहाजीराजे हे सुलतानाचे हुकूमावरून आपली धाकटी बायको, तुकाबाईसाहेब यांस बरोबर घेऊन कर्नाटकांतील बंदोबस्ताकारितां जातात, व शिवाजी महाराज व त्यांची आई जिजाबाई साहेब यांस पुण्यास दादोजी कोंडदेव यांचेपाशीं ठेवितात. शहाजीराजे हे तंजावर येथेंच आपलें ठाणें कायमचें करून तेथेंच आपला खटला वाढवितात. शिवाजी महाराज हे कांहीं विशेष योग्यतेस चढतील याविषयीं राजे यांची नाउमेद होते. ५ शिवाजी महाराज यांस दादोजी कोंडदेव यांचें शिक्षण. दादोजींचा राजे यांचे जहागिरीचा कारभार. त्यांची वसुलाची पद्धति. ६ शिवाजी महाराज हे वयांत येत चालले असें पाहून, दादोजी हे त्यांस जमाबंदी, न्यायमनसुबा वगैरे कामें शिकविण्यास यत्न करितात ; परंतु महाराजांचें मन त्या कामांकडे विशेषसें लागत नाहीं. त्यांचे मनाची धांव हिंदुपद बादशाही स्थापन करण्याचे महदुद्योगाकडे जाऊन, ते दादोजींचे हाताखालील तरुण बांड कारकून व शिपाई मंडळी यांचीं मनें आपल्या अचाट उद्योगाकडे ओढूं लागतात. यामुळें दादोजींस मोठी काळजी उत्पन्न होते. महाराजांचें मन त्यांनीं आरंभिलेल्या कृत्यापासून परतावें, ह्मणून दादोजी महाराजांस उपदेश करितात. ७ परंतु महाराजांचे मनांत तो भरत नाहीं. ते आपला उद्योग तसाच दादोजींस न कळे असा चालवितात. त्यांचा मावळे लोकांचा विशेष परिचय होतो. तानाजी मालुसरे, येसाजी कंक व

वाजी फसलकर वगैरे ज्वान देशमुख मंडळी महाराजांस अनुकूळ होतात. ८ या वेळची आदिलशाहीची स्थिति. शिवाजी महाराज तोरणा किल्ला घेऊन राजगड किल्ला बांधण्यास सुरुवात करितात. या गोष्टींचा पुकारा महंमद आदिलशहाचे कानावर जातो. तो शहाजी राजे यांस पुत्राचे आगळिकीबद्दल लिहितो. राजे त्याबद्दल दादोजी कोंडदेव यांस रागावून पत्र लिहितात. दादोजीचे मनाची स्थिति. तो काळजीनें झिजून मृत्यु पावतो. त्याचें मरणसमयीं शिवाजी महाराजांशीं झालेलें भाषण. ९ दादोजीचे मरणानंतर शिवाजी महाराज पुण्याकडील जहागिरीचा कारभार आपण स्वतःच पहातात. कोंडणा व पुरंदर हे किल्ले महाराज युक्तीनें हस्तगत करून घेतात. कल्याण प्रांतांतून सरकारी खजीना विजापुरास जात असतां, महाराज त्याजवर छापा घालून तो लुटून नेतात. ते दुसरे पुष्कळ किल्ले काबीज करितात. १० शिवाजी महाराजांचा कारभारी आबाजी सोनदेव हा कल्याण प्रांताचे सुभेदारावर हल्ला करून त्यास कैद करितो, व त्याचा सर्व प्रांत जिंकतो. महाराज त्यास त्या प्रांतावर सुभेदार नेमितात. महाराजांची परस्त्रीअभिलाषाविषयीं परांङ्मुखतेसंबंधाची आख्यायिका. कल्याण प्रांतांत शिवाजी महाराज आपली नवीन राज्यव्यवस्था सुरू करितात. ११ महाराजांचा हा उद्योग बंद पाडावा, म्हणून विजापूरचा सुलतान शहाजीराजे यांस कपटानें कैद करून विजापुरास आणितो. राजे यांस आदिलशहा देहांतशासनाची धमकी देतो. राजे यांस कैदेंतून सोडविण्यासाठीं शिवाजी महाराज हे दिल्लीचा शहाजहान बादशहा यांशीं संधान लावितात, व त्यांजकडून राजे यांस कैदेंतून सोडविण्याविषयीं महंमद आदिलशहास पत्र पाठवितात. शहाजीराजे हे अखेर कैदेंतून निघतात. शिवाजी महाराजांवर आदिलशहाचे सांगण्यावरून बाजी शामराज हा एकाएकीं हल्ला करितो; परंतु तो फसतो. १२ आदिलशहा हा शहाजी राजे यांस पुनः कर्नाटकांतील बंदोबस्तासाठीं फौज देऊन पाठवितो. तेथील अव्यवस्था. आफजलखान याचें कपट.

१ मागील भागांत सांगितल्याप्रमाणें शहाजीराजे यांचे आयुष्यांतील विशेष पराक्रमाचा भाग येथें संपून, ते यापुढें विजापूरचे सुलतानाचे पदरीं त्याची इमानइतबारें चाकरी करून स्वस्थ राहिले. असो; आपण आतां अम्मळ त्यांचे गृहस्थितीकडे वळूं. राजे यांचें लग्न मोठे समारंभानें, सिंदखेडचे जाधवराव देशमुख यांची कन्या जिजाबाई

हिजबरोबर लागलें, ह्मणून मागें लिहिलेंच आहे; परंतु या संबंधापासून उभयपक्षांचा लोभ जडावयाचा तो न जडतां, त्यामध्यें उलटें हळू हळू वितुष्ट मात्र पडत चाललें. जिजाबाईसाहेबांचा स्वभाव कांहीं अंशीं अभिमानी व तोऱ्याचा असल्याकारणानें, दोघां नवराबायकोंचें परस्परांवरील प्रेम कांहीं काळानें कमी कमी होत जाऊन, राजे यांनीं शेवटीं १६३० या सालीं मोहित्यांची कन्या तुकाबाई ही दुसरी बायको केली. या नवीन संबंधामुळें, जिजाबाईसाहेब ह्या रुसून आपले माहेरचे कोणा नातेवाईकांकडे जाऊन राहिल्या. यानंतर १६३२ या सालीं तर शहाजीराजे यांनीं मोंगल बादशहावर रागावून, निजामशाहीचेतर्फेनें मोठें निकराचें युद्ध चालविलें असतां, जाधवराव हे मोंगलांचा पक्ष धरून त्यांजबरोबर लढत होते; यामुळें तर जाधवराव व राजे यांचें विशेषच वैर पडलें; तथापि दोघा नवराबायकोचा रुसवा होऊन, जिजाबाईसाहेब ह्या शहाजीराजे यांजपासून निघून जाण्यापूर्वीं, त्यांजपासून राजे यांस दोन पुत्र झाले होते. थोरल्याचें नांव संभाजीराजे असून, त्यांजवर राजे यांची विशेष प्रीति होती; यामुळें ते आईस सोडून राजे यांचे जवळच असत.

२ शहाजीराजे यांचे दुसरे पुत्र, जे महाराष्ट्र पातशाहीचे स्थापनकर्ते **शिवाजी महाराज** हे शिवनेरी किल्ल्यांत सन १६२७ या वर्षीं जन्मले. हें वर्ष खरोखरच महाराष्ट्र देशाचेच काय; परंतु एकंदर हिंदुस्थान देशाचेही इतिहासांत सोनेरी अक्षरांनीं लिहिण्यासारखें आहे! कारण, ज्या राज्यक्रांतीनें फार दिवस नष्ट झालेलें स्वातंत्र्य या महाराष्ट्र भूमीस पुनः प्राप्त झालें, व तेथें हिंदुपद्पातशाहीची स्थापना झाली. जिचेयोगानें हिंदुधर्माची मुसलमान लोकांनीं दीर्घकाळ चालविलेली विटंबना बंद होऊन त्याचे शुद्धीस आरंभ झाला, जी आमच्या जुन्या विद्या, कलाकौशल्य, आचार, विचार, रीतरिवाज इत्यादिकांचे पुनरुज्जीवन होण्यास कारणीभूत झाली, व हल्लींसुद्धां, आह्मीं परदेशीय लोकांचे दाबाखालीं अगदीं चिरडून न जातां साधारणपणें आपलें घर तरी धरून आहोंत, ही स्थिति आह्मांस राहण्यासही जीच राज्यक्रांति

पुष्कळ अंशीं कारण आहे, तीस शिवाजी महाराज हे मुख्य आधार पुरुष होत; तथापि महाराजांचे जननकालीं किंवा त्यानंतर कांहीं वर्षेपर्यंत त्यांचेपुढील अभ्युदयाचीं कांहींएक चिन्हें दिसून आलीं नाहींत; परतु उलट स्थितीचीं मात्र तीं दिसत होतीं. कारण, शिवाजी महाराजांचे जन्मानंतर लवकरच वर लिहिल्याप्रमाणें शहाजीराजे व जिजाबाईसाहेब यांचें पटेनासें होऊन राजे यांनीं तुकाबाई ह्मणून दुसरीही बायको केली, व यापुढें १६३२ या सालीं दौलताबादेचे किल्ल्यावरून राजे यांचें मोंगलांबरोबर मोठें निकराचें युद्ध झुंपून जिजाबाईसाहेब व शिवाजी महाराज यांजवर कित्येक मोठे बिकट प्रसंग गुदरले. या बहुतेक वेळीं जिजाबाईसाहेबांचे केवळ हुषारीनेंच बाल महाराज मोंगलांचे हातीं पडावयाचे चुकले! कोणी सांगतात कीं, त्यांस यावेळीं केव्हां कोंडाणा, केव्हां शिवनेर व केव्हां कोंकणांत माहोली या किल्ल्यांत नेऊन ठेविलें होतें. येणेंप्रमाणें कांहीं अंशीं गृहकलहामुळें व कांहीं अंशीं मोंगलांबरोबर युद्ध चालत असल्यामुळें, शिवाजी महाराज यांची आणि त्यांचे वडील शहाजीराजे यांची भेट महाराज सुमारें दहा वर्षांचे होईपर्यंत पडलीच नाहीं; परंतु मागील भागांत सांगितल्याप्रमाणें १६३६ या वर्षीं मोंगलांचा व विजापूरकरांचा तह होऊन विजापूरचे सुलतानास निजामशाहींतील जो नवीन मुलूख प्राप्त झाला होता, त्याचा बंदोबस्त करून, राजे हे जेव्हां विजापुरास परत गेले, तेव्हां त्यांनीं शिवाजी महाराज व जिजाबाईसाहेब या उभयतांस आपले बरोबर तिकडे नेलें. यानंतर दोन वर्षांनीं राजे यांनीं निंबाळकर यांची कन्या सईबाई हिजबरोबर बाल महाराजांचे लग्न मोठे समारंभानें करून दिलें. ( १६३९ ).

शिवाजी महाराज यांस लहानपणापासून विशेष लळा त्यांचे आईचाच असे. ती मोठी हुषार व दिलदार मनाची बायको असल्यामुळें, तिनें मागील आपले पूर्वजांच्या शौर्याच्या व वैभवाच्या गोष्टी सांगून आपले बालकाचे कोंवळे मनांत मोठीं हिमतीचीं कृत्यें करण्याचा जो अंकूर दृष्टीस पडूं लागला होता तो वृद्धिंगत केला

यवनांनीं सर्व देश व्यापिला, धर्म बुडविला, देवालयांत शिरून देव फोडले, गोवध व ब्राह्मणांचा छळ हीं तर हमेशा चोहोंकडे बिनदिक्कत चालू आहेत. या दुष्टांचेच पायीं आपण देशोधडीं लागून रानोमाळ पळत आहों; त्यांचें पारिपत्य करणारा शककर्ता राजा आपले कुळांत निपजणार आहे, ह्मणून यामागें देवीचे कित्येकदां दृष्टांत झाले आहेत; परंतु तो केव्हां उत्पन्न होईल तेव्हां खरा! असे जिजाबाईनें बाल महाराजांपाशीं वारंवार दुःखोद्गार काढावेत. यामुळें महाराजांचे मनांत वरचेवर वीरश्री, धर्माभिमान, शौर्य इत्यादि वृत्ति उचंबळूं लागल्या. शिवाय महाराजांस कथा, पुराणें ऐकण्याचाही मोठा नाद असे. असें सांगतात कीं, महाभारतांतील भीमसेनाचें अद्भुत पराक्रम-वर्णन चाललें असतां, तें ऐकून, पांडव वीरानें आपले हाडवैरी जे कौरव त्यांचें जसें निर्दलन केलें, तसेंच आपणही, गोब्राह्मणाचा छळ करणारे जे दुष्ट यवन त्यांचेंही करूं, अशी मनांत ईर्षा येऊन त्यांस विलक्षण स्फुरण चढे!*

३ येणेंप्रमाणें, शिवाजी महाराज यांची व त्यांचे वडिलाची प्रथम गांठ पडली, तेव्हां त्यांचे मनाची स्थिति झाली होती. यवनांविषयीं त्यांचे मनांत इतकें लहानपणापासून जें हाडवैर उत्पन्न झालें होतें, त्याचा प्रत्यय शहाजी राजे यांस लवकरच आला. असें सांगतात कीं, वडिलानीं पुत्राचें वय, सुलतानाचे दरबारास जाण्यासारखें झालें आहे असें पाहून, त्यास, सरंजाम घेऊन सुलतानास मुजरा करून येण्यास सांगितलें असतां, महाराजांनीं उत्तर केलें कीं, “ यवन केवळ नीच, त्यांचें आर्जव करणें किंवा त्यांस मुजरा करणें, ह्याचा मला अत्यंत त्रास वाटतो; रस्त्यानें जात असतां, गोवध होतो तो पाहून, वध करणारे यवनांचा तत्क्षणींच वध करावा असें वाटतें; परंतु आपण काय ह्मणाल, या गोष्टीचा पुनः विचार करून, जागचेजागींच राग गिळून टाकतों. अमीर, उमराव, यांचे घरीं जाणें माझे चित्तास बरें वाटत नाहीं.

* दंतकथा.

एखादे समयीं त्यांचा स्पर्श झाल्यास, मी दुसरीं वस्त्रें घेतों. " पुत्राचें हें निग्रहाचें भाषण ऐकून, शहाजी राजे यांनीं महाराजांचा निषेध करून ह्मटलें कीं, " तूं ह्मणतोस हें सर्व खरें आहे, परंतु हल्लीं पृथ्वीचे अधिकारी यवन आहेत, त्यांची सेवा करून, आपला धर्मरक्षण करून आपणांस राहिलें पाहिजे, असा ईश्वरी नेम दिसतो. असें नसतें तर, आपले वंशांतील सार्वभौमपद कां जातें? असो; आह्मीं तुमचेकरितां श्रम करून वैभव मिळविलें, तें संभाळून तुह्मीं पातशहाची मर्जी संपादन करावी हेंच उचित होय. " परंतु महाराजांनीं यावर उदासपणानें उत्तर केलें, " वडिलांची आज्ञा शिरसावंद्यच आहे; परंतु यवन गोब्राह्मणांना पीडा देतात, ती पाहण्यापेक्षां प्राण गेला तरी पतकरला! " *

पुत्राची ही चमत्कारिक वृत्ति पाहून शहाजी राजे यांस बरें वाटलें नाहीं. त्यांनीं पुनः दुसरे एके प्रसंगीं शिवाजी महाराजांस मोठा आग्रह करून, बळें बळेंच सुलतानाचे भेटीस पाठविलें असतां, व त्यापूर्वींच मुरारपंतांनीं महाराजांचे गुणांचें वर्णन करून ते भेटीस येत आहेत, असें सुलतानास कळविलें असतां, महाराज दरबारांत जे आले, ते सुलतानास मुजरा वगैरे न करितां तसेच दूर जाऊन बसले. सुलतानानें, " राजांचे पुत्र ते हेच काय? " ह्मणून विचारलें; परंतु मुरारपंतांनीं संपादणूक केली कीं, " राजे अजून लहान आहेत; दरबारास येण्याचा त्यांचा हा प्रथमच प्रसंग आहे; परंतु आपले सेवेस बहुत योग्य आहेत." यानंतर चालीप्रमाणें बालमहाराजांस पोषाख, विडा वगैरे देऊन त्यांस निरोप दिला; परंतु घरीं येतांक्षणींच शिवाजी महाराजांनीं दरबारांत मिळालेला पोषाख काढून टाकून सचेल स्नान केलें! *

४ हें वर्तमान शहाजी राजे व मुरारपंत यांस समजल्यावर, त्यांनीं विचार केला कीं, शिवाजी महाराज हे प्रौढ होईपर्यंत तरी त्यांस विजापुरास ठेवणें बरोबर नाहीं. यानंतर लवकरच शहाजी राजे यांस

* चिटणिसांची बखर.

मागें सांगितल्याप्रमाणें, रेंदुल्लाखान याचे हाताखालीं दुय्यम ह्मणून नेमून त्यांस कर्नाटकांत स्वारीवर जाण्याचा सुलतानाचा हुकूम झाल्यामुळें, राजे यांनीं, शिवाजी महाराज व त्यांची आई जिजाबाईसाहेब व नवीन सून सईबाई यांस, पुणें व सुपें या जहागिरीकडे पाठवून दिलें. येथें त्यांची व मुलखाची नीट व्यवस्था रहावी याकरितां, दादोजी कोंडदेव ह्मणून कोणी त्यांचे फार दिवसांचे जुने व विश्वासू कारभारी होते, त्यांस शहाजीराजे यांनीं त्यांचेबरोबर दिलें, व आपण व वडील पुत्र संभाजीराजे व धाकटें कुटुंब तुकाबाई; व नारायण रघुनाथ हनुवंते ह्मणून दादोजी कोंडदेवाप्रमाणेंच दुसरे कारभारी होते ते, व कांहीं सरंजाम असें घेऊन कर्नाटकाचे मोहिमीवर निघून गेले. (१६३९)

यावेळीं शहाजीराजे यांचें वय सुमारें पंचेचाळीस वर्षांचें होतें. त्यांस आतां यवनांशीं सामना करून उलाढाली कराव्या, ही उमेद राहिली नव्हती. नवीन दरबाराचीच इमान इतबारें नोकरी करून यापुढें राहिलेले दिवस सुखानें काढावे, असें त्यांस वाटूं लागलें होतें. सुलतानानें कर्नाटकांत जी नवीन मोहीम त्यांस सांगितली होती, ती त्यांनीं चांगले रीतीनें फत्ते केल्यामुळें, त्यानें त्यास त्याच प्रांतांत दुसरी एक जहागीर करून दिली होती. या नवीन जहागिरीचा बंदोबस्त करून व भोंवतालील लहान सहान संस्थानें मधून मधून काबीज करून ते तिकडेसच राहिले. यावेळीं, तंजावर येथें विजय राघव ह्मणून कोणी संस्थानिक होता, त्याचा राजे यांनीं पराभव करून, तंजावर शहर हस्तगत केलें; व तें आपणांस राहण्यास विशेष सोईचें होईल, ह्मणून राजे यांनीं आपलें ठाणें तेथें नेलें. येथें त्यांचे दुसरे कुटुंबास कांहीं दिवसांनीं पुत्र झाला. त्याचें नांव व्यंकोजीराजे असें ठेविलें. शहाजीराजे यांचें जिजाबाईसाहेबांशीं अगोदरच पटेनासें झालें होतें, व नवीन बायकोस आतां पुत्र झाला, यामुळें यापुढें त्यांचा विशेष ओढा कर्नाटकांतील खटल्याकडेसच लागत चालला.

शिवाजी महाराजांची वृत्ति राजे यांचे साधारण लक्षांत आलीच होती. त्यांचे लक्षणांवरून ते पुढें मोठ्या योग्यतेस चढतील, याविषयीं त्यांस

विशेष उमेद वाटेना. तेव्हां सरासरी नावडती बायको व नावडता पुत्र यांचा खड्या दूर पुण्याकडील जहागिरीवर ठेवून, तिजवर त्यांचा खर्च चालून बाकी शिल्लक राहील ती, दादोजी कोंडदेव यांनीं आपणाकडे कर्नाटकांत पाठवून द्यावी, अशी राजे यांनीं व्यवस्था केली होती. यामुळें यापुढें ते पुण्याकडे फार करून आले देखील नाहींत!

९ येणेंप्रमाणें बापानें आईस टाकल्यामुळें, त्यांजपासून दूर राहणें, आईनें यवनांचे हातीं लागूं नये ह्मणून आपणांस सतत जपणें, तिचें धैर्य, शौर्य, धर्मप्रेरणा, उदारता वगैरे गुण उत्पन्न करणारें भाषण लहानपणापासून ऐकणें, व त्याचप्रमाणें कथापुराणांतील अंतःकरण उचंबळविणारे कथाभाग कानीं पडणें इत्यादि गोष्टींनीं शिवाजी महाराजांचें मनांवर चांगले परिणाम झाले, व त्यांचे हांतून यापुढें जे मोठे पराक्रम—स्वराज्यस्थापना व धर्मशुद्धि—हे झाले, त्यांस त्या पुष्कळ अंशीं कारणीभूत झाल्या यांत संशय नाहीं.

शिवाजी महाराजांचें शिक्षणांस वरील गोष्टीप्रमाणेंच किंबहुना त्याहूनही कदाचित् अधिक अनुकूल गोष्ट ह्मटली ह्मणजे, दादोजी कोंडदेव यांचें शिक्षण हें होय. दादोजींनीं पुणेंप्रांतीं येतांक्षणींच आपले यजमानासाठीं मोठा वाडा बांधून, तेथें त्यांस व त्यांचे मातोश्रीस हरएक प्रकारें सुख होईल, अशी व्यवस्था केली. मराठे हे आपणांस लिहिणें वाचणें आलेंच पाहिजे, असें समजत नाहींत. तें काम कारकुनाचें आहे, असें ते समजतात. यामुळें शिवाजी महाराजांस दादोजींनीं लिहिणें वाचणें हें कांहीं शिकविलें नाहीं. त्यांस मोठे झाल्यावरही सहीसुद्धां कधीं करतां आली नाहीं; परंतु घोड्यावर उत्तम तऱ्हेनें बसणें, तिरंदाजी करणें, भाला मारणें, तरवार, पट्टा वगैरे हत्यारें उत्कृष्ट रीतीनें चालविणें, इत्यादि गोष्टी, ज्या मराठे लोकांच्या मुलांना अवश्य आल्या पाहिजेत, असें त्या काळीं लोक समजत असत, त्या सर्व शिवाजी महाराजांस दादोजींनीं शिकवून, त्यांत त्यांस उत्तम तरबेज करविलें होतें. त्याचप्रमाणें महाराजांस कथापुराणें यांचें श्रवण करवून, त्यांस धर्माचरण, राजनीति वगैरे गोष्टींचा चांगला बोध केला होता.

येणेंप्रमाणें शिवाजी महाराजांस, त्यांचे आयुष्यांतील महदुद्यमास जें शिक्षण अत्यवश्य होतें, तें दादोजी कोंडदेव यांचे विशेष हुषारीनें व शहाणपणानें मिळालें.

६ दादोजी कोंडदेव हे मूळचे कारकून असून जमाबंदीचे कामांत ते मोठे निष्णात असून, त्यांजकडे वर लिहिल्याप्रमाणें शहाजीराजे यांनीं आपली पुणें व सुपें या प्रांतांची जहागीर वहिवाटीस दिली होती. प्रथम या मुलखांत फार अव्यवस्था असे; परंतु दादोजी यांनीं मलिकंबर याचे पद्धतीवर जमिनीची मोजणी व प्रतबंदी करून, दरसाल जसें पीक येईल, त्या मानानें ते त्याचा वसूल घेऊं लागले. यानंतर लवकरच शहाजीराजे यांस विजापूरचे सुलतानाकडून, त्यांनीं कर्नाटकांतील मोहीम फत्ते केल्याबद्दल इंदापूर, बारामती व मावळ हे प्रांत जहागीर मिळाल्यावर, हेही प्रांत दादोजींचेच वहिवाटीस आले. यावेळीं मावळे लोकांची स्थिति फार वाईट होती. वर्षभर जमिनीवर श्रम करून त्यांस पुरतें अन्नवस्त्रही मिळत नसे. दादोजी यांनीं प्रथम धारा वगैरे कांहीं न घेतां त्यांजकडे जमिनी लावून दिल्या. कित्येकांना थोडा पगार व नाचण्या वगैरे धान्य देऊन, त्यांस आपले नोकरीस ठेविलें. त्याचप्रमाणें चौक्या पहारे वगैरे ठेऊन चोरवडा मोडून टाकिला, व वाघ, लांडगे वगैरे श्वापदांचा उपद्रव होता तो दूर केला. यामुळें, अधिकाधिक जमीन लागवडीस येत जाऊन, देशांतील वस्ति वाढत चालली. येणेंप्रमाणें थोडेच वर्षांत दादोजींचे उत्तम व्यवस्थेमुळें, मुलखांत आबादानी होऊन, शहाजीराजे यांस त्यांचे जहागिरीपासून बराच वसूल येऊं लागला.

शिवाजी महाराजांचें वय जसजसें अधिक होऊं लागलें, तसतसें त्यांस दादोजी कोंडदेव आपले कारभारांत जास्त जास्त घेऊं लागले. न्याय मनसबा करितांना त्यांनीं महाराजांस जवळ बसवून घ्यावें, व जमाबंदीचीही त्यांस माहिती व्हावी, ह्मणून त्यांस त्यांनीं गावोंगांव आपलेबरोबर हिंडवावें; परंतु महाराजांचें लक्ष त्या कामाकडे दिवसेंदिवस कमी कमी होऊं लागलें. त्यांची धांव, न्याय मनसबी व जमा-

वंदी शिकून आपली वडिलोपार्जित जहागीरच संभाळून रहावें, येथ-
पर्यंतच थांबून राहिनाशी झाली. आपले देशांतील फार दिवस नष्ट
झालेलें स्वराज्य पुनः स्थापन करावें; आपला जुना धर्म, ज्याची यव-
नांनीं पायमल्ली केली आहे, त्याचें रक्षण करावें; गोब्राह्मणाचा चोहों-
कडे छल होतो आहे, तो बंद करावा; वगैरे विचार, ज्यांचें बीजा-
रोपण त्यांचे मनांत अगदीं लहानपणींच झालें होतें, ते आतां त्यांस
यौवनदशा प्राप्त होऊं लागतांच विशेष दृढ होऊं लागले. दादोजी
यांचे हाताखालीं नवीन दमाची कांहीं कारकून शिपाई मंडळी होती,
त्यांचीं मनें महाराजांनीं आपलें नवीन महदुद्योगास उद्युक्त करून
घेतलीं. यांत विशेष प्रमुख ह्मटले ह्मणजे शंकराजी नीळकंठ, आबाजी
सोनदेव, रघुनाथ बल्लाळ कोरडे व बाळकृष्णपंत मुजुमदार हे होत.
शिवाजी महाराजांसारिखा होतकरू जहागीरदाराचा मुलगा, हिंदु-
स्वराज्य स्थापना व हिंदुधर्मरक्षण अशा महत् कार्याकरितां पुढें
होत आहे हें पाहून, जवळपासचे लहान मोठे देशमुख, देशपांडे यांचे
घराण्यांतील ज्वान मंडळी सहजच त्यांचे मसलतीस येऊन मिळूं लागली.

महाराजांनीं हा नवीनच विलक्षण खटाटोप आरंभिलेला पाहून,
दादोजी कोंडदेव यांस तें बरं वाटेना. त्यांनीं त्यांस एकांतीं बोला-
वून बोध केला कीं, "तुह्मीं जो स्वराज्य स्थापन करण्याचा उद्योग
चालविला आहे, तो फार स्तुत्य आहे; परंतु त्यास सध्यांचा काळ
अनुकूल नाहीं. सर्व पृथ्वी यवनांनीं पादाक्रांत केली आहे. किल्ले,
फौजा वगैरे सर्व त्यांचे स्वाधीन आहेत. अशा कृत्यास, हिंदुराजे
जागोजाग साह्य असून हिंदु फौजा चोहोंकडे फैलावल्या पाहिजेत.
ईश्वराची अनुकूलता व सिद्धाचे आशीर्वाद हीं पाहिजेत; परंतु सध्यां
कालदेशवर्तमान हीं पाहतां, तुमची मसलत आमचे मनसब्यास
येत नाहीं. याचा परिणाम चांगला लागणें दुर्घट आहे. तुमचे
वडिलांनीं मोठे श्रम करून दौलत मिळविली; मोठा लौकिक संपादिला;
तो तुह्मीं गमाविला असें लोकांनीं न ह्मणावें, इतकेंच आमचें
ह्मणणें आहे."

७ शिवाजी महाराजांनीं पाहिलें कीं, आपले उद्योगास दादोजी-सारख्या वयोवृद्ध मनुष्याची संमति कधीं पडणार नाहीं; तथापि उघ-डपणें बोलून त्यांचें मन दुखविणें हें त्यांस बरें वाटेना. त्यांनीं त्यांस उलट उत्तर न करितां, यापुढें आपला उद्योग त्यांचे दृष्टी किंवा कानीं न पडे अशाविषयीं मात्र ते साधारण सावधगिरी ठेवूं लागले. ते वरचेवर कोंकणप्रांतांत कांहींतरी निमित्त काढून जात, व तिकडेच कित्येक दिवसपर्यंत रहात. ही गोष्ट दादोजींचें लक्षांत येऊन, ते हळू हळू महाराजांवर जहागिरीचे कारभाराचा बोजा घालूं लागले. त्यांचे मनांतील हेतु हा कीं, येणेंकरून तरी महाराजांस उलाढाली करण्यास अवकाश सांपडूं नये; परंतु दादोजींचे या युक्तीनें महारां-जांचे उद्योगास खळ न पडतां, उलटा तिजपासून तो विशेष जारीनें चालविण्यास मात्र त्यांस सवड झाली. महाराजांकडे कारभार आल्या-मुळें, जवळपासचे श्रीमान व वजनदार मराठे सरदारांशीं त्यांचा संबंध पडूं लागला. महाराजांची वागणूक मोठी इभ्रतीची, उदात्त व मन-मिळाऊ असल्यामुळें, त्यांचें वजन सहजच या लोकांवर व विशेषेकरून त्यांतील होतकरूं मंडळीवर पडूं लागलें. यांपैकीं मावळ प्रांतांत तानाजी मालुसरे, येसाजी कंक व बाजी फसळकर ह्मणून तिथे मोठे हिंमतदार व मसलती असे देशमुख होते; त्यांचा आणि महाराजांचा विशेष निकट स्नेह जमला. मावळ व कोंकण या प्रांतांत महाराजांनीं वरचे-वर जाऊन, तेथील दऱ्या, खोरीं व डोंगरांतील बिकट वाटा, ह्या अगदीं आपल्या पायाखालच्या करून टाकल्या. मावळे लोकांवर महा-राजांची विशेषच भक्ति असे. हे लोक दिसण्यांत अडाणी व मूर्ख दिसतात खरे; परंतु वास्तविक पाहतां, त्यांसारखे चपळ, मेहनती व विश्वासु असे दुसरे लोक सांपडणार नाहींत, असा महाराजांचा समज असे. या लोकांस त्यांनीं नेहमीं आपले स्वारींत ठेवावें, शिकारीस घेऊन जावें व विशेष इनामगिरीचीं कामें असल्यास, तीं त्यांनीं त्यांनाच सांगावीं. यामुळें मावळे लोकांचीं मनें महाराजांकडे विशेषच लागलीं.

८ शिवाजी महाराजांनीं जो हा नवीन महद्‌द्योग आरंभिला होता, त्यास ती वेळ चांगली अनुकूल होती. यावेळीं विजापूर येथील सुलतान महम्मद आदिलशहा हा, मोंगलांबरोबर १६३७ या सालीं तह झाल्यापासून लढाईचा व्याप नाहींसा झाल्यामुळें, उत्कृष्ट मशीदी बांधणें, बागबगीचे लावणें, तळीं बांधून त्यांचें पाणी राजधानींत आणून सोडणें वगैरे कामांत मोठे मजेनें दिवस काढीत होता. त्याचे सरदार, कर्नाटकांत विजयानगरचें राज्य बुडाल्यापासून चोहोंकडे बेबंदी होऊन, जागोजाग जे देशमुख, पाळेगार, जमेदार वगैरे लोक स्वतंत्र होऊन बसले होते, त्यांस क्रमाक्रमानें जिंकून त्या प्रदेशांत आदिलशाहीचा अम्मल बसविण्याकरितां उद्युक्त असल्यामुळें, त्यांनीं तिकडे विजापूरच्या उत्कृष्ट फौजा गुंतविल्या होत्या. जागोजाग किल्ल्यांचीही व्यवस्था नीट नसून, ते बहुतेक देशमुख, मोकासदार वगैरे मराठे लोकांचेच स्वाधीन असत. शिवाय, पुणें, सुपें वगैरे मावळ प्रांत व त्याचे पश्चिमेकडील कोंकणपट्टी हे प्रांत निझामशाहीकडून निघून आदिलशाहीकडे येऊन फार वर्षें झालीं नसल्यामुळें, तेथील लोक शहाजी राजे यांचें नांव व त्यांचे पराक्रम अजून विसरले नव्हते. या सर्व गोष्टी शिवाजी महाराज व त्यांचे ज्वान व चौकस अनुयायी यांचे लक्षांत पूर्वींच येऊन चुकल्या होत्या. याशिवाय त्यांस असेंही समजून आलें होतें कीं, हिंदूपद स्थापणेच्या उद्योगास लागण्यास मूळ आरंभ म्हटला म्हणजे, घांटमाथा हा प्रथम आपले ताब्यांत आला पाहिजे, ठिकठिकाणचे डोंगरी किल्ले युक्तिप्रयुक्तीनें साध्य केले पाहिजेत, व हें काम फारसा बोभाट न होतां, व गोड बोलण्यानें जितकें सिद्धीस जाईल, तितकें दांडगाईनें जाणार नाहीं, व पुढेंसुद्धां बरेच दिवस सुलतानाचे फौजांबरोबर मैदानांत लढाई करून आपला निभाव लागणार नाहीं, तर त्यांजपाशीं धरसोडीचाच सामना चालविला पाहिजे.

येणेंप्रमाणें शिवाजी महाराज व त्यांचे अनुयायी, ज्यांचे मनांची वृत्ति त्यांचे समागमानें त्यांचेसारखीच झाली होती, त्यांनीं, सर्व गोष्टींचा विचार करून व या महद्‌द्योगांत प्राण जरी गेले, तरी

बेहत्तर आहे, असा मनाचा धडा करून, त्यांनीं प्रथम मावळांत तोरणा किल्ला हस्तगत करून घेण्याची मसलत केली. तानाजी मालुसरे वगैरे त्रिकुटांनीं किल्लेदाराशीं संधान बांधून व त्यास कांहीं पैसा देऊं करून, त्यापासून तो किल्ला आपले ताब्यांत घेतला. ही गोष्ट सन १६४६ याबर्षी घडली. यावेळीं शिवाजी महाराजांचें वय फक्त १९ वर्षांचें होतें. यावेळीं महाराजांनीं तोरणा किल्ला घेतला नव्हे, तर हिंदुपाद-शाहीरूपी भावी भव्य इमारतीचें तोरणच सुमुहूर्तावर लाविलें, असें ह्मटलें तरी चालेल!

तोरणा किल्ला हस्तगत झाल्याबरोबर, शिवाजी महाराजांनीं विजापुरास वकील पाठवून, झालेली गोष्ट सुलतानाचे कानावर घालून, त्यांस असें भासविण्याचा यत्न चालविला कीं, 'हें कृत्य केवळ सरकारची चाकरी ह्मणून आह्मीं केलें आहे. या पूर्वींचे किल्लेदारांनीं, या मुलखापासून जो वास्तविक वसूल होतो, तो सरकारास आज दहा वर्षांत कधींही दिला नाहीं. आह्मांकडे हा किल्ला राहूं दिल्यास, आह्मीं त्यांचेपेक्षां पुष्कळ अधिक वसूल सरकारांत आणून देत जाऊं. शिवाय हा प्रांत अंमळ एकीकडे असल्यामुळें, तिकडे सरकारचा विशेष विश्वासाचा चाकर असणें फार इष्ट आहे. अशा गोड गोड भूलथापा देऊन व दरबारांतील प्रमुख उमरावांस नजराणे, लांच वगैरे चारून, महाराजांनीं सुलतानास या गोष्टीचा कोणतेही तऱ्हेनें बरेच दिवस निकाल लावूं दिला नाहीं. शिवाय इकडे मोठी लगेच हातजलदी करून, त्यांनीं तोरणा किल्ल्याची दुरुस्ती करण्याचा व अधिक मावळे लोक जमा करण्याचा झपाटा लाविला. किल्ल्यांत हें काम चाललें असतां, महाराजांस एकाएकीं तेथील एके पडीत जागेंत मोठा द्रव्यसंचय सांपडला. कुलस्वामिनीनें प्रसन्न होऊन आपले महत्कृत्यास साह्य ह्मणून हा ठेवा आपणांस दिला, असें महाराजांनीं समजून, अधिक फौज व दारूगोळा वगैरे सरंजाम विकत घेण्याचा, व या किल्ल्यासारखाच दुसरा एक नवीनच किल्ला बांधण्याचा निश्चय केला. तोरणा किल्ल्याशेजारींच दुर्गादेवी नांवाचा एक डोंगर आहे, त्याजवर हें नवीन काम त्यांनीं सुरू केलें. डोंगरास

तीन माच्या होत्या, त्या सर्व महाराजांनीं बांधून काढविल्या. ही जागा फार मजबूत असून, ती आपले राजधानीस योग्य आहे, अशी महाराजांची खात्री झाल्यामुळें, किल्ल्याचें काम त्यांनीं फार झपाट्यानें चालविलें, व तें एक वर्षाचे आंतच संपविलें. या नवीन किल्ल्यास त्यांनीं, राजगड, असें नांव दिलें.

या किल्ल्यांचीं कामें चालत असतां, त्यांचा पुकारा वारंवार विजापुरचे सुलतानाच्या कानावर जातच होता; परंतु आपले राज्याचे पुढील नाशाचें हें मूळच उत्पन्न झालें आहे, अशी कल्पना त्यास यावेळीं मुळींच नव्हती. ह्मणून त्यानें त्याचा विशेष बंदोबस्त करण्याची त्वरा केली नाहीं. त्यानें फक्त शिवाजी राजे यांस किल्ल्याचें काम तहकूब ठेवण्याबद्दल हुकूम पाठविला, व शहाजी राजे यांजकडून पुत्राचे आगळीकीबद्दल जबाब मागितला. शहाजीराजे यांस पुत्राचे त्या कृत्याबद्दल अर्थातच कांहीं बातमी नव्हती. त्यांस त्याबद्दल आश्चर्य वाटून राग तर आलाच; परंतु त्यावर त्यांनीं तूर्त पांघरूण घालून सुलतानास उत्तर पाठविलें कीं, "पुत्रानें किल्ल्याचे बांधणीसंबंधानें आमचा कांहीं सल्ला घेतला नाहीं; तथापि आह्मी व आमचा पुत्र असे उभयतां सरकारचे हुकुमाचे निःसीम चाकर आहोंत; आणि हें जें काम शिवाजी राजे यांनी केलें आहे, तें आपण दिलेल्या जहागिरीचे बंदोबस्तांकरितांच केलें असेल, याबद्दल आह्मांस मुळींच शंका नाहीं." याप्रमाणें इकडे सुलतानास सामोपचाराचें उत्तर पाठवून देऊन, शहाजीराजे यांनीं, दादोजी कोंडदेव व शिवाजीराजे यांस बरेंच खरमरीत पत्र लिहिलें; व किल्ल्याचें काम एकदम बंद ठेवावें असा हुकूम पाठविला. यजमानांचें पत्र वाचून पाहून, दादोजी यास वाटलें कीं, आपण इतके दिवस अब्रूनें काढिले; परंतु आतां शिवाजी महाराजांचे पायीं आपले तोंडांस काळोखी लागण्याची वेळ आली आहे. त्यांनीं महाराजांस बोलावून आणून ह्मटलें, "मी तुह्मांस पूर्वीपासून सांगत आलों; परंतु तुह्मी कांहीं ऐकत नाहीं. राजे यांस तुमचे या अविचारी व गैर कृत्याबद्दल फार राग आला आहे.

यापासून त्यांस खरोखर पेंच पडून, आपलें खानदानी घराणें खरो-खर खराबीस येईल. तेव्हां तुह्मीं हा आरंभिलेला उद्योग सोडून देऊन, राजे यांचेप्रमाणें, सुलतानाची उत्तमप्रकारें चाकरी करून, त्यांचेपेक्षांही अधिक योग्यतेस चढण्याची उमेद धरावी. त्यापासून तुमचें, तुमचे वडिलांचें व अवघे सर्व घराण्याचें कल्याण होणारें आहे." शिवाजी महाराजांनीं नेहमींप्रमाणेंच "तुह्मीं ह्मणतां तसेंच आतां मी करणार. यापुढें खरोखर मी कांहीं खटपट करणार नाहीं." असें गोड व मोघम शब्दांनीं उत्तर दिलें; तथापि दादोजींनीं महाराजांचे मनांतला भाव ओळखिला. दादोजींचें वय आतां बरेंच झालें असून, त्यांचे शरीरास बऱ्याच व्याधीही जडल्या होत्या. त्यांत, महाराजांचें मन तर त्यांचे नवीन विलक्षण उद्योगापासून वळत नाहीं हें पाहून, आपणावर यजमानांचा खरोखर शब्द येतो, व राजे यांचे नांवासही काळोखी लागते, असें दादोजींचे वरचेवर मनांत येऊन, ते आतां झिझणीसच लागले. त्यांनीं वर्ष सहा महिने तसेंच लोटिले. शेवटीं ते अगदीं मरणोन्मुख झाले असतां, त्यांचे विचारांत कांहीं फरक पडून त्यांस असें वाटूं लागलें कीं, शिवाजीराजे यांचें मन, त्यांच्या अचाट खटाटोपापासून काढण्यासाठीं आपण हरतऱ्हा करून पाहिली; परंतु तें कांहीं निवू शकत नाहीं. तेव्हां हा कांहीं तरी ईश्वरी संकेतच नसेल ह्मणून कशावरून? यांची बुद्धि, कल्पना व पराक्रम हीं कांहीं विलक्षण दिसतात. राजे यांचे कुळांत यवनांचा शास्ता शककर्ता राजा निपजणार आहे, ह्मणून जो मागें मालोजीराजे यांस देवीचा दृष्टांत झाला असा ह्मणून सांगतात, तोच हा अवतारी पुरुष नसेल असें तरी कोणी ह्मणावें? असे विचार दादोजी कोंडदेव यांचे मनांत मरणसमयीं येऊं लागून, त्यांनीं महाराजांस जवळ बोलावून तेथें जम-लेले आप्त सोयरे, कारकून, शिपाई वगैरे जहागीरीचे सर्व कामगार यांचे समक्ष महाराजांस ह्मटलें, "आमचा अंतकाळ तर आतां जवळ आलाच आहे. आह्मीं इतके दिवस तुमचे मनाची पोंच किती आहे हें पाहण्या-करितांच, तुह्मीं आरंभिलेल्या नवीन उद्योगाचा निषेध करून बोललों; परंतु आतां तुमचे बुद्धीविषयीं व तुमचे पराक्रमाविषयीं आमची खात्री झाली.

तुह्मीं हिंदुस्वराज्य स्थापन करण्याचा आपला स्तुत्य उद्योग तसाच जारीनें चालू द्या. त्यांत तुह्मांस ईश्वर खचीत यश देईल. तुह्मी गो-ब्राह्मणांचा प्रतिपाळ करा, व यवन लोक उन्मत्त होऊन देवस्थानें भ्रष्ट करीत आहेत, त्यांचें पारिपत्य करा. आह्मीं इतके दिवस तुमचे वडिलांची इमानेंइतबारें चाकरी केली, व त्यांनीं व तुह्मीं आमचा परामर्ष उत्तमप्रकारें घेतला. आतां, आमचे मागें आपण आमचे कुटुंबाचा तसाच चांगले रीतीनें समाचार घेत जावा, एवढेंच ह्मणणें आहे, " इतकें बोलून दादोजी कोंडदेव यांनीं प्राण सोडिला.*

९ दादोजी कोंडदेव यांचे मागें जहागिरीची सर्व व्यवस्था अर्थातच शिवाजी महाराज यांजकडे आली. त्यानंतर लवकरच शहाजी राजे यांचेकडून, मागील राहिलेला वसूल मागण्याकरितां मनुष्यें आलीं असतां, महाराजांनीं त्यांस तसेंच परत रवाना केले, व त्यांजबरोबर सांगून पाठविलें कीं, " वृद्ध कारभारी दादोजी कोंडदेव यांस देवाज्ञा झाली. वसुलाची बाकी मागतां; परंतु इकडे आमचा खटला वाढल्या कारणानें, आमचा आह्मांसच खर्च पुरत नाहीं. याउपर वडिलांनीं कर्नाटकांतील आपला खटला तिकडील जहागिरीचे उत्पन्नावरच चालवावा. "

शिवाजी महाराजांचे जहागिरी मुलुखांत, शहाजी राजे यांचे तर्फेचे कांहीं कामगार होते; ते अजून महाराजांस जुमानीत नसत. यांपैकीं चाकणचे किल्ल्यावर फिरंगाजी नरसाळा ह्मणून कोणी गडकर होता, त्यास शेवटीं महाराजांनीं त्याजकडेसच किल्ल्याचें काम व भोंवतालील गांवांचे वसुलाची व्यवस्थाही पूर्वीप्रमाणेंच चालू ठेवून, वश करून घेतलें. दुसरा अडेल कामगार ह्मटला ह्मणजे, महाराजांची सापत्न मातुश्री तुकाबाई हिचा भाऊ बाजी मोहिते, हा होय. ह्याचे ताब्यांत सुपें प्रांत असून, त्याजजवळ तीनशे घोड्यांची चांगली पागा असे. महाराजांनीं त्यास बोलावणें पाठविलें असतां, तो गोडगोड थापा मात्र देई; परंतु महाराजांची भेट घेईना, व शहाजी राजे यांचे हुकुमाशिवाय,

* चिटणीस यांची बखर

मला तुमचे ताब्यांत मुलूख किंवा तेथील वसूल कांहीं देतां येणार नाहीं असें सांगूं लागला. यावरून शिवाजी महाराजांनीं मावळे लोकांची एक निवडक टोळी बरोबर घेऊन, एके दिवशीं मध्यरात्रीं बाजी मोहिते याजवर एकाएकीं छापा घातला, व त्यास व त्याचे पक्षाचे लोकांस कैद केलें, आणि मुलूख, पागा वगैरे त्याजपासून काढून घेऊन, त्यास व त्याचेसारखेच दुसरे जे नाढाळ कामगार होते, त्यांस शहाजी राजे यांजकडे कर्नाटकांत पाठवून दिलें.

शिवाजी महाराजांचे जहागिरींत, कोंडणा व पुरंदर असे दोन मोठे मजबूत किल्ले होते. त्यांजवर पूर्वींपासून सुलतानानें दोन स्वतंत्र किल्लेदार नेमून दिले होते. या दोन किल्लेदारांशीं महाराजांचा पहिल्यापासून चांगला स्नेह असे. कोंडणा येथील मुसलमान किल्लेदार, यास महाराजांनीं कांहीं पैसा वगैरे देऊन वश करून घेतलें, व त्याजपासून तो किल्ला आपले ताब्यांत घेतला. तसेंच या सुमारास पुरंदरचा किल्लेदार नीलकंठ हैबतराव हाही वारला. त्यास तीन मुलगे होते. त्यांपैकीं वडील मुलानें विजापूरचे सुलतानाचे हुकुमाची वाट न पाहतां, तो आपण एकटाच किल्ल्यावरील शिबंदीवर अंमल चालवूं लागला, व त्यानें सभोंवतालील रानें व जमिनी आपल्या ताब्यांत घेतल्या. यामुळें, त्याचे दोघे धाकटे भाऊ त्यांशीं भांडूं लागून, त्यांनीं तो आपला कज्जा शिवाजी महाराजांकडे निवाड्याकरितां आणिला. महाराजांचें अंग धाकटे भावांकडे होतें. ते कांहीं मावळे लोक बरोबर घेऊन, सुप्याकडे जाण्याच्या मिषानें पुरंदर किल्ल्याखालीं येऊन उतरले. महाराज समक्ष खालीं आले आहेत, तेव्हां त्यांस अर्थातच प्रथम किल्लेदाराचे मुलगे आपला वाद सांगण्याकरितां किल्ल्यावर घेऊन गेले. तेथें गेल्यावर रात्रीं वडील भाऊ निजला असतां, महाराजांनीं धाकटे भावांशीं मसलत करून आपली फौज किल्ल्यावर आणिली, व त्यास कैद केलें, आणि किल्ला व त्यावरील शिबंदी हीं सर्व आपले ताब्यांत घेतलीं. यानंतर महाराजांनीं तिघे भावांची परस्परांत समजूत घालून व त्यांस इनामगांव वगैरे देऊन,

त्यांस त्यांनीं आपले पदरीं चाकरीस ठेविलें, व तेही महाराजांची सेवा इमानइतबारें करूं लागल्यामुळें, ते यापुढें चांगल्या योग्यतेस चढले.

येणेंप्रमाणें शिवाजी महाराजांनीं एक वर्षाचे आंत, विशेष गडबड किंवा रक्तपात न करितां, तीन मजबूत किल्ले हस्तगत केले, व एक त्याहूनही जबरदस्त असा नवीनच किल्ला बांधिला. यानंतर त्यांची नजर विशेष फांकून, ते वर सांगितल्यापेक्षांही अधिक अचाट व साहसाचीं कृत्यें करण्यास प्रवृत्त झाले. निजामशाहींपैकीं कोंकणपट्टीचा मुलूख, हा विजापूरचे सुलतानास १६३६ यासालीं मिळाला, ह्मणून मागें सांगितलेंच आहे. त्यापैकीं कल्याणप्रांत हा, भिवंडीपासून नागोटण्यापर्यंत, यावेळीं मुल्लाना अहंमद ह्मणून सुभेदार होता त्याजकडे होता. त्याचे ताब्यांत घांटाखालीं व वरती असे बरेच किल्ले होते; परंतु त्यांचा चांगला बंदोबस्त नसे. इकडे शिवाजी महाराजांनीं मावळे लोक अधिकाधिक जमा करून व त्यांस चांगलीं हत्यारें वगैरे देऊन, बरीच मोठी फौज तयार करण्याचा झपाटा चालविलाच होता. त्याचप्रमाणें चांगले हुषार मसलती असे कारकून पाठवून, त्यांजकडून कल्याणप्रांतांतील हालहवालीचा छडानछडा गुप्त बातमी त्यांनीं ठेविली होती. मुल्लाना सुभेदाराकडून प्रांताचा खजिना विजापूराकडे रवाना होत आहे, ही खबर शिवाजी महाराजांस लागतांच, त्यांनीं निवडक ३०० बारगीर घोडेस्वार व मावळे लोकांचें कांहीं पायदळ बरोबर घेऊन, खजीन्याबरोबर असणारे शिपायांवर एकाएकीं हल्ला केला, व त्यांची दाणादाण करून त्यांस पळवून लाविलें. मग तो सर्व खजिना बारगीर लोकांचे स्वाधीन करून, तो ते राजगडास मोठे त्वरेनें सुरक्षित घेऊन आले. ह्या विलक्षण कृत्यानें, महंमद आदिलशहाचा महाराजांचे उद्योगाबद्दलचा संशय अगदीं फिटला; परंतु खजीना लुटल्याचे बातमीचे पाठोपाठ, शिवाजी महाराजांनीं कांगारी, तिकोना, लोहगड, भोरप, केलना वगैरे किल्ले घेऊन मावळ प्रांत सर्व जिंकला, हीही बातमी विजापूरास येऊन थडकली. यानंतर थोडे दिवसांनींच, कोंकणांत तळें, घोसाळें, रायरी वगैरे किल्ले हे महाराजांनीं काबीज

ले, व कित्येक शहरें लुटलीं. या मोहिमींत महाराजांस पुष्कळ
संपत्ति मिळाली, व ती ते सर्व राजगडास घेऊन गेले ( १६४८ ).

१० परंतु नुसते किल्ले घेणे किंवा शहरें लुटणें, यापेक्षांही महाराजांचे
विजयाची धांव आतां पुढें सरसावली. त्यांनीं, आबाजी सोनदेव यास
कल्याणाकडे फौजा देऊन पाठविलें असतां, त्यानें एकाएकीं मुल्लाना
अहंमद याजवर छापा घालून त्यास कैद केलें, व त्या प्रांतांतील
सर्व किल्ले स्वाधीन करून घेतले. महाराजांस ही बातमी कळतांच, ते
तत्काळ कल्याणास गेले, व आबाजीचे हुषारीबद्दल व त्याचे शौर्या-
बद्दल त्याची तारीफ करून, त्यांनीं त्यास, त्यानें जिंकलेले प्रांतांचा
सुभेदार म्हणून नेमिलें. तसेंच महाराजांनीं मुल्लाना सुभेदारास कैदेंतून
काढून, त्याचा चांगला सन्मान राखिला, व त्यास विजापुराकडे परत
जाण्यास परवानगी दिली. असें सांगतात कीं, मुल्लाना याची सून
मोठी रूपवती असून, तीही आबाजी सोनदेव याचे हातीं यावेळीं
लागली होती. पुढें महाराज आल्यावर आबाजी यानें, ती सरका-
रांनींच ठेवावी असें सुचविलें असतां, महाराजांनीं त्याचा निषेध करून
उत्तर केलें, " ही स्त्री आह्मांस मातेप्रमाणें आहे. ज्यास यश पाहिजे,
त्यानें परस्त्रीचा अभिलाष करूं नये. तेणेंकरून रावणादि क्षयास
गेले!!* "

कल्याण प्रांत जिंकल्यापासून शिवाजी महाराजांचे हिंदुपादशा-
हीस आरंभ झाला असें ह्मटलें पाहिजे. त्यांनीं एकदम त्या प्रांतांत
आपले तर्फे जमाबंदीचे कामास सुरुवात केली. लोकांचे वतन, हक्क
वगैरे कायम केले. ब्राह्मणांचीं व देवस्थानांचीं उत्पन्नें कायम करून
वाढविलीं, व प्रजेस हरप्रकारें सुख होऊन, त्यानीं महाराजांचें राज्य
चिरकाल चालो, अशी ईश्वराजवळ प्रार्थना करावी, अशा तऱ्हेनें त्यांनीं
व्यवस्था केली. कल्याण प्रांताचे दक्षिणेस जंजिरा येथील सिद्धी
याचा मुलूख होता. त्याचे प्रांतांतील तळें, घोंसाळें, रायरी वगैरे किल्ले

* चिटणीस यांची बखर.

मराठ्यांनीं घेतले ह्मणून मागें सांगितलेंच आहे; परंतु हा हबशांचा मुलूख आपले विशेष वचकेंत रहावा, ह्मणून शिवाजी महाराजांनीं रायरीजवळ लिंगाणा, व घोंसाळ्याजवळ बिरवाडी ह्मणून दोन नवीनच किल्ले बांधिले.

११ कल्याणाकडून येणारा खजीना लुटला, किल्ले घेतले, सुभेदारास कैद करून सर्व प्रांत सर केला, इत्यादि खबरी एकामागून एक ऐकून, विजापूर येथें लोकांत मोठी चळवळ उडून गेली; परंतु सुलतानास त्याचें फारसें कांहीं वाटलें नाहीं. त्याची समजूत अशी झाली कीं, हें सर्व कृत्य शहाजी राजे यांचेंच असलें पाहिजे. कर्नाटकांतून रेंदुल्ला-खान हा परत विजापुरास आल्यापासून, त्या प्रांतांत राजे हेच एकटे राहिल्याकारणानें, त्यांचें बळ अधिक होऊं लागलें होतें. शिवाय शिवाजी महाराजांनीं उपस्थित केलेलें बंड हें, शहाजी राजे यांचेच जहागिरी मुलखांत उत्पन्न झालें असून, ज्या प्रांतांत पूर्वीं त्यांचा अम्मल चालत होता, त्यावरच काय तें बळावलें होतें. तेव्हां शहाजी राजे यांचा बंदोबस्त केला ह्मणजे त्यांचे पुत्राचें बंड सहजच मोडून जाईल; विशेष फौजफांटा त्याचे निवारणार्थ पाठविण्याची गरज नाहीं, असा विचार करून, सुलतान महंमद आदिलशहा यानें, मुधोळचा देशमुख बाजी घोरपडे, जो शहाजी राजे यांचेबरोबरच कर्नाटकांत होता, त्यास गुप्त हुकूम पाठविला कीं, राजे यांस कैद करून आमचेकडे पाठवावें. त्याप्रमाणें घोरपडे यानें शहाजी राजे यांस आपले घरीं भोजनास बोलावून, तेथें दगा करून कैद केलें, व सुलतानाकडे त्यांस विजापुरास पाठवून दिलें. ( १६४९ )

शहाजी राजे यांस विजापुरास आणल्यावर, सुलतानानें त्यांस निक्षून सांगितलें कीं, 'तुमचे पुत्रानें मावळांत मोठा दंगा मांडून किल्ले घेण्याचा व शहरें लुटण्याचा सपाटा लाविला आहे. आह्मांस पक्कें ठाऊक आहे कीं, या कामांत तुमचें अंग निखालस आहे. तर तुह्मीं हें बंड मोडल्यावांचून आमचें मन तुह्मांविषयीं साफ होणार नाहीं. तुह्मीं शिवाजीस पत्र पाठवून याचा तडकाफडकी बंदोबस्त केला पाहिजे.'

यावर शहाजी राजे यांनीं उत्तर केलें कीं, " माझा या कामांत बिलकुल हात नाहीं. शिवाजी माझें मुळींच ऐकत नाहीं, व तो सरकारचा जितका गुन्हेगार आहे, तितका तो माझाही गुन्हेगार आहे. सरकारांनीं खुशाल त्याजवर फौज पाठवून त्याचा योग्य बंदोबस्त करावा. त्यांत माझी कांहीं आडकाठी नाहीं. " येणेंप्रमाणें शहाजी राजे यांनीं, पुत्राचे बंडांत आपलें अंग नाहीं, याबद्दल सुलतानाची खात्री करण्याकरितां पुष्कळ सांगितलें; परंतु महंमद आदिलशहास त्यांचें ह्मणणें खरें वाटेना. त्यास मोठा राग येऊन, त्यानें शहाजी राजे यांस एका तळघरांत कोंडिलें, व त्यांस निक्षून सांगितलें कीं, शिवाजीचें बंड अमुक दिवसांत जर न मोडेल, तर तळघराचें दार आह्मीं बुजवून टाकूं ! !

वडिलांवर आलेल्या या भयंकर प्रसंगाची बातमी शिवाजी महाराजांस कळतांच ते फार घाबरून गेले. प्रथम त्यांस सुलतानास आतां शरण गेल्यावांचून गत्यंतर नाहीं असें वाटलें; परंतु त्यांची बायको सईबाई हिनें त्यांस सल्ला दिला कीं, " सुलतानास शरण जाऊन व त्याचे स्वाधीन होऊन आपला इष्ट हेतु सिद्धीस जाणार नाहीं; यवन लोक ह्मणजे मोठे दगेबाज असतात; त्यापेक्षां आपले पराक्रमासच वचकून ते काय वळतील तें खरें. " शिवाजी महाराजांना बायकोचें हें बोलणें खरें वाटलें. त्यांनीं आतां नवीनच एक मसलत काढली. त्यावरून इतके लहान वयांतही त्यांचें पुढील गोष्टीविषयींचें धोरण, बुद्धिकौशल्य व हुषारी हीं दिसून येतात. त्यांनीं इतके दिवस विजापूरचे मुलखांतच काय ती धामधूम चालविली होती; परंतु दिल्लीचे मोंगल बादशहाचे मुलखास त्यांनीं अगदीं उपद्रव लाविला नाहीं. मोंगलांची शक्ति फार अधिक आहे हें त्यांस ठाऊक होतें, व शिवाय विजापूरकरांनीं आपणांस कधीं पेंचांत आणिलें तर, दिल्लीचे बादशहाचा तरी आपणास आस्रा रहावा, ह्मणून त्यांनीं वरील सावधगिरी केली होती. शहाजी राजे यांजवर आलेल्या संकटाचे निवारणार्थ, त्यांनीं एकदम दिल्लीचा बादशहा शहाजहान याजकडे संधान लावून, त्याचे कानांवर आपली सर्व हकीकत घातली. बादशहास शहाजी राजे यांचे पराक्रमाबद्दल अगोदरपासून खात्री होतीच, व शिवाजी महाराज यांचे नूतन

धामधुमीबद्दलही त्यास बातमी कळली होती. यामुळें हे दोघे मराठे सरदार आपलेसे झाले असतां, पुढें मागें आपणांस त्यांपासून दक्षिणेंतील राज्य वाढविण्यास चांगला उपयोग होईल, अशा समजुतीनें बादशहानें शिवाजी महाराजांस उत्तर पाठविलें कीं, ' शहाजीराजे यांस मुक्त करण्याबद्दल आह्मीं विजापूरचे सुलतानास लिहितों; त्यांचे मागील आगळीकीबद्दलही आह्मीं त्यांस माफी देऊन, त्यांस पुन्हां आपले चाकरीस ठेवूं. शिवाय तुह्मां स्वतःस पांच हजार घोडेस्वारांचीही वेगळी मनसब नेमून देऊं. '

शहाजहान बादशहाचे पत्रावरून व मुरारपंताचे रदबदलीवरून, सुलतान महंमद आदिलशहा यानें शेवटीं शहाजीराजे यांस तळघरांतून काढिलें, व त्यांची जमानत घेऊन, त्यांस विजापुरांतले विजापुरांतच नजर कैदेंत ठेविलें. आपले वडील तर मुक्त झाले; परंतु आतां आपणांस बादशहाचे चाकरीस गेलें पाहिजे हें मनांत येऊन, शिवाजी महाराजांस कांहीं वेळ मोठी फिकीर पडली; परंतु त्यांनीं युक्तीनें, जुन्नर व अहंमदनगर या प्रांतांतील देशमुखीचे आमचे वडिलोपार्जित हक्क आहेत, त्यांबद्दल राहिलेली आमची बाकी आह्मांस मिळावी, असें मध्येंच खुसपट घालून व त्याबद्दल अर्ज देऊन आपला वकील आग्र्यास बादशहाकडे पाठवून दिला. त्यांचे मनांतील हेतु असा कीं, या हक्कांचे बाबीबद्दल बोलण्याचालण्यांतच पुष्कळ वेळ निघून जावा, आणि आपण बादशहाचे चाकरीस राहण्याची गोष्ट लांबणीवर पडावी. शिवाजी महाराजांची ही युक्ति पूर्ण सफल झाली. कारण, दिल्लीसारख्या बादशाही दरबारांत देशमुखीचे बाबीसारख्या क्षुल्लक बाबींचा निकाल लवकर लागतो कशाला? शेवटीं बरेच दिवसांनीं वकिलास बादशहानें सांगितलें कीं, ' तूर्त तुमचे हक्कांबद्दल आह्मांस विचार करितां येत नाहीं; परंतु शिवाजीराजे आग्र्यास दरबारास आल्यावर त्याचा आह्मीं विचार पाहूं. ' ( १६५० )

शिवाजी महाराजांस तरी हेंच पाहिजे होतें. तूर्त आपले वडील कसे तरी संकटांतून मुक्त तर झाले; आतां यापुढें बादशहाचे चाकरीस

राहतों किंवा नाहीं, या गोष्टीचा निकाल आग्र्यास त्याचे भेटीस जाईपर्यंत कांहीं न लागतां, ती गोष्ट सहजच मोघमांत राहून लांबणीवर पडून राहिली हेंही बरेंच झालें, असें त्यांस वाटलें. असो; महाराजांनीं यापुढें चार वर्षेंपर्यंत शहाजीराजे हे नजर कैदेंतून सुटेपर्यंत, विजापूरचे मुलखास अगदीं उपद्रव दिला नाहीं, व सुलतानानेंही त्यांजवर फौज वगैरे पाठवून त्यांचा बंदोबस्त करण्याची खटपट केली नाहीं. महाराजांचा हेतु असा कीं, आपण अधिक दंगा केला, तर त्यापासून आपले वडिलांस पुन्हां त्रास सोसावा लागेल, व सुलतानाचा हेतु असा कीं, शिवाजी महाराजांस विशेष पेचांत आणण्याची खटपट केली, तर कदाचित् ते अविचारानें एकदम आपले हातीं आलेला मुलूख मोंगल बादशहाचेच स्वाधीन करून त्याचे चाकरीस राहतील; आणि १६३६ सालचे तहांत ठरलेला विजापूरचे सुलतानाकडून बादशहास येणारा करभार बरेच वर्षें थकला असल्यामुळें, बादशहासही हा मुलूख घेण्यास वस्तुतः सबळ कारण झालें होतें. हा विचार मनांत येऊन, महंमद आदिलशहानें शिवाजी महाराजांचे बंदोबस्ताकरितां उघड अशी कांहींएक खटपट केली नाहीं; तथापि महाराजांवर गुप्त छापा घालून त्यांस पकडण्याचा मात्र त्यानें यत्न केला. बाजी शामराज म्हणून कोणी त्याचे पदरीं शिलेदार होता. त्यानें, महाराज हे महाड येथें आहेत अशी बातमी ठेवून, चंद्रराव मोरे यांचे मुलखांत फाडझांटाखालीं महाराजांवर छापा घालण्याचे बेतानें शिपायांची एक टोळी बरोबर घेऊन दबा धरून बसला; परंतु शिवाजी महाराजांस या दग्याची बातमी अगोदरच लागली असल्यामुळें, त्यांनीं उलट बाजी शामराज याचे टोळीवर एकाएकीं तुटून पडून, त्यांतील पुष्कळांचा नाश केला, व बाकीच्यांस जंगलांत पळून लाविलें! ( १६९२ )

१२. शहाजीराजे यांनीं, सुलतानानें आपणांस कर्नाटकांत आपले जहागिरीकडे परत पाठवावें म्हणून पुष्कळ खटपट केली; परंतु सुलतानाचें मन त्या गोष्टीकडे वळेना. शेवटीं १६९३ यासालीं कर्नाटक प्रांतांत अतोनात बखेडा झाल्यामुळें, राजे यांस तिकडे बंदोबस्त करण्याकरितां पाठवावें, असें महंमद आदिलशहा यांस वाटलें; परंतु

राजे यांस बाजी घोरपडे यानें विश्वासघात करून पकडून आणून दिलें होतें, त्याबद्दल ते घोरपडे याशीं दावा करतील ह्मणून, प्रथम दोघांकडून, मागील झालेल्या गोष्टी आतां आपण विसरून गेलों, त्याबद्दल या पुढें उभयतांचे मनांत कांहीं राहिलें नाहीं, अशाविषयीं आणा शपथा घेऊन सुलतानानें दोघांस रवाना केलें; परंतु राजे यांचे मनांतून घोरपडे यांचे विषयींचा राग अगदीं गेला नाहीं. त्यांनीं कर्नाटकांत जातेवेळीं शिवाजी महाराजांस निरोप पाठविला कीं, "तुह्मीं जर खरोखर माझे पोटचे असाल, तर बाजी घोरपडे याचे विश्वासघाताबद्दल त्याचा चांगला सूड उगविल्यावांचून कधींही राहणार नाहीं!"

शहाजीराजे कर्नाटकांत येऊन पाहतात तों, खरोखरच तेथें पूर्वीं केलेला बंदोबस्त कांहीं राहिला नाहीं. प्रत्येक छोटेखानी जमेदार, सरकारी अम्मलदार यांस न जुमानतां लूटालूट करून, व शेजारचे जमेदारांशीं युद्ध करून आपला मुलूख वाढवूं पाहत होता. खुद्द राजे यांचे जहागिरीचाही बराच भाग शेजारचे जमेदारांनीं बळकाविला होता. यांपैकीं कनकगिरी येथील किल्लेदारावर त्यांचें पारिपत्य करण्याकरितां, राजे यांनीं आपला वडील पुत्र संभाजीराजे यांस बरोबर कांहीं फौज देऊन पाठविलें होतें; परंतु विजापूरचा सरदार अफजूलखान * यानें कांहीं दगा केल्यामुळें, संभाजीराजे या मोहिमेवर ठार झाले, व त्यांचे फौजेची अर्थातच दाणादाण झाली. संभाजीराजे यांजवर त्यांचे वडिलांची विशेष प्रीति असल्यामुळें, त्यांचे मृत्युमुळें शहाजीराजे यांस अत्यंत दुःख झालें. यांनीं या नंतर कनकगिरीवर मोठा मारा करून तो किल्ला घेतला, व आंतील लोकांची कत्तल करून पुत्राचे वधाचा सूड उगविला! अफजूलखान हा आपले प्रमाणेंच सरकारी अंमलदार पडला, त्याचें पारिपत्य आपणास तात्काळ करणें बरोबर नाहीं; सुलतानाजवळ गेल्यावर त्याबद्दल पाहून घेऊं, असा विचार करून शहाजीराजे यावेळीं स्वस्थ राहिले.

* सभासद व चिटणिस यांच्या बखरी व अफजूलखानाचे खुनावरील पोंवाडा.

# भाग ७.

## शिवाजी महाराज—अफज़ूलखानाचा वध.

१. शिवाजी महाराजांस तुकाराम बोवा, रामदासस्वामी वगैरे साधूंचे समागमाची इच्छा होते. त्यांस स्वामींनीं केलेला उपदेश. त्याजपासून महाराजांचे आचरणावर झालेले परिणाम. २. जावलीचा राजा चंद्रराव मोरे, त्याजवर महाराज गुप्त स्वारी करून त्याचा नाश करितात. ३. दक्षिण प्रांतावर औरंगजेब याची नेमणूक. त्याची व्यवस्था. त्याची महत्वाकांक्षा. विजापूर व गोवळकोंडे येथील राज्यांत कुरापती काढण्याचा त्याचा यत्न. कुतुबशहा व त्याचा वजीर मीर जुमला. औरंगजेबाची कुतुबशहावर कपटाची स्वारी. कुतुबशहा शरण येतो. मीर जुमला हा दिल्लीहून दक्षिणेंतील फौजेवरचा मुख्य अधिकारी ह्मणून नेमिला जातो. त्याचे व औरंगजेब याचे आदिलशाहीविरुद्ध बेत. महंमद आदिलशहा मरण पावतो. त्याचे मागून त्याचा मुलगा दुसरा अल्ली आदिलशहा हा मोंगल बादशहाची परवानगी न घेतां गादीवर बसतो. त्यावरून औरंगजेब हा विजापूरचे मुलखावर स्वारी करून राजधानीस वेढा देतो. आदिलशहा शरण येऊन, एक कोट रुपये खंडणी देण्यास तयार होतो ४. इतक्यांत शहाजहान बादशहाचें भयंकर आजाराचें वर्तमान येऊन पोहोंचतें. दारा व औरंगजेब यांचे स्वभावांचें वर्णन. औरंगजेब हा आपला भाऊ सुलतान मुराद याशीं सल्ला करून, दोघे दारावर स्वारी करण्याकरितां उत्तर हिंदुस्थानांत निघून जातात. शहानहान बादशहास कैद करून, औरंगजेब हा स्वतः बादशहा होतो. ५. औरंगजेब व शिवाजी महाराज यांचे परस्परांविषयींचे विचार. मोंगलांची फौज विजापुरावर चालून गेली, ही संधि पाहून शिवाजी महाराज, जुन्नर, अहंमदनगर वगैरे मोंगल लोकांचे ठाण्यांवर हल्ला करून तीं लुटतात. ते आपली पागा अधिक वाढवितात. सरनोबत व पेशवा यांच्या नेमणुका. विजापूरचे सुलतानाबरोबर मोंगलांचा तह झाल्यामुळें, तिकडील लढाई एकदम बंद पडते. यामुळें शिवाजी महाराज औरंगजेबाशीं नम्रभाव दाखवितात. दोघांचा पत्रव्यवहार. ६. जंजिऱ्याचा सिद्धी फत्तेखान, त्याजवर शिवाजी महाराज हे शामराजपंत पेशव्यास पाठवितात. शामराजपंताचा पराजय होतो. त्यास महाराज कामावरून काढून टाकितात, व त्याचे जागीं मोरो त्रिमल पिंगळे यास पेशवा करितात.

सिद्दी याजवर महाराज, रघुनाथ बल्लाळ, नेताजी पालकर व मोरोपंत पिंगळे यांस फौजा देऊन रवाना करितात. ७. विजापूरचे दरबारची हकीकत. शिवाजी महाराजांचे बंदोबस्ताकरितां अफजलखानाची रवानगी. तो पंढरपुराचे वाटेनें पुण्याकडे कूच करून येतो. महाराजांची त्याजबरोबर युद्ध करण्याची तयारी. महाराज अफजूलखानास अगदीं नम्रपणाचे निरोप पाठवून, त्यास भुलविण्याचा यत्न करितात. खान हा आपण भुलल्यासारखें दाखवून, शिवाजी महाराजांस त्यांनीं पसरलेल्या कपटाचे जाळ्यांत त्यांसच पकडण्याची हांव धरितो. महाराज हे प्रतापगडावर बंदोबस्तानें राहतात व खान हा वांई येथें फौजेचा तळ देऊन राहतो. अफजूलखान हा महाराजांकडे आपला वकील दत्ताजी गोपीनाथ यास पाठवितो. तो खानाचा मायावी भाषणाचा निरोप महाराजांस कळवितो. ८. महाराज युक्तीनें वकीलास फिसलावून आपणाकडचा करून घेतात. खानास ठार करण्याचा त्यांचा बेत ठरतो. खान, महाराजांची भेट किल्ल्याखालीं घेण्यास कबूल होतो. भेटीकरितां महाराजांची तयारी. ९. महाराज अंगरख्याखालीं चिलखत वगैरे घालून पूर्ण बंदोबस्त करितात. अफजूलखान भेटीस येतो. महाराज किल्ल्याखालीं उतरतात. खान व महाराज हे एकमेकांस भेटतात. इतक्यांत खान हा आपली मान खाकेंत दाबून धरितो असें महाराजांस वाटल्यावरून, ते मागें सरून खानाचे पाटांत वाघनख खुपसतात. दोघांची झटापट होऊन खान पडतो. १०. विजापूरचे सैन्यावर चोहोंकडून हल्ला होऊन त्याची दाणादाण होते. त्यांपैकीं जे हातीं लागले, त्यांची महाराज चांगली व्यवस्था ठेवितात. प्रतापगडावरील महोत्साह. अफजूलखानाचे वधासंबंधानें निरनिराळीं मतें. त्यांचा विचार. ११. खानाचे वधामुळें विजापूरास झालेला हाहाःकार. शिवाजी महाराज कोल्हापूर प्रांत लुटतात. पन्हाळा, रांगणा, वसंतगड वगैरे किल्ले हस्तगत करून खुद्द विजापुरापर्यंत खंडण्या वसूल करितात. १२. विजापुरास पुनः दुसरे मोहिमेची तयारी चालते. तिजवर सिद्दीजोहार याची नेमणूक होते. जंजिऱ्याचा सिद्दी व वाडीचे सावंत देशमुख हेही महाराजांवर उठतात. महाराजांचा बंदोबस्त. ते स्वतः पन्हाळ्याचे किल्ल्यावर असतां, त्यास सिद्दीजोहार हा वेढा घालतो. महाराजांचें संकट. महाराज मोठे युक्तीनें किल्ल्यावरून उतरून शत्रूंचे वेढ्यांतून निघून जातात. त्यांचे मागें विजापूरचें सैन्य लागतें. बाजी परभु याचा विश्वासुपणा व पराक्रम. तो लढाईत पडतो. १३. सुलतान अल्ली आदिलशहा याचे पोटांत सिद्दी जोहार याचे इमानाविषयीं संशय येतो. सिद्दी यास ती बातमी लागुन, तो सुलतानाचे भेटीस न येतां,

कर्नूलकडील आपले जहागिरीकडे निघून जातो. १४. सुलतान अली आदिलशहा हा पन्हाळा, पावनगड वगैरे सह्याद्रीचे लगतचे कित्येक किल्ले पुन: काबीज करून घेतो. इकडे शिवाजी महाराज राजापूर व शृंगारपूर हीं गांवें लुटून घेतात. त्यांचे बंदोबस्ताकरितां, आदिलशहा हा सावंत बहिलोलखान व बाजी घोरपडे यांची नेमणूक करून, आपण स्वत: कर्नाटकांतील जमेदारांचें बंड मोडण्याकरितां जातो. १५. शिवाजी महाराज, बाजी घोरपडे याजवर एकाएकीं छापा घालून त्याचा नाश करितात. सावंत यांचा पाडाव होतो. ते शिवाजी महाराजांस शरण येऊन, त्यांचे पदरीं राहतात. जंजिऱ्याचे सिद्दीचा पराभव व त्याशीं तह. १६. महाराज आरमार तयार करून, त्याजवर दर्या, सागर व माय नामक भंडारी यांची नेमणूक करितात. १७ विजापूरचा वजीर अबदूल महंमद, हा शहाजी राजे यांस मध्यस्ती करण्याकरितां शिवाजी महाराजांकडे पाठवितो. शहाजी राजे व शिवाजी महाराज यांची भेट. विजापूरचे सुलतानाबरोबर तह. १८. शिवाजी महाराजांचे राज्याचा विस्तार.

१. मागील भागांत, शिवाजी महाराजांनीं आपले पराक्रमानें राज्य कसें संपादन केलें हें सांगितलें; परंतु राज्य कसें चालवावें, राजांचे धर्म कोणते, प्रजा कशानें सुख पावून आपणांस राजी होतील, शत्रूशीं साम, दाम, दंड, भेद हे कसे करावे, तो जित झाला असतां, त्याचा आदर करून व त्यास ममतेंत घेऊन, त्यास आपलेसें कसें करून घ्यावें इत्यादि गोष्टी, ज्या शककर्ते राजांस अवश्य माहीत पाहिजेत, त्या महाराजांस कशा अवगत झाल्या, हें सांगणें राहिलें; ह्मणून पुढील कथाभाग चालविण्याचे अगोदर तेंच प्रथम येथें सांगतों.*

वर सांगितलेलीं राजनीतीचीं तत्वें, महाराजांचे हृदयांत, बालपणापासून पुराणादिकांतील भीष्मनीति, नारदनीति, व्यासनीति वगैरे कथाभागांवरून बिंबलीं होतींच; परंतु तीं पूर्णपणें दृढ होण्यास, या वेळीं जे अनेक साधुसंत—तुकारामबोवा, रामदास स्वामी, मोरया

* या गोष्टींचा इंग्रजी इतिहासांतून नुसता उल्लेख आहे. त्यांबद्दल विशेष खुलासा जो पाहिजे तो त्यांत केला नाहीं. तो चिटणिस यांचे बखरींत चांगला केला आहे. तो बरा दिसल्यावरून तो येथें संक्षेपरूपानें घेतला आहे.

गोसावी, रंगनाथ स्वामी, निंबाजी बोवा वगैरे—होते, त्यांचा सहवास व उपदेश हे विशेष कारणीभूत झाले. तुकाराम बोवांची अकिंचन वृत्ति, त्यांचा साधा व अदांभिक स्वभाव, त्यांच्या प्रेमळ व प्रासादिक कथा, यांजवरून त्यांचा लौकिक बराच चोहोंकडे पसरला होता. शिवाजी महाराजांस लहानपणापासून कथा कीर्तनांचा नाद असेच; परंतु तुकाराम बोवांचे कीर्तनांचें तर त्यांस यावेळीं वेडच लागलें. बोवांचे कीर्तनांचा सर्व भर पांडुरंगभक्तीवर असून, कलियुगांत मुक्तीचा मार्ग ह्मटला ह्मणजे, सर्वसंग परित्याग करून, पांडुरंगभजन हेंच होय, या तत्वाचें ते प्रतिपादन करीत. शिवाजी महाराजांची मूळ प्रकृति पूर्ण चंचल असल्यामुळें, तुकाराम बोवांचा हा बोध त्यांचे मनांत ठसून, आपण उद्योग आरंभिला आहे तो केवळ व्यर्थ आहे, असें त्यांस वाटूं लागलें. तेव्हां बोवांची एकदां गांठ घेऊन, त्यांचा गुरुपदेश घ्यावा अशी त्यांस इच्छा उत्पन्न झाली. त्यांनीं तुकाराम बोवांस घेऊन येण्याकरितां, उंची उंची पोषाख, रत्नांचे अलंकार, पालखी, अबदागिरी वगैरे सरंजाम बरोबर देऊन कारकून, शिपाई यांस बोवांकडे पाठविलें; परंतु त्या अकिंचन पांडुरंग भक्तास या ऐश्वर्याचें काय मोल!! त्यानें शिवाजी महाराजांचे मनुष्यांस त्यांचे सर्व सरंजामासुद्धां तसेंच परत पाठवून दिलें. मात्र महाराजांस उत्तर ह्मणून २२ अभंग लिहून ते त्यांजबरोबर धाडिले. * त्यांतील

---

* या अभंगांपैकीं कांहीं विशेष चटकदार आहेत ते खालीं देतों:—

अरण्यवासी आह्मीं फिरो उदासिन ॥ दर्शन हें हीन अमंगळ ॥
वस्त्रावीण काया झालीसे मलीन ॥ अन्नरहित जीर्ण फलाहारी ॥
× × × × ×
तुह्मापाशीं आह्मीं येऊनीया काय ॥ वृथा शीण होय चालण्याचा ॥
मागावें हें अन्न तरी भिक्षा थोर ॥ वस्त्राचीये थार चिंध्याविंदीं ॥
निद्रेशीं आसन उत्तम पाषाण ॥ वरी तें प्रावर्ण आकाशाचें ॥
× × × × ×
पांडुरंगीं आमुची झाली पूर्ण भेटी ॥ हातांत नरोटी दिधली देवें ॥
विठ्ठलाचे दास केवळ भिकारी ॥ आह्मां लागीं हरी उपेक्षीना ॥
शरण असावें रामदासा लागीं ॥ नमन साष्टांगीं घाली त्यासी ॥

तात्पर्य असें आहे कीं, "आमचे सारखे अरण्यवासी देवभक्तांचे दर्शनापासून तुह्मांस तादृश कांहीं लाभ नाहीं; तथापि विठ्ठल भेटून मुक्ति मिळावी ही जर तुह्मांस इच्छा असेल, तर तुह्मीं रामदास स्वामींची उपासना करावी; ह्मणजे तुमचा हेतु साध्य होईल."

तुकारामबोवांनीं महाराजांस रामदासस्वामींकडे जाण्यास सांगितल्यावरून ते स्वामींचेकडे गेले. रामदास स्वामी हे केवळ परमार्थदृष्टि साधु नसून, ते व्यवहारज्ञानीही होते; यामुळें ते राजगुरु होण्यास इतर साधुसंतांपेक्षां विशेष योग्य होते. राजे लोकांस मुक्तीचा मार्ग ह्मणजे, अनुष्ठानें, देवभजन, जपजाप्य हे नव्हत; तर यथायोग्य प्रजापालन करणें, जे दुष्ट लोक प्रजेस पीडा देत असतील त्यांस शासन करणें, गोब्राह्मण साधुसंत यांचें रक्षण करणें इत्यादि कृत्यें हाच होय, असा त्यांनीं महाराजांस उपदेश केला. तुकाराम बोवांचे एकदेशीय कीर्तनापासून महाराजांचे मनांत, त्यांनीं आरंभिलेले महदुद्योगाविषयीं जी शिथिलता उत्पन्न झाली होती, ती स्वामींचे उपदेशानें नाहींशी होऊन, त्यास या नवीन उपदेशानें विशेष तरतरी आली. स्वामींनीं महाराजांचे पराक्रमाबद्दल व त्यांनीं हिंदुस्वराज्य व हिंदुधर्म स्थापना याकरितां आरंभिलेला उद्योग, याबद्दल त्यांची पाठ थोपटली, व तुमचे सर्व मनोरथ सिद्ध होतील, असा आशीर्वाद दिला. ते ह्मणाले कीं, "तुह्मीं संकट समयीं श्री देवीचें स्मरण करावें; ती हृदयस्थ होऊन आज्ञा करील तसें करीत जावें. दासबोधाचा पाठ नेहमीं करीत असावा." महाराजांस हा अनुग्रह सन १६४९ या सालीं झाला.

येणेंप्रमाणें राजगुरु रामदास स्वामी व इतर साधु यांचा समागम व सदुपदेश हे शिवाजी महाराजांस वेळोवेळीं होत गेल्यानें, मोठे वीरपुरुषांचेठायीं, उत्छृंखलपणा, मदोन्मत्तपणा, विनाकारण रक्तपाताविषयीं इच्छा वगैरे जे दुर्गुण साहजिक उत्पन्न होतात, ते शिवाजीमहाराजांचेठायीं उत्पन्न झाले नाहींत. शत्रु जित झाला असतां त्याचा मान ठेवणें, रूपवती स्त्रिया सांपडल्या असतां त्याविषयीं वाईट वासना न धरितां त्यांस त्यांचे आप्तवर्गाकडे पाठवून देणें, शत्रूकडील लोक

हस्तगत झाले असतां, त्यांचा परामर्ष घेऊन व त्यांचीं मनें वळवून, त्यांस आपले पदरीं ठेवून घेणें वगैरे गुण महाराजांचे ठायीं येण्यास, व त्यांनीं आरंभिलेल्या स्तुत्य उद्योगास चांगलें वळण लागण्यास, संतसमागम कारण झाला. याशिवाय, या समागमाचेयोगानें, सामान्य देवभोळे लोकांत महाराजांविषयीं विशेष पूज्यभाव व भक्ति हीं उत्पन्न झालीं असतील हें सांगणें नकोच.

२. येणेंप्रमाणें महाराजांचे अनुग्रहाचा कथाभाग संपवून, आतां त्याचे पुढील हकीकतीस प्रारंभ करितों. शहाजी राजे यांस कैदेतून काढून सुलतानानें कर्नाटकांत पाठविलें, ह्मणून मागील भागांत सांगितलेंच आहे. त्या प्रांतांत दिवसानुदिवस अधिकाधिक घोंटाळा माजत चालल्यानें, व शहाजी राजे हेही कैदेतून मुक्त झाल्यानें, शिवाजी महाराजांस विजापूरचे मुलुखांत पुनः धामधूम सुरू करून, अधिकाधिक प्रांत जिंकण्यास चांगली सवड झाली. महाराजांनीं सहा वर्षांमागें काबीज केलेल्या प्रांतानजीकच, चंद्रराव मोरे याचा जावळीचा मुलूख होता. त्यानें आपणांस येऊन मिळावें, ह्मणून महाराजांनीं पुष्कळ खटपट केली; परंतु चंद्रराव ह्यानें उघडपणें नाहीं न ह्मणतां, बाजी शामराव यानें महाराजांस पकडण्याची जी खटपट केली होती ह्मणून मागें सांगितलें आहे, तींत त्यानें आपलें अंग ठेविलें. यामुळें चंद्रराव याचेविषयीं शिवाजी महाराजांचे मनांत बरेच दिवसांपासून डांचत होतें; तथापि लढाई करून चंद्रराव याचा पाडाव होणें कठीण, ह्मणून त्याशीं त्यांनीं कपटप्रयोग केला. महाराजांनीं चंद्रराव याजकडे राघो बल्लाळ व संभाजी कावजी या दोन सरदारांस, राव याचे कन्येला आपलेसाठीं मागणी घालण्याचे मिषानें पाठविलें; परंतु त्यांचा आंतील गुप्त हेतु असा होता कीं, वरील दोन सरदारांनीं जावळी येथें जाऊन, तेथील सर्व मुलुखाची गुप्त बातमी मिळवावी. ( १६५९ )

जावळी येथें गेल्यावर राघो बल्लाळ व संभाजी कावजी यांनीं चंद्रराव याची गांठ घेऊन, वरपांगी सोयरीकी संबंधानें पुष्कळ बोलणीं केलीं; परंतु चंद्रराव हा कैफी असून, त्याचे लोकांत फूटही आहे

असें पाहून, चंद्रराव हा बेसावध असतां त्यास ठार मारण्याचा त्यांनीं बेत केला, व तो त्यांनीं महाराजांस लिहून कळविला. महाराजांस तो पसंत पडून, त्यांनीं राघो बल्लाळ याचे मदतीस गुप्तपणें घांटावर फौज पाठवून दिली, व आपणही स्वत: राजगडाहून रात्रीचे रात्रीं कूच करून महाबळेश्वरीं येऊन दाखल झाले. येणेंप्रमाणें सर्व तयारी झालीसें पाहून, राघो बल्लाळ यानें चंद्रराव व त्याचा भाऊ सूर्यराव यांस कांहीं मसलतीसंबंधानें बोलण्याकरितां ह्मणून एकीकडे बोलाविलें, व तेथें ते आले असतां त्या दोघांस विश्वासघात करून एकाएकीं ठार केलें. इतक्यांत चंद्रराव याचीं शिपाईमाणसें अंगावर चालून आलीं असतां, राघो बल्लाळ व संभाजी कावजी हे पळून जाऊन सभोंवतालचे झाडींत घुसले. तेथें महाराज फौज घेऊन तयारच होते. त्यांनीं जावळीवर एकदम चोहोंकडून हल्ला केला. चंद्रराव याचे पुत्र व त्याचा दिवाण हिंमतराव हे चांगले शूरपणें लढले; परंतु अखेर हिंमतराव हा जखम लागून पडला, व चंद्रराव याचे मुलगे कैद झाले. ( १६५५ )

शिवाजी महाराज यांनीं मोठी त्वरा करून चंद्रराव याचा सर्व मुलूख सर केला. वासोट्याचा किल्ला व सावतरें खोरें हीं महाराजांचे हस्तगत झालीं. चंद्रराव याचे पुत्रांनीं कैदेंत असतां सुलतानाकडे पत्र पाठवून मसलत चालविली ह्मणून त्यांस ठार मारिलें; परंतु त्यांच्या स्त्रिया वगैरे होत्या त्यांस महाराजांनीं सोडून दिलें. जावळी घेतल्यानंतर थोडेच दिवसांनीं हिरडस येथील देशमूख बंदल, जो शिवाजी महाराजांस जुमानीत नसे, त्याचा किल्ला रोहिडा यावर महाराजांनीं रात्रीं एकाएकीं हल्ला करून तो सर केला. देशमूख हा सावध असल्यामुळें, त्यानें आपली शिबंदी जमवून किल्ला पुष्कळवेळ मोठे शौर्यानें लढविला; परंतु महाराजांचें सैन्य फार अधिक असल्यामुळें अखेर त्याचा मोड होऊन तो लढाईंत पडला. त्याचा दिवाण बाजी परभू हा ह्या प्रसंगीं मोठे शूरपणें लढला. त्याचा महाराजांनीं चांगला आदर करून, व त्याचे त्यास पूर्वीचे सर्व

हक्क व उत्पन्नही देऊन त्यास आपले पदरीं ठेवून घेतलें. त्याचे हाताखालीं बरीच फौज दिली; व तोही शेवटपर्यंत चांगले इमान इतबारें राहिला. जावळी व हिरडस हे प्रांत जिंकल्यावर तेथें नीट बंदोबस्त रहावा ह्मणून, महाराजांनीं कृष्णा नदीचे उगमाजवळ एक नवीनच मजबूत किल्ला बांधण्याचें योजिलें. या कामावर त्यांनीं, मोरो त्रिमल पिंगळे ह्मणून शहाजीराजे यांचे पदरीं पूर्वी कोणी विश्वासु कारकून होता त्याचा मुलगा होता, त्याची नेमणूक केली. या किल्ल्याचें काम मोरोपंत पिंगळे यानें फार उत्तम रीतीनें बजावल्यावरून तो महाराजांचें मर्जीत दिवसानुदिवस चढत चालला. या नवीन किल्ल्यास प्रतापगड असें नांव ठेविलें. ( १६५६ )

३. इतके दिवस शिवाजी महाराजांनीं विजापूरचे राज्यांतच धामधूम करून त्यांतील किल्ले व मुलूख हे काबीज करण्याचा सपाटा लावला होता; परंतु जागोजाग त्यांस यश येत चालल्यानें, आतां त्यांची नजर अधिक फांकून, ती दिल्लीचे बादशाही मुलुखाकडेही वळली. या मुलुखावर शहाजान बादशहानें आपला तिसरा मुलगा औरंगजेब यास १६५० या सालीं सुभेदार ह्मणून पाठवून दिलें होतें. हा राजपुत्र मोठा हुषार व मेहनती असल्यामुळें, त्यानें निजामशाहीचे मुलुखाची थोडे काळांत चांगली व्यवस्था लाविली. जमिनीचे सारे माफक लावून व चोरवडा अगदीं नाहींसा करून, त्यानें तो देश लवकरच चांगले स्थितीस आणिला. त्यानें खडकी ही आपले मुख्याची जागा करून, तीस औरंगाबाद असें आपलें नांव दिलें; परंतु औरंगजेबाचा मोठा दुर्गुण ह्मटला ह्मणजे, महत्वाकांक्षा हा असल्यामुळें त्यानें शेजारचे राज्यांत कुरापती उपस्थित करून, तीं क्रमाक्रमानें बुडविण्याचा यत्न चालविला. यावेळीं गोंवळकोंडे येथें अबदुल्ला कुतुबशहा हा राज्य करीत होता. त्याची, त्याचा वजीर मीरजुमला याचे पुत्रानें कांहीं आगळीक केल्यामुळें, कुतुबशहानें त्यास शिक्षा केली. यावरून सुलतानाचें आणि वजीराचें भांडण होऊन, वजीरानें औरंगजेब याचे मार्फत शहाजान बादशहाकडे दाद मागितली

औरंगजेबास कांहींतरी निमित्त पाहिजे होतेंच. त्यानें बापास खरें खोटें असे नाना प्रकार कळवून, कुतुबशहाविषयीं त्याचें मन कलुषित केलें; यामुळें बादशहानें रागावून कुतुबशहास मीरजुमल्यासंबंधानें एक दांडगेपणाचें पत्र लिहिलें. त्यावरून कुतुबशहा तर अधिकच खवळून, त्यानें वजीराचे पुत्रास कैद केलें, व त्याची सर्व मालमत्ता जप्त केली. हें वर्तमान औरंगजेबानें बादशहास कळवितांच, बादशहानें फौज तयार करून सुलतानावर एकदम चाल करून जाण्यास हुकूम दिला; तथापि उघड लढाई करण्यापेक्षां, कांहीं कपटप्रयोगानें जर आपला हेतु साध्य होईल तर बरें, असें औरंगजेबास वाटल्यावरून, त्यानें आपला पुत्र सुलतान महंमद याजबरोबर बरेंच सैन्य देऊन, तो बंगाल्यांत आपले चुलत बहिणीशीं लग्न लावण्याकरितां जात आहे असें मीष करून, त्यास हैदराबादेवरून पाठविलें, आणि आपण मागून स्वतः सर्व फौज घेऊन निघाला. कुतुबशहास हें कपट न समजल्यामुळें, तो बेसावध होता. मोंगलांचे सैन्यानें एकाएकीं तटावर हल्ला सुरू करून, हैदराबाद शहर लुटण्यासही आरंभ करीपर्यंत तो जागा झाला नाहीं. शेवटीं त्यानें निरुपाय ह्मणून शरण येऊन, वजीर मीरजुमला याचे पुत्रास कैदेंतून सोडविलें, व त्याची जप्त केलेली सर्व जिनगी त्यास परत दिली; परंतु त्याजवरचें संकट एवढ्यानेंच नाहींसें झालें नाहीं. त्यास आपली मुलगी सुलतान महंमद यास द्यावी लागून, यापूर्वी थकलेला करभार दरसाल एक कोट रुपयेप्रमाणें सर्व द्यावा लागला. ( १६५५ )

येणेंप्रमाणें एका शाहीचा बराच पाडाव करून, औरंगजेब हा यापुढें आदिलशाहीविषयींही अशीच कांहीं तरी खटपट करण्याचे तयारीस लागला. गोवळकोंड्याचा वजीर मीरजुमला हा आतां मोंगलास मिळून तो दिल्लीस बादशहाकडे गेला. तो मोठा हुषार असून, त्यास दक्षिणेकडील माहिती चांगली असल्यामुळें, त्यास बादशहानें लवकरच आपला वजीर करून दक्षिणेकडील फौजेवर मुख्य अधिकारी ह्मणून पाठवून दिलें. औरंगजेब व मीरजुमला या दोघांनीं आतां अशी

मसलत चालविली कीं, कुतुबशाहीप्रमाणें आदिलशाहीलाही कांहीं तरी घोटाळ्यांत आणावें; परंतु महंमद आदिलशहानें दिल्लीस बादशहाचा वडील मुलगा दाराशेको यांशीं संधान बांधून, बादशहास बरेंच आपलेंसें करून घेतलें होतें. आदिलशहाकडून करभाराची बाकीही वेळचेवेळीं पोंचत नसे; तथापि बादशहाचें मन सुलतानाविषयीं अनुकूल असल्या-मुळें, औरंगजेब व मीरजुमला यांची मसलत पुष्कळ दिवस सिद्धीस जाईना.

परंतु महंमद आदिलशहा हा १६५६ या सालाचे अखेरीस वारला. त्याचे गादीवर त्याचा मुलगा दुसरा अली आदिलशहा हा बसला. त्याचें यावेळीं वय १९ वर्षांचें होतें. त्याचें राज्य साधारण बरेंच चांगले स्थितींत असून, खजिन्यांत पैसाही पुष्कळ होता. मुलुखांत एकंदर आबादानी असून, त्याची फौजही बरीच मोठी होती; परंतु तिची व्यवस्था चांगलीशी नव्हती. मागें सांगितल्याप्रमाणें शिवाजी महाराजांचा पुंडावा मुलुखांत चालला असतांही, त्याचे चांगले चांगले सरदार व शिपाई हे कर्नाटकांत तेथील जमेदारांचा पाडाव करून त्यांचा मुलूख काबीज करण्याचे कामीं गुंतले होते.

असो; नवीन सुलतान दिल्लीचे बादशहास न विचारतां गादीवर बसला, हा त्यानें बादशहाचा अपमान केला, असें औरंगजेब व मीर जुमला ह्यांनीं त्यास समजावून देऊन विजापुरावर स्वारी करण्याबद्दल त्याचा हुकूम आणिला. इकडे विजापूरास तर युद्धाची कांहींच तयारी नव्हती; तथापि होईल तितकी त्वरा करून मोंगल लोकांची फौज ज्या वाटेनें येणार, त्या वाटेवरील किल्ल्यांतून शिबंदी, दारुगोळा वगैरे सरंजाम विजापूरकरांनीं भरला. त्याचप्रमाणें मुख्य वजीर खान महंमद व दुसरे मुसलमान सरदार हे, व सरजीराव घाटगे, बाजी घोरपडे, निंबाळकर वगैरे मराठे जहागीरदार यांनीं आपापल्या फौजा मोंगलावर चाल करून जाण्याकरितां बाहेर काढिल्या. औरंगजेब यानें पूर्वेकडून चालून येऊन, प्रथम बेदर शहर हें अपाट्यासरसें एके दिवसांत सर केलें. या शहरांतील शिबंदीवर विजापूरकरांची मोठी

भिस्त होती. यामागून मोंगलांचे फौजेनें कलबुर्गा हेंही हल्ला करून घेतलें, आणि त्यांची चाल मोठ्या त्वरेनें विजापुराकडे होऊं लागली. कांहीं वेळ प्रथम विजापूरचे घोडेस्वारांनीं औरंगजेबास बराच त्रास दिला; परंतु मुख्य वजीर खानमहंमद हा लवकरच फितूर झाल्यामुळें, विजापूरकरांचें प्रत्येक ठाणें मोंगलांचे स्वाधीन होऊं लागलें. कांहीं लहानसहान सरदार शत्रूंशीं चांगले शूरपणें लढले; परंतु त्यांस पाठबळ न मिळाल्यामुळें, त्यांच्यानें फार वेळ टिकाव धरवेना. शेवटीं औरंगजेब यानें एकदम चाल करून येऊन, विजापुरास वेढा दिला. ( १६५७ ) राजधानींत सर्व धांदल उडून गेल्यामुळें, मोंगलांची फौज येण्यापूर्वी शहराबाहेरील पाणी नाहींसें करणें व दाणा वैरण सर्व राजधानींत आणून टाकणें वगैरे नेहमींच्या तजविजीसुद्धां विजापूरचे लोकांस कांहीं सुचलें नाहीं. औरंगजेबानें वेढ्याचें काम मोठ्या जोरानें चालविल्यामुळें, नवीन सुलतान अल्ली आदिलशहा हा लवकरच जेरीस येऊन, तो मोंगलांस एक कोट रुपये व आणखीही दुसरें हवें तें देण्यास तयार झाला; परंतु औरंगजेबाचे मनांत विजापूरचें सारें राज्यच खालसा करितां आलें तर करावयाचें होतें.

४. असो; इतक्यांत मध्यंतरीं उत्तर हिंदुस्थानांत एक नवीनच मोठी राज्यक्रांति सुरू झाली. त्यामुळें विजापूरचे स्वारीचें हें प्रकरण एकदम तूर्त बंद पडलें. शहाजहान बादशहा हा एकाएकीं आजारी होऊन त्याचे वांचण्याचीही आशा सुटली, या गोष्टीची बातमी औरंगजेबाची विशेष आवडती बहीण रोशनेरा बेगम हिजकडून आग्र्याहून गुप्तपणें त्यास विजापुरास येऊन पोहोंचली. तिनें कळविलें कीं, वडील भाऊ दारा यानें बादशाहीचा बहुतेक कारभार आटोपला असून, बाकी आणखी दोघे भाऊ—सुलतान सुजा हा बंगाल्यांतून व सुलतान मुराद हा गुजराथेंतून — फौजा जमा करून दारा याजबरोबर लढण्याकरितां आग्र्यावर चालून येत आहेत. या बातमीचे पाठोपाठ दारा याजकडून, मीर जुमला व दुसरे सरदार जे दक्षिणेंत होते त्यांस हुकूम आला कीं, तुह्मीं सर्वांनीं हिंदुस्थानांत

परत यावें. दारा व औरंगजेब यांचें पहिल्यापासूनच वैर असे. दारा हा मनाचा मोकळा, शूर, परंतु अविचारी असा असे. त्याच्या धर्मसमजुतीही अकबर बादशहाप्रमाणें महमदी धर्मासच अनुसरून होत्या असें नाहीं, यामुळें तो नास्तिक आहे असें समजून दरबारांतील बहुतेक उमराव त्यास चहात नसत. ही गोष्ट औरंगजेबाचे लक्षांत येऊन, लोकांनीं आपणास विशेष बरें ह्मणावें ह्मणून, मुसलमानी धर्मांत जें जें आचरण करावें ह्मणून सांगितलें आहे, तें तें तो विशेष कडक रीतीनें करी, व आपणास सद्धर्म व सद्धर्मप्रसार यांपेक्षां दुसरें कांहीं अधिक प्रिय नाहीं, असा तो आंव घाली. मीरजुमला यास परत येण्याविषयीं हुकूम येतांच, औरंगजेबानें विजापूरचे सुलतानाचें तहाचें बोलणें मान्य करून, त्याजपासून पुष्कळ रक्कम रोकड घेतली, व आपली सर्व फौज घेऊन, दिल्लीकडे दाराशीं युद्ध करण्याकरितां चाल केली. त्याचा धाकटा भाऊ सुलतान मुराद हाही गुजराथेंतून आपली फौज काढून उत्तरेकडे चालला होता. त्यास औरंगजेबानें सांगितलें कीं, "मी तुला गादीवर बसवितों. मला स्वतःला तिची इच्छा नाहीं. माझा पहिल्यापासून एकीकडे राहून धर्माचरणांत जन्म काढावा असा जो निश्चय झाला आहे, तो कायमच आहे. दारा हा धर्मभ्रष्ट असून तो मजवर उठला आहे, तेव्हां त्याशीं युद्ध करून तुला मी गादी देतों." सुलतान मुराद यास अशा भुलथापा देऊन त्यास औरंगजेबानें आपलेंसें करून घेतलें, व यानंतर त्या दोघांनीं आपापलीं सैन्यें एकत्र करून दारावर चाल केली. त्याचे फौजेबरोबर यांच्या दोन मोठ्या लढाया झाल्या. त्या दोहींतही दारा याचा पराभव होऊन, तो इकडून तिकडे पळूं लागला. शेवटीं तो औरंगजेबाचे हातीं लागून त्यास त्यानें ठार मारिलें. याचे थोडे वेळांपूर्वीं शाहाजहान बादशहास अंमळ बरें वाटूं लागतांच, त्यानें आपले पुत्र चोहोंकडून आग्र्यावर चाल करून येत आहेत असें पाहून, त्यानें त्या प्रत्येकास आपापले प्रांतांत जाण्यास हुकूम पाठविले; परंतु हे हुकूम दाराच खोटे करून पाठवीत आहे, अशा मिषानें त्यांजकडे त्यांनीं लक्ष दिलें नाहीं.

शेवटीं दारा हा मारला जाऊन शहाजहान बादशहा हातीं लागला असें पाहून, औरंगजेब यानें सुलतान मुराद यास एकदम कैद केलें, व त्याची सर्व फौज फितूर करून आपणाकडे घेतली, आणि आपण स्वतः दिल्लीचे तक्तावर बसला. यानंतर त्यानें मीरजुमला यास बरोबर घेऊन सुलतान सुजा याजवर स्वारी केली, व त्याचाही पराभव केला. सुजा हा यानंतर आराकान प्रांतांत पळून गेला; परंतु तिकडेही तो धरिला जाऊन ठार मारिला गेला. येणेंप्रमाणें औरंगजेब बादशहा हा बापास पदच्युत करून व भावांचा नाश करून, कांहीं पराक्रम व कांहीं कपटप्रयोग यांचेयोगानें दिल्लीचा बादशहा झाला ( १६५८ ).

९. असो; आपण आतां कांहीं वेळ शिवाजी महाराजांकडे वळूं. नुकतेंच वर लिहिल्याप्रमाणें औरंगजेब हा जेव्हां विजापुरावर स्वारी करून जाण्यास निघाला ( मार्च १६५७ ), तेव्हां शिवाजी महाराजांनीं त्यास पत्र लिहिलें कीं, आह्मीं पहिल्यापासून दिल्लीचे गादीचे ताबेदार आहोंत व तसेंच राहण्याची आमची इच्छा आहे. आह्मीं विजापूरचे मुलखांतील जो भाग जिंकला आहे, तो आमचेकडे राहूं द्यावा व त्याचप्रमाणें कोंकणांतील दाभूळ वगैरे ठाणींही आमचेकडेसच असूं द्यावीं. महाराजांचे या पत्राचा औरंगजेब यानें मोठे संतोषानें स्वीकार केलासें दाखवून, त्यांनीं ज्या ज्या गोष्टी त्यांत लिहिल्या होत्या, त्या सर्व आपणांस मान्य आहेत असें भासविलें. शिवाय त्यानें अशीही इच्छा दर्शविली कीं, शिवाजी महाराजांनीं आपली एकदां गांठ घ्यावी, ह्मणजे समक्ष भेटीअंतीं पुष्कळ गोष्टींचा उलगडा होईल. कारण, दोघांचें हित एकाच गोष्टीपासून होणारें असल्यामुळें, दोघांचा मिलाफ होणें हें अत्यंत इष्ट होय; परंतु शिवाजी महाराज हे या गोड गोड थापांस भुलून न जाऊन, त्यांनीं ‘ आह्मीं बादशहाचे अगदीं बंदे चाकर आहोंत, लागेल तो हुकूम करावा. ’ असे अगदीं गरीबीचे निरोप पाठवून, स्वतः ते भेटीस मुळींच गेले नाहींत. त्यांचे मनांतील हेतु असा होता कीं, मोंगलांचें आणि विजापूरकरांचें एकदां युद्ध जुंपलें, ह्मणजे तें बरेंच दिवस चालेल, व यापूर्वीं विजापूरचे राज्यांत धामधूम

करून आपण जसा मुलूख मिळविला, तसाच मोंगलांचे राज्यांतही मिळविण्यास आपणांस चांगली संधि सांपडेल. या बेतानें मोंगलांचें सैन्य विजापूरचे वाटेस लागलेसें पाहून, महाराजांनीं एकाएकीं रात्रीं त्यांचे जुन्नरचे ठाण्यावर हल्ला करून तें लुटलें ( मे १६५७ ). या लुटींत त्यांस तीन लक्ष मोहरा, दोनशें घोडे व आणखी कांहीं ऐवज असा सांपडला. ही लूट महाराजांनीं स्वतः पुण्यापर्यंत पोहोंचवून, तेथून ती घोडेस्वारांचे हातीं राजगडास रवाना केली, व आपण पुनः दुसरी अशीच लूट मिळविण्याकरितां अहंमदनगरावर गेले. महाराज आडरस्त्यांनीं जाऊन या शहरावर एकाएकीं आले खरे; परंतु ते आल्याची बातमी किल्ल्यांत लवकरच पोहोंचून, तेथून घोडेस्वारांची एक टोळी आल्यामुळें, महाराजांस पुष्कळ लूट मिळविण्यास फावलें नाहीं. येथें त्यांस फक्त ७०० घोडे व ४ हत्ती इतकेंच काय तें सांपडलें.

येणेंप्रमाणें मोंगलांचेही मुलुखांत आतां महाराजांनीं धामधूम करण्यास आरंभ केला. पुण्यास आल्यावर त्यांनीं प्रथम चोहांकडे घोडीं खरेदी करून, त्यांजवर आपले बारगीर बसवून पागा वाढविण्याचा मोठा सपाटा चालविला. त्याचप्रमाणें ते आतां आपले पदरीं शिलेदारही ठेवूं लागले. यापूर्वीं कित्येक वर्षें त्याजपाशीं, माणकोजी दुतोंडे ह्मणून त्यांचे वडिलांचा फार दिवसांचा विश्वासु असा एक हवालदार असे, त्याचे हाताखालीं घोडेस्वारांची एक लहान टोळी मात्र असे. त्यास महाराजांनीं सरनोबत हा किताब दिला होता. हा मरण पावल्यावर, त्याचे जागीं महाराजांनीं, नेताजी पालकर ह्मणून कोणी एक वजनदार व हुषार असा शिलेदार होता, त्यास नेमिलें. त्याचप्रमाणें शामराजपंत ह्मणून कोणी पुष्कळ दिवसांचा त्यांचा कारभारी होता, त्यास त्यांनीं पेशवा असा किताब दिला. त्याचेकडे मुलकी काम असून, शिवाय फौजेचेंही काम बरेंच असे. या रीतीनें शिवाजी महाराजांनीं नवीन फौज गोळा करण्याचा व चांगले कामगार पदरीं ठेवण्याचा उद्योग जारीनें चालविला; परंतु त्यांस मोंगलांचे व विजा-

पूर्वीच्यांचें युद्ध पुष्कळ दिवस चालेल, व तेवढे संधींत आपलें कार्य पुष्कळ उरकेल, ह्मणून जें वाटलें होतें तें अगदीं फसलें. विजापूरचा वजीर खान महंमद हा मोंगलांकडे फितूर झाल्यामुळें, विजापूरवाल्यांचा एकदम पाडाव झाला, व त्यामुळें महाराजांचा अंदाज चुकला. त्यावरून महाराजांनीं, औरंगजेबास विजापुरास एक मोठ्या नम्रतेचें पत्र लिहून पाठविलें कीं, " आमचे हातून ही आगळीक घडली; परंतु त्याबद्दल माफी असावी. आह्मीं बादशहाचे चाकर, आमचेकडून चाकरींत अंतर होणार नाहीं. "

पुढें औरंगजेब हा विजापूरचे सुलतानाबरोबर तह करून, दारा शाहाबरोबर युद्ध करण्याकरितां हिंदुस्थानांत निघून गेला. तेव्हां त्याजकडे, शिवाजी महाराजांनीं आपला वकील कृष्णाजी भास्कर यास पाठवून अर्ज केला कीं, " आमचे हातून मागील आगळीक झाली, ती फार वाईट गोष्ट झाली; तिजबद्दल आह्मांस फार वाईट वाटतें; तथापि सध्यां आपणांस लढाईंत उपयोगीं पडण्याकरितां ह्मणून आह्मीं इकडे घोडेस्वारांची एक बरीच मोठी टोळी तयार केली आहे, व आपण हुकूम कराल, तर हिंदुस्थानांत आपले कुमकेस ती पाठवून देऊं, व आपले मागें इकडे दक्षिणेंत आपले मुलुखाचाही बंदोबस्त ठेऊं; परंतु बादशाही मुलुखांत आमचे पुष्कळ पिढ्या चालत आलेले असे कांहीं देशमुखीचे हक्क आहेत, ते आह्मांस सरकारांतून मिळण्याची मेहरबानी व्हावी; ह्मणजे सरकारची चाकरी करण्यास आह्मी तत्पर आहोंतच. शिवाय कोंकणप्रांत विजापुरकरांकडे असतांना, त्याची त्यांनीं किती अव्यवस्था करून टाकिली हें आपणांत माहीत आहेच. तोच प्रांत जर सरकारांनीं आह्मांकडे लावून दिला, तर बादशहास आह्मीं पुष्कळ फायदा करून दाखवूं. "

औरंगजेब हा सध्यां भावांबरोबर युद्ध करण्यांत गुंतला असल्यामुळें, त्यास दक्षिणेकडील मुलुखाविषयीं विशेष फिकीर करण्यास सवड नव्हती. शिवाजी महाराजांचा कावा त्याचे लक्षांत आला; परंतु त्या गोष्टीला तूर्त इलाज नाहीं, ह्मणून महाराजांस त्यानें युक्तीनें उत्तर पाठविलें कीं,

" तुह्मीं वकिलामार्फत जो मजकूर कळविला, तो आमचे ध्यानांत आला. तुमचे अपराधांबद्दल माफी आहे; पुन्हां मात्र असें वर्तन होतां कामा नये. कोंकणप्रांत तुह्मीं आपलेकडे ठेविल्यास आमचेकडून हरकत नाहीं. तुह्मीं ह्मणतां कीं, बादशाही मुलुखांत तुमचे देशमुखीचे हक्क आहेत; तर त्याबद्दल विचार करण्याकरितां, सोनपंडित ( आबाजी सोनदेव ) यांस तुमचेतर्फे पाठवून द्यावें. तुमचें आमचें बोलणें ठरलें; ह्मणजे तुह्मीं आमचे मदतीस पांचशें घोडेस्वार पाठवून द्यावे, व दक्षिणेंतील आमचे मुलुखाचा चांगला बंदोबस्त राखावा." येणेंप्रमाणें औरंगजेब यानें, शिवाजी महाराजांनीं केलेले अपराध पोटांत घालण्याचा आव घालून, व त्यास जास्त मुलूख वगैरे मिळवून देण्याचा आशातंतू लावून देऊन, हिंदुस्थानांत जिकडे तिकडे आपली स्वस्थता झाली, ह्मणजे मग शिवाजी महाराजांचा समाचार घेतां येईल, असा त्यानें आपले मनांत बेत केला. यापुढें चार वर्षेंपर्यंत महाराजांचा मोंगलांशीं प्रसंगच झाला नाहीं.

६. या सुमारास, विजापूरचे सुलतानानें, मोंगलांबरोबर तह झाल्यामुळें ७०० पठाण आपले चाकरींतून कमी केले होते, ते महाराजांकडे चाकरीस राहण्यास आले. प्रथम महाराजांस या गोष्टीचा विचार पडला; परंतु गोमाजी नाईक ह्मणून जिजाबाई साहेबांचा कोणी पुष्कळ दिवसांचा विश्वासु शिपाई त्यांजजवळ होता, त्याचे सांगण्यावरून महाराजांनीं त्या सर्वांस आपले चाकरीस ठेवून घेतले. मुसलमान शिपाई असे प्रथमच महाराजांनीं यावेळीं ठेविले. त्यांजपासून त्यांना यापुढें पुष्कळ फायदा झाला. या नवीन शिपायांवर, रघुनाथ बल्लाळ यास महाराजांनीं मुख्य नेमिलें. याशिवाय आणखी लोक गोळा करून महाराजांनीं कोंकणांतील समुद्रकांठचे कित्येक किल्ले हस्तगत केले. कोंकणांत जंजिऱ्याचा सिद्दी * फत्तेखान याजपाशीं लढाऊ गलबतें

* जंजिऱ्याचा सिद्दी हा मूळचा निजामशाहीचे पदरचा सरदार होय. त्याजकडे आरमाराचें सर्व काम असे. निजामशाही बुडाल्यावर कोंकणप्रांत जेव्हां विजापूरचे आदिलशाहीकडे आला, तेव्हां महंमद आदिलशहा यानें सिद्दी याचा

असल्यामुळें, त्याचा समुद्रावर व समुद्रकांठचे गांवांवर मोठा दरारा असे. त्याचे मुलखावर स्वारी करण्याकरितां महाराजांनीं शामराजपंत पेशवे यांस पाठविलें; परंतु फत्तेखान हा सावध असल्यामुळें, त्यानें पेशव्याचा हल्ला होण्यापूर्वींच त्याजवर हल्ला करून त्याचा अगदीं मोड करून टाकला ( १६५९ ). या मोहिमेंत अपयश आल्यामुळें, महाराजांस मोठी चुरचूर लागली. त्यांनीं शामराजपंतास कामावरून दूर करून, मोरो त्रिमल पिंगळे यास त्याचे जागीं नेमिलें; व पुन्हां फौज गोळा करून रघुनाथ बल्लाळ यास जंजिऱ्यावर पाठविलें; परंतु सिद्दी हा त्यास दाद देईना; ह्मणून महाराजांनीं अधिक मोठी फौज जमा करून, ती नवीन पेशवा मोरोपंत पिंगळे व सरनोबत नेताजी पालकर यांजबरोबर देऊन, पावसाळा संपतांच पाठवून दिली; परंतु इतक्यांत विजापुराहून अफजूलखान ह्मणून कोणी सरदार बरोबर मोठी फौज घेऊन आपणांवर चाल करून येत आहे, अशी बातमी समजतांच महाराजांस जंजिऱ्यावर धाडलेली फौज परत बोलावणें भाग पडलें.

७. औरंगजेब हा विजापूरच्या सुलतानाबरोबर तह करून हिंदुस्थानांत निघून गेल्यावर, विजापूरचे राज्यास पुन्हां सांवरण्यास वास्तविक चांगली संधि होती; परंतु नवीन सुलतान अल्ली आदिलशाहा हा लहान असल्यामुळें, त्याचा अम्मल जसा बसावा तसा बसला नव्हता. सरदार लोकांत जूट मुळींच नसून, ते एकमेकांचा नाश करण्यास टपले होते. मुख्य वजीर खान महमद हा मोंगलांकडे फितूर झाल्यामुळें, त्याचा सर्व लोक द्वेष करीत होते. त्यास सुलतानानें आश्वासन देऊन दरबारास बोलावून आणिलें; परंतु शहराचे दरवाजाजवळ तो येऊन पोंचतांच, त्याजवर त्यानें मारेकरी घालून त्यास हत्तीखालीं ओढून त्याचे तुकडे तुकडे केले; तथापि खान महमद याची जहागीर जप्त न करितां, सुलतानानें ती त्याचा मुलगा कावसखान याजकडेच ठेविली ( १६५८ ).

---

मुलुख त्याजकडेसच पूर्वींप्रमाणें ठेविला. याचे गलबतांचा मुख्य सांठा धुंडिराजापूर येथें असे, व त्याचे ताब्यांत समुद्रकांठचे बरेच किल्ले असत.

इकडे शिवाजी महाराजांनीं दिवसेंदिवस विजापूरचा मुलूख सर करण्याचा सपाटा लाविला असें पाहून, शेवटीं विजापूरच्या लोकांचे डोळे उघडले, व त्यांनीं एक मोठी फौज तयार केली. अफजूलखान ह्मणून कोणीएक वयस्क असा मोठा सरदार होता, त्यानें या मोहिमेवर मी जातों, असा सुलतानास अर्ज केला. त्याचें बोलणें सुलतानानें मान्य करून, त्यास निरोप देण्याकरितां एक मोठा दरबार भरविला. अफजूलखानानें विडा उचलून सुलतानास मुजरा करून फुषारकीनें ह्मटलें कीं, "मी लवकरच त्या भिकार दरवडेखोरास पायांत बेड्या घालून सरकारचे तक्तापुढें आणून उभा करितों ". ही मोहीम फत्ते व्हावी ह्मणून, आदिलशहानें अफजूलखानाबरोबर पांच हजार घोडेस्वार, सात हजार उत्कृष्ट पायदळ, चांगला तोफखाना, याशिवाय सर्व प्रकारचें चांगलें सामानसुमान असें दिलें, व अफजूलखान हा शेवटीं पावसाळा संपतांच, सप्टेंबर महिन्यांत मोठ्या थाटानें मोहिमेवर निघाला ( १६५९ ). अफजूलखान हा विजापुराहून निघून, तुळजापूर, पंढरपूर या वाटेनें नीट पुण्याकडे येत चालला. वाटेंत त्यानें प्रसिद्ध हिंदूंचे देवस्थानांस बराच उपद्रव देऊन, कित्येक भ्रष्टही केलीं ह्मणून सांगतात. विजापूरकरांची फौज आपले मुलखाजवळ येऊं लागली असें पाहून, शिवाजी महाराजांनीं आपले सरदार लोक जमवून असा विचार ठरविला कीं, या फौजेपुढें उघडे मैदानांत आपला निभाव लागणार नाहीं; तर जावळीकडील झाडीचे मुलखांत आपला बचाव बरा होईल, ह्मणून तिकडेच जाऊन तळ द्यावा. यावरून महाराजांनीं चोहोंकडच्या फौजा गोळा केल्या व जंजिऱ्यावर धाडलेलें सैन्यही परत बोलावलें. तसेंच पुण्याकडील किल्लेकोटांचा नीट बंदोबस्त करून, ते अखेर प्रतापगडावर येऊन दाखल झाले. लढाईची ही कडेकोट तयारी चालत असतां, महाराज हे खानाकडे मोठे नम्रतेचे निरोपावर निरोप पाठवीत होतेच. त्यांतील मतलब असा कीं, "आपल्यासारख्या शूर सरदाराबरोबर लढाई ह्मणून खेळावी अशी आमची हिंमत मुळींच नाहीं. आमचेहातून सरकारचा मोठा अपराध झाला आहे, व त्यामुळें त्यांचा आमचेवर मोठा राग आहे; तथापि

आपण आमची तरफदारी केली, तर सरकार आमचे सर्व अपराध पोटांत घालण्यास समर्थ आहेत. खानसाहेब कृपा करून जर एवढी मध्यस्थी करतील, तर आमचे ताब्यांत असलेला सर्व मुलूख आम्ही आजच सोडून देण्यास तयार आहोंत. ”

शिवाजी महाराज येणेंप्रमाणें अगदीं नम्रतेचे निरोप पाठवीत असल्यामुळें, अफजूलखान यास आपली मोहीम आतां सहजच फत्ते होते, असें वाटूं लागलें. वांई येथील प्रांत झाडीचा असून तो मोठा कठीण आहे, हें त्यास, त्या प्रांतीं तो या पूर्वीं कांहीं दिवस सुभेदार असल्यामुळें, ठाऊक होतें. तेव्हां लढाई करून आपली फौज खराब करण्यापेक्षां, शत्रू स्वतः होऊन शरण येऊन मुलूख सोडून देऊं ह्मणत आहे, त्याप्रमाणें त्याजविषयीं बोलणें लावून, आपलें काम झालें तर फार उत्तम होईल. असा विचार मनांत आणून अफजूलखान यानें आपला वकील पंताजी ( दत्ताजीपंत ) गोपीनाथ बोकील यास महाराजांशीं बोलणें लावण्याकरितां, प्रतापगड किल्ल्याखालीं फाड या गांवीं पाठवून दिलें. खानाकडील वकील आला हें समजतांच, महाराजही त्यास भेटण्याकरितां किल्ल्यावरून खालीं आले. भेट झाल्यावर वकीलानें महाराजांस खानाचें ह्मणणें कळविलें कीं, ‘ आपले वडील शहाजी राजे व खान हे पुष्कळ दिवसांचे दोस्त असल्यामुळें, आपल्याविषयीं त्यांचा कांहीं दुजा भाव नाहीं. आह्मीं तुह्मांकरितां सुलतानापाशीं रदबदली करून त्यांजकडून तुह्मांस माफी करवून, तुह्मीं जो मुलूख जिंकून घेतला आहे, त्यांतील कांहीं तुह्मांस जहागीरसुद्धां करून देवूं. ’ यावर शिवाजी महाराजांनीं उत्तर केलें कीं, ‘ खानसाहेबांचा आह्मांवर पूर्ण लोभ आहे, व ते आमचें अहित कधीं करणार नाहींत हें आह्मीं पक्कें जाणून आहों. ते ह्मणतात त्याप्रमाणें आह्मांस सरकारांतून जहागीर मिळाल्यावर आमची तक्रार मुळींच नाहीं. आह्मीं तर सरकारचे निःसीम ताबेदार आहोंत; आणि ह्मणूनच आह्मीं पुष्कळ पाळेगारांस नाहींसें करून त्यांचा मुलूख सरकाराकरितांच आपले ताब्यांत घेतला

आहे, तो आतां सरकारांत गुजरवून देऊं.' इतकें बोलणें या बैठकीस झालें.

वकील निघून गेल्यावर, शिवाजी महाराजांस हें अरिष्ट कसें टळेल, याबद्दल मोठी काळजी लागली. ते चिंतातुर होऊन, रामदास स्वामींनीं सांगितल्याप्रमाणें देवीची प्रार्थना करीत बसले असतां, देवी महाराजांचे अंगांत एकदम संचरून बोलूं लागली, 'अरे मुला, तूं येवढी चिंता कशाची करितोस? तुला माझा वर आहे. मी तुझें अरिष्ट दूर करीन.' महाराजांजवळ बाळाजी आवजी चिटणीस व वाकनीस हे बसले होते; त्यांनीं देवीचें अभिवचन लिहून घेतलें, व तें त्यांनीं महाराज शुद्धीवर आल्यावर त्यांस वाचून दाखविलें. त्यावरून आतां भिण्याचें कारण राहिलें नाहीं, अशी महाराजांची व भोंवतालील सरदारांची खात्री झाली.* देवीचें अभिवचन मिळतांच, महाराज रात्रींच उठून वकीलाचे बिऱ्हाडीं गेले, व त्याची गुप्तपणें एकांतीं गांठ घेतली. महाराजांनीं त्याची व त्याचेबरोबर आलेले शिपाईप्यादे वगैरे लोकांची अगोदरच उत्तमप्रकारें व्यवस्था ठेविली होती. मात्र मोठे युक्तीनें वकीलाचें स्वतःचें राहण्याचें ठिकाण इतरांपासून अंमळ दूर असें केलें होतें. महाराजांनीं त्यास गोड गोड बोलून खानाचे मनांत खरोखर काय आहे, हें त्याचें तोंडांतून युक्तियुक्तीनें काढून घेतलें. त्यावरून, युक्तिप्रयुक्ति करून साधेल तर शिवाजी महाराजांस पकडून न्यावें किंवा वेळ पडल्यास ठारही करावें, असा खानाचा बेत आहे असें महाराजांस कळलें. खान तोंडानें जें बोलतो, त्याप्रमाणें त्याचें अंतःकरण शुद्ध मुळींच नाहीं. तेव्हां 'या गोष्टीस इलाज काय करावा? तुह्मी ब्राह्मण आहां. आह्मांस

---

* चिटणीसांची बखर.—शिवाजी महाराजांमध्यें ज्या कित्येक युक्त्या होत्या, त्यापैकींच, आपले देवभोळे सरदारांस व शिपाई लोकांस आणीबाणीचे प्रसंगीं धैर्य येण्याकरितां, आपले अंगांत भवानी देवी संचार पावून ती आपणांस भविष्यवाद सांगते, ही योजना असावी, व तीस रामदासस्वामी व चिटणीस वगैरे राजधुरंधर मंडळीचें साहाय्य असेल असें वाटतें.

तर देव, गोब्राह्मण अगदीं वंद्य. यवनांचे पीडेपासून त्यांचें रक्षण करावें, हिंदुधर्मास आलेली ग्लानि दूर करावी, हिंदू स्वराज्य स्थापन करावें, यांविषयीं तर आह्मीं उद्योग चालविला आहे. भवानी देवीनें त्याबद्दल साक्षात्कार देऊन, तुह्मांला या कामांत यश येईल, ह्मणून अभिवचन दिलें आहे. या कामीं आह्मांस तुह्मीं अवश्य साहाय्य झालें पाहिजे.' अशी पंताजी गोपीनाथ यास महाराजांनीं गळ घातली. त्याचप्रमाणें त्यास हिवरें हें गांव या कामगिरीबद्दल वंशपरंपरें इनाम करून देऊं ह्मणून सांगितलें. यावरून, वकील यांचें मन कांहीं धर्माभिमानानें व कांहीं इनामाच्या लालचीनें वळून, तो महाराज ह्मणतील त्या गोष्टीस कबूल झाला. शेवटीं प्रस्तुत आलेलें अरिष्ट कसें निवारितां येईल, यांविषयीं महाराजांचें व वकीलाचें बरेच वेळ बोलणें झाल्यावर वकील ह्मणाला, 'अफजूलखान हा आपले बुद्धीनें मोठा लबाड व कपटी आहे खरा; तथापि त्यास आपले हुषारीची बरीच घमेंड असल्यामुळें, तो विश्वासानें फसला जाण्यासारखा आहे. तेव्हां त्यास किल्ल्याखालीं बोलचाली करण्याकरितां बोलाविला असतां तो येईल.' हें ऐकून महाराजांचे मनांत एकदम कल्पना आली कीं, खान जर किल्ल्याखालीं येईल, तर भेटीचे प्रसंगीं दगा केला असतां सर्व कार्य एकदम उरकेल; तथापि या गोष्टीचा पुरा विचार करण्याकरितां महाराजांनीं कृष्णाजी भास्कर यास, तो मसलतीचे कामांत मोठा हुषार असल्यामुळें, लागलीच तेथें बोलावून आणिलें, व त्यास तो सर्व बेत सांगून त्याचा या कामीं विचार घेतला. शेवटीं तिघांनीं खानास फूस लावून भेटीस बोलावून आणून, तेथें त्यास दग्यानें ठार करण्याचा बेत ठाम केला, व ते सर्व आले तसे गुप्तपणें आपापले ठिकाणास परत गेले.

दुसरे दिवशीं पंताजी गोपीनाथ व शिवाजी महाराज यांच्या बाह्यात्कारी उगाच भेटी होऊन, कांहीं बोलणीं चालणीं झाल्यासारखीं झालीं. यानंतर पंताजी गोपीनाथ याजबरोबर शिवाजी महाराजांनीं आपला वकील ह्मणून कृष्णाजी भास्कर यास देऊन, अफजूलखानाकडे वांई येथें पाठवून दिलें. पंताजी गोपीनाथ यानें खानास शिवाजी महारा-

जांचे बोलाचालीची सर्व हकीकत कळवून तो त्यास शेवटीं ह्मणाला, " शिवाजींचें सामर्थ्य तें किती? तो आपली फौज व आपला पराक्रम यांस पाहून अगदीं गांगरून गेला आहे. आपण होऊन जर त्यास आश्वासन द्याल, तर तो खरोखरच आपले स्वाधीन होईल असें मला खास वाटतें. त्याचे मनांत आपली समक्ष भेट घ्यावी असें आहे. त्यास आपला विश्वास पोहोंचत नाहीं, ह्मणून तो येथें येऊं शकत नाहीं; तथापि आपण जर किल्ल्याखालीं याल, तर तो तेथें आपले भेटी-करितां खास येईल. प्रथम भेटीचीच काय ती अडचण आहे. एकदां आपली व त्याची गांठ पडून विश्वास पटला, ह्मणजे मग कांहीं नाहीं. तो आपलेकडे येथेंसुद्धां येईल." अफजूलखानास अगोदरच स्वत:चें शहाणपण व हुषारी यांबद्दल मोठी घमेंड असल्यामुळें, वकीलाचें हें भाषण ऐकून त्यास तें अगदीं खरें वाटलें. त्यानें मनांत विचार केला कीं, " शिवाजीनें पाठविलेल्या निरोपावरून तो बहुतेक भेटीअंतीं स्वत: होऊन स्वाधीन होईल; नाहींच झाला, तर एकदां विश्वासानें भेटीस आल्यावर मग तो जातो कोठें? बेटा, छोटा मराठे भाई! भेटीचेवेळीं आपले भलेभक्कम कवळींत तो एकदां गवसला, ह्मणजे तो मग कसचा सुटतो?* " खानाचे मनांत पंताजी गोपीनाथ याचे फितुरीबद्दल शंकाच आली नाहीं. तो लागलाच शिवाजी महाराजांची भेट घेण्यास कबूल झाला, व त्यानें आपली सर्व फौज मोठे कष्टानें जावळीस चढवून, तेथें त्यानें आपली छावणी दिली. येथें शिवाजी महाराजांनीं अगोदरच त्याचे फौजेकरितां, दाणावैरण वगैरेची चांगली व्यवस्था करून ठेवल्यामुळें तो मोठा खुष झाला.

इकडे शिवाजी महाराजांनीं खानाची भेट घेण्याकरितां, प्रतापगड

---

* शिवाजी महाराजांस दगा करावा असें अफजूलखानाचे पोटांत होतें, याबद्दल ग्रांट डफ यांचे इतिहासांत उल्लेख नाहीं; तथापि त्याबद्दल सभासद, चिटणीस, मराठी पोवाडे यांमधून व स्काट वेअरिंग यांचे इतिहासांत तो केलेला आहे. अफजूलखानाचे मनांत दगा करावयाचा होता; परंतु शिवाजी महाराजांचे विशेष तरतुदीमुळें त्यांचाच दगा शेवटीं सिद्धीस गेला असें दिसतें.

किल्ल्याखालीं जवळच सभोंवतालची झाडी तोडून मोठें पटांगण तयार करविलें. त्याचे मध्यभागीं एक मोठा टोलेजंग मंडप देऊन, उत्तम आरास करून, एकापुढें एक अशा लहान थोर बैठकी खलबताकरितां करविल्या. शिपाई, प्यादे वगैरे यांचेसाठीं जागा व सामानसुमान यांची उत्तम प्रकारें व्यवस्था केली. शेवटीं सर्व तयारी झाल्यावर खानाकडील माणसें येऊन त्यांनीं, भेटीकरितां जागा चांगले प्रकारें तयार केली आहे असें त्यास परत जाऊन कळविलें. ही सर्व वरून चकाचकी केली होती खरी; परंतु शिवाजी महाराजांनीं जागोजाग रानांतून गुप्त चौक्या ठेविल्या होत्या. झाडी तोडून जावळीहून किल्ल्याकडे येण्याचे सर्व रस्ते बंद केले होते व एकच मात्र खुला ठेविला होता. महाराजांनीं कोंकणांतून नेताजी पालकर यांस सैन्या-सह बोलावून आणून, त्यास किल्ल्याचे पूर्वेचे अंगास झाडींत दबा धरून बसविलें होतें, व त्यास असें सांगून ठेविलें होतें कीं, संकेता-प्रमाणें कर्ण्याची तुतारी वाजतांच त्यानें झाडींतून निघून तेथें जवळच खानाचे हजार पंधराशें जे लोक येऊन उतरले असतील, त्यांजवर एकाएकीं तुटून पडून त्यांचा नाश करावा. त्याचप्रमाणें मोरोपंत पेशवा यासही महाराजांनीं जावळीस खानाचें जें सर्व सैन्य होतें, त्याजवर हल्ला करण्याकरितां, त्याजवळ उत्कृष्ट शिपाई देऊन त्यास शेजारचे झाडींत लपून बसण्यास सांगितलें होतें; व किल्ल्यावरून पांच तोफा होतांच पेशवा यानें खानाचे सैन्यावर एकदम हल्ला करावा असा संकेत ठरला होता.

येणेंप्रमाणें शत्रूचे सैन्यावर एकाएकीं हल्ला करून त्याचा नाश करण्याची महाराजांनीं तजवीज केली; परंतु कदाचित् बेत फसून आपलाच नाश झाला, तर मागें बखेडा होऊं नये, ह्मणून त्यांनीं किल्ल्याचा व राज्याचाही बंदोबस्त करून ठेविला. दरवाजांत मोठ-मोठे सरदार व जागोजागीं उत्कृष्ट असे दोन हजार धारकरी बस-विले. त्याचप्रमाणें पेशवा व इतर सरदार यांस बोलावून त्यांचे स्वाधीन मातुश्री जिजाबाईसाहेब व संभाजीराजे यांस केलें व त्यांस ते

ह्मणाले, ' आह्मीं ही होड आरंभिली आहे; श्री यश देईलच; परंतु कदाचित् वांकडें झाल्यास तुह्मीं न घाबरतां, बेत केला आहे त्याप्रमाणें गर्दी करून शत्रूचा नाश करावा आणि राज्याचें रक्षण करावें. '

९. यानंतर खानाचे भेटीसाठीं नेमलेला दिवस येऊन पोहोंचतांच, महाराजांनीं पहाटेस उठून व मंगलस्नान करून, देव, ब्राह्मणास नमस्कार केला; नंतर मातुश्री जिजाबाईसाहेब यांचे ते पायां पडले. त्यांनीं महाराजांस आशीर्वाद देऊन ह्मटलें, " त्या मेल्या खानानें तुझा वडील भाऊ संभाजी याचा दगा करून जीव घेतला; त्याचा तूं चांगला सूड घे. देवी भवानी तुला यश देऊन लवकर परत संभाळून आणो. "* महाराजांनीं नंतर उठून अंगांत चिलखत घातलें, व त्यावरून रुवाचा अंगरखा घातला. डोक्यासही आंतून शिरस्त्राण घालून, त्यावरून पागोटें घातलें. उजवे हातांत बाहींत बिचवा झांकून घेतला, व डावे हातांत वाघनख चढविलें. येणेंप्रमाणें किल्ल्याखालीं जाण्याची सर्व तयारी करून, महाराजांनीं खानाकडे निरोप पाठविला कीं, " आह्मीं भेटीचे जागेस जाण्यास इकडून निघालों, तुह्मीं तिकडून तेथें यावें. "

खानास निरोप पावतांच तो लागलाच सुमारें पंधराशें स्वार बरोबर घेऊन, भेटीकरितां बांधलेल्या मंडपाकडे जाण्यास निघाला; परंतु किल्ल्यापासून हाक दोन हाकेचे अंतरावर तो येऊन पोहोंचतांच, त्याचा वकील पंताजी गोपीनाथ बोकील यानें पुढें येऊन त्यास ह्मटलें कीं, ' मला वाटतें आपण इतकी फौज बरोबर घेऊन गेल्यास, शिवाजी कदाचित् बिचकेल; तो भेटीस येणार नाहीं. तेव्हां हे स्वार येथेंच ठेऊन आपण एकच हत्यारबंद शिपाई बरोबर घेऊन पालखींत बसून मंडपाकडे चलावें. ' खानास स्वतःचे धूर्तपणाची व अंगबळाची विशेष घमेंड असल्यामुळें, व आपला वकील फितूर झाला आहे, हें त्याचे स्वप्नांतही नसल्यामुळें, आपण दगा करण्याचे अगोदर व तोही फार पक्केपणें असा, आपला शत्रू आपणांसच करील याची त्यास

---

* चिटणीसांची बखर.

कल्पनाही नव्हती! शिवाजी आतां खचित् हातीं लागतो, या आशेस तो बिचारा गुंतला असल्यामुळें, दुसऱ्या सामान्य मनुष्यास ज्या गोष्टी संशयाच्या वाटल्या असत्या, त्या त्यास न भासून वकील जें जें ह्मणेल त्यास तो कबूल होऊं लागला! खान मंडपांत येऊन पाहतों तों शिवाजी महाराजांचा ठिकाण नाहीं; तेव्हां तो अमळ अधीर होऊन, त्याजबद्दल चौकशी करूं लागतो आहे, इतक्यांत त्यानें महाराजांस किल्ल्याखालीं उतरतांना पाहिलें. त्यांचे हातांत वगैरे कांहीं शस्त्र दिसत नव्हतें; परंतु त्यांचे मागून तानाजी मालुसरे मात्र चालत येत होता, व त्याचे कंबरेस दोन तलवारी होत्या.

शिवाजी महाराज मंडपांत येतांच ते अफजूलखानास पाहून, जणूं काय दबकत दबकत पुढें येऊं लागले. हें लक्षांत आणल्यासारखें करून, पंताजी गोपीनाथ यानें खानाचा हत्यारबंद शिपाई जवळ उभा होता, त्याची शिवाजी महाराजांस भीति वाटते, असें निमित्त सांगून त्यास तेथून अमळ दूर उभें केलें. आपले धिप्पाड शरीरापुढें शिवाजी महाराजांचा छोटेखानी बांधा व त्यांचें भ्याल्यासारखें स्वरूप हीं पाहून, वकील जें जें ह्मणे तें तें खानास सर्व खरेंच वाटत चाललें. शेवटीं महाराज बैठकींत आलेसें पाहून, अफजूलखान हा त्यांस भेटण्याकरितां उठून दोन तीन पावलें पुढें झाला. उभयतांचें दोन चार कुशल प्रश्न झाल्यावर, ते एकमेकांस मित्रत्वदर्शक आलिंगन देऊं लागले. इतक्यांत अफजूलखान यानें, आपणास हातानें पुढें ओढून डावे हाताखालीं दाबून धरिलें, व आतां तो आपल्या अंगावर कट्यार चालवितो असें शिवाजी महाराजांस वाटून, त्यांनीं आपलें अंग चपलाईनें काढून घेऊन, खानाचे पोटांत एकदम वाघनख खुपसलें. खान लागलाच मोठ्यानें, ‘ दगादगा ’ ह्मणून ओरडला, आणि आपली तरवार उपसून त्यानें महाराजांचे डोक्यावर वार केला; परंतु त्यांचे डोक्यावर शिरस्त्राण असल्यामुळें, त्यांस तेव्हाइतकी साधी जखम झाली, दुसरी कांहीं इजा झाली नाहीं. इकडे महाराजांनीं आपले तरवारीचा हात खानाचे खांद्यावर करतांच, त्याचे अंगांत फक्त अंगरखाच असल्यामुळें,

महाराजांचा वार त्याचे पोटापर्यंत उतरला, व त्यामुळे तो तत्काळ मुर्दा होऊन पडला! त्याचा शिपाई सय्यद बंडु हा हें कृत्य पहातांच महाराजांचें अंगावर चालून आला; परंतु शिवाजी महाराज व तानाजी मालुसरे यांचेबरोबर त्याच्यानें फार वेळ टिकाव धरवला नाहीं, व अखेर तोही ठार झाला. इकडे या गडबडींत पालखीचे भोयांनीं खानाचा मुर्दा पालखींत घालून चालविला; परंतु त्यास खंडो माळी वगैरे महाराजांचे सरदार आडवे येऊन, त्यांनीं खानाचें डोकें कापून घेऊन तें किल्ल्यावर पोहचवून दिलें!!

१०. यावेळीं तिसरा प्रहर होऊन जाऊन, दिवस तीन चार घटका मात्र राहिला होता. किल्ल्याखालून व वरून संकेताप्रमाणें कर्ण्यांच्या व तोफांच्या निशाण्या होतांच, एकदम चोहोंकडून मावळे लोक झाडींतून बाहेर पडले. खानाचे लोकांस घोड्यांवर चढण्यास किंवा हत्यारें घेऊन चाल करून येण्यास त्यांनीं मुळींच सवड दिली नाहीं. त्यांजवर चोहोंकडून एकदम हल्ला सुरू झाल्यामुळें, ते घाबरून पळूं लागले. हजार पंधराशें स्वार जे किल्ल्याचे पायथ्याशीं खानाबरोबर आले होते, त्यांजवर नेताजी पालकर हा तुटून पडला, व त्यानें त्यांतील बहुतेकांची कत्तल उडविली; परंतु जावळीकडे मोरोपंत पिंगळे यांजकडे महाराजांनीं सांगून पाठविलें कीं, 'शत्रूकडील जे कोणी शिपाई आपलीं हत्यारें स्वाधीन करून शरण येतील त्यांस जीवदान द्यावें; व्यर्थ रक्तपात करूं नये.' विजापूरकरांचे फौजेची येणेंप्रमाणें दाणादाण झाल्यामुळें त्यांचें पुष्कळ द्रव्य व लढाऊ सामान महाराजांचें हातीं लागलें चार हजार घोडे, साठ पासष्ट हत्ती, हजार बाराशें उंट, शिवाय बैलांचा तोफखाना हीं सर्व महाराजांस प्राप्त झालीं.

शत्रूकडील पुष्कळ लोकांस तो मुलूख माहितीचा नसल्यामुळें, त्यांस रस्ता न उमगून ते रानावनांतून अन्नवस्त्रावांचून मोठे हाल काढीत असे कित्येक दिवसपर्यंत पळत होते. त्यांस महाराजांनीं आश्वासन देऊन व आपलेकडे आणून त्यांचें संगोपन केलें, व त्यापैकीं जे महाराजांपाशीं चाकरीस रहाण्यास कबूल झाले, त्यांस त्यांनीं आप

पदरीं ठेऊन घेतलें, व बाकीचे लोकांस त्यांचे मुलुखांत परत जाऊं दिलें. यांपैकीं झुंझारराव घाटगे ह्मणून कोणी मराठा सरदार होता, त्याचे बापाचा आणि शहाजी राजे यांचा मोठा स्नेह असल्यामुळें, शिवाजी महाराजांनीं त्याचा मोठा सन्मान केला. त्यानें विजापूरची चाकरी सोडून आपले पदरीं येऊन रहावें, ह्मणून महाराजांनीं त्यास बराच आग्रह केला; परंतु तो तसें करीना; तथापि महाराजांनीं त्यास चांगले किंमतीचा नजराणा देऊन त्यास त्याचे गांवीं परत पाठवून दिलें; परंतु खंडोजी काकडे ह्मणून मावळे लोकांचा कोणी एक सरदार होता, त्यानें द्रव्याचे लालचीनें शत्रूंस मिळून, महाराजांचे न कळत अफजूलखानाचा मुलगा व बायकामाणसें यांस, आडवाटेनें खोऱ्यादऱ्यांतून पळवून नेऊन कऱ्हाड येथें सुरक्षितपणें आणून पोंहो-चविलें. हें वर्तमान महाराजांस कळतांच, त्यांनीं काकडे यास पकडून आणून लागलाच त्याचा शिरच्छेद करविला.

शिवाजी महाराज एकदांचे संकटांतून पार पडून परत आले असें पाहून, जिजाबाई साहेबांनीं त्याजवरून लिंबलोण केलें व त्या ह्मणाल्या, ‘ संभाजीचा सूड घेतलास, माझे डोळ्यांचें पारणें फेडलेंस; आज भेट झाली, हा सोन्याचा दिवस उगवला. ’ यानंतर शिवाजी महाराजांनीं पुष्कळ दानधर्म केला. ज्या सरदारांनीं व शिपाई लोकांनीं पराक्रम केले, त्यांचा मान करून, कोणांस पालख्या, कोणांस अबदागिरी, कोणांस सोन्याचीं कडीं, कोणांस उंची उंची वस्त्रें अशीं ज्यांचे त्यांचे योग्यतेप्रमाणें महाराजांनीं दिलीं. जे जखमी झाले, त्यांची उत्तम रीतीनें उस्तवारी केली. जे लढाईंत पडले, त्यांचे होतकरू पुत्रांस बोलावून आणून चाकरीस ठेविलें; ज्यांचीं मुलेंबाळें लहान, त्यांचे बायकांस वर्षासनें करून दिलीं. येणेंप्रमाणें शिवाजी महाराजांनीं आपले पदरचे लोकांस खुष ठेवून, शत्रूंकडील लोकही आपणांस बरें ह्मणतील असें केलें. पंताजी गोपीनाथ वकील यास हिवरें हें गांव, त्यास कबूल केल्याप्रमाणें वंशपरंपरेनें इनाम करून दिलें ( १६५९ ).

अफजूलखानाचे वधाविषयीं येथें दोन शब्द लिहिल्यावांचून इति-

हासकारांचें काम पुरें होणार नाहीं, असें समजून ते आतां लिहितों. या कृत्याबद्दल मराठी बखरींत शिवाजी महाराजांची मोठी तारीफ* केली आहे; परंतु मुसलमानी तवारिखींतून तें अत्यंत नीच व दुष्टपणाचें ह्मणून वर्णिलें आहे. ग्रांटडफसारख्या लोकमान्य अशा इंग्रजी इतिहासकारांनीं, हें कृत्य विशेष चांगलें किंवा विशेष वाईट असें कांहींच ह्मटलें नाहीं. आलीकडील सुधारलेल्या युरोपीयन राष्ट्रांचे नीतिशास्त्रदृष्ट्या, अफजूलखानाचा वध हा अगदीं गर्हणीय होय यांत संशय नाहीं; तथापि शिवाजी महाराजांचे तर्फे कांहीं थोड्या गोष्टींचा विचार केला असतां, त्यांचा अपराध एवढा मोठा आहे असें आपणांस वाटणार नाहीं. प्रथम, शिवाजी महाराजांचा काळ व त्यावेळचे लोकांची नीतिमत्तेबद्दलची कल्पना, ह्यांविषयीं विचार केला पाहिजे. श्रीरामचंद्रानें वालीस कशातऱ्हेनें मारिलें, श्रीकृष्णानें भीमसेनास मांडीकडे खूण दाखवून, दुर्योधनास गदाघातानें कसें खालीं पाडिलें, भगवान् श्री विष्णूनें वामनावतार घेऊन बळी राजापाशीं भिक्षाही मागून, त्यांस ह्या भूलोकावरून कसें दवडिलें, इत्यादि पूज्य मानिलेल्या पुराण ग्रंथांतील कथाभाग महाराजांचे कानावर वारंवार पडत असतां, त्यांस अफजूलखानासारख्या गोब्राह्मणास पीडा देणाऱ्याचा वध करणें ह्मणजे कांहीं पाप आहे, असें वाटत नसेल यांत संशय नाहीं. त्यांचे राजगुरु रामदास स्वामी, ज्यांची त्यांस यवनांचें पारिपत्य करून महाराष्ट्र राज्य वाढविण्याविषयीं पूर्ण संमति§ असे, त्यांनींसुद्धां खानाचे वधाबद्दल महाराजांचा निषेध केला असेल असें वाटत नाहीं. अफजूलखानानें महाराजांचा वडील भाऊ संभाजी राजे याचा घात केला होता व आपणा स्वतःविषयींही त्याचा तसाच बेत असेल, असें त्यां

* अफजूलखान मारून महाराज विजयी झाले, ते समयीं, जसा शिशुपाल सभेमध्यें सहज लीलेंकरून श्रीकृष्णजीनें मारिला, त्याप्रकारें त्या सभेंत शोभा येती झाली. चिटणीसांची बखर.

§ बहुत लोक मेळवावे । लोक विचारें भरावे । कष्ट करूनी घसरावें । म्लेच्छांवरी ॥ आहे तितुकें जतन करावें । पुढें आणिक मेळवावें । महाराष्ट्र राज्यची करावें । जिकडे तिकडे. ॥

पंताजी गोपीनाथ यांचे तोंडून कळलें होतें. तेव्हां आपणांस अप-कार करणाऱ्या शत्रूचा कपटानें नाश करणें यांत कांहीं गैर नाहीं, असेंही त्यांस वाटत असेल, हें साहजिकच आहे. शिवाजी महाराजांस विनाकारण रक्तपाताचा कंटाळा असे, व शत्रू जर भला असेल, तर त्यास ते त्याचा चांगला मान करून त्याशीं भलेपणानें वागत असत. याबद्दल, येथपर्यंत कल्याणचा सुभेदार मुल्लाना अहंमद, चाकणचा किल्लेदार फिरंगाजी नरसाळा, हिरडसचा बाजी परभू यांचीं, व यापुढें जयपूरचा राजा जयसिंग व गोवळकोंड्याचा सुलतान अबू हसन कुतुबशहा यांचीं उदाहरणें आहेत. याशिवाय दुसरी गोष्ट हीही लक्षांत आणली पाहिजे कीं, महाराजांचें जावळी येथील यापूर्वी नुक-तेंच घडलेलें चंद्रराव मोरे याचेसंबंधाचें कृत्य खानास माहीत नसेल असें नाहीं, व शिवाय विजापूरचे दरबारांत विश्वासघाताचे प्रसंग थोडथोडके होत नसून, खान अजाण अल्पवयी होता असेंही नव्हतें.* तो शिवाजी महाराजांचा दगेबाजीचा स्वभाव तर जाणून असेलच; परंतु आपणच त्यांस दगा करून आपलें काम साधून घेऊं, अशा आशेंत तो राहून, पंताजी गोपीनाथ यांचे विश्वासावर फार गेल्यामुळें अखेर त्याचा नाश झाला, हें विशेष संभवनीय दिसतें. शेवटीं शिवाजी महाराजांचे या अपराधाबद्दल विचार करतांना हेंही लक्षांत ठेविलें पाहिजे कीं, हल्लीं युरोपांतील सुधारलेले राष्ट्रांत राजनीतिमत्तेची पोंच पुष्कळ वाढली आहे, व विनाकारण रक्तपात वगैरे करणें ह्मणजे दुष्टपणाचें कृत्य आहे, असें साधारण लोक समजूं लागले आहेत हें खरें; तथापि तेथेंसुद्धां राजनीति ही, अद्याप तिची पहिली पायरी जी कीं ती बोलण्यांत व लिहिण्यांतच दृष्टीस पडावी—व येवढीही गोष्टसुद्धां एके तऱ्हेनें मोठी अभिनंदनीय आहे—तिजवरच येऊन पोहोंचली

---

§ शिवराजाचें आठवावें रूप । शिवराजाचा आठवावा साक्षेप । शिवराजाचा आठवावा प्रताप । भूमंडळीं. ॥

संभाजी महाराजांस रामदास स्वामीचें पत्र.

* ग्र्यांडडफ पान ६२, १०६ भाग १.

आहे. प्रत्यक्ष कृतींत जितकी तिची साक्ष पटावी तितकी पटत नाहीं. तेव्हां वरील या सर्व गोष्टींचा विचार केला असतां, शिवाजी महाराजांनीं आपले जिवावरचें हें काम पतकरून अफजूलखानाचा जो वध केला, त्याबद्दल आपण त्यांस एरवीं जितका दोष दिला असता, तितका खरोखरच देण्यास तयार होणार नाहीं.

११. अफजूलखानाचा वध व त्याचे फौजेची झालेली वाताहात यांची बातमी चौथे दिवशीं विजापूरास येऊन पोहोंचली. ती ऐकून सुलतान अल्ली आदिलशहा व त्याची आई यांस फार वाईट वाटलें. पादशहा जादीनें तर तीन दिवस अन्न खाल्लें नाहीं असें ह्मणतात. उमरावांस व सामान्य लोकांसही दुःख झालें. तरी सरदारांमध्यें एकमेकांचा द्वेष व मत्सर हीं असल्यामुळें, त्यांचे हातून शत्रूचा तावडतोब बंदोबस्त व्हावा अशी बरेच दिवस तजवीज झाली नाहीं.

इकडे शिवाजी महाराजांनीं फौज गोळा करून, जंजिऱ्याचे सिद्धीवर चाल करून जाण्याची हूल दाखवून, ते एकाएकीं कोल्हापूर प्रांतांत उतरले. पन्हाळा किल्ल्यावरील अधिकारी यानें कांहीं लांच खाऊन, महाराजांचे स्वाधीन किल्ला करून दिला. तेथें त्यांनीं अण्णाजी दत्तो ह्मणून कोणी हुषार व विश्वासु असा ब्राह्मण कारकून होता त्यास नेमिलें. यानंतर लवकरच पावनगड, वसंतगड वगैरे किल्ले काबीज करून, कृष्णा नदीचे कांठचे मुलुखांतून शिवाजी महाराज खंडण्या वसूल करीत व जागोजाग आपलीं ठाणीं बसवीत चालले. त्याच-प्रमाणें पन्हाळ्यावरून फौजा पाठवून, त्यांनीं सह्याद्रीचे पायथ्याचे व माथ्यावरचे सर्व किल्ले हस्तगत करून घेतले; त्यांपैकीं रांगणा व खिळणा हे किल्ले घेण्यास विशेष श्रम पडले. खिळण्याचें नांव बद-लून, महाराजांनीं त्यास विशाळगड हें नांव दिलें.

शिवाजी महाराज कोल्हापूर प्रांतांत आले असें समजतांच, तेथील अधिकारी रुस्तुमझमान हा मिरजेहून फौज जमा करून महाराजांवर चालून आला; परंतु त्याजपाशीं फक्त तीन हजार स्वार व कांहीं

पायदळ मात्र असल्यामुळें, त्याचा महाराजांनीं अगदीं मोड करून त्यास कृष्णा नदीचे पार हांकून लाविलें ( डिसेंबर १६५९ ). यानंतर तोच रोख धरून, शिवाजी महाराज जागोजाग खंडण्या वसूल करीत व गांव लुटीत व चोहोंकडे आपला दरारा पसरवीत खुद्द विजापुरापर्यंत गेले; परंतु तेथून ते अशा जलदीनें परत आले कीं, शत्रूस त्यांचा पाठलाग करितां आला नाहीं. इकडे अण्णाजी दत्तो याजकडून यापूर्वींच महाराजांनीं विशाळगडास मोठी फौज जमा करून ठेविली होती, ती बरोबर घेऊन त्यांनीं समुद्रकांठीं राजापुरावर स्वारी केली. तेथें खंडणी वसूल करून, व दाभोळ व शेजारचीं ठाणींहीं हस्तगत करून, जवळ जमा झालेली लूट महाराजांनीं राजगडीं नेऊन पोहोंचविली ( जानेवारी १६६० ).

१२. पन्हाळा किल्ला हस्तगत होऊन रुस्तुमझमान याचा मोड झाला, व महाराजांच्या स्वाऱ्या खुद्द विजापूरापर्यंत येऊन थडकूं लागल्या, हें पाहून तेथील सरदार मंडळी बरीच घाबरून गेली. त्यांनीं एक मोठी फौज पुन्हां जमा केली व तिजवर कोण मुख्य नेमावा याबद्दल पुष्कळ वाटाघाट केली. शेवटीं कोणी एखादा जुने खानदानी घराण्यांतील उमराव न नेमतां, सिद्धीजोहार म्हणून कर्नूल येथें कोणी सुभेदार होता, त्यासच या कामगारीवर नेमावें असें ठरलें. या सुभेदारानें यापूर्वीं कर्नाटकांत सरकारचीं पुष्कळ कामें उत्तम प्रकारें बजाविलीं असल्यामुळें, त्याचा बराच नांवलौकिक होता. त्यास आतां सलाबतखान हा मोठा किताब देऊन, त्याजबरोबर दहा हजार घोडेस्वार, चौदा हजार पायदळ, व इतर चांगला सरंजाम हा दिला. अफजूलखानाचा मुलगा फाजील महंमदखान, ज्यास आपले बापाचे वधाबद्दल सूड उगविण्याविषयीं उत्कट इच्छा होती, तोही या मोहिमीवर जाण्यास तयार झाला. विजापुरास झालेली ही तयारी पाहून, जंजिऱ्याचा सिद्धी फत्तेखान हाही शिवाजी महाराजांचे कोंकणांतील मुलुखावर उठला. त्याचप्रमाणें वाडीचे देशमुख सावंत, ज्यांचें कांहीं दिवसांपूर्वीं महाराजांस येऊन मिळण्याविषयीं बोलणें चाललें होतें परंतु तें अखेर जमलें नाहीं, तेही यावेळीं महाराजांशीं विशेष आकसानें लढण्यास तयार झाले.

येणेंप्रमाणें शिवाजी महाराजांवर चोहोंकडून शत्रु उठले असतां, त्यांनीं न घाबरतां आपले मुलखाचे रक्षणाकरितां योग्य बंदोबस्त केला. जंजिऱ्याचे सिद्दीवर रघुनाथ बल्लाळ यास धाडिलें; सावंताशीं लढण्याकरितां बाजी फसलकर सरनोबत यास पाठविलें; कल्याण भिवंडीचे प्रांतावर आबाजी सोनदेव यास ठेविलें. पुरंदर, सिंहगड, प्रतापगड व त्या सभोंवतालील मुलखाचा बंदोबस्त ठेवण्याकरितां मोरोपंत पिंगळे याची योजना केली, व आपण स्वतः पन्हाळा किल्ल्यावर राहून शत्रूंशीं लढण्याकरितां तयारी केली. हा किल्ला जितका मजबूत आहे असें महाराजांस वाटलें होतें, तितका तो खरोखर नव्हता, व तेथें राहण्यानें पहिल्यापहिल्यानें तर महाराज मोठे पेंचांतच आले. महाराज पन्हाळा किल्ल्यावर आहेत हें सिद्दी जोहार यास कळतांच, तो प्रथम तिकडे वळला. शत्रू किल्ल्याकडे चाल करून येत असतां शिवाजी महाराजांनीं त्यांस फारसा अडथळा केला नाहीं; परंतु ते किल्ल्याशीं येऊन भिडल्यावर नेताजी पालकर यानें भोंवतालचा मुलूख लुटून फस्त करून व विजापूरचे फौजेस दाणावैरण न मिळे अशी नाकेबंदी करून व त्याचप्रमाणें त्यांजवर वरचेवर रात्रीं छापे घालून त्यांस जेर केलें. इकडे किल्ल्यावरून मावळे लोक खालीं उतरून खोऱ्यांतून लपतछपत विजापूरचे फौजेचे छावणीजवळ येऊन, ते गैरसावधपणें निजले असले तर, ते त्यांजवर एकदम तुटून पडत; परंतु ते झोंपेंतून उठून जागे झालेच तर, ते त्यांजवर बाण टाकीत. या तऱ्हेचे हल्ल्यांनीं विजापूरकरांचे पुष्कळ लोक मरत; तथापि सिद्दीजोहार यानें किल्ल्यास चोहोंकडून चांगले मोर्चे बांधून, भर पावसाळा चालू असतांही, किल्ल्याची अशा उत्तम प्रकारें बंदी केली कीं, आंत नवीन माणूस किंवा सामानसुमान कांहीं पोहोंचेनासें झालें. आपले सरदार बाहेर काय करीत आहेत हें महाराजांस कळेना, व किल्ल्यांत काय स्थिति आहे हें सरदारांस कळेना. शेवटीं आपली चूक महाराजांचे लक्षांत येऊन, त्यांनीं आपणांस या संकटांतून मोठ्या युक्तीनें सोडवून घेतलें ( सप्टेंबर १६६० ).

पन्हाळा किल्ल्यास वेढा अगदीं बेमालूम असून महाराजांस बाहेरून कुमक मुळींच पोंहचत नाहींशी झाली हें पाहून, किल्ला व महाराज आतां आपले हातीं खास येतात, अशी विजापूरचे फौजेस मोठी आशा लागली. ते वेढ्याचें काम आतां अधिक दक्षतेनें करूं लागले. तेव्हां शत्रूस भूल कशी द्यावी असा महाराजांनीं विचार करून, ‘ आह्मीं आतां किल्ला स्वाधीन करून देतों ’ ह्मणून त्यांनीं प्रथम सिद्धीजोहार याजकडे बोलणें सुरू केलें. त्यांचे मनांतील हेतु हा कीं, तहाचें बोलणें सुरू केलें ह्मणजे अर्थातच शत्रूकडील लोक अंमळ बेसावध राहतील. शेवटीं बोलणें निक्कें करण्याकरितां आह्मीं स्वतः किल्ल्या-खालीं येतों, तुह्मीं शपथ घेऊन अभयवचन मात्र दिलें पाहिजे, असें महाराजांनीं सिद्धीजोहाराकडे सांगून पाठवितांच त्यानें तें तत्काळ दिलें. सिद्धी लोक हे इमानास फार जागणारे असतात, हें महाराजांस पक्कें ठाऊक होतें. ते लागलेच थोडे शिपाई बरोबर घेऊन, विजापूरकरांचे एका मोर्च्याजवळ आले. महाराजांचें व सिद्धीजोहाराचें पुष्कळ बोलणें होऊन शेवटीं महाराजांनीं कबूल केलें कीं, ‘ उद्यां आह्मीं किल्ला स्वाधीन करून देतों ; मात्र कांहीं किरकोळ बाबींचा विचार करावयाचा राहिला आहे, त्यास आतां संध्याकाळ होत असल्यामुळें अवकाश नाहीं, उद्यां त्यांचा एकंदर निकाल करूं. ’ येणेंप्रमाणें महाराजांनीं अस्तमानापर्यंत युक्तीनें बोलणें लांबवून, दुसरे दिवशीं बाकी राहिलेल्या कांहीं किरकोळ बाबी या कशा तरी ठरल्या जाऊन किल्ला खास आपले स्वाधीन होतो, अशी विजापूरचे फौजेस आशा लावून ते संध्याकाळीं किल्ल्याकडे वर परत गेले.

त्या दिवशीं रात्रीं विजापूरचे छावणींत, आतां तह ठरला असें समजून लोक अगदीं बेसावध होते ; परंतु मध्यरात्र होतांच शिवाजी महाराज यांनीं आपलेबरोबर मावळे लोकांची एक निवडक टोळी घेऊन ते किल्ल्याखालीं अंधारांत उतरले, व शत्रूचे पहारे व चौक्या चुकवून त्यांनीं रांगणा किल्ल्याची वाट धरिली. महाराज येणेंप्रमाणें चुकवून गेले, हें पुष्कळ वेळ विजापूरकरांस समजलेंच नाहीं ; परंतु ती खबर

पक्की ह्मणून समजतांच, फाजील महंमदखान व सिद्धीजोहार याचा मुलगा सिद्धी वजीस हे तातडतोब बरोबर घोडेस्वार घेऊन, महाराजांचा पाठलाग करण्याकरितां धांवले. त्यांचे मागून बरेंच पायदळही रवाना झालें; परंतु शिवाजी महाराजांची पाठ त्यांस सुमारें नऊ दहा वाजेतों-पर्यंत दिसलीच नाहीं. ह्यावेळीं महाराज रांगणा किल्ल्यापासून तीन कोसांवर जो घांट लागतो तो चढत होते. शत्रूचें सैन्य पाठलाग करीत आलेलें पाहून, शिवाजी महाराजांनीं बाजी परभू याचे हाताखालीं कांहीं मावळे लोक देऊन त्यास सांगितलें कीं, 'आह्मीं किल्ल्यावर बाकी सर्व लोकांसह सुरक्षित पोहोंचेतोंपर्यंत तुह्मीं शत्रूस खिंडींतच थोपून धरावें. आह्मीं किल्ल्यावर पोहोंचतांच संकेतदर्शक पांच तोफा सोडूं, ह्मणजे तुह्मीं मग आपले लोक घेऊन डोंगराचे आश्रयानें किल्ल्याकडे वर यावें.'

विजापूरकरांची फौज मोठी लगेहात करीत खिंडीशीं येऊन, ती खिंड चढूं लागली; परंतु बाजी परभू यानें मावळे लोकांसह त्यांचे घोडे-स्वारांवर असा निकराचा मारा केला कीं, त्यांस त्यानें खिंडींतून परत खालीं घालविलें. यानंतर विजापूरकरांचें पायदळ येऊन पोहोंचल्यावर त्यांनीं मावळ्यांवर दोनदां हल्ले केले; परंतु तेही त्यांनीं मागें हटविले. यापुढें दुपारचे सुमारास फाजील महंमदखान यानें शिपायांची नवीन टोळी आणून पुन्हां तिसऱ्यानें मोठे निकरानें पुढं चाल केली. बाजी परभू यानें त्यांजवर पुनः तुटून पडून हल्ला केला; परंतु त्याचे या-पूर्वीं बरेच लोक मरून गेले असल्यामुळें, व शत्रूचें सैन्य पुष्कळ असल्यामुळें त्याचा नाइलाज झाला; तथापि बाकी राहिलेल्या शिपा-यांसहच तो मोठे शूरपणानें लढला. शेवटीं अर्धे अधिक मावळे लोक पडले, व त्यांत बाजी परभूही गोळी लागून पडला. मात्र पडण्यापूर्वीं किल्ल्यावरून झालेल्या तोफा त्याचे कानीं पडल्या अस-ल्यामुळें, त्यास समाधान वाटून तो असें बोलला कीं, 'मी आपली कामगिरी तर बजाविली.' त्याचें प्रेत शत्रूचे हातीं न लागावें, ह्मणून मावळ्यांनीं शत्रूचे माऱ्यास तोंड देऊन मोठे शूरपणानें तें किल्ल्यावर सुरक्षितपणें पोहोंचविलें. बाजी परभू यानें अशा उत्तम रीतीनें आपलें

काम बजावून त्यांत आपला प्राणही खर्चिला, यावरून महाराजांनीं त्याचा मुलगा बाळाजीबाजी यास बोलावून आणून, बापाची सरदारी त्यास दिली. त्याचप्रमाणें त्याचे सात भाऊ होते, त्यांसही पालख्या व तैनात करून देऊन मावळे लोकांची सबनिशी त्यांस सांगितली.

१३. इकडे फाजील महंमदखान हा रांगणा किल्ल्याशीं येऊन भिडला; परंतु ते पावसाळ्याचे दिवस असून आपले सैन्याचा निभाव डोंगरांत लागणार नाहीं, म्हणून तो परत पन्हाळ्याकडे गेला. सिद्दी-जोहार याचा सर्व बेत फसल्यामुळें, त्यास आतां रांगणा किल्ल्याकडे फौज घेऊन जावें, किंवा पन्हाळाच प्रथम हस्तगत करावा हें कांहीं सुचेना. सुलतान अल्ली आदिलशहास शिवाजी आतां खचित् हातीं येतो, अशी मोठी आशा लागून राहिली असल्यामुळें, महाराज शेवटीं निसटून गेले, हें ऐकून त्यास फार वाईट वाटलें. त्यास संशय आला कीं, सिद्दीजोहार यानें शिवाजी महाराजांपासून लांच खाऊन त्यास पळून जाऊं दिलें. यावरून त्यानें सर्व फौज स्वतःच आपले हातीं घेऊन तो कऱ्हाडाकडे चालला. सुलतानानें सिद्दीजोहार याचे अंगीं शत्रूशीं फंद केल्याबद्दलचा दोष लाविला; परंतु सिद्दी हा मूळ तापट स्वभावाचा असून, तो आतां फसला गेल्यामुळें चिडला होता; यामुळें त्यानें आपले दोषारोपाचें निष्करण करितांना अंमळ अमर्यादपणाचें भाषण केलें. त्यावरून दरबारांत त्याचे जे शत्रू होते, त्यांनीं सिद्दी हा बेइमान असून दांडगाही आहे असे सुलतानाचे कान भरले. हें वर्तमान सिद्दी यास कळल्यावर, सुलतानानें त्यास आपले छावणीकडे बोलाविलें असतां, त्यानें कांहीं निमित्त सांगून तो आपले जहागिरीचें गांव कर्नूल इकडे निघून गेला (जानेवारी १६६१).

१४. इतक्यांत सुलतान अल्ली आदिलशहा यानें पन्हाळा, पावनगड, व सह्याद्रीचे माथ्यावरचे व तळाचे सर्व किल्ले पुन्हां जिंकून घेतले. मात्र रांगणा व विशाळगड हे त्याचे हातीं लागले नाहींत; परंतु इतकें होण्यास पावसाळा लागल्यामुळें, सुलतान हा डोंगरांतून निघून कृष्णेच्या कांठीं चिमलगें या गांवीं छावणी देऊन राहिला.

विजापूरचा सुलतान आपले डोंगरी किल्ले परत जिंकून घेत असतां इकडे शिवाजी महाराज हे अगदीं स्वस्थ बसले नव्हते. त्यांनीं राजापुरावर पुनः स्वारी करून तें घेऊन लुटलें. या शहरांत कांहीं इंग्लिश व्यापारी होते, त्यांनीं पन्हाळा किल्ल्यास वेढा पडला असतां सिद्धीजोहारास दारूगोळा पुरविला होता, अशी बातमी महाराजांस लागल्यामुळें, त्यांनीं त्या व्यापाऱ्यांस शेजारचे एका किल्ल्यांत कैद करून ठेविलें. यानंतर दळवी ह्मणून त्या प्रांतांत कोणी स्वतंत्र संस्थानिक होते, त्यांचें मुख्य शहर शृंगारपूर हें महाराजांनीं छापा घालून घेतलें. दळवी यांजबरोबर महाराजांची लढाई होऊन त्यांत दळवी हे पडले. त्यांचा सर्व मुलूख महाराजांचे हातीं आला. तेथील लोकांस प्रथम शिवाजी महाराजांचें भय वाटून ते जंजिऱ्याच्या मुलुखांत रहावयास जाऊं लागले; परंतु दळवी यांचे सुर्वे ह्मणून कोणी दिवाण होते, त्यांची महाराजांनीं समजूत पाडून व सर्व लोकांस त्यांचे पूर्वीचे हक्क त्यांजकडे कायम राखून त्यांस तेथून जाऊं दिलें नाहीं.

सुलतान अल्ली आदिलशाहा हा चिमलगें या गांवीं छावणी करून राहिला असतां, त्यानें सिद्धीजोहार यास अभयवचन देऊन आपणाजवळ आणिलें. तेथें त्यानें त्याचा चांगला मान राखिला; परंतु सिद्धीजोहार याचा शत्रू जो इब्राहीमखान, त्याचे तंत्रानें सुलतान फार चालत असल्यामुळें, सिद्धी यास सुलतानाचा विश्वास येईना. इतक्यांत कर्नाटकांत तेथील कित्येक जमेदारांनीं पुनः बंड उपस्थित केल्यामुळें, सुलतानानें या नवीन मोहिमेवर सिद्धी जोहाराची योजना केली. सिद्धी तरी सुलतानापासून एकदांचा बरेपणें केव्हां सुटून जातों ह्मणून वाटच पहात होता! तो लागलाच कर्नूळकडे निघून गेला; परंतु जमेदारांचें बंड मोडण्याविषयीं त्याची विशेष तत्परता दृष्टीस पडेना; ह्मणून तो बंडखोरांस सामील होऊन शिवाजी महाराजांशींसुद्धां त्याचें आंतून संधान आहे, असें सुलतानास वाटूं लागलें.

शिवाजी महाराजांबरोबर युद्ध चालवावें किंवा प्रथम कर्नाटक प्रांताचा बंदोबस्त करावा, ह्याविषयीं विजापूरचे दरबारांत मोठा

विचार पडला. इतक्यांत वाडीचे सावंत यांजकडून अर्ज आला कीं, "आम्हांस सरकारांतून चांगली कुमक पोहोंचली, तर आम्हीं शिवाजीपासून सर्व कोंकणप्रांत सोडवितों." सावंत यांचेकडे यापूर्वीं बाजीराव फसलकर याची नेमणूक महाराजांनीं केली होती ह्मणून मागें सांगितलेंच आहे. सावंत व फसलकर यांची मोठी निकराची लढाई होऊन तींत दोघेही पडले व विशेष सरसी कोणाही पक्षाची झाली नाहीं. तेव्हां सावंत यांनीं पुनः कंबर बांधून सरकारांतून कुमक मागून आपले मुलखावरील शत्रूंचा शह काढून टाकण्याचा निश्चय केला. सुलतानास कर्नाटक प्रांतांत सिद्धीजोहार एकदां जोरावला असतां पुढें फार कठीण जाईल असें वाटून, त्यानें त्या प्रांतांत फौज घेऊन स्वतः जाण्याचा विचार केला, व महाराष्ट्राचे सुदैवानें शिवाजी महाराजांविषयीं विजापूरचे दरबाराकडून पुनः एक-वार उपेक्षा झाली. सुलतानानें सावंतांचा अर्ज मंजूर करून, त्यांचे मदतीस बहिलोलखान व बाजी घोरपडे मुधोळकर यांची योजना केली व आपण कर्नाटकांत निघून गेला.

१९. इकडे नवीन व्यवस्थेप्रमाणें सैन्य गोळा होत असतां, बाजी घोरपडे हाही मुधोळास येऊन तेथें आपले शिपाई प्यादे वगैरे सरंजाम जुळविण्याचे तयारीस लागला. या सर्व बातम्या महाराजांस वरचेवर पोहोंचत होत्याच; परंतु घोरपडे हा मुधोळास आला असून तो बेसावधही आहे, हें महाराजांस विशाळगडावर कळतांच, शहाजी राजे यांस घोरपडे यानें मागें दगा केला होता त्याचा सूड उगविण्यास ही संधि उत्तम आहे, असें जाणून ते ताबडतोब मोठ्या त्वरेनें मुधोळास गेले, तेथें त्यांनीं बाजी घोरपडे याजवर एकाएकीं छापा घातला व त्यास, त्याचे घरचे सर्व माणसांस, व त्याचे शिपाई वगैरे यांस ठार केलें. यानंतर मुधोळ गांव जाळून टाकून महाराज मोठे त्वरेनें परत विशाळगडास येऊन दाखल झाले. बाजी घोरपडे याचा याप्रमाणें नाश झाल्यामुळें, त्याचे कामगिरीवर कावसखान ह्मणून सरदाराची विजापुराहून नेमणूक झाली. बहिलोलखान व कावसखान या दोघांनीं लवकरच सह्याद्रिमाथ्यावरचे सर्व किल्ले व मुलूख काबीज केला, व

तेथून ते कोंकणांत उतरण्याचे तयारींत होते ; इतक्यांत सुलतानानें त्यांसही आपले कुमकेस कर्नाटकांत बोलावून नेलें ; आणि वाडीकर सावंत यांस शिवाजी महाराजांचे तडाक्यांत एकटेच असे सोडून दिलें !

इकडे कर्नाटकांत सुलतान अल्ली आदिलशाहा यानें रायचूर व तुरगल या दोन शहरांवर मोठा निकराचा हल्ला केला. यावेळीं त्यानें मोठा पराक्रम केला ; परंतु तेथील लोकांनीं चांगले शूरपणें लढून त्यास दाद दिली नाहीं. इतक्यांत सिद्धीजोहार यानें सुलतानाचा आपणावर फंदाबद्दल पक्का संशय आहे असें पाहून, याउपर त्याचे ताब्यांत पुनः जाणें बरें नाहीं, असें समजून त्यानें उघड बंड केलें. झुंझारराव घाटगे व फलटणकर नाईक यांच्या फौजा तुंगभद्रानदी ओलांडून सुलतानाचे इतर सैन्यापासून दूर झालेल्या पाहून, त्यांजवर सिद्धी यानें एकदम हल्ला केला, व त्यांची प्रथम दाणादाण करून त्यांस नदीपलीकडे पळवून लाविलें ; परंतु बहिलोलखान याची फौज मागून येऊन पोहोंचतांच त्या दोघांस धीर येऊन त्यांनीं सिद्धीजोहार यास परत हटविलें. यानंतर थोडकेच दिवसांनीं सिद्धीजोहार यास त्याचे शिपायांनींच ठार मारिल्यामुळें त्याचें बंड अगदीं मोडून गेलें ; परंतु मूळ जमेदारांचें जें बंड झालें होतें तें तसेंच चालू होतें. शेवटीं सुलतानानें दोन वर्षें कर्नाटकांत काढून सुंदचे राजावर खंडणी बसवून व प्रांतांत साधारण बंदोबस्त करून तो विजापुरास परत आला. ( १६६२ ).

असो ; येणेंप्रमाणें विजापूरकरांची सर्व फौज कर्नाटकांत गुंतून गेल्यामुळें, इकडे शिवाजी महाराजांस आयतेंच चांगलें फावलें. वाडीचे सावंत हे महाराजांचे तडाक्यांत एकटेच राहिल्यामुळें, त्यांचा मुलूख महाराजांनीं थोडेच अवकाशांत सर केला. यानंतर सावंत व श्रृंगारपूरचा रामदळवी हे गोंव्यास पोर्तुगीज लोकांपाशीं आश्रय मागण्याकरितां गेले; परंतु गोंवेकरांस महाराजांनीं धमकीच्या गोष्टी सांगून पाठविल्यामुळें, त्यांनीं त्यांस भिऊन सावंत व दळवी यांस आपले मुलुखांतून काढून दिलें. शेवटीं ते अगदीं निराधार होऊन महाराजांस शरण आले. तेव्हां सावंत हे आपले भोंसले कुळापैकींच असून, ते चाकरीस राहूं ह्मणताहेत असें पाहून, महाराजांनीं त्यांस

वाडीची देशमुखी पूर्ववत् सांगून, त्यांस आपले पदरीं ठेवून घेतलें, व ते याउपर महाराजांची चाकरी इमानइतबारें करूं लागले. राम दळवी हाही महाराजांचे पदरीं राहिला. त्या दोघांचे मुलुखांत महाराजांनीं आपली शिबंदी ठेविली, व त्यांचे मुलुखांतील चांगले चांगले शिपाई आपले देशांतील फौजांत आणून लाविले. त्याचप्रमाणें त्या मुलुखांतील रायरी व मालवण हे किल्ले महाराजांनीं चांगले मजबूत असे बांधिले.

जंजिऱ्याचा सिद्धी फत्तेखान याजवर शिवाजी महाराजांनीं रघुनाथ बल्लाळ यांची योजना केली होती, ह्मणून मागें सांगितलेंच आहे. सिद्धी याजपाशीं गलबतांचें उत्तम साधन असल्यामुळें, तो महाराजांचे कोंकणांतील मुलुखांत जागोजाग उतरून लुटालूट करी, व यामुळें त्यानें प्रथम रघुनाथ बल्लाळ यांजवर कांहीं वेळ सरशीही मिळविली; परंतु महाराजांनीं लवकरच कोंकणांत चांगली कुमक पाठविल्यामुळें सिद्धी ह्याची अगदीं पिछेहाट होऊन, महाराजांनीं सिद्धीचें चांगलें ठाणें जें धुंडीराजापूर हेंही घेतलें. यानंतर त्यास विजापुराकडून किंवा सावंताकडून कुमक पोहोंचेनाशी झाल्यामुळें, तो जंजिऱ्यांत अगदीं कोंडला गेला. मराठ्यांनीं आतां जंजिऱ्यावरही तोफांचा मारा सुरू केला; परंतु त्यांजपाशीं चांगले गोलंदाज व पुऱ्याशा तोफा नसल्यामुळें, सिद्धी त्यांस दाद लागूं देईना ( १६६१ ); तथापि अखेर चोंहोंकडून अगदीं कोंडून गेल्यामुळें, फत्तेखान सिद्धी हा शिवाजी महाराजांस शरण आला, व त्यानें त्यांशीं तह केला कीं, ‘ या उपर महाराजांनीं घेतलेले प्रांतांस व किल्ल्यांस मी उपद्रव करणार नाहीं; व महाराजांनींही माझे प्रांतास उपद्रव करूं नये ’ ( १६६२ ).

१६. सिद्धी यानें वर लिहिल्याप्रमाणें महाराजांशीं तह केला खरा; परंतु तो मधून मधून महाराजांचे प्रांतास उपद्रव करीतच असे. त्याचा बंदोबस्त करण्याकरितां महाराजांनीं त्या प्रांतीं पांच सात हजार लोक जागोजाग ठेविले; व सिद्धीप्रमाणें समुद्रावर आपली सत्ता चालावी ह्मणून त्यांनीं एक नवीन आरमार तयार करविलें. गलबतें, शिडाडें, तरांडी, दुबारें वगैरे अनेक जातींचीं चार पांचशें

जहाजें बांधून तयार केलीं. या आरमाराचें मुख्य ठिकाण कुलाबा हें करून सुवर्णदुर्ग व विजयदुर्ग येथेंही बरींच गलबतें ठेविलीं, व त्या सर्वांवर दर्यासागर व माय नामक भंडारी हे अधिकारी नेमिले. त्यांचे हाताखालीं लढाऊ कोळी व खलाशी व तोफा वगैरे दर्यावर्दी सामान सर्व सज्ज असें दिलें. यामुळें सिद्धी, पोर्तुगीज वगैरे लोकांवर महाराजांची लवकरच जरब पडूं लागली. पोर्तुगीज लोकांनीं लवकरच महाराजांकडे वकील पाठवून तह केला; त्यांत असें ठरलें कीं, महाराजांनीं पोर्तुगीज लोकांचे गलबतांस उपद्रव देऊं नये, व त्या-बद्दल पोर्तुगीज लोकांनीं महाराजांस तोफा, दारूगोळा वगैरे लढाईचें सामान पुरवीत जावें.

१७. सावंतांस एकटे सोडून दिल्यामुळें, त्यांचा मुलूख सर केला जाऊन ते शिवाजी महाराजांचे पदरीं राहिले; जंजिऱ्याचा सिद्धी यानेंही महाराजांशीं तह केला; कर्नाटकांतील मोहीम विशेष सफळ झाली नाहीं; व इकडे शिवाजी महाराजांची शक्ति उत्तरोत्तर वृद्धि-गत होऊन, त्यांजबरोबर लढण्यास तूर्त आपणांस सामर्थ्य राहिलें नाहीं असा विचार मनांत आणून, सुलतान अली आदिलशहाचा वजीर अबदूल महंमद यानें, शहाजीराजे यांचेमार्फत शिवाजी महाराजांची समजूत काढण्याचा विचार केला. वजीरानें शहाजीराजे यांस बोला-वून आणून त्यांस आपला हेतु सांगितला. राजे यांचे मनांत फार दिवसांपासून पुत्रास भेटण्याची इच्छा होती. त्याचप्रमाणें आपले देशीं जेजुरी, शंभुमहादेव वगैरे ठिकाणीं जाऊन देवदर्शन घेणें होतें; तेव्हां हा आयताच योग आलेला पाहून, ते त्या गोष्टीस तत्काळ कबूल झाले. ते ह्मणाले " पुत्र आमचे स्वाधीन नाहींत याबद्दल मागेंच आह्मीं खात्री केली आहे; तथापि प्रयत्न करून पाहतों. त्याची भेट घेऊन बोधाच्या चार गोष्टी सांगून सरकारचे आज्ञेंत त्यानें चालावें असें करून पाहतों;" तथापि शहाजीराजे पुत्राकडे गेल्यावर त्यांनीं त्यास तिकडेसच मिळून राहूं नये ह्मणून, त्याबद्दल वजीरानें खातरजमा करून घेऊन, त्यांस शिवाजी महाराजांकडे जाण्यास निरोप दिला. यानंतर शहाजीराजे तंजावरास परत जाऊन तेथून

व्यंकोजीराजे, तुकाबाई व बराच सरंजाम बरोबर घेऊन शिवाजी महाराजांचे भेटीस निघाले. वाटेनें तुळजापूरचे देवीचें व पंढरपूरचे विठोबाचें दर्शन घेतलें. आपण भेटीस येत आहों ह्मणून राजे यांनीं पुढें पत्रें व जासूद पाठविले. शिवाजी महाराजांस ही खबर लागतांच वडिलांस सामोरें जाण्यास हत्ती, घोडे, पालख्या वगैरे सरंजाम बरोबर घेऊन सरनोबत यांस सांगितलें. भेटीस फार वर्षें झालीं, ह्मणून जेजूरीस देवाचे संनिध सर्वांच्या गांठी पडल्या. नंतर महाराजांनीं सर्वांस लष्करांत आपले डेऱ्याकडे चालविलें. शहाजी राजे पालखींत बसल्यावर महाराज, पायींच जोडा न घालितां पालखी धरून मोठे मर्यादेनें चालले. डेऱ्यास येऊन पोहोंचल्यावर शहाजी राजे यांनीं महाराजांस हातीं धरून जवळ बसवून घेतलें, व मोठें सद्गदित अंतःकरण होऊन ते ह्मणाले, 'श्री भवानीचा वर पूर्वी झाला तेच पुत्र तुह्मीं, जगविख्यात पराक्रम तुह्मीं केलात. धर्मरक्षक तुह्मीं निर्माण झालांत! शिसोदे कुळांत उत्पन्न होऊन, तुह्मीं तें धन्य केलें!' यानंतर पुष्कळ दानधर्म करून व ब्राह्मणभोजनें घालून, उभयतां परिवारासह पुण्यास येऊन दाखल झाले. तेथें महिना दोन महिने राहिल्यानंतर महाराजांनीं वडिलांस राजगड, प्रतापगड वगैरे किल्ले दाखविले. अफजूलखानाचा कोठें व कसा वध केला हें सर्व दाखविलें. यानंतर रायगडास जाऊन, तेथील नवीन बांधलेलें राजमंदिर, हत्ती, घोडे वगैरे सर्व दौलत दाखविली. तेथून पुढें रामदास स्वामींचें दर्शन घेऊन, सर्व मंडळी पन्हाळा किल्ल्यावर गेली. तो पाहिल्यानंतर शहाजीराजे यांनीं परत कर्नाटकांत जाण्याची इच्छा दर्शविली. आपण इकडे राहिल्यानें तिकडील जहागिरीचा बंदोबस्त नीट राहणार नाहीं वगैरे सांगून, त्यांनीं तिकडे जाण्याचा बेत केला. सर्वांच्या भेटी होऊन, राजे यांनीं निरोप घेतांना महाराजांस एकांतीं घेऊन सांगितलें कीं, 'तुह्मीं राज्य मिळविलें ही मोठी संतोषाची गोष्ट झाली; तथापि आमची इच्छा आहे कीं, या उपर आमचे जिवांत जीव आहे तोंपर्यंत तरी, आमचे सरकाराबरोबर तुमची दोस्ती असावी. त्यांस तुमचेकडून उपद्रव लागूं नये; तुह्मांस या हातानें नाहीं तर त्या हातानें ते कांहीं

तरी पोहोंचवितील. यावर महाराजांनीं 'वडिलांचे इच्छेबाहेर मी नाहीं,' असें उत्तर करून, शहाजीराजे यांजबरोबर सुलतानास देण्याकरितां पोषाख, जवाहीर, हत्ती, घोडे, वगैरे नजराणा दिला व आपण परत आपले मुलखांत आले. शहाजीराजे विजापुरास येऊन तेथें वजीरास व सुलतानास भेटून त्यांनीं त्यांस शिवाजी महाराजांनीं दिलेला नजराणा दिला, व कामगिरी फत्ते केल्याबद्दलची हकीकत सर्व कळविली. नंतर सुलतानाचा निरोप घेऊन ते तंजावरप्रांतीं परत निघून गेले. (१६६२).

१८. येणेंप्रमाणें विजापूरचे सुलतानाबरोबर शिवाजी महाराज यांचा तह झाला. तोरणा किल्ला त्यांनीं १६४६ त घेतल्यापासून सोळा वर्षें एकसारखें वरील सरकारांबरोबर त्यांचें युद्ध चालून त्यांत त्यांची साधारण सरशीच झाल्यामुळें, त्यांचा आतां बराच अम्मल पसरला. यावेळीं त्यांचें राज्य सर्व कोंकण व घाटमाथा यांजवर पसरलें होतें. त्याची दक्षिणोत्तर सीमा गोवें व कल्याण हीं होऊन, पूर्व पश्चिम सीमा सुपें व जंजिरें हीं झाली होती. त्यांचेजवळ ५०,००० पायदळ व ७,००० घोडा इतकी फौज जमली होती. त्यांनीं याच सुमारास रायरी हा किल्ला अधिक चांगला बंदोबस्ताचा आहे असें पाहून, त्याच्या डोंगराच्या बाजू तासून काढून तो शत्रूस बहुतेक असाध्य असा करून टाकून आपली राजधानी तेथें केली. किल्ल्यांत जागोजाग इमारती बांधून मुख्य मुख्य मंत्री व सरदार यांस रहावयाकरितां सोय केली, व सर्व मुख्य कचेऱ्या वगैरे तेथेंच आणिल्या.

शिवाजी महाराजांस जसजशी यशप्राप्ति अधिकाधिक होत चालली, तसतसे ते अधिक धर्मत्रत होत चालले. ते यापुढें विशेष कडक व्रतें आचरूं लागले. तुळजापूरचे देवीचें दर्शन आपणास नित्य व्हावें, ह्मणून उत्तम गंडकीची शिळा आणून व तिची उत्तम कारागिराकडून देवीची एक सुंदर प्रतिमा करवून, तिची स्थापना मोठे समारंभानें प्रतापगडावर केली; आणि तेथें नित्य ब्राह्मणभोजन, पूजा वगैरे चालू राहण्याकरितां महाराजांनीं चांगल्या नेमणुकी करून दिल्या. *

* चिटणीसांची बखर.

# भाग ८.

## शिवाजी महाराज—त्यांचें दिल्लीस प्रयाण. त्यांची राज्यव्यवस्था.

१. औरंगजेब बादशहा हा शिवाजी महाराजांचा कल्याण प्रांत काबीज करितो. त्यावरून महाराज औरंगाबादेकडील मोंगलांचा मुलूख लुटून फस्त करितात. मोंगलांचा सुभेदार शाहिस्तेखान हा महाराजांचीं सुपें, पुणें वगैरे ठाणीं घेतो, व चाकणचे किल्ल्यास वेढा घालितो. फिरंगाजी नरसाळा याची मर्दुमकी व निःसीम स्वामिभक्ति. २. मराठे लोकांचे सामर्थ्याविषयीं शाहिस्तेखान व औरंगजेब बादशहा यांचा मतभेद. शाहिस्तेखानाचे मदतीस जोधपूरचा राजा यशवंतसिंग यास बादशहा पाठवितो. नेताजी पालकर हा मोंगलांचे मुलुखांत धामधूम चालवितो. शाहिस्तेखान हा पुण्यास महाराजांचे वाड्यांत येऊन उतरला असतां, तेथें त्याजवर महाराज रात्रीं येऊन छापा घालतात. खानाचे जीवावरचा प्रसंग. त्याचे फौजेची खराबी. सिंहगड घेण्यासाठीं मोंगलांचा यत्न निष्फळ होतो. शाहिस्तेखानाची नाचक्की होऊन त्याची बदली होते, व त्याचे जागीं सुलतान मोअझिम याची नेमणूक होते. ३. शिवाजी महाराजांची सुरत शहरावरील मोहीम. शहाजी राजे यांचा मृत्यु. महाराज मोंगलांचे मुलुखांत व विजापूरचे राज्यांत अशा दोन्हीं ठिकाणीं लुटालुटी व युद्ध चालवितात. महाराजांची समुद्रावरील सफर. ते बारसीलोर, कारवार वगैरे शहरें लुटतात. ४. औरंगजेब बादशहा हा दक्षिणेकडील सुभ्यावर जयपूरचा राजा जयसिंग व दिलेरखान यांची नेमणूक करितो. ती करण्यांत त्याचे हेतु. ते दोघे शिवाजी महाराजांचे मुलुखांत शिरून मोठे निकरानें युद्ध चालवितात. त्यामुळें महाराज व त्यांचे सरदार गडबडून जातात. पुरंदर किल्ल्यास दिलेरखान वेढा घालतो. तेथील हवालदार मुरार बाजी देशपांडे याचें शौर्य व मृत्यु. शिवाजी महाराज व जयसिंग राजा यांची भेट होऊन, महाराज राजे यांचे मार्फत बादशहाशीं तह करितात. औरंगजेब बादशहाचे दक्षिणेंतील राज्यासंबंधाचे विचार. जयसिंग हा शिवाजी महाराजांस बरोबर घेऊन विजापूरावर स्वारी करितो. महाराजांचा पराक्रम. त्यावरून बादशहा हा महाराजांचा गौरव केल्यासारखें दाखवून, त्यांस दिल्लीस आपले भेटीस येण्याकरितां पत्र पाठवितो. महाराज पत्राचा स्वीकार करून बादशहाचे भेटीस जाण्याची तयारी करितात. ५. महाराज दिल्लीस गेल्यावर तेथें बादशहाकडून त्यांचा योग्य सन्मान होत नाहीं,

यामुळें त्यांचे तोंडांतून कांहीं अमर्यादतेचे शब्द बाहेर पडतात. बादशहा महाराजांस नजरकैदेंत ठेवितो. तींतून ते आपली सुटका मोठे युक्तीनें करून घेतात. महाराज आपले तावडींतून निसटून गेले हे बादशहास कळल्यावर, तो त्यांस पकडून आणण्याबद्दल तजविजी करितो. महाराज उत्तर हिंदुस्थानांतील पवित्र तीर्थांच्या यात्रा करून अखेर दक्षिणेंत सुरक्षितपणें येऊन पोहोंचतात. ६. शिवाजी महाराज दिल्लीकडे गेल्यावर, त्यांचे मागें जयसिंग राजा हा विजापुरावर स्वारी करितो; परंतु बादशहाकडून त्यास कुमक न मिळाल्या कारणानें ती फसते. राजा जयसिंग यास बादशहा दक्षिणेचे सुभ्यावरून परत बोलावतो व त्याचे जागीं आपला पुत्र सुलतान मोआझिम व यशवंतसिंग यांची पुनः नेमणूक करितो. सुलतान मोआझिम व यशवंत यांचें स्वभाववर्णन. त्यांचे संबंधानें औरंगजेब बादशहाचे विचार. शिवाजी महाराज या दोन नवीन सुभेदारांस वश करून घेऊन, त्यांचे मार्फत बादशहाशीं तह करितात. विजापूरचा सुलतानही त्या दोघां सुभेदारांचे मार्फत बादशहाशीं तह ठरवितो. तसेंच विजापूरचा वजीर अबदूल हुसेन कमाल हा शिवाजी महाराजांशीं निराळा तह करून त्यांस खंडणी देऊं करितो. गोंवळकोंड्याचा सुलतानही महाराजांस खंडणी देण्यास कबूल होतो. जंजिऱ्याचे सिद्दीवर महाराज मोठा मारा करितात. ७. यापुढें सुमारें दोन वर्षे शिवाजी महाराज हे बाहेर कोठें मोहिमेवर न जातां, ते आपले राज्याची व्यवस्था लावितात. तिचें वर्णन. अष्टप्रधान व त्यांचीं कामें. फौजेची व्यवस्था —पायदळ, त्यांतील नाईक, जुमलेदार, हजारी, पंचहजारी, सरनोबत वगैरे निरनिराळे अधिकारी, त्यांचे पगार, त्यांचीं हत्यारें, त्यांचे पोषाख वगैरे. घोडेस्वार, त्यांतील अधिकारी, शिलेदार व बारगीर. फौजेचा पगार वांटून देण्यासंबंधानें महाराजांची वहिवाट. लूट करण्यासंबंधानें, ती आणून देण्यासंबंधानें व तिची वांटणी करण्यासंबंधानें महाराजांचे कानु. किल्ल्यांसंबंधाची महाराजांची व्यवस्था. पागेंतील घोडीं, हत्ती, उंट, बैल वगैरेसंबंधाच्या व्यवस्था. शिवाजी महाराजांची जमाबंदीची पद्धति. कुलकर्णी, तालुकदार, सुभेदार वगैरे अधिकाऱ्यांचीं कामें, न्यायमनसुब्याची पद्धत. वेद, शास्त्र वगैरे प्राचीन आर्यविद्येस महाराजांचें उत्तेजन. महाराष्ट्र भाषेंतील पोंवाडे नामक कवितेचा उदय, व तिचा परामर्ष.

१. मागील भागांत सांगितल्याप्रमाणें शिवाजी महाराजांचें विजापूर सुलतानाबरोबरचें युद्ध संपलें. त्यांनीं यानंतर अधिक प्रबळ ज दिल्लीची बादशाही तिजबरोबर युद्ध आरंभिलें. महाराजांनीं औरंगजे

बादशहाकडे वकील पाठवून, 'तुमचे कुमकेकरितां आह्मीं दक्षिणेंतून फौज पाठवितों; मात्र अहमदनगर प्रांतांत आमचे वडिलोपार्जित कांहीं देशमुखीचे हक्क आहेत, ते आह्मांकडे चालू व्हावे,' असें बोलणें चालविलें, व त्यावरून बादशहानें उत्तर पाठविलें कीं, 'तुह्मीं तूर्त पांचशें घोडेस्वार आमचे मदतीस पाठवावे, व आमचे मागें दक्षिणेंतील आमचे मुलुखाचा बंदोबस्त ठेवावा. तसेंच तुमचे देशमुखीचे हक्कांबद्दल विचार करण्याकरितां तुमचे तर्फे सोन पंडित ( आबाजी सोनदेव ) यांस आमचेकडे पाठवून द्यावें.' इत्यादि कथाभाग मागील भागांत आलाच आहे; परंतु यावेळीं उभय पक्षांचे वकिलांमार्फत फक्त बोलणें होऊन, थोडा पत्रव्यवहार मात्र झाला. निकालास कांहींच गोष्ट लागली नाहीं ( १६५८ ). यापुढें महाराज, विजापूरचा सुलतान, जंजिऱ्याचा हबशी, वाडीचे सावंत वगैरे लोकांशीं युद्ध करण्यांत अगदीं गुंतून गेले असल्यामुळें, व औरंगजेब बादशहा हाही आपले नवीन प्राप्त झालेल्या बादशाहीचा बंदोबस्त करण्यांत उत्तर हिंदुस्थानांत गुंतून पडला असल्यामुळें, त्या दोघांचा सुमारें चार वर्षेंपावेतों पुनः प्रसंगच झाला नाहीं; तथापि शिवाजी महाराज विजापूरकरांचे युद्धांतून पार पडण्यापूर्वींच, औरंगजेब बादशहा हा आपले अडचणींतून सुमारें एक वर्ष अगोदर मोकळा झाल्यामुळें, शिवाजी महाराजांनीं त्याची मागें जी प्रतारणा केली होती, तिचें उसनें फेडण्याकरितां त्यानें आपली फौज पाठवून कल्याण, भिवंडी हीं एकदम हल्ला करून घेतलीं ( मे १६६१ ). औरंगजेब बादशहानें यामागें गम खाऊन चांगली संधी येईपर्यंत तो जसा गप बसला होता, त्याचप्रमाणें शिवाजी महाराज हेही आतां मोंगलांबरोबर युद्ध करण्याची ही वेळ नाहीं असें पाहून, विजापूरकरांबरोबर तह होईपर्यंत स्वस्थच बसले, व मोंगलांविरुद्ध त्यांनीं अगदीं हालचाल केली नाहीं; परंतु विजापूरकरांबरोबर तह होतांच त्यांनीं आपलें पायदळ मोरोपंत पिंगळे यांचे व घोडेस्वार नेताजी पालकर यांचे हाताखालीं देऊन, त्यांनीं मोंगल बादशहाचे मुलुखांत एकदम धूम सुरू केली. मोरोपंत पिंगळ्यानें जुन्नरचे उत्तरेकडील पुष्कळ किल्ले सर केले, व नेताजी पालकर यानें सर्व मुलूख फस्त

करण्यास आरंभ केला. तो खुद्द औरंगाबादेपर्यंत वाटेंतील खेडीं जाळून टाकीत, मोठमोठ्या शहरांपासून खंडण्या उखळीत व चोहोंकडे आपला दरारा पसरवीत चालला. तो आज या दिशेनें तर उद्यां दुसऱ्याच दिशेनें, अशा मोठमोठ्या मजला मारून मोंगल फौजांचे हातीं न लागतां, सर्व लूट घेऊन पुण्यास परत आला ( १६६२ ).

यावेळीं दक्षिणेंतील सुभ्यावर औरंगजेब बादशहाचा मामा शाहिस्तेखान हा होता. यास अमीर उल्मरा हा मोठा किताब असे. त्यास बादशहानें सक्त हुकूम पाठविला कीं, ' तुह्मीं एकदम या पेंढाराचा बंदोबस्त करून, त्या लोकांस चांगली दहशत पडेल, अशा तऱ्हेची त्यांस चांगली शिक्षा करावी, त्याचप्रमाणें शिवाजीचे मुलुखांत शिरून त्याचे सर्व किल्ले सर करून घ्यावेत. ' हा हुकूम पावतांच शाहिस्तेखान हा औरंगाबादेहून निघून अहंमदनगर, पेरगांव या मोठ्या वाटेनें बरोबर मोठी फौज घेऊन पुण्याकडे चालला. वाटेनें त्यानें सुपें घेण्याकरितां सिंदखेडचा देशमुख जाधवराव यास कांहीं फौज देऊन पाठविलें; व तें ठाणें घेतल्यानंतर सभोंवतालचा मुलूख धरून बसण्यास त्यानें त्यांस हुकूम केला. खान हा स्वतः पुण्यास आला व त्यानें तें घेतलें, आणि कात्रजचा घांट व शिवापूर हीं धरून बसण्यास फौजेच्या निरनिराळ्या टोळ्या पाठविल्या. त्याचप्रमाणें त्या प्रांतांत किल्ल्याची स्थिति कशी काय आहे, हें टेहळण्याकरितांही त्यानें माणसें पाठविलीं. सुभेदार चालून येतो, हें शिवाजी महाराजांस कळतांच, ते राजगडावरून निघून सिंहगडावर येऊन राहिले.

शाहिस्तेखान यानें प्रथम चाकणचा किल्ला हस्तगत करण्याचा विचार केला. कारण त्याची पुण्याची छावणी व जुन्नर यांचेमध्यें तो असल्याकारणानें, त्याचे फौजेस पुष्कळ त्रास होई. हा किल्ला शिवाजी महाराजांनीं १६४६ सालीं फिरंगोजी नरसाळा याचे ताब्यांत राहूं दिल्यापासून, मोळा वर्षेपर्यंत तो त्याजकडेसच होता. शाहिस्तेखान यानें मोठी फौज बरोबर घेऊन किल्ल्यापुढें मोर्चे दिले. त्यास प्रथम वाटलें होतें कीं, येवढी मोठी फौज पाहूनच किल्ल्याचा हवा-

लदार किल्ला आपले स्वाधीन करून देईल; परंतु फिरंगोजी नरसाळा हा मोंगलांचे फौजेस न डगतां, त्यानें सुमारें दोन महिनेपर्यंत तो किल्ला लढविला. शेवटीं वेढा पडल्यापासून छपन्नावे दिवशीं किल्ल्याचे ईशान्येकडील बुरुजाखालीं मोंगलांनीं सुरुंग लावून तो उडविल्यानें किल्ल्यावरील लोक बरेच मेले, व आंत शिरण्यास किल्ल्यास मोठी खिंड पडली. मोंगल लोक लागलीच पुढें धांवून जाऊन व मोठा हल्ला करून खिंडींतून घुसूं लागले; परंतु फिरंगोजी हा आपले बाकी राहिलेले लोकांसह पुढें करून मोठे शौर्यानें लढला, व रात्र होईपर्यंत त्यानें शत्रूस दाद लागूं दिली नाहीं. पहांटेस महाराजांचे परवानगीनें त्यानें आपला किल्ला मोंगलांचे स्वाधीन केला. फिरंगोजीचा पराक्रम व महाराजांचे ठिकाणीं असलेली त्याची निष्ठा हीं पाहून, शाहिस्तेखान यानें त्याचे गुणाबद्दल त्याची फार तारीफ करून, त्यास बादशहाचे पदरीं चाकरीस राहण्यास पुष्कळ आग्रह केला; परंतु फिरंगोजी हा ती गोष्ट कबूल करीना, ह्मणून खानानें त्यास शेवटीं तसेंच जाऊं दिलें. तो तेथून शिवाजी महाराजांकडे निघून आला, व त्यांनीं त्याची फार वाखाणणी करून त्याजकडे भूपाळगड किल्ल्याचें काम सांगितलें.

२. चाकणचा किल्ला घेण्यांत मोंगलांकडील ९०० मनुष्यें, कांहीं ठार व कांहीं जखमी अशीं झालीं. एकट्या किल्ल्यासाठींच इतकी खराबी झाली हें पाहून, शाहिस्तेखानास मराठ्यांचे किल्ले घेणें ह्मणजे कांहीं सोपें काम नाहीं असें वाटूं लागलें. त्यानें बादशहास त्याबद्दल कळवून, आपले कुमकेस जास्त फौज पाठविण्याविषयीं अर्ज केला; परंतु औरंगजेब बादशहाचा मराठ्यांविषयीं यावेळीं व पुढें कित्येक वर्षेपर्यंतही वेगळाच समज होता. मराठे लोक ह्मणजे अगदीं कांहींच नाहींत असें तो समजत असे. यामुळें शाहिस्तेखानाचे कर्तबगारीविषयींच त्यास प्रथम शंका उत्पन्न झाली, व त्यानें त्याचे मदतीस जोधपूरचा राजा यशवंतसिंग यास पाठवून दिलें; परंतु यशवंतसिंग येऊन पोंचण्यास बरेच दिवस लागल्यामुळें, खान हा आपली फौज

घेऊन पुण्यासच छावणी करून स्वस्त बसला. इकडे नेताजी पालकर यानें पुनः अहंमदनगर, औरंगाबाद वगैरे प्रांतांत शिरून, मागील सालाप्रमाणें या सालींही गांवें जाळण्याचा व लुटण्याचा झपाटा चालविला ( १६६३ ). इतक्यांत यशवंतसिंग येऊन पोहोंचल्यामुळें, नेताजीचा पाठलाग करण्याकरितां, शाहिस्तेखान यानें एक फौजेची टोळी पाठविली. तिनें त्याजवर छापा घालून याचे बरेच लोक ठार केले व त्यास स्वतःस जखमी केलें; व विजापूरचा सरदार रुस्तुमझमान यानें त्यास गुप्तपणें पळवून नेऊं दिलें नसतें, तर तो मोंगलांचे हातीं लागत होता. यानंतर पावसाळ्याचें तोंड लागलें म्हणून, मोंगल लोक विशेष खटपट न करितां छावणींत येऊन राहिले.

शाहिस्तेखान हा पुण्यास छावणी करून राहिला असतां, तो दादोजी कोंडदेव यांनीं, त्या गांवीं शिवाजी महाराजांकरितां जो वाडा बांधिला होता म्हणून मागें सांगितलें आहे, त्यांत जाऊन बंदोबस्तानें उतरला होता. त्यानें मोंगलांचे पदरीं जे मराठे सरदार होते, त्यांचे घोडेस्वारांखेरीज नवीन मराठे घोडेस्वार आपले चाकरीस मुळींच ठेविले नाहींत; तसेंच गांवांत परवान्याशिवाय कोणाही मराठे शिपायानें हत्यार घेऊन येऊं नये, असाही त्यानें सक्त हुकूम केला होता. खानानें इतका कडेकोट बंदोबस्त केला असतांही, त्यावर शिवाजी महाराजांनीं मोठ्या चमत्कारिक रीतीनें रात्रीं छापा घालून, त्यास बहुतेक ठार करण्याचा प्रसंग आणिला! महाराजांनीं दोन कारकून पाठवून, त्यांजकडून मोंगलांचे फौजेंतील एका शिपायास कितविलें व ‘ माझे घरीं आज लग्न आहे, तेव्हां तासे, बरके व वाजंत्री वाजण्यास व शहरांतून वरात नेण्यास मला परवानगी पाहिजे ’ म्हणून त्याजकडून परवाना मिळविला. यानंतर अस्तमानाचे सुमारास, महाराज हे आपले बरोबर बरीच फौज घेऊन, सिंहगडावरून खालीं उतरले. तेथून जागोंजाग वाटेंत ते शिपाई ठेवीत पुण्यास येऊन पोहोंचले. त्यांनीं कांहीं लोक पाठवून, कात्रजचे घांटाचे वाटेवर ठिकठिकाणीं झाडांस व बैलांचे शिंगास पोत बांधिले, व सिंहगडचे बाजूस कर्ण्याचे तुतारीची

नेशाणी होतांच त्यांनीं ते पोत पेटवून, कर्णे, शिंगें, व बाजे हे वाजवीत कात्रजचे वाटेनें निघून जावें, असा त्यांस हुकूम केला. कात्रजाचे बाजूकडे उजेड व दंगा पाहून, शत्रूंचा छापा त्या बाजूनें येऊन, ते तिकडे परत निघून गेले असें मोंगलांस वाटून, त्यांनीं सिंहगडाकडे आपले पाठीस लागून न यावें ह्मणून, त्यांस गुलकावणी देण्याची महाराजांनीं ही युक्ति काढिली. येणेंप्रमाणें छाप्याची तयारी करून, शिवाजी महाराज हे बरोबर तानाजी मालुसरे, येसाजी कंक, दादाजी बापूजी देशपांडे वगैरे सुमारें पंचवीस निवडक असामी घेऊन, ते काळोखांत कोणाचे नजरेस न येई असे संकेताप्रमाणें फितूर केलेल्या शिपायाचे वरातीचे मिरवणूकींत मिसळून गेले.

मध्यरात्रीं चोहोंकडे सामसूम झाल्यावर, शिवाजी महाराज व त्यांचे निवडक धारकरी हे, त्यांस गांवांतील सर्व आडगल्लया माहीत असल्या-मुळें, मोंगलांच्या चौक्या पहारे चुकवून खानाचे वाड्याचे आवारांत शिरले. तेथून त्यांनीं एका खिडकीवर चढून जाऊन, तींतून वरचे मजल्यांत प्रवेश केला; परंतु इतक्यांत कांहीं वाजल्यामुळें, वाड्यांतील कांहीं बायका जाग्या होऊन, त्यांना कांहीं दगा आहे अशी भीति वाटली. त्या लागलींच खान निजला होता त्या खोलींत धांवत गेल्या व त्यांनीं खानास उठविलें. इतके अवकाशांत शिवाजी महाराज व त्यांचे लोक हे त्या ठिकाणीं येऊन पोहोंचले. खानानें आपले जिवावरचा प्रसंग पाहून, तो खिडकींतून उडी टाकून पळून गेला; परंतु तितके अवसरांतच त्याचा हात खिडकीचे चौकटीस असतां, त्याजवर कोणे धारकऱ्याचा वार लागून, त्याचें एक बोट तुटलें. खानाचें फक्त बोटावरच गेलें; परंतु त्याचा मुलगा जो शेजारचे एके खोलींत निजला होता, तो तेथल्यातेथेंच ठार झाला! इकडे छावणींत मोठा गलबला होऊन, शत्रूचा छापा आला ह्मणून सर्व लोक घाबरून गेले. इतक्यांत संकेताप्रमाणें सिंहगडचे बाजूस कर्ण्याची तुतारी वाजतांच, कात्रजाचे वाटेकडे पोत पेटून शिंगें, बाजे वगैरे वाजूं लागल्या-मुळें, मोंगलांस भूल पडून ते शत्रूचा पाठलाग करण्याकरितां कात्रजाचे

बाजूकडे धांवले; परंतु तेथें जाऊन पाहतात तों शत्रूची फौज वगैरे कांहीं नसून, फक्त झाडांस व बैलांचे शिंगास पोत लावलेले असून, वाजे वगैरे ही शत्रूची केवळ गूळ आहे, असें त्यांस आढळून आलें.* इकडे शिवाजी महाराज यांनीं, असें धाडसाचें कृत्य करून व शत्रूची पूर्ण फजीति उडवून सिंहगडची वाट धरिली. वाटेंत जागोंजाग लोक ठेविले होते ते गोळा करून व शत्रूस आपले लोक पुष्कळ आहेत, असें भासविण्याकरितां पुष्कळ जास्त मशाली लावून, ते मोंगलांचे फौजेदेखत मोठ्या थाटानें किल्ल्यावर चढून गेले ( एप्रिल १६६३ ).

पहाट होतांच, मोंगलांची फौज चिडून मोठ्या आवेशानें सिंहगडाखालीं नगारे, तुताऱ्या वगैरे वाजवीत आली. महाराजांनीं त्यांस किल्ल्याखालीं मुकाट्यानें येऊं दिलें; परंतु ते तोफांचे टप्प्यांत येतांच त्यांजवर एकदम सरबत्ती झाडली. त्यासरसा त्यांचा निशाणाचा हत्ती तोफेचा गोळा लागून पडला, सर्व फौज घाबरून मागें सरली. इतक्यांत कडताजी गुजर, ज्यास नेताजी पालकर यानें कांहीं घोडेस्वारांचे टोळीसह शेजारींच त्या रानांत ठेविलें होतें, त्यानें, मोंगलांचे बावरलेल्या फौजेवर एकदम मोठा झपाट्याचा हल्ला केला, व त्या सर्वांस पळवून लाविलें. मराठ्यांचे फौजेस मोंगलांनीं पाठ दाखविली असा प्रथमच प्रसंग होय!!

शाहिस्तेखान हा झालेली अप्रतिष्ठा व पुत्रवध यांचेयोगें शरम व दुःख पावून, अगदीं नाउमेद होऊन गेला. त्यानें यशवंतसिंगास 'तूं गाफील राहिल्यामुळें हा दगा झाला' असा दोष दिला, व बादशहास लिहून कळविलें कीं, 'फौजेंत मोठी अव्यवस्था आहे, व यशवंतसिंग हा शिवाजीस फितूर आहे.' बादशहा हा नुकताच एका भयंकर दुखण्यांतून उठून, हवा पालटण्याकरितां काश्मीराकडे जाण्याचे

* रोमन लोकांचे इतिहासांत, ह्यानिबल ह्या कार्थेजचे सरदारानें एके प्रसंगी बैलाचे शिंगास पोत लावून, रोमन लोकांस फसविण्यास अशा तऱ्हेचीच युक्ति लढविली होती असें आढळतें.

तयारींत होता, तों त्यास ही दक्षिणेकडील खबर पोहोंचली. त्यास शाहिस्तेखानाचे कर्तृत्वाबद्दल अगोदरच शंका आली होती, आणि त्यांत त्याचें हें पत्र पाहून तर, ती विशेषच दृढ झाली. त्यानें लागलीच खानास दक्षिणेचे सुभ्यावरून काढून बंगाल्याकडे बदललें, आणि त्याचे जागीं आपला पुत्र सुलतान मोआझीम यास पाठवून दिलें. शाहिस्तेखान निघून गेल्यावर, यशवंतसिंगानें सिंहगडास वेढा घालण्याचा विशेष प्रयत्न न करितां, फक्त जुन्नर, चाकण येथें ठाणीं ठेवून, तो फौजेसह औरंगाबादेस निघून गेला.

३. इकडे शिवाजी महाराजांनीं, कल्याणचे शेजारीं एक व भुंडीराजापूर याचे शेजारीं एक अशा दोन फौजा गोळा करून, शत्रूंस फसविण्याकरितां अशा अफवा उडवून दिल्या कीं, आपण एकीनें पोर्तुगीज लोकांचीं वसई व चौल ह्या ठाण्यांवर हल्ला करणार, व दुसरीनें जंजिऱ्याचा सिद्धि याचा अगदीं बींमोड करून टाकणार आहोंत; परंतु महाराजांची खरोखर मोहीम गुजराथ प्रांतांतील अति श्रीमान् ह्मणून प्रसिद्ध अशा सुरत शहरावर होती. त्यांनीं बहिरजी नाईक ह्मणून टेहळ्यांचा मुख्य होता, त्यास यापूर्वीं पुढें पाठवून तें शहर कशा तऱ्हेनें चांगलें लुटतां येईल, याविषयीं सर्व तजवीज केली. शेवटीं सर्व तयारी होतांच, नाशिकास देवदर्शन करावयाचें आहे व या प्रांतीं मोरोपंत पिंगळे पेशवे यांनीं नवीन घेतलेले किल्ले हे स्वतः जाऊन पहावयाचे आहेत, अशा मिषानें शिवाजी महाराज हे नाशिकाकडे गेले; व महाराज तेथेंच क्षेत्रीं राहिले आहेत असा लोकांस भ्रम वाटत असतां, ते एकाएकीं चार हजार घोडेस्वारांसह भरारी मारून आयतेच सुरत शहरावर उतरले. महाराजांनीं हा छापा असा अचानक घातला कीं, त्या प्रांताचे सुभेदारास, त्याबद्दल बातमी पोहोंचून तो फौज घेऊन येण्याचे पूर्वींच, महाराजांनीं तें शहर सहा दिवसपर्यंत सावकाश लुटून तेथील सर्व लूट सुरक्षितपणें रायगडास नेऊन पोहोंचविली. त्या मोहिमेंत महाराजांस *कोट्यावधि रुपये किंमतीचा माल सांपडला असें ह्मणतात.

---

* चिटणीस यांची बखर.

सुरत शहरास इंग्लिश व डच लोकांच्या व्यापाऱ्यांच्या वखारी होत्या. तिकडे महाराजांचा लाग साधला नाहीं. त्यांजपाशीं दारूगोळ्याचें सामान चांगलें असून बंदोबस्तही विशेष होता, ह्मणून त्या लुटण्यापासून प्राप्तीपेक्षां खराबी होण्याचा संभव अधिक आहे, असें जाणून, कदाचित् शिवाजी महाराज त्यांचे वाटेस गेले नसावेत $ ( ९ जानेवारी १६६४ ).

शिवाजी महाराज या मोहिमेवरून परत देशीं आले, तों त्यांस शहाजीराजे यांचे अकस्मात घडलेल्या मृत्यूची बातमी कळली. राजे हे विजापूरकरांचे फौजेबरोबर चित्रदुर्ग तालुक्यांत कांहीं बंडखोर जमेदारांचा दंगा मोडण्याचे कामावर असतां, तुंगभद्रेचे कांठीं बेदनूर शहराजवळ, बसवपट्टण या गांवीं सहज शिकारीस ह्मणून गेले होते; तेथें ते घोड्यावरून पडून त्यांचा अंत झाला. यावेळीं त्यांचें वय ७० वर्षांचें होतें. शिवाजी महाराजांचें, विजापूरचे सरकाराबरोबर जरी शत्रुत्व होतें, तरी शहाजीराजे हे त्या सरकाराबरोबर पूर्ण निष्ठेनेंच वागत असत. यामुळें, सुलतान अल्ली आदिलशहा याचा त्यांजवर विश्वास असून, त्यांजला अहंमद आदिलशहा यानें यापूर्वीं जी जहागीर दिली होती, तिजशिवाय राजे यांनीं, आर्नी, पोर्टोनोहो आणि तंजावर हीं जीं त्यानंतर जिंकलीं, तींही सुलतान अल्ली आदिलशहानें त्यांजकडेसच राहूं दिलीं. शहाजी राजे यांचें हें वर्तमान ऐकून, शिवाजी महाराजांस अर्थातच फार दुःख झालें, व त्यांनीं राजे यांचें उत्तरकार्य सिंहगडावर लक्षावधि रुपये खर्चून केलें. पुष्कळ दानधर्म केला, व बसवपट्टण या गांवीं वडिलांची छत्री बांधून, तिची पूजाअर्चा चांगले प्रकारें चालण्याकरितां मोठी नेमणूक करून दिली. राजे यांचे मरणानंतर शिवाजी महाराज यांनीं, आपणास राजे हा किताब घेतला व ते आपले नांवानें नाणीं पाडूं लागले.

---

$ शिवाजी महाराजांचे शौर्यांत धाडस व तारतम्य हीं प्रसंग पाहूनच असत. इंग्रजींतील --Discretion is the better part of valour ही ह्म त्यांचे शौर्यास पूर्ण जागणारी आहे.

या सालींही पावसाळा लागण्याचे सुमारास, पुनः नेताजी पालकर यानें मोंगलांचा मुलूख लुटण्याचा व जाळण्याचा झपाटा लाविला, व त्याचा बंदोबस्त बादशहाचे फौजांचे हातून होईना. इकडे समुद्रावरही महाराजांचे आरमारानें बराच दंगा मांडिला. मोंगल लोकांचीं कांहीं जहाजें, आंत मक्केस जाणारे यात्रेकरू भरून, मोच्यास चाललीं होतीं; त्यांस या आरमारानें पकडिलें, व यात्रेकरूंपासून चांगली खंडणी घेतल्यावांचून त्यांस महाराजांचे लोकांनीं सोडून दिलें नाहीं. यानंतर आगस्ट महिन्यांत महाराजांनीं स्वतः अहंमदनगरचे पेठ्यावर अकस्मात् छापा घालून तो लुटला व खुद्द औरंगाबादेपर्यंत सर्व मुलुखांत धुंडावा करून सोडला. महाराज मोंगलांचे मुलुखाकडे गुंतले आहेत, तेव्हां कोंकणप्रांत सोडविण्यास ही चांगली संधि आहे, असें विजापूरसरकारास वाटून, त्यांनीं दोन सरदारांबरोबर चांगल्या फौजा देऊन त्यांस तिकडे पाठविलें; परंतु शिवाजी महाराज यांनीं दोन्हीकडील संधान राखून शत्रूंचें कांहीं चालूं दिलें नाहीं. त्यांस शिवाजी महाराज एक आहेत किंवा अनेक आहेत असा भास करून दिला! त्यांनीं एकदम कोंकणांत भरारी मारून, विजापूरचे फौजेशीं मोठी लढाई मारून, तिचा अगदीं मोड करून टाकिला. या लढाईंत विजापूरचे ६००० शिपाई पडले असें ह्मणतात. यावेळीं वेंगुर्लें येथील लोक महाराजांचे शिबंदीवर उठल्यावरून, तें शहर त्यांनीं जाळून फस्त केलें; व तेथून ते सिंहगडास मोठ्या त्वरेनें परत आले. मोंगलांची एक मोठी फौज जुन्नरचे ठाण्यास नुकतीच रवाना झाली हें कळल्यावरून, महाराज त्यांचे तजविजीस लागले; परंतु शत्रू स्वतः होऊन चाल करून न येतां, ते आपले मुलुखाचाच बंदोबस्त करून राहिले.

येणेंप्रमाणें मोंगलांकडे थंडाई पाहून, शिवाजी महाराजांनीं कांहीं फौज कृष्णेच्या पलीकडे विजापूरचे मुलुखांत लूट करण्यास पाठवून दिली व आपण स्वतः नवीनच एका मोठ्या मोहिमेवर जाण्याचे तयारीस लागले. मोंगलांचे छावणीवर छापा घालण्याची आपली तयारी चालली आहे अशी अफई उठवून देऊन, ते गुप्तपणें आपलें आरमार

जमा करून मालवणचे बंदरांत बसले, व एकाएकीं बसनूर ( बारसिलोर ) या शहरावर उतरले. येथें महाराजांनीं सुरतेप्रमाणें मोठी लूट मिळवून, नंतर ते परत गोकर्णास आले. तेथें त्यांनीं देवदर्शन घेऊन पुष्कळ दानधर्म केला. यानंतर महाराजांनीं फौजा पुढें रवाना करून, त्या प्रांतांतील श्रीमान् श्रीमान् अशीं बरींच शहरें लुटलीं. कारवार येथील लोकांनीं महाराजांस बराच अटकाव केला; परंतु त्यांजपासूनही त्यांनीं अखेर खंडणी वसूल केली. या शहरीं इंग्लिश लोकांची एक वखार होती. त्या लोकांनीं महाराजांस सुमारें १००० रुपये खंड दिला. ( फेब्रुवारी १६६९ ). या ठिकाणाहून सर्व फौज खुष्कीचे वाटेनें रवाना करून देऊन, महाराज स्वतः जहाजांत बसून जलमार्गानें रायगडास परत येण्यास निघाले; परंतु वारा समोरचा असून मोठ्या जोराचा लागल्यामुळें, जहाजें पुनः खालीं वाहून गेलीं, व यामुळें बरेच दिवस महाराजांस स्वदेशीं येतां आलें नाहीं. महाराजांनीं समुद्रावरून स्वारी केली अशी ही एकच होय. या मोहिमेंत समुद्रावर फार खोटी झाली व समुद्रपर्यटण कांहीं अशीं खात्रीचें नाहीं असें पाहून, व देवीनेंही महाराजांचे अंगांत येऊन सांगितलें कीं, " तुला समुद्राचे सफरींत यश प्राप्त होणार नाहीं. तूं जमिनीवरच राज्य कर. " यामुळें महाराज यापुढें समुद्रावरचे मोहिमेस स्वतः कधीं गेले नाहींत.

४. शिवाजी महाराज या सफरीवर गेले असतां, त्यांचे मागें औरंगजेब बादशहानें राजा यशवंतसिंग व सुलतान मोआझिम यांस हिंदुस्थानांत परत बोलावून, त्यांचे जागीं जयपूरचा मिरजाराजा जयसिंग व दिलेरखानपठाण यांची नेमणूक केली व त्यांस दक्षिणेकडे पाठवून दिलें. औरंगजेब बादशहानें, इतके दिवस शिवाजी महाराजांचे पुंडाव्याकडे मोठेंसें लक्ष दिलें नाहीं; कारण शाहाजहान बादशहा जिवंत असतां उत्तर हिंदुस्थानांत बंडें उपस्थित होतील, ह्मणून त्यास बरीच भीति वाटत असे. या शिवाय इराणचे बादशहाबरोबरही लढाई करण्याचा प्रसंग येईल कीं काय असाही त्यास कांहीं वेळ धाक वाटत

होता. औरंगजेब बादशहाचा स्वभाव मोठा अविश्वासी असल्यामुळें, कोणा सरदाराचे किंवा पुत्राचेदेखील हातीं एखादी मोठी फौज देऊन, शिवाजी महाराजांची खोड मोडावी असा त्यास धीर होत नसे. शिवाजी महाराजांनीं सुरतेसारखीं श्रीमंत शहरें लुटलीं, आपले नांवानें नाणीं पाडण्याचा क्रम चालविला, आपणांस राजा असा किताब घेतला, इतक्या गोष्टी केल्या, तरी औरंगजेब बादशहास त्यांचा इतका राग आला नाहीं; परंतु शेवटीं मक्केस जाणारे यात्रेकरूंसही त्यांनीं लुटलें, ही बातमी त्यास कळतांच त्यास फारच संताप आला. यामुळें त्यानें वरील दोन सरदारांची योजना दक्षिणेचे सुभ्याकडे ताबडतोब केली.

ही व्यवस्था करण्यांत औरंगजेब बादशहाचे मनांत आणखी दोन हेतु होते. राजा जयसिंग व दिलेरखान हे दोघेही, त्याचा भाऊ दारा याचे पक्षाचे प्रथम असून ते चांगले पराक्रमी असल्यामुळें, त्यांस औरंगजेब बादशहानें आपले पक्षास वळवून घेतले होते; तथापि त्यांजबद्दल बादशहाचे पोटांत पूर्ण विश्वास नव्हता. दिलेरखान हा पठाण जातीचा असून, तो मोठा धीट व धाडसी स्वभावाचा होता, व बादशाही फौजेंत त्याचे जातीचे जे पुष्कळ शिपाई होते, त्यांजमध्यें त्याची चांगली प्रतिष्ठा असे; यामुळें खानाविषयीं तर बादशहास विशेषच भीति वाटत असे. तेव्हां हे दोघेही सरदार, त्यांचा बाहेरून चांगला मान केल्यासारखें दाखवून त्यांस दक्षिणेंत पाठवून दिले. तर उत्तर हिंदुस्थानांत त्यांचेसंबंधानें तूर्त भीतीचें कारण राहणार नाहीं, व शिवाय दक्षिणेंत शिवाजी महाराजांचा बंदोबस्त करण्यास व विजापूरचे सुलतानाकडे थकलेली खंडणी वसूल करण्यास त्यांचा चांगला उपयोग करून घेतां येईल, असा औरंगजेब बादशहा यानें दुहेरी विचार मनांत आणिला. बादशहा हा, यामागें दक्षिणेंत सुभेदारीचे कामावर असल्यामुळें, त्यास त्या मुलखाची चांगली माहिती होती, व तेथें त्याचे विश्वासाचेही अनेक लोक होते; परंतु राजा जयसिंग व दिलेरखान हे त्या प्रांतांत अगदीं गैरमाहित होते. या

सर्व गोष्टींमुळें ते दक्षिणेंत कांहीं गडबड करितील असा संभव अगदीं नव्हता. त्यांतूनही विशेष बंदोबस्ताकरितां बादशहानें जयसिंगाचा मुलगा रामसिंग यास मानकरी ह्मणून आपले दरबारीं बोलावून घेतलें. या बाह्य महत्सत्काराचा बादशहाचे पोटांतील हेतु असा होता कीं, रामसिंग आपले अटकेंत असला ह्मणजे त्याचा बाप फंद वगैरे करण्यास उद्युक्त होणार नाहीं. याशिवाय, बादशहानें राजा जयसिंग यास अंमळस चढवून देऊन, शिवाजी महाराजांचा बंदोबस्त झाल्यावर विजापूरचें राज्य खालसा करण्याचीही कामगिरी त्यासच सांगितली. ही कामगिरी बजावण्यापुरतें जयपूरचे राजाचे अंगीं सामर्थ्य नाहीं हें जरी बादशहास ठाऊक होतें, तरी परभारें विजापूरकरांची शक्ति जर कमी होईल तर बरेंच, असें त्यास वाटत होतें. त्याचा मतलब असा कीं, आदिलशाही, कुतुबशाही वगैरे दक्षिणेंतील राज्यांस, आपले सरदारांकडून वरचेवर हल्ले करून क्षीण करून ठेवावें, व मग आपणांस जेव्हां फावेल तेव्हां बरोबर मोठी फौज घेऊन स्वतःच दक्षिणेंत जाऊन, तीं सर्व राज्यें एकदांच खालसा करून टाकावीं !

असो; राजा जयसिंग व दिलेरखान हे फेब्रुआरी महिन्यांत नर्मदा नदी उतरून, शिवाजी महाराज यांस बारसिलोरचे मोहिमेवर जाऊं देऊन, त्यांचे मागें दक्षिणेंत फौजेसुद्धां दाखल झाले. जयसिंग यानें सुलतान मोआझिम याची गांठ औरंगाबादेस घेऊन, नंतर तो एप्रिल महिन्यांत पुण्यास दाखल झाला. त्यानें लागलाच पुरंदरचे किल्ल्यास वेढा घालून, तो तसाच पुढें चालविण्याचें काम दिलेरखानावर सोंपविलें, व आपण स्वतः सिंहगडास वेढा घालून बसला. तसेंच त्यानें कांहीं फौज पुढें राजगडाकडेही पाठवून दिली. नेताजी पालकर यास, महाराज देशांत ठेवून गेले होते; परंतु त्यानें शत्रूंची खबर न ठेवितां, तो महाराजांचा हुकूम मोडून दुसरीकडेसच लूट मारण्याकरितां निघून गेला होता. त्यानें कडतोजी गुजर याच्यापाशीं कांहीं घोडेस्वार मात्र ठेविले होते; परंतु शत्रूचे प्रचंड सैन्यापुढें अर्थातच कडतोजीचे लहान टोळीनें कांहीं चालेना.

हा इकडे प्रकार झाला असतां, शिवाजी महाराज नुकतेच समुद्रा-
रील सफरीहून परत आले होते. ते लागलेच रायगडास गेले व
थें सर्व सरदार व मानकरी यांस बोलावून आणून व मोठा दरबार
रवून, त्यांत बादशहाचे फौजेबरोबर आतां सामना कसा करावा
ाबद्दल विचार चालविला; परंतु कोणताच विचार पक्का ह्मणून न
रल्यामुळें, महाराज एकांतीं विचार करून देवीची प्रार्थना करण्यास
ेकीकडे जाऊन बसले. इतक्यांत — असें सांगतात कीं — त्यांचे
ंगीं देवीनें संचार करून ह्मटलें कीं, "या हिंदु राजाचा पराभव
झे हातून होणार नाहीं, त्याजबरोबर तूं तह्च कर." राजा जय-
संग याचे पराक्रमाबद्दल अगोदरच मोठा नांवलौकिक असून, त्याजब-
ाबर फौजही चांगली होती. त्यानें लढाईचें कामही मोठ्या सपा-
ट्यानें चालविलें होतें व देवीचीही आज्ञा विशेष उमेद आणणारी
न्हती. या सर्व गोष्टींचा विचार करून, शिवाजी महाराज व त्यांचे
सरदार यांस आतां पुढें काय करावें हें कांहीं सुचेना.

इकडे दिलेरखानानें पुरंधर किल्ल्याचे वेढ्याचें काम मोठ्या जोरानें
चालविलें होतें; परंतु तेथील हवालदार मुरार बाजी देशपांडे महाड-
कर हा त्यास कांहीं दाद लागूं देईना. मोंगल लोक जिकडून जिक-
डून चढून येत, तिकडून तिकडून त्यांस तो पिटून खालीं हांकून
लावी. त्याचे जवळ दोन हजार निवडक मावळे व हेटकरी असे होते.
शेवटीं दिलेरखान यानें पुढें जोरानें सरसावून जाऊन व मावळ्यांस
मागें हटवून, तळचे कोटाचे एका बुरुजाखालीं सुरुंग पाडण्यास आरंभ
केला. मावळे लोक वरचेवर सुरुंग पाडणारे मोंगलांवर हल्ले करून
त्यांस तेथून हांकून लावीत; परंतु शेवटीं मोंगलांस एका खडकाचा
आसरा सांपडून, त्यांनीं सुरुंगाचें काम पुरें करून तो उडविला. त्या-
मुळें तळकोटाचा बुरुज पडून, मोंगल लोक आंत शिरून त्यांनीं तो
सर्व घेतला व मावळे लोक वरचे कोटावर मागें हटून गेले; परंतु
इतक्यांत, मोंगल लोक गाफीलपणानें तळकोटांत अव्यवस्थितपणें चोंहों-
कडे पसरून लूट गोळा करूं लागले आहेत, असें हेटकऱ्यांनीं पाहून,

यांजवर वरून गोळ्यांचा असा जोराचा मारा केला कीं, मोंगल लोक कांहीं कोंपऱ्या कोंपऱ्यांचे आसऱ्याला जाऊन दडले व कांहीं तर खालीं पळून जाऊन खडकाचेखालीं जाऊन लपले. शत्रूंची अशी घांदल उडालेली पाहून, मुरार बाजी यानें आपले मावळेलोकांसह त्यांजवर तुटून पडून एकसारखी जोरानें तलवार चालविली. हजार दोन हजार मोंगल कापला गेला व बाकी सर्व किल्ल्याखालीं पळून गेले! दिलेरखान हा, डोंगराखालून हत्तीवर बसून, आपले लोक हल्ला कसा चढवीत आहेत ह्मणून पहात होता. त्यानें आपल्या फौजेची झालेली दुर्दशा पाहून आपले निवडक पठाण लोक घेतले व पळून जात होते त्यांस थांबविले, व आपला हत्ती पुढें घालून पुनः मोठ्या जमावानिशीं शत्रूंवर निकरानें चाल केली; परंतु मावळे लोकांस एकदां यश आलें ह्मणजे ते जीवाकडे पाहणारे नसतात; त्यांचे त्वेषाचे माऱ्यापुढें खानाचे शूर पठाणही कचरूं लागले! इतक्यांत मुरार बाजी हा जेथें तेथें स्वतः पुढें होऊन आपले लोकांस उत्तेजन देत हल्ला चालवीत असलेला दिलेरखान याचे लक्षांत येऊन, त्यानें त्याजवर नेम धरून तीर मारला व त्यास खालीं पाडिलें. मावळेलोकांनीं आपला सरदार पडला असें पाहून त्यांचा धीर सुटून ते पळून वरचे कोटांत गेले. मोंगल लोकांनीं पुनः तळकोट काबीज केला; परंतु वरचे कोटावरून गोळ्यांचा मारा पुनः झाल्यामुळें त्यांनीं तो पुनः सोडून दिला.

येणेंप्रमाणें पुरंदर किल्ल्याचे उत्तरेचे बाजूनें लाग साधत नाहीं असें पाहून, दिलेरखानानें त्या किल्ल्याचे ईशान्येस वजीरगड ह्मणून एक किल्ला आहे त्याजवर हल्ला करून तो घेतला, व त्याजवर तोफा चढवून तेथून पुरंदर किल्ल्याचे वरचे कोटावर मारा चालविला; परंतु इतक्यांत पावसाळा सुरूं झाल्यामुळें व मोंगलांचा तोफखानाही चांगला नसल्यामुळें, कित्येक दिवस तोफा चालवूनही पुरंदरचे वरचे कोटावर मारा लागूं होईना; तथापि किल्ल्यावरचे लोकांत विशेष उमेद न राहिल्यामुळें, ते आपला किल्ला मोंगलांचे स्वाधीन करण्याचा विचार

रूं लागले; परंतु इतक्यांत महाराजांकडून "आह्मीं सांगेपर्यंत किल्ला त्रूंस देऊं नये" असा हुकूम आल्यावरून, त्यांनीं तो विचार तूर्त हित केला.

पुरंदर किल्ला हा आतां मोंगलांचे हातीं खास लागतो, व त्यामागून ाकीचे किल्लेही त्यांचे हातीं जातात असें पाहून, शिवाजी महाराज यांनीं वेचार केला कीं, "तूर्त मोंगलांबरोबर लढून आपला निभाव लागणार ाहीं; त्यांचें सैन्य व त्यांचे सरदार हे फार खबरदार आहेत. वीनें सांगितलें आहे तेंच खरें; तेव्हां सर्व किल्ले व मुलूख मोंगलांनीं जिंकण्याचे अगोदर, त्यांशीं तहाचें बोलणें लावलें तर त्यांत शोभा आहे. ाहींतर कफल्लक झाल्यावर अर्थ नाहीं." मग महाराजांनीं रघुनाथ-ट पंडितराव यास, राजा जयसिंग याजकडे तहाचें बोलणें लावण्या-करितां पाठविलें. राजा जयसिंग यानें पंडितरावाचा चांगला मान करून महाराजांचा मानस ऐकून घेतला. शिवाजी महाराज कदाचित् ई कपट करीत असतील, असा त्यास प्रथम संशय येऊन, त्यानें पंडि-रावाचें ह्मणणें फारसें मनावर घेतलें नाहीं; तथापि पंडितरावानें, हाराजांच्या पोटांत आपणांविषयीं विपरीतभाव कांहीं नसून, त्यांचे नांत तहच कर्तव्य आहे अशाबद्दल शपथ घेतल्यावरून, तो तहाचे ोष्टीस तत्काल कबूल झाला. तो ह्मणाला, "औरंगजेब बादशहा लवान्, पृथ्वीपति, त्याशीं तुह्मीं सख्य करावें; शत्रुत्वानें राहून ा कालीं परिणाम लागणार नाहीं; आह्मीं हिंदु जयपूरचे राजे; तुह्मीं उदेपूरचे घराण्यांतील शिसोदे, थोर वंशज; तुह्मीं हिंदुधर्म स्थापना करिता, यास्तव आह्मीं तुह्मांस अनुकूल आहोंत. तुह्मीं बादशहास रण याल, तर त्याजकडून तुह्मांस माफी देऊन तुह्मांस कांहीं मुलूखही नहागीर ह्मणून आह्मीं देववूं; त्याजबद्दल तुमची खात्री होण्याकरितां आह्मीं आमचे रजपूतांची आणभाकसुद्धां देण्यास तयार आहोंत."

पंडितरावानें राजा जयसिंग याचा मानस महाराजांस कळविला. तो त्यांस मान्य होऊन, रजपूत राजांचें इमान अत्यंत मोठें, त्यांजपासून दगा कधींही होणार नाहीं, असा विचार करून, ते जुलै महिन्यांत राय-

गडावरून निघून प्रथम प्रतापगडावर व मग तेथून जावळी येथें येऊन दाखल झाले. तेथून थोडे लोक बरोबर घेऊन ते सिंहगडाचे शेजारीं राजा जयसिंग होता त्याचे छावणींत गेले. शिवाजी महाराज आले असें राजा जयसिंग यास कळल्यावर, तो आपले तंबूतून उठून महाराजांस सामोरा आला, व त्यांस भेटून व आलिंगन देऊन त्यांस तंबूत घेऊन गेला. महाराजांस आपले उजवे बाजूस बसवून घेऊन, त्यानें त्यांशीं मोठ्या आदरानें व प्रेमानें भाषण केलें, व पूर्वीं रघुनाथभट पंडितराव यांजपाशीं तहासंबंधानें तो जें बोलला होता, तेंच तो आतां महाराजांपाशीं बोलला. महाराजांनीं जयसिंग चांगला वयातीत थोर राजा आहे असें पाहून, त्यास मोठे अदबीनें समयोचित उत्तर दिलें.

यानंतर रात्र झाली असें पाहून, महाराज शेजारच्या तंबूंत निघून गेले. दुसरे दिवशीं जयसिंगानें आपला मामा सुभानसिंग यांस बरोबर देऊन, महाराजांस दिलेरखानाचे भेटीस पुरंदरास पाठविलें. या वेळपर्यंत खानास तहाचें बोलणें चाललें आहे, याविषयीं अगदीं वार्ता नसून, पुरंदर किल्ला सर केल्याचें श्रय आपणांस येतें, या आशेस तो गुंतून राहिला होता; परंतु महाराज येऊन आतां तहच होतो हें पाहून, तो मनांत फार खट्टू झाला. त्यानें मोठा आंव आणून महाराजांस ह्मटलें, "हा किल्ला तर आह्मीं सर करून वरील सर्व लोकांची कत्तल उडविणार; त्यांनें आमचे फार लोक खराब केले." परंतु महाराजांनीं, "हाच किल्ला काय, सर्व किल्ले व प्रांत हे आतां आपलेच आहेत; आह्मांस फक्त माफी द्या आणि बादशहापाशीं आमचेविषयीं रदबदली करून आह्मांस बादशहाचे पदरीं घ्या ह्मणजे झालें; आमचें याउपर कांहीं ह्मणणें नाहीं" असें खानास अंमळ चढवून देऊन नम्रपणाचें उत्तर केल्यावर, तो अंमळ नरम होऊन ह्मणाला, "जयसिंग राजे सुभेदार, वयानें वडील आहेत; बादशहाची मर्जी त्यांवर मोठी; आह्मीं त्यांचे ताब्यांतले आहोंत; ते करतील त्यांत आह्मीं आहोंत." येणेंप्रमाणें दिलेरखानाचीही समजूत होऊन, तो महाराजांबरोबर जयसिंग याचे छावणींत सिंहगडास आला.

यानंतर लढाई बंद होऊन, दोहों पक्षांच्या बोलण्याचालण्याच्या कांहीं बैठकी झाल्यावर असें ठरलें कीं, राजा जयसिंग यानें बादशहास पत्र पाठवावें व त्यांत कोणत्या अटींवर शिवाजी महाराज तह करण्यास कबूल आहेत, हें त्यास कळवावें; व त्याजकडून रुकाराचें उत्तर आलें ह्मणजे तह कायम ठरून, त्याप्रमाणें पुढें व्यवस्था लागावी. यावेळीं दोहों पक्षांचे अनुमतानें कलमें ठरलीं तीं येणेंप्रमाणें— "शिवाजी महाराज यांनीं बादशाही मुलुखांतील काबीज केलेल्या किंवा त्यांनीं नवीनच बांधलेल्या अशा ३२ किल्ल्यांपैकीं, पुरंदर व सिंहगड व आणखी दुसरे १८ असे २० किल्ले व त्यांचे सभोंवतालील मुलूख हे राजा जयसिंग याचे एकदम ताब्यांत द्यावेत; बाकी राहिलेले १२ किल्ले व त्यांचे भोंवतालचा सुमारें एक लक्ष होनांचा मुलूख, व यापूर्वीं त्यांजकडेसच असलेला प्रांत हे महाराजांकडे रहावेत व ही बादशहाकडून मिळालेली जहागीर असें त्यांनीं समजावें. त्यांचे पुत्र संभाजी राजे जे हल्लीं आठ वर्षांचे आहेत, त्यांस पांच हजार घोडेस्वारांची मनसब बादशाहींतून मिळावी. त्याचप्रमाणें निजामशाही मुलुखांत, महाराजांचे देशमुखीचे जे हक्क होते, त्यांचे मोबदला व या तहानें बादशहास महाराजांनीं जो मुलूख सोडून दिला त्याचेहि मोबदला असे, विजापूरचे मुलुखांत महाराजांस चौथाई व सरदेशमुखी हे हक्क मिळावेत, व हा वसूल महाराजांनीं परभारें स्वतः करून घ्यावा".

या वरील तहांत, विशेष लक्षांत ठेवण्यासारखें असें शेवटचें कलम होय. आपले राज्यांतील देशमुखीचे हक्कांबद्दल परराज्यांवर किंवा कदाचित् आपले मांडलिक राज्याचे मुलुखावर औरंगजेब बादशहानें खुशाल हवाला दिल्यानें व शिवाजी महाराजांनीं तो पतकरल्यानें दोघांचा मतलब साधून, परभारें तिसरे बिचारे निर्बल राज्याचा नाश होत होता हें उघड आहे. दिल्लीचे मोंगल बादशहा हे पहिल्यापासून आदिलशाही, कुतुबशाही वगैरे दक्षिणेंतील राज्यें, ही महमद तघलख याचेवेळीं बादशाही मुलुखाचे भाग असून, पुढें दिल्लीके

बंडाळी माजल्यामुळें स्वतंत्र झालीं होतीं, तीं आपलीं मांडलिक संस्थानेंच आहेत असा आव घालीत असत, व हीं राज्यें यापुढें जसजशीं दुर्बल होत चाललीं, तसतशीं त्यांजवर त्यांनीं खंडणीसुद्धां लादून दिली; येवढेंच नाहीं, तर औरंगजेब बादशहाचा तीं अगदीं खालसा करण्याचा उद्योग एकसारखा चालला होता, हें मागें सांगितलेंच आहे. तेव्हां तूर्त शिवाजी महाराजांचें लचांड परभारें विजापूरकरांवर चालतां येऊन, तें संस्थान जर आयतेंच क्षीण करतां आलें, तर बादशहासही ती गोष्ट इष्टच होती. बादशहाची नजर केवळ आपले स्वार्थावरच असल्यामुळें, अशा कृत्यापासून, प्रथम विजापूरचे राज्याचा व मागून आपले बादशाहीचाही नाश होणार हें त्याचे लक्षांत आलें नाहीं. शिवाजी महाराजांस, विजापूरचे मुलुखांत चौथाई व सरदेशमुखी हे हक्क प्राप्त होण्यापासून व त्यांचा वसूल त्यांस स्वतःच गोळा करण्याची बादशहाकडून परवानगी मिळण्यापासून अर्थातच अतोनात फायदा होता. त्यांनीं बादशहास असें कळावलें कीं, "या हक्कांबद्दल आह्मीं तुह्मांस पेशकुष ह्मणून ४० लक्ष होन, दरसाल तीन लक्ष अशा हप्त्याप्रमाणें देऊं व तुमचे चाकरीकरितां आणखीही फौज ठेऊं."

औरंगजेब बादशहास जयसिंग यानें कळविलेलीं हीं कलमें पसंत पडून, त्यानें शिवाजी महाराजांस एक मोठें लांबलचक पत्र पाठविलें. त्यांत त्यानें महाराजांच्या सर्व अटी आह्मांस कबूल आहेत असें कळविलें. त्यानें बारा किल्ले नांवनिशीवार लिहून ते व त्यांचे सभोंवतालचा मुलूख, हा महाराजांस जहागीर ह्मणून दिला आहे, ह्मणून लिहिलें. संभाजी राजे यांस पांच हजार घोडेस्वारांची मनसब दिला. त्याचप्रमाणें देशमुखीचे हक्कांसंबंधानें लिहितांना, त्यानें आपले पत्रांत, चौथाई व सरदेशमुखी हेच जरी शब्द घातले नाहींत, तरी 'विजापूरकरांचे मुलुखांत तुह्मीं जे हक्क मागतां, ते आह्मीं तुह्मांस देऊं; मात्र तुह्मीं तें सर्व राज्य जिंकून घेण्यास, राजा जयसिंग याजबरोबर फौज घेऊन गेलें पाहिजे. तसेंच तुह्मीं ह्मणतां तो पेशकुषीचा पहिला हप्ताही तुह्मीं आह्मांस दिला पाहिजे.' असें लिहिलें आहे. औरंगजेब

बादशहास चौथाई व सरदेशमुखी ह्या शद्बांचा अर्थच समजला नसावा; निदान हे हक्क एकदां आपले लेखणींतून बाहेर पडले ह्मणजे, मराठ्यांचा सर्व देशभर सुळसुळाट चालू होऊन त्याजपुढें सर्व मोंगलबादशाही नष्ट होणार हें त्यास अगदीं समजलें नव्हतें. त्यानें इतक्या खोल पाण्यांत न शिरतां, तर्त येवढाच विचार पाहिला कीं, हे हक्क विजापूरचे राज्यापुरतेच शिवाजी महाराज मागत आहेत, तेव्हां त्याचा आपले राज्याशीं कांहीं संबंध नाहीं.

येणेंप्रमाणें शिवाजी महाराजांबरोबर युद्ध केल्यानें व त्यांजपासून पुष्कळसा मुलूख व किल्ले हे हिसकावून घेऊन, त्यांस त्यांबद्दल परराज्यांतील मात्र कांहीं हक्क दिल्यानें, राजा जयसिंग यानें बादशहाची एक कामगिरी चांगली बजाविली. आतां दुसरी कामगिरी— कीं, विजापूरचे सुलतानाकडे वारंवार बाकी थकते, व ती युद्ध केल्याशिवाय मिळत नाहीं, तेव्हां त्यानें राज्यच खालसा करून घ्यावें, —ही बजावणें राहिली. विजापूरचे राज्यांत अलीकडे चांगली व्यवस्था नसल्याकारणानें, महंमद आदिलशहा यानें, १६३७ या सालचे तहांत, दिल्लीचे बादशहास दरसाल जी वीस लक्ष होन खंडणी देण्याची कबूल केली होती, ती विजापूरचे सरकाराकडून नियमानें दिली जात नसे. यामुळें मोंगल बादशहास त्या राज्यावर स्वारी करण्यास आयतेंच निमित्त होई. राजा जयसिंग हा शिवाजी महाराजांचें साहाय्य घेऊन, आपले राज्यावर स्वारी करून येतो, असें सुलतान अल्ली आदिलशहा यास कळतांच, तो मागील सर्व थकलेल्या खंडणीचा निकाल करण्यास कबूल झाला, व त्याजबद्दल त्यानें राजा जयसिंग याजकडे निरोपही पाठविला; परंतु राजा जयसिंग यास खंडणी वसूल करण्यापेक्षां, विजापूरचें राज्यच होतां होईल तोंपर्यंत खालसा करावें, असा बादशहाचा हुकूम असल्यामुळें, तो सुलतानाचे निरोपाकडे लक्ष न देतां, तसाच त्याचे मुलुखांतून जागोजाग गांवें व किल्ले काबीज करीत चालला. ( नोव्हेंबर १६६५ ).

या स्वारींत शिवाजी महाराजांनीं आपलेबरोबर दोन हजार स्वार

व आठ हजार पायदळ इतकी फौज घेतली होती. विजापुराकडे जातांना प्रथम निंबाळकर यांचा मुलख लागला. त्यांत फलटण हें मोंगलांनीं काबीज केलें व महाराजांचे मावळे लोकांनीं तातोरा हा किल्ला सर केला. पुढें जातां जातां मंगळवेढें लागलें. तेथें विजापूरकरांची फौज त्यांस भेटली. त्यांचा मुख्य सरदार अबदुल महंमद हा असून. त्याचे हाताखालीं अबदुल करीम, बहिलोलखान, कासमखान, सिद्धी उझीज व शिवाजी महाराजांचा सापत्न भाऊ व्यंकोजी राजे हे होते. या प्रसंगीं व्यंकोजी राजे हे चांगले लढले असें सांगतात.

मोंगलांचे बाजूनें शिवाजी महाराज व नेताजी पालकर ह्यांनीं चांगले पराक्रम केले. महाराजांनीं शत्रूचे पुष्कळ किल्ले व गांवें घेतलीं. ह्या गोष्टी औरंगजेब बादशहास कळविल्यावर त्यानें शिवाजी महाराजांची तारीफ करून, त्यांस एक पत्र पाठविलें व बादशहा आपणावर लोभ करितो हें समजण्याकरितां, त्यानें त्यांस कांहीं नजराणाही पाठवून दिला. यानंतर आणखी दुसरें एक पत्र पाठवून बादशहानें महाराजांस “ तुह्मीं एकदां आमचे भेटीकरितां दिल्लीस येऊन जावें; येथें आल्यावर तुह्मांस आह्मीं आपले मोठे मानकरी करून, तुह्मांस मोठीं कामें सांगूं ” असें लिहिलें. राजा जयसिंग याचा आतां बराच घरोबा पडला असल्यामुळें, महाराजांनीं हें पत्र राजा जयसिंग यास दाखवून, त्याबद्दल त्याचा सल्ला घेतला. राजा जयसिंग यानें बादशहाचे भेटीस दिल्लीस जाण्यास कांहीं हरकत नाहीं ह्मणून सांगितलें. त्यावरून आपण दिल्लीस भेटीस येतों ह्मणून बादशहास कळविण्याकरितां, महाराजांनीं रघुनाथ बल्लाळ कोरडे यांस आपला वकील ह्मणून पुढें पाठवून दिलें. असें करण्यांत महाराजांचा वास्तविक हेतु हा होता कीं, त्यानें पुढें जाऊन, दिल्लीचे दरबारांतील मुख्य मुख्य उमराव हे कशा प्रकारचे लोक आहेत, व तेथील एकंदर हालहवाल कशी काय आहे ह्याविषयींची गुप्त माहिती मिळवून ठेवावी. आपण दिल्लीस गेल्यावर मागें चांगला बंदोबस्त रहावा ह्मणून, राज्याचा सर्व अधिकार महाराजांनीं मोरोपंत पिंगळे, आबाजी सोनदेव व अण्णाजी

दत्तो या तिघांचे हातीं दिला, व आपणाप्रमाणें सर्वांनीं त्यांचा हुकम मानावा ह्मणून सर्व कामगारांस सक्त आज्ञा केली. त्याचप्रमाणें सर्व किल्ले वगैरे महाराज स्वतः पाहून आले. यानंतर त्यांनीं आपण स्वतः व संभाजी राजे असे दोघांनीं, दिल्लीस जाण्याची तयारी केली. ( मार्च १६६६ ).

९. शिवाजी महाराजांनीं आपणांबरोबर पांचशें निवडक स्वार व एक हजार मावळे शिपाई इतकी फौज घेतली होती. ते नर्मदा व चंबळा ह्या नद्या उतरून, प्रथम मथुरेस गेले. तेथें कांहींवेळ राहून व नंतर गोकुळवृंदावन करून, ते दिल्लीस जाऊन पोहोंचले. तेथें त्यांस राजा जयसिंग याचा मुलगा रामसिंग हा व आणखी कांहीं लहान मानकरी मात्र सामोरे आले. शिवाजी महाराजांस वाटलें कीं, बादशहानें आपणांस येवढीं पत्रें पाठवून भेटीस बोलाविलें, आणि येथें आल्यावर तर आपण त्याचे खिजगणतींतही नाहीं! तथापि हा अपमान ते यावेळीं गिळून गेले. यानंतर ते बादशहाचे दरबारांत त्याचे भेटीस गेले असतां, तेथेंही अपमानाचाच प्रकार घडून आला. बादशहापुढें नजर ठेवून, महाराजांनीं त्यास सलाम केला असतां, त्यांस त्यानें " केव्हां आला " वगैरे कुशल प्रश्न केले; परंतु महाराजांस जें वाटलें होतें कीं, बादशहा आपणांस मोठमोठ्या उमरावांमध्यें बसण्यास सांगेल, त्याप्रमाणें कांहींएक न होतां, त्यांस उजवे बाजूस यशवंतसिंग वगैरे रजपूत सरदार उभे होते त्यांत उभे राहण्यास, बादशहानें हाताचे खुणेनें सुचविलें. हा अपमान महाराजांस सहन न होऊन, ते रागाचे आवेशांत, बादशहास लागणारे असे कांहीं गौण शब्द बोलले. ते शेजारीं उभे असलेले मानकऱ्यांनीं जसेचेतसेच त्याचे कानांवर घातले. त्यावरून, दरबार आटोपून महाराज आपले डेऱ्यास गेले असतां, बादशहाकडून त्यांस निरोप आला कीं, ' या उपर तुह्मीं दरबारांत येऊं नये; काय बोलणें असेल तें वकीलामार्फत कळवीत जावें. ' आपण दिल्लीस आलों व हें काम भलतेंच होऊन बसलें हें पाहून, महाराजांस मोठी काळजी लागली.

यापुढें बादशहाचा हेतु तरी काय आहे हें कळण्याकरितां, त्यांनीं रघुनाथपंत कोरडे यास पाठवून अर्ज केला कीं, ' आपणांकडून दिल्लीस भेटीस येण्याकरितां आह्मांस पत्रें आलीं, त्यावरून आह्मीं येथें येऊन दाखल झालों. आह्मीं आपलेकडून सरकारची सेवा केली, याबद्दल आह्मांस चौथाई व सरदेशमुखी या हक्कांच्या सनदा करून देणें त्या करून द्याव्या. दक्षिणेंत आदिलशाही व कुतुबशाही हीं राज्यें खालसा करून देण्याचे कामीं लागेल तीं मदत देण्यास आह्मीं तयार आहों. तथापि ती सरकारास नको असेल तर, आह्मांस आमचे देशीं परत जाण्यास परवानगी द्यावी. आह्मांस व आमचे लोकांस तरी हिंदुस्थानची हवापाणी कांहीं मानत नाहीं; तेव्हां आह्मांस सरकाराकडून निरोप व्हावा. ' बादशहानें अर्ज ऐकून घेऊन, त्यांजवर कांहीं तरी थरसोडीचें असेंच उत्तर दिलें, व लवकरच शहरचा कोतवाल पोलादखान यास बोलावून आणून, त्यास हुकूम केला कीं, ' शिवाजी महाराज जेथें उतरले आहेत, तेथें भोंवताली चौक्या पहारे ठेवून, त्यांजवर नीट नजर ठेवावी, व ते बाहेर कोठें जाऊं लागले तर, आपले लोक त्यांजबरोबर ठेवावेत; त्यांनीं आमचे परवानगीशिवाय येथून निघून जाऊं नये, अशाविषयीं तुह्मीं बंदोबस्त ठेवला पाहिजे. '

येणेंप्रमाणें आपणांस नजरकैद केल्यामुळें, बादशहाचें मन आपणांविषयीं साफ नसून, तो याउपर आपणांस काय करील याचा नेम नाहीं असें महाराजांस वाटूं लागलें. त्यांनीं रामसिंग याचे मार्फत बादशहाचे कानांवर घातलें कीं, " आह्मांस आमचे देशाकडे जाण्याची परवानगी होत नसेल तर, निदान आमचे बरोबरचे लोकांस तरी परत जाण्याचा हुकूम व्हावा; या मुलुखाची हवापाणी न मानल्यामुळें, पुष्कळ जण दुखण्यानें पडले आहेत ". बादशहानें पाहिलें कीं, " शिवाजी महाराज हे आयतेच आपली फौज देशास पाठवूं ह्मणत आहेत, तेव्हां हें बरेंच आहे; लोक एकदां निघून गेले ह्मणजे ते आपले तावडींतून जातील कोठें ?" याप्रमाणें त्यानें विचार करून महाराजांचे सर्व फौजेस स्वदेशीं जाण्यास परवाने दिले. ते मिळाल्या-

बरोबर, महाराजांनीं सर्व फौजेस परत आपले मुलुखांत जाण्यास हुकूम करून, कांहीं अगदीं निवडक विश्वासू मंडळी मात्र बरोबर ठेविली. येणेंप्रमाणें फौजेचें लटांबर सुरक्षितपणें आपले देशास लावून दिल्यानें, बादशाहाचे हातांतून आतां आपण स्वतः सहज सुटून जाऊं अशी महाराजांस उमेद आली.

शिवाजी महाराजांनीं दिल्लींतून पार निघून जाण्याची जी आतां युक्ति योजली, ती खरोखर अलौकिक होय. त्यांनीं राजधानींतील मोठमोठे उमरावांस भेटण्याचा परिपाठ घालून, व त्यांजकडे नजराणा पाठवून देऊन, त्यांतील पुष्कळांचा स्नेह संपादन केला. त्याप्रमाणें आपले घरीं गुरुवारचा उत्साह असतो असा बाहणा करून, मिठाईच्या मोठमोठ्या डाल्या नवीन स्नेह जोडलेले उमरावांचे घरीं पाठविण्याचा महाराजांनीं पाठ घातला. कधीं कधीं मोठमोठ्या मशिदींपुढें फकी-रांसही या डाल्यांतून मिठाई महाराजांनीं वांटावी. येणेंप्रमाणें मिठाईचे मोठमोठे हारे महाराजांचे घरीं आणण्याचा व ते बाहेर पाठ-विण्याचा हरहमेष पाठ पडला. प्रथम कोतवालाचे शिपायांनीं ते तपासून पाहिले; परंतु त्यांत मिठाईच असते व दुसरें कांहीं नाहीं असें पाहून त्यांनीं ते तपासण्याचें सोडून दिलें. असो; येणेंप्रमाणें इकडे असा प्रकार चालू असतां, महाराजांबरोबर जी निवडक मंडळी राहिली होती, तींतून कांहीं दुखणें लागलें ह्मणून सोडून गेले, कांहीं नोकरींतून काढून टाकिले ह्मणून गेले; अशा निमित्तांनीं पुष्कळ असाम्या महा-राजांपासून निघून गेल्या; परंतु ते सर्व निरनिराळे वेष घेऊन शहरां-तच होते. त्यांचे जागीं त्या प्रांतींचींच कांहीं गडीमाणसें महाराजांनीं चाकरीस ठेविलीं; परंतु त्यांस वरचेवर पालटून, आपली मसलत त्यांस न कळावी अशाविषयीं त्यांनीं खबरदारी घेतली. शेवटीं दिल्लींतून पळून जाण्याची सर्व तयारी झाली असें पाहून, महाराजांनीं आठ पंधरा दिवस अगदीं बेमारीचें सोंग घेतलें. महाराजांचे जीवास बरें न वाटून ते घराबाहेरसुद्धां पडत नाहींत, असें कोतवालाचे लोकांस त्यांनीं भासविलें. इकडे मिठाईचे पेटारे जायायेण्याचा परिपाठ पूर्वी-

प्रमाणें चालूच होता. शेवटीं एके दिवशीं संध्याकाळीं, महाराज व संभाजी राजे असे उभयतां, या मिठाईचे पेटाऱ्यांत बसून पाहरे-कऱ्यांचे हद्दींतून एकदांचे निभावून पार पडले!

इकडे घरांतून महाराज निघून गेले, या गोष्टीचा बोभाट होऊन, त्यांचा पाठलाग लवकर न व्हावा ह्मणून महाराजांनीं अशी युक्ति केली होती कीं, त्यांचा फार दिवसांचा विश्वासू व हुषार असा हिरोजी फरजंद ह्मणून कोणी शिपाई होता, त्यास त्यांनीं आपले पलंगावर निजविलें व त्याला आपला शेला पांघरायास घालून, व त्याचा हात मात्र उघडा राहील इतका त्यास झांकून टाकून, एका पोरास त्याचें अंग रगडण्यास ठेविलें. येणेंप्रमाणें सर्व रात्रभर, हिरोजी हा अंथरुणांतच पडून राहिला. दुसरे दिवशीं सुमारें एक प्रहर झाल्यावर, चौकीचे लोक महाराजांचे खोलींत येऊन पहातात तों, महाराज अगदीं बेमार होऊन शेला पांघरून पडले आहेत व पोरगा अंग रगडतो आहे, असें त्यांचे दृष्टीस पडलें. त्यांनीं त्यास पुसलें कीं, ' महाराज आज फार वेळसे पडून आहेत ? पोरग्यानें उत्तर दिलें, ' महाराजांचें डोकें फार दुखत आहे. ' हें ऐकून पाहरेकरी निघून गेले. मग कांहीं वेळ गेल्यावर हिरोजी हा अंथरुणांतून उठून, आपला स्वतःचा पोषाख करून व पोरग्यास बरोबर घेऊन, महाराजांस औषध आण-ण्यास जातों ह्मणून जो बाहेर पडला तों पडलाच! येणेंप्रमाणें शिवाजी महाराज हे कांहीं आपले कल्पनाविशेषाचे जोरानें, व कांहीं मोंगलांचे गैरबंदोबस्तामुळें, आलेल्या संकटांतून पार पडले.

इकडे चौकीचे पाहरेकरी दोन प्रहराचे सुमारास आपसांत बोलूं लागले कीं, ' आज महाराजांचे घरांत माणसांचा राबता कांहीं दिसत नाहीं. महाराज फार बेमार आहेत असें ह्मणतात. तेव्हां कांहीं-जण घरांत जाऊन, महाराजांचे खोलींत जाऊन पाहतात तों, अंथरुणा-वर कोणी नाहीं. तेव्हां दगा करून महाराज पळून गेले, हें वर्तमान कोतवालास समजून, त्यानें तें भीत भीत बादशहाचे कानांवर घातलें.

बादशहानें पोलादखानावर रागावून, त्याची मनसब जप्त केली; त्याचप्रमाणें महाराजांचा तपास करण्याकरितां सर्व शहरभर तावडतोब लोक रवाना केले; परंतु त्यांचा कांहींच पत्ता न लागल्यामुळें, बादशहानें त्यांचा शोध लावून त्यांस पकडून आणण्याबद्दल, चोहोंकडे तालु-कदारांस पत्रें पाठवून दिलीं.

शिवाजी महाराज हे संभाजी राजे व इतर मंडळी यांसह, दिल्लींतून बाहेर पडल्यावर, त्यांनीं विचार केला कीं, आपण आतांच नीट आपले देशीं जावयास निघालों तर, बादशहाचे लोक त्या वाटेनें आपला शोध करीत आहेत, त्यांचे हातीं आपण कदाचित् पडूं; ह्मणून कांहीं वेळ इकडेसच बैराग्यांचा वेष घेऊन, काशी, प्रयाग, गया वगैरे पवित्र तीर्थस्थानें पहावीं व नंतर तेथून स्वदेशीं जावें. येणेंप्रमाणें ते प्रथम मथुरेस गेले. तेथें मोरोपंत पिंगळे पेशवे यांचे मेहुणे राहत होते. त्यांचा शोध काढून त्यांस सर्व वर्तमान सांगून, त्यांजपाशीं संभाजी राजे यांस ठेविलें. कारण आपणांबरोबर वाटेंत येवढे लहान मुलाचा निभाव लागणार नाहीं असें महाराजांस वाटलें. नंतर तेथून निघून संकल्पाप्र-माणें सर्व तीर्थयात्रा निर्विघ्नपणें करून, स्वदेश सोडल्यापासून नऊ महि-न्यांनीं महाराज परत रायगडास येऊन दाखल झाले. ( डिसेंबर १६६६ ). महाराज सुरक्षितपणें परत आले, ह्मणून जिजाबाईसाहेबांनीं मोठा उत्साह केला. चोहोंकडे साखरा वांटल्या, पुष्कळ दानधर्म केला व किल्ल्यांव-रून तोफांचे आवाज केले. नंतर कांहीं दिवसांनीं संभाजी राजे यांस स्वदेशीं आणण्याकरितां महाराजांनीं माणसें पाठवून त्यांस आणिलें.

६. असो. शिवाजी महाराज दिल्लीस निघून गेले असतां, त्यांचे मागें दक्षिणेंत, अकल्पिक रीतीनें महाराजांस अनकूल अशा पुष्कळ गोष्टी घडून आल्या होत्या. महाराज गेल्यावर राजा जयसिंग यानें एकट्या-नेंच विजापूरचे सुलतानाबरोबर युद्ध चालवून, खुद्द विजापुरास वेढा घातला; परंतु सुलतानाचे घोडेस्वारांनीं त्याचे सैन्यावर वरचेवर छापे घालून व त्यांस दाणावैरण वगैरे मिळूं न देऊन त्यांस फार त्रास दिला. आदले सालीं पाऊसही कमीच पडला असल्यामुळें, मोंगलांचे छावणींत

आजार वाढला व पाण्याचें दुर्भिक्ष झालें. विजापूरचे सुलतानानें बाद-शहाचे फौजांबरोबर बरीच टक्कर मारली, हें पाहून गोंवळकोंड्याचे सुलतानानेंही आपला सरदार नेक नामखान याजबरोबर कांहीं फौज देऊन त्यास विजापूरकरांचे मदतीस पाठविलें. गोंवळकोंड्यास बादशाहाचा वकील होता, त्यानें सुलतानास "तुह्मी हें काम गैर करितां; तुह्मी जयसिंगाचे मदतीस फौज पाठवा, नाहींतर तुमचे मुलुखावरच अगोदर स्वारी होईल" वगैरे आपणांकडून पुष्कळ सांगून पाहिलें; परंतु सुलतानानें तें कांहीं ऐकिलें नाहीं. शेवटीं बादशहाकडून आपणांस कांहीं कुमक पोहोंचत नाहीं असें राजा जयसिंग यानें पाहून, त्यास असें वाटूं लागलें कीं, या मोहिमेंत परभारें आपली नाचक्की झाली व आपले रजपूत शिपाई हे मरून गेले तर बादशहास त्याची काय दिक्कत आहे? असा नाउमेदीचा विचार त्याचे मनांत उत्पन्न होऊन, तो विजापूरचा वेढा उठवून परत औरंगाबादेकडे चालला. वाटेनें जातांना त्याचे फौजेचा बराच नाशही झाला. शिवाजीमहाराजांपासून व विजापूरचे सुलतानापासून जो मुलूख व जे किल्ले त्यानें घेतले होते, त्यांचे रक्षणापुरती त्याजपाशीं फौज नसल्यामुळें, त्यानें मुख्य मुख्य किल्ले—पुरंदर, सिंहगड, लोहगड, माहोली व करनाळा—यांतून मात्र चांगली शिबंदी ठेऊन त्यांचा बंदोबस्त केला. बाकी ज्या किल्ल्यांतून दाणावैरणीचा बराच पुरवठा होता, त्यांत थोडे थोडे शिपाई ठेविले; परंतु इतरांचे दरवाजे जाळून टाकून किंवा त्यांच्या भिंतीस खिंडी पाडून, ते शत्रूस पुनः सहज उपयोगी पडूं नयेत असें त्यानें करून टाकिलें; तथापि इकडे दिल्लीस रामसिंगाचे मदतीनें शिवाजी महाराज पळून गेले असें बादशहास वाटून, त्यानें त्यास दरबारास येऊं नये ह्मणून हुकूम केला, व जयसिंगासही त्याचे दक्षिणेचे सुभ्यावरून काढून व त्याचे जागीं सुलतान मोआझिम व यशवंतसिंग यांची पुनः नेमणूक करून त्यास परत दिल्लीस येण्यास लिहिलें. राजा जयसिंग हा बराच वयातीत झाला असून, बादशहानें आपली योग्यता न ओळखून आपला अपमान केला, असें त्यास वाटून तो मनांत फार खट्टू झाला. तो दिल्लीकडे परत जातांना वाटेंतच मरण पावला.

राजा जयसिंग याचे मागून बादशहानें दिलेरखान यासही दक्षिणेंतून काढून माळव्यांत बदललें. (१६६७).

येणेंप्रमाणें औरंगजेब बादशहानें वेडेपणानें, दोन हुशार सरदार काढून नेऊन त्यांचे जागीं दोन थिल्लर माणसांची नेमणूक केल्यानें, शिवाजी महाराजांचें आयतेंच हित झालें हें सांगणें नकोच. यशवंतसिंग हा जोधपूरचा राजा असून, तो वयानें बराच मोठा व चालचालणूकीनें मोठा संभावित असा होता. शिवाजी महाराज दिल्लीस असतां त्यांचा या रजपूत राजाबरोबर बराच स्नेह जमून, त्याचा लोभी स्वभाव त्यांस माहीत झाला होता. हा राजा हिंदु धर्माचा मोठा अभिमानी असून, त्यानें सर्व हिंदु लोकांना जिझिया ह्मणून जो कर औरंगजेब बादशहानें बसविला होता, त्यासंबंधानें त्यास एक चांगलें खरमरीत पत्र—कोणी ह्मणतात शिवाजी महाराजांचे सांगण्यावरून—लिहिलें होतें. हा पूर्वी दारा याचे पक्षाचा असून पुढें औरंगजेबास येऊन मिळाला होता; तथापि त्यावर बादशहाचा भरंवसा नव्हता. सुलतान मोआझिम हा औरंगजेब बादशहाचा दुसरा मुलगा असून तो स्वभावानें पुष्कळ अंशीं फार चांगला होता. तो मोठा शूर व उदार असा असून बापाप्रमाणें संशयी नसे; परंतु त्याचे अंगीं दुर्गुण ह्मटले ह्मणजे ऐषआरामाची विशेष प्रीति, उधळेपणा व दुसऱ्यावर फाजील भरंवसा ठेवणें, हे होते. तो बहुतेक यशवंतसिंगाचे तंत्रानेंच चालत असे. औरंगजेब बादशहा हा आपले पुत्राचा व यशवंतसिंगाचा स्वभाव जाणून होता; परंतु नाइलाज ह्मणून त्यानें त्यांस दक्षिणेचे सुभ्यावर पुन्हा पाठवून दिलें होतें. दिलेरखान याजविषयींही मागें सांगितल्याप्रमाणें बादशहास भरंवसा वाटत नसे; परंतु त्याचें राजपुत्राशीं सूत नसून यशवंतसिंगाशीं तर त्याचें हाडवैरच असल्यामुळें, त्यानें त्यास दक्षिणेंतून काढून तेथून जवळच माळव्यांत ठेविलें होतें; अशाकरितां कीं, दक्षिणेंत राजपुत्र व यशवंतसिंग हे जर कांहीं गडबड करूं लागतील, तर दिलेरखानाकडून आपणांस सहजच तावडतोब बातमी लागेल. येणेंप्रमाणें बादशहास रजपूत

राजांचा, किंवा आफगाण सरदारांचा, किंवा स्वतः चे पुत्रांचा असा कोणाचाही विश्वास वाटत नसल्यामुळें, त्यानें मोठे युक्तीनें याची नजर त्याजवर, त्याची नजर याजवर राहील अशी व्यवस्था करून व स्वतः ची वचक सर्वांवर ठेवून, तो राज्य चालवीत होता.

शिवाजी महाराजांस, दक्षिणेचे सुभ्यावर या नवीन आलेल्या असामींचा स्वभाव पूर्ण माहीत होता. ते येण्याचे अगोदरच मोरोपंत पेशवा यानें राजा जयसिंगानें जे किल्ले जाळून किंवा पाडून डाकलग करून टाकले होते, ते पुनः घेऊन त्यांची त्यानें दुरुस्ती केली होती व त्यांत पुनः मावळे लोक ठेविले होते. यानंतर शिवाजी महाराज हे जेव्हां दिल्लीहून सुटून दक्षिणेंत परत आले, तेव्हां त्यांनीं कल्याणप्रांत बहुतेक मोंगलांपासून सोडवून घेतला होता; परंतु दक्षिणेचे सुभ्याची नवीन व्यवस्था झालेली पाहून महाराजांस वाटलें कीं, आपला हेतु साधण्यास आतां लढाईपेक्षां पैसा अधिक उपयोगीं पडेल. त्यांनीं राजपुत्र मोआझिम व यशवंतसिंग यांस मुबलक पैसा चारून त्यांस आपलेंसें करून घेतलें. राजपुत्रानें सांगितल्यावरून महाराजांनीं त्याचे नांवें अर्ज लिहून पाठविला कीं, 'आपण बादशहापाशीं आमचेकरितां रदबदली करावी; बादशहांनीं आमचेकडून चाकरी घेतली नाहीं, तथापि आमचे मनांत त्यांचे पदरीं राहून इमानइतबारें चाकरी करावी असा हेतु आहे.' सुलतान मोआझिम यानें हा अर्ज बादशहाकडे पाठवून त्याची संपादणूकही चांगली केली. बादशहास तूर्त दक्षिणेकडचे कारभाराकडे लक्ष देण्यास सवड नसल्यामुळें, त्यानें शिवाजी महाराजांचा अर्ज मंजूर करून त्यांस राजे हा किताब दिला; त्यांचे पुणें, सुपें, चाकण वगैरे प्रांत त्यांचे त्यांस परत दिले. तसेंच संभाजी राजे यांस ५००० स्वारांची मनसब मुकर करून, महाराजांचे जुन्नर व अहमदनगर या प्रांतांतील हकांबद्दल त्यांस वऱ्हाड प्रांतांत जहागीर दिली, व पूर्वींचे करारप्रमाणें विजापूरचे राज्यांत चौथाई व सरदेशमुखी ह्यांचे हक्कही त्यांस दिले. शिवाजी महाराजांचे मनांतील वांकडें जाण्याकरितां, त्यांस पुत्राचेमार्फत बादशहानें

कळविलें कीं, "आमचे मनांत तुमचा चांगला मान करून तुह्मांस तुमचे हक्कांबद्दल सनदा देऊन व मोठ्या कामगिऱ्या सांगून तुमचे देशीं तुह्मांस जाण्याचा निरोप द्यावयाचा होता; तथापि तुह्मीं आह्मांस न विचारतां तसेंच गेला, तर हेंही बरेंच झालें, त्याबद्दल उभयतांस वाईट वाटण्याचें कारण नाहीं." येणेंप्रमाणें महाराजांच्या सर्व अटी कबूल करून, औरंगजेब बादशहानें त्यांजवर पुष्कळ मेहेरबानी केली असें दाखविलें. त्यांत त्याचा हेतु महाराजांस पुनः आपले कपटरूपी जाळ्यांत ओढण्याचा असावा असें दिसतें. कांहीं लोकांचें असेंसुद्धां ह्मणणें आहे कीं, बादशहानें मुद्दाम आपले पुत्राकडून शिवाजी महाराजांस मिळाल्यासारखें दाखवून, खोटेंच बंड उपस्थित करावें, ह्मणजे आपणांस जे सरदार नाइराज असतील, त्यांची परीक्षा होऊन त्यांचें पारिपत्य करितां येईल अशी त्याची खटपट होती; परंतु असले पेंचांतील पेंच करण्याची विलक्षण कल्पना औरंगजेब बादशहाचे कपटी स्वभावास शोभण्यासारखी आहे खरी; तथापि सुलतान मोआझिम याचें एकंदर मागील व पुढील वर्तन पाहिलें तर त्यास ती जुळत नाहीं. शिवाय अशा नीच कृत्यापासून बादशाहीस कदाचित् उलटा नाहीं तो धोका होण्याचा संभव होता; तेव्हां राजपुत्राचे तरी मनांत महाराजांविषयीं विपरीत भाव नसावा असें वाटतें.

मोंगलांचें व विजापूरकरांचें जें युद्ध चाललें होतें, त्यास दोघेही तूर्त कंटाळून जाऊन त्यांजमध्यें सन १६६८ चे जून महिन्याचे सुमारास तह ठरला. यावेळीं या कामांत विजापूरचे तर्फे शहा अबदुल हुसेन कमना हा असून, त्यानें सोलापूरचा किल्ला व त्याचे भोंवतालचा १,८०,००० होनांचा मुलूख बादशहाचे स्वाधीन केला. मोंगलांचें व विजापूरकरांचें येणेंप्रमाणें झालेलें सख्य पाहून शिवाजी महाराजांस शंका आली कीं, आपण विजापूरचे राज्यांत चौथाई व सरदेशमुखी हे हक्क चालवूं लागलों असतां, कदाचित् बादशहा आड येईल, ह्मणून त्यांनीं सुलतान मोआझिम व यशवंतसिंग यांची गांठ घेऊन व त्यांस नजराणा वगैरे देऊन, त्यांनीं आपणांस वरील हक्क चालविण्याचे कामांत

अडथळा करूं नये असें केलें. शिवाजी महाराजांची ही तयारी पाहून, विजापूरचा मुख्य प्रधान अबदुल महंमद यानें, त्यांस दरसाल तीन लक्ष रुपये देण्याचें कबूल करून, त्यांनीं सुलतानाचे मुलखांत उपद्रव देऊं नये, असा त्यांचेपाशीं गुप्त ठराव केला. विजापूरचे सुलतानाप्रमाणें गोवळकोंड्याचे सुलतानानेंही आपले मुलखांत शिवाजी महाराजांनीं वरील हक्क चालवूं नयेत, ह्मणून त्यांस पांच लक्ष रुपये दरसाल देण्याचें कबूल केलें. ( १६६८ ).

७. असो. शिवाजी महाराजांनीं तोरणा किल्ला घेऊन, हिंदुपातशाहीची प्रथम सुरुवात केल्यास आतां बावीस वर्षें होऊन गेलीं होतीं. इतके काळांत महाराजांनीं विजापूरचे सुलतानाबरोबर व दिल्लीचे बादशहाबरोबर सामना करून दोहोंपासून बराच मुलूख, किल्ले वगैरे हस्तगत करून घेऊन, त्यांनीं बरेंच चांगलें राज्य संपादन केलें होतें. त्यांचा अंमल बहुतेक सर्व कोंकणप्रांतावर पसरला असून, जुन्नर, चाकण येथपर्यंत पोहोंचला होता. दिल्लीचे बादशहाकडून त्यांस वऱ्हाडप्रांतांत नवीनच जहागीर मिळाली असून, त्यांचा पुत्र संभाजी राजे व सेनापती कडताजी गुजर, ज्यास त्यांनीं प्रतापराव असा मोठा किताब दिला होता, ते औरंगाबादेस सुलतान मोआझिम याचेपाशीं पांच हजारांची मनसब घेऊन होते. दक्षिणेंत विजापूरकर जेरीस येऊन, ते महाराजांस तीन लक्ष रुपये देण्यास कबूल झाले; त्याचप्रमाणें गोवळकोंडचा सुलतान हाही पांच लक्ष रुपये खंडणी देण्यास राजी झाला. येणेंप्रमाणें बावीस वर्षांत महाराजांनीं आपले पराक्रमानें जें नवीन हिंदुस्वराज्य स्थापन केलें, त्याची व्यवस्था चांगली लागावी ह्मणून, यापुढें महाराजांनीं सुमारें दीड दोन वर्षें बाहेर मोहिमेवर न जातां, ते त्याच उद्योगास लागून राहिले. यावेळीं त्यांनीं ज्या निरनिराळ्या व्यवस्था लावून दिल्या, त्या पाहिल्या असतां, युद्धाचे कामांत महाराजांचें बुद्धिकौशल्य जसें दृष्टीस पडतें, तसेंच राज्यव्यवस्थेंतही तें दृष्टीस पडतें. त्यांचे पश्चात् मराठे लोकांचा जो एवढा उत्कर्ष झाला व त्यांनीं दिल्लीचें तक्त हालवून टाकून सर्व देश जो मुसलमान लोकांपासून परत जिंकून

घेतला, त्या सर्वांस शिवाजी महाराजांचा बुद्धिप्रभाव हाच कारण होय! कोणत्या व्यवस्था केल्या असतां, त्या आपल्याकडून व आपले पश्चात् आपले लोकांकडून चांगल्या चालविल्या जातील, व शत्रूंवर आपला तह नेहमीं लागू पडून, त्यांचे मुलुखांत वरचेवर आपला पाय आपणांस कसा शिरकवितां येईल, या गोष्टीबद्दल महाराजांचें धोरण कांहीं अलौकिक होतें यांत संशय नाहीं. या व्यवस्था महाराजांचे राज्याचे आरंभापासूनच सुरू झाल्या असून, त्यांत त्यांनीं वेळोवेळीं स्वानुभवावरून फेरबदल केले होते. त्या यावेळीं पूर्ण झाल्या असून, त्यांचे मागें बरेच दिवस तशाच चालल्या होत्या. पुढें पेशवाईत कालांतरानें त्यांत कांहीं फेरबदल झाले; परंतु ते होण्यापूर्वीं त्या मूळ कशा होत्या, हें कळणें आपणांस अवश्य आहे, ह्मणून त्यांचें येथें थोडक्यांत दिग्दर्शन करून हा भाग संपवितों.

राज्याचा कारभार चालविण्याकरितां शिवाजी महाराजांनीं अष्टप्रधानांची योजना केली होती. ती येणेंप्रमाणें :—

१. पेशवा अथवा मुख्य प्रधान. या कामावर वर लिहिल्याप्रमाणें मोरो त्रिमल पिंगळे हे होते.

२. मुजुमदार. या प्रधानाचें काम वसुलावर देखरेख ठेवून, त्याचा सर्व हिशेब ठेवणें हें असे. त्याचे हाताखालीं दोन तीनशे कारकून असत. या कामावर आबाजी सोनदेव ( कल्याण प्रांताचे सुभेदार ) हे होते.

३. सुरनीस. यांचेकडे सर्व राज्यकारणी पत्रव्यवहार व सरकारी दप्तर हीं असत. शिवाय सनदा वगैरे कागदपत्र पाहून तीं बरोबर आहेत ह्मणून त्यांजवर शेरा मारून, त्यांची नोंदणी करणें हेंही याजकडेसच असे. हें काम अण्णाजी दत्तो यांजकडे असे.

४. वाकनीस. यानें महाराजांचा खाजगी पत्रव्यवहार पहावा; ते जें जें कांहीं करतील, त्याची दिनचर्या लिहून ठेवावी; त्याचप्रमाणें महाराजांचे खानगी घोडेस्वार व इतर शिपाई प्यादे व चाकरमाणसें

यांजवर देखरेख ठेवावी, अशीं कामें त्याजकडे असत. हें काम दत्ताजीपंत यांजकडे असे.

५. सरनोबत. यांचेकडे सैन्याचें काम असे. त्यांत पायदळावर येसाजी कंक व घोडेस्वारांवर प्रतापराव गुजर असे वेगळाले सरनोबत असत.

६. दबीर. यांचेकडे परराज्यांचा पत्रव्यवहार असे. त्यासंबंधीं सर्व कारस्थानें, खलबतें वगैरे गोष्टींचे कागदपत्र यांजपाशीं असत. हें काम सोमनाथपंत यांजकडे असे.

७. न्यायाधीश. राज्यांतील सर्व न्यायमनसुबे करण्याचें काम निराजी रावजी व गोमाजी नाईक यांजकडे असे.

८. न्यायशास्त्री. यांजकडे धर्मसंबंधीं सर्व बाबींचें काम असे. हें काम प्रथम सांभ उपाध्ये यांजकडे असून, त्यानंतर तें रघुनाथपंत यांजकडे दिलें.

या अष्टप्रधानांशिवाय शिवाजी महाराजांपाशीं खजीनदार, चिटणीस, फडणवीस व पारशी लिहिण्यास मुनशी असे कामदार असत. यांपैकीं पहिले तीन कामावर अनुक्रमें शामजी नाईक पुंडे ( चांभारगोंदें येथील शेषोनाईक पुंडे, ज्यांनीं मालोजी राजे यांची प्रथम ठेव ठेविली होती, त्यांचे नातू ), बाळाजी आवजी व बाळकृष्णपंत झुवंते हे होते.

वरील अष्टप्रधानांपैकीं शेवटले दोन खेरीजकरून बाकीचे सर्वांकडे फौजेचें थोडेंबहुत काम असेच. ते लढाईस गेले ह्मणजे त्यांचीं मुलकीचीं कामें त्यांचे नांवें त्यांचे मुतालिक करीत असत. या मुतालिकांखेरीज प्रत्येक प्रधानास मुजुमदार, फडणवीस, सबनवीस, कारखान्नीस, चिटणीस, जामदार, पोतनीस असे सात कामगार त्यांचे हाताखालीं असत.

शिवाजी महाराजांचें राज्य नुकतेंच स्थापन झालें असून त्याचा सर्व जोर फौजेवरच असल्यामुळें, त्यांचें लक्ष तिचे व्यवस्थेकडे विशेष

असे हें सांगणें नकोच. त्यांचे सैन्यांत पायदळाचा फार मोठा भरणा असून, त्याचे मानानें घोडेस्वारांची संख्या थोडी होती. पायदळासंबंधानें त्यांची व्यवस्था अशी असे कीं, दहा लोकांस एक नाईक, पन्नासांस एक हवालदार, शंभरांस एक जुमलेदार व हजारांस एक हजारी असे असत. हजाऱ्यावरची पायरी पंच हजाऱ्याची असे, व त्याजहून दुसरा मोठा अधिकारी काय तो सरनोबत हाच असे. पायदळांतील शिपाई दोन जातीचे असत—एक मावळे व दुसरे हेटकरी. मावळे हे घांटमाथ्याचे व हेटकरी हे कोंकण प्रांताचे राहणारे असत. दोघेही डोंगर वगैरे अवघड जागीं, जेथें देशावरील लोकांचा अगदीं रिघाव होणार नाहीं, तेथें माकडांप्रमाणें चढून जाण्यांत मोठे पटाईत असत. त्यांचीं हत्यारें ह्मटलीं ह्मणजे ढाल, तरवार, बरची, तीरकमटा व बंदूक हीं असत. शत्रूंवर निकराचा हल्ला करून त्यांजवर तलवार चालविण्याचे कामांत मावळे लोक मोठे कट्टे असत; परंतु हेटकरी हे व त्यांतही विशेषेंकरून सावंताचे वाडीकडले हे बंदूकीनें नेम मारण्याचे कामांत मोठे कुशल असत. प्रत्येक दहा असामींत एक बंदुकी असे; बाकी नऊ जणांपाशीं इतर हत्यारें असत. शिपाई लोकांनीं आपापलीं हत्यारें बाळगावीत; परंतु दारूगोळा मात्र सरकारांतून मिळावा अशी वहिवाट असे. या शिपायांचा साधारण पोषाख ह्मटला ह्मणजे डोक्यास पागोटें, अंगांत कुडतें, पायात चोळणा, कंबरेस कांचा व त्याचेवरून धोतर असा असे. यांस चाकरीस ठेवतांना कित्येकांस प्रथम नुसतें धान्य देऊनच ठेवीत असत; परंतु त्यांची जसजशी हुषारी दिसून येईल, तसतसा त्यांस क्रमाक्रमानें एका होनापासून तीन होनापर्यंत दरमहा पगार मिळत असे. जुमलेदारास सालीना शंभर होन, एक हजारी यास पांचशें होन असा पगार असे. पंच हजारी यास अडीच हजार होन पगार असून, शिवाय त्यास पालखी, अबदागीर वगैरे सरंजाम हा सरकारांतून दिला जात असे व त्याचा खर्चही सरकारांतूनच चालत असे.

शिवाजी महाराजांची घोडेस्वारांची व्यवस्था पायदळाप्रमाणेंच पुष्कळ अंशीं असे. पंचवीस स्वारांवर एक हवालदार, सव्वाशें स्वारांवर

एक जुमलेदार व सहाशे पंचवीस स्वारांवर एक सुभेदार असे असत. दहा सुभेदारांवर एक *पंचहजारी ह्मणून अंमलदार असे. याचे वरची पायरी ह्मटली ह्मणजे सरनोबताचीच होय. प्रत्येक सुभेदाराचे हाताखालीं महाराजांनीं नेमून दिलेले असे, एक हिशोब लिहिणारा व दुसरा तो तपासणारा असे दोन कारकून असत. त्याचप्रमाणें पंचहजारी याचे हाताखालीं वरीलच कामें करण्याकरितां अधिक हुषार व अधिक पगाराचे असे, एक मुजुमदार व दुसरा अमीन ह्मणून कामदार दिले असत. ही कारकून मंडळी बहुतकरून ब्राह्मण किंवा परभू जातीची असत. महाराजांचे घोडेस्वार दोन प्रकारचे असत. एक शिलेदार व दुसरे बारगीर. शिलेदार हे बरेच चांगले स्थितींतले लोक असून, त्यांचीं स्वतःचीं घोडीं, हत्यारें, दारूगोळा वगैरे असत, व ते महाराजांपासून कांहीं उक्ता पैसा घेऊन, त्यांचे स्वारीचीं वगैरे कामें बजावून देत. कांहीं शिलेदार विशेष ऐपतवान असून, त्यांचे पदरींही हजार पांचशें घोडेस्वार असत. बारगीर हे महाराजांचे नोकर असून, त्यांस बसण्यास घोडीं व हत्यारें हीं सरकारांतून मिळत. ह्या लोकांस सरकारी पागेचे लोक असे ह्मणत असत. त्यांवर महाराजांचा विशेष भरंवसा असे, व त्यांतील कांहीं लोक शिलेदार लोकांचे टोळ्यांतून नेहमीं मिसळून ठेवीत असत. तेणेंकरून शिलेदारांची बंड करण्याची किंवा फितूर होण्याची भीति नसे. शिलेदार व बारगीर ह्या दोहोंचीं साधारण हत्यारें ह्मटलीं ह्मणजे ढाल, तरवार व भाला हीं असत; परंतु कित्येकांपाशीं बंदुकीही असत. घोड्यांवर बसण्यांत व भाला मारण्यांत हे लोक विशेष तरबेज असत. या लोकांचा पोषाख साधारणपणें पायदळांतील शिपायांप्रमाणेंच असे. डोक्यास पागोटें असून तें खालीं पडूं नये व स्वारही विशेष उग्र दिसावा ह्मणून त्याची शेवटली पट्टी पुष्कळजण हनुवटीखालून घेऊन, ती वर डोक्यास बांधून देत असत. त्यांचे अंगांत रूचाचा अंगरखा असून, पायांत टांचेपर्यंत तुमान असे, आणि

* याचे हाताखालीं वास्तविक ६२५० स्वार असत.

कंबरेस रुंद कापडाचा पट्टा बांधला असून, त्यास तलवार लटकविली असे. शिलेदारांचा पगार दरमहा सहापासून बारा होनांपर्यंत व बारगीरांचा दोनपासून पांच होनांपर्यंत असे. जुमलेदारास सालीना अडीचशे व सुभेदारास सहाशे होन असे पगार असत. पंचहजारी यास अडीच हजार पगार असून, शिवाय पालखी, अबदागीर वगैरे सरंजाम सरकारांतून मिळत असत. प्रत्येक जुमलेदार, सुभेदार व पंचहजारी यांचेबरोबर कमीजास्त बातमी आणणारे हेर व ती लिहिणारे कारकून असत. या हेरांचा बेहरजी नाईक ह्मणून कोणी मराठा मुख्य असे. हा बातमी काढण्याचे कामांत अत्यंत प्रवीण असल्यामुळें, त्याजवर महाराजांचा मोठा लोभ असे.

फौजेस पगार वाटून देण्यासंबंधानें, शिवाजी महाराजांची व्यवस्था फार चोख असे. स्वारी संपली ह्मणजे वर्षाचे वर्षास हिशेब पुरे करून, ज्यांचे पगार देणे राहिले असतील, त्यांस ते रोख पैसा देऊन, महाराज चुकते करून देत असत. कधीं पैसा शिल्लक नसल्यास सरदारांचे नांवें प्रांतांत सुभेदारांवर वरात ( हुंडी ) देण्याची वहिवाट असे; परंतु सरदारांनीं आपली फौज गांवांत नेऊन परस्पर रयतेपासून आपला पगार वसूल करावा, हा प्रकार महाराज अगदीं करूं देत नसत. प्रांतांत कुलमुखत्यार काय तो सुभेदार. फौजेचे सरदारांची तेथें सत्ता अगदीं नसावयाची. यामुळें रयतेस सुख लागून चोहोंकडे चांगला बंदोबस्त राही. पगाराशिवाय, महाराज मनुष्य व जात पाहून त्यास लग्नकार्याकरितां पैसा देत असत; परंतु कोणी उधळेपणानें राहून कर्ज करील, तर त्यास लागलीच चाकरींतून महाराज काढून टाकीत. तसेंच लष्करांत बटीक, बायको व कलाल यांस नेण्याची सक्त मनाई असे. कारण, दोहोंपासून आपले शिपाई लोक बेसावधपणें राहून अनर्थ घडेल अशी महाराजांस पक्की खात्री होती. चाकरीस लोक ठेवतांना महाराजांची अशी वहिवाट असे कीं, नवीन शिपायांस महाराज स्वतः पाहून, तो चांगल्या हुषारीनें व ईमानानें चाकरी करील अशाबद्दल कोणा जुन्या शिपायाची खातर जमा घेत, व मग त्यास

चाकरीस ठेवीत असत. जुमलेदार, हजारी वगैरे ठेवतांना ते चांगले जातीकुळीचे, शूर वगैरे आहेत, असें पाहून मग महाराज त्यांस ठेवीत असत.

शत्रूचे मुलुखांत मोहीम करण्यास जाण्याचे व तेथें लूट मिळवून आणण्याचे संबंधानें, शिवाजी महाराजांची व्यवस्था अशी असे कीं, पावसाळा संपला ह्मणजे दसऱ्याचे दिवशीं सर्व सरदार, मानकरी, शिलेदार वगैरे लोकांनीं महाराजांचे भेटीस यावें. त्या दिवशीं मोठा दरबार भरून सर्वांच्या गांठी पडत व मोठा उत्सव होत असे. मोहिमेची तयारी होऊन प्रत्येक शिपायाजवळ घोडा, हत्यारें वगैरे सामान जें जें असेल त्याच्या यादी होत; ह्मणजे स्वारीहून परत आल्यावर त्यांत कमीजास्त काय झालें असेल याचा सहजच हिशोब लागे. शिपाई लोकांनीं लूट गोळा करण्याचे संबंधानें महाराजांची सक्त ताकीद असे कीं, ब्राह्मण, गाय, शेतकरी किंवा स्त्री यांस कोणीही उपद्रव करूं नये. त्याचप्रमाणें शत्रूचे मुलुखांतील श्रीमान् मुसलमानांशिवाय इतर कोणास कैद करूं नये किंवा खंडणींत ओलीस घेऊं नये. लुटींत मिळालेला सर्व ऐवज सरकारांत हजर केला पाहिजे. लूट आणणारे इसमास, त्यानें आणलेल्या जिनसांचे किंमतीचे मानानें, महाराज कांहीं बक्षीस देत असत; परंतु जर कोणी लुटींत मिळविलेला जिन्नस लपविला आणि तो त्याचे अंगीं लागला, तर महाराज त्यास शिक्षा देऊन चाकरींतून दूर करीत असत; तथापि कोणास एकादा जिन्नस हवासा वाटल्यास, त्याची किंमत रोख देण्यास किंवा त्याचे पगारांतून वजा करूं देण्यास तो कबूल असल्यास, तो जिन्नस त्यास मिळत असे. मोहिमेंत ज्यांनीं पराक्रम केला असेल, त्यांचा महाराज मोठा दरबार भरवून त्यांत मोठा मान करीत. ज्यांस जखमा लागल्या असतील. त्यांस वस्त्रें, किताब वगैरे त्यांस संतोष वाटण्यासारख्या देणग्या देत असत. जे लढाईंत पडले असतील, त्यांचे मुलांस किंवा भावांस चाकरीस ठेवून, त्यांचे योग्यतेप्रमाणें त्यांचा परामर्ष महाराज घेत असत; परंतु ज्यांनीं कुचरपणा केला किंवा लूट लपविली, त्यांस

चांगलें शासन होत असे. महाराजांची दक्षता किंवा गुप्त बातमी ठेवण्याची अशी कांहीं शिताफी असे कीं, त्यांचेपासून कोणतीही गोष्ट बहुतेक छपविली जात नसे.

शिवाजी महाराजांचे राज्याची बळकटी पुष्कळ अंशीं त्यांचे किल्ल्यांवर असे. किल्ले स्वाधीन असल्यामुळें, भोंवतालचा मुलूख सहजच त्यांचे कबजांत राही. शिवाय शत्रूचे प्रांतांत लूट करून ते चालून आले असतां, मिळविलेली लूट शेजारचे किल्ल्यांत एकदांची नेऊन टाकिली, ह्मणजे शत्रूचा बहुतेक नाइलाज होत असे. अशा अनेक तऱ्हेनें किल्ले हे महाराजांस चांगले उपयोगाचे असल्याकारणानें, ते त्यांचे बंदोबस्ताविषयीं विशेष जपत असत. किल्ल्यांचे संबंधानें त्यांची व्यवस्था फार कडक असे, व कोणी त्यांचे नियमाविरुद्ध वर्तन केलें, तर ते त्याची अगदीं क्षमा करीत नसत. प्रत्येक किल्ल्यावर मुख्य असा हवालदार ह्मणून अधिकारी असे, त्याचें काम किल्ल्याचा तनखा, दाणागल्ला, दारूगोळा वगैरे सामान आणविण्याचें असून, चौकीपहारे यांचा नीट बंदोबस्त ठेवावा हें असे. त्यानें स्वतः उभे राहून, संध्याकाळीं किल्ल्याचे दरवाजे बंद करून, रात्रीं दरखदार यांस बरोबर घेऊन गस्त घालावी, व पुन्हां पहांटेस दरवाजे उघडावे अशी त्यास ताकीद असे. सर्व पत्रव्यवहार त्याचे नांवानें चालून, त्यावर त्याचा शिक्का असे. त्याचे हाताखालीं एक किंवा अधिक असे तट-सरनोबत ह्मणून असत. कधीं कधीं पुरंधर, रायगड, पन्हाळा यासारख्या मोठमोठ्या किल्ल्यांस, प्रत्येक दरवाजास वेगळाला तटसरनोबत असे. याशिवाय हवालदार याचे हाताखालीं शिपायांची वगैरे हजीरी घेऊन, त्यांची चौकशी ठेवण्याकरितां एक ब्राह्मण सबनीस व धान्य, दारूगोळा वगैरे सामान आणून, त्याचा हिशेब ठेवण्याकरितां, एक परभू कारखाननीस असे दोन कामगार असत. किल्ल्यांवरील शिबंदीचे लोकांखेरीज प्रत्येक किल्ल्यास त्याचे त्याचे वेगळे वेगळे असे पिढीजात ब्राह्मण कारकून, मराठे शिपाई, रामोशी, महार, मांग असे असत. त्यांस वंशपरंपरा किल्ल्याखालील कांहीं जमिनी

सारा माफ करून दिल्या असत. रामोशी, महार व मांग यांचीं कामें रसिदी आणाव्या न्याव्या, शत्रूंची बातमी ठेवावी; परंतु त्यांजकडील कोणी बातमी काढण्यास आले असतील, तर त्यास गप्प मारून भलतीकडेच लावून द्यावें, व एकटा दुकटा असल्यास त्यांस ठारही करावें हीं असत. किल्ल्यांवरील एकंदर सर्व लोकांस गडकरी ह्मणत असत, व किल्ल्यावर त्यांचे निर्वाहाची वंशपरंपरा चांगली सोय करून दिल्याकारणानें, ते किल्ल्याचे संरक्षणार्थ प्राणही देण्यास तयार असत. किल्ल्यावरील कामें कोणी कशीं व केव्हां करावीं यांबद्दल महाराजांनीं अगदीं तपशीलवार नियम करून दिले असत व विनाकारण फाजील खर्च न व्हावा याविषयीं त्यांची मोठी दक्षता असे.

पागेचीं घोडीं, हत्ती, उंट, बैल, गाई वगैरे जनावरांचीही शिवाजी महाराजांनीं चांगली व्यवस्था ठेविली होती. लुटींत मिळविलेले व खरेदी केलेले असे घोडे, घोड्या व शिंगरें हीं उत्तम अवलादीचीं पाहून, महाराज त्यांची चांगली निगा ठेवीत असत. मोहिमेवर गेले ह्मणजे आठ महिने घोड्यांची चंदी परभारें शत्रूंचे मुलुखांतून बाहेर पडतच असे; परंतु पावसाळ्यांत घोडीं स्वदेशीं आल्यावर त्यांचें पोषण चांगलें व्हावें ह्मणून जेथें जेथें कुरणें असतील तेथें तेथें किल्ल्यांचे आश्रयाखालीं, कांहीं येथें कांहीं तेथें, अशी महाराज आपली पागा बंदोबस्तानें ठेवीत असत. शिवाय कांहीं लोक या पागेचे तर्तुदीचे कामावरच नेमिले असून, ते आपापले किल्ल्यांवर आठ महिने दाणा-वैरण वगैरे आणून टाकून, बरसातींत पागा स्वदेशीं आली ह्मणजे तिचे उपयोगीं ती पडावी ह्मणून ती व्यवस्थेनें ठेवीत असत व या कामां-बद्दल सरकारांतून त्यांस वंशपरंपरा सारा माफ करून कांहीं जमिनी दिल्या असत. घोड्यांस नालबंदी महिन्या पंधरा दिवसांनीं होई व त्यांची गणती लागावी ह्मणून, प्रत्येक घोड्याचे ढुंगणावर त्याचे नंबरचा शिक्का दिला असे. घोड्यांप्रमाणेंच उंट, हत्ती, बैल वगैरे जनावरांचीही व्यवस्था चांगली ठेविली असे. त्यांस निरनिराळ्या सोईच्या जागा वांटून देऊन, त्यांजवर चांगले कामगार नेमिले असत.

शिवाजी महाराजांचे पीलखान्यांत तीनशे साडेतीनशे हत्ती असत. त्यांचें हौदे, अंबाऱ्या वगैरे सामान नीट चांगलें सज्ज असे. महाराजांजवळ एकंदर हजार दीड हजार उंट होते. त्यांपैकीं कांहीं लढाऊ व कांहीं डांक पोंहोंचवण्याचे कामाचे असे असत. त्याप्रमाणेंच तोफा ओढण्याकरितां व दारुगोळा वाहण्याकरितां बैल चांगले पुष्ट असे ठेविले असत.

येणेंप्रमाणें शिवाजी महाराजांची, *फौज, किल्ले, मोहीम, लूट, पागा वैगेरे गोष्टींची व्यवस्था सांगितल्यानंतर, आपण आतां त्यांचे इतर व्यवस्थांकडे वळूं. यांपैकीं प्रथम जमाबंदीविषयीं लिहितों. महाराजांनीं, प्रथम प्रांतांत मोजणी करवून जमिनींचे धारे ठरवून दिले. ते बहुतेक अंशीं दादोजी कोंडदेव यांनीं यापूर्वीं सुरू केले होते त्याप्रमाणेंच होते. जमिनींतून दरसाल जें ऐन उत्पन्न होईल, त्यावर आकारणी होत असे. साधारणपणें जमीन वाहणारास उत्पन्नाचा $\frac{३}{५}$ व सरकारास $\frac{२}{५}$ असा विभाग पडे. प्रांत एकदां महाराजांचे पूर्ण ताब्यांत आला, ह्मणजे तेथें लूट किंवा खंडणी ह्यांचा उपद्रव अगदीं लागत नसे, आणि तेथील लोक आपली रयत असें समजून, त्यांजपासून महाराज फक्त जमिनीचा सारा मात्र घेत असत. हा गोळा करण्याचें काम महाराज लष्करी अंमलदाराकडे अगदीं सांगत नसत. त्याकरितां स्वतंत्र मुलकी कामदारांची योजना असे. प्रत्येक खेड्यास एक पाटील व एक कुलकर्णी असे असत व दोन तीन खेड्यांवर एक कारकून असे. बरेच कारकुनांवर एक तरफदार किंवा तालुकदार ह्मणून ब्राह्मण किंवा परभू जातीचा अंमलदार असे, व या तालुकदाराचे जोडीस एक मराठे जातीचा हवालदार ह्मणून असे. तालुकदार व हवालदार यांचेवरचा अधिकारी ह्मटला ह्मणजे सुभेदार किंवा मामलेदार हा होय. त्याचे प्रांतांत दोन तीन किल्ले असून, त्यांत तो वसुलादाखल आलेला पैसा किंवा धान्य नेऊन ठेवीत असे. हे सर्व अधिकारी केवळ

---

* चिटणीसांची बखर व ग्रांट डफ यांचा इतिहास.

मुलकी असल्यामुळें, त्यांजपासून रयतेस विशेष सोय व सुख असे. या सर्वांचे कामावर महाराजांची मोठी करडी नजर असे. त्यांस त्यांचे कामाबद्दल, पुढें पेशवाईंत ज्याप्रमाणें त्याच गांवांतून किंवा प्रांतांतून वंशपरंपरा जमिनी देण्याचा प्रघात पडला, त्याप्रमाणें तो यावेळीं नव्हता; त्यांस महाराजांपासून महिनाअखेर किंवा सालअखेर उक्ता पगार मात्र मिळत असे. महाराजांचें असें ह्मणणें असे कीं, अंमलदारांस जमिनी तोडून दिल्या, ह्मणजे त्यापासून रयतेला अतोनात त्रास होतो; परंतु याशिवाय विजापूरचे राज्यांत वरील पद्धतीपासून अंमलदार पुष्कळदां बळावून जाऊन ते जसे उलट सरकाराविरुद्ध उठत व त्यास ते जुमानीत नाहींसे होत, तसें आपले राज्यांतही होईल.

रयत लोकांवर लष्करी अंमलदारांची योजना केली असतां त्यांस त्रास होईल, हें जसें शिवाजी महाराजांचे लक्षांत आलें, तसेंच त्यांस देशमुख, देशपांडे व इतर पिढीजात वतनदार लोक यांपासून उपद्रव लागूं नये, ह्मणून महाराजांनीं त्यांस त्यांचे वतनहक्क त्यांचे गांवचे रयतेपासून परभारें वसूल करूं न देतां, त्यांस त्यांचा पैसा तालुकदार किंवा मामलेदार यांचेपासून मिळत जावा अशी व्यवस्था केली असे. त्याचप्रमाणें महाराजांनीं गांवगांवचे तट पाडून टाकिले, व नवे कोणांसही करूं दिले नाहींत. कारण, या तटापासून देशमुख, देशपांडे हे बळावून बंडावा करतील, असा त्यांस धाक वाटत असे. तथापि ह्या लोकांनीं आपणावर नाईराज होऊन बंडें करूं नयेत, ह्मणून महाराज त्यांपैकीं पुष्कळांस लष्करीखात्यांत घेत असत व त्यामुळें ते लोक महाराजांवर खुष असत.

शिवाजी महाराजांचे राज्यांतील न्यायमनसुबीची व्यवस्था न्यायाधी-शाकडे असे ह्मणून मागें सांगितलेंच आहे. गांवांतील दिवाणी खट-ल्यांचा निवाडा पूर्वापार चालत आलेल्या पद्धतीनेंच पंच नेमून होत असे. फौजदारी खटल्यांची चौकशी होऊन, अपराध्यांस हिंदुशास्त्रांत ज्या शिक्षा सांगितल्या आहेत त्या बहुतेक देण्यांत येत; तथापि पूर्वीचे मुसलमान राजांनीं जे कांहीं कायदेकानू केले होते, त्यांपैकीं

कांहीं अगदीं रूढ झाले असल्यामुळें, तेच महाराजांनीं चालू ठेविले. येणेंप्रमाणें महाराजांची न्यायपद्धति मूळ हिंदुशास्त्रावर रचिली असून, त्यांत कांहीं मुसलमानांचे कायदेकानू मधून मधून गोंवून दिले होते.*

हिंदु लोकांच्या प्राचीन विद्या ज्या वेद, शास्त्रें यांचा मुसलमानांचे राज्यांत बहुतेक उच्छेद झाला असल्यामुळें, प्रथम त्यांचे अध्ययनास उत्तेजन देणें हें अत्यंत इष्ट होय असें महाराजांस वाटलें. जुना धर्म स्थापन करण्यास जुन्या विद्यांचे पुनर्जीवनाशिवाय दुसरा मार्ग नाहीं असें पाहून महाराजांनीं अशी व्यवस्था केली कीं, जो ब्राह्मण एका ग्रंथाचें अध्ययन करील, त्यास एक मण धान्य, दोन ग्रंथांचें करील त्यास पांच मण व सर्व दशग्रंथांचें अध्ययन करील त्यास दहा मण धान्य, त्याची परीक्षा घेऊन द्यावें. ब्राह्मण दूर देशीचे असल्यास, महाराज त्यांस पन्नासपासून शंभरपर्यंत रुपये देत असत. वैदिकांप्रमाणेंच पंडितांचीही संभावना महाराज करीत असत. याप्रमाणें दिवसानुदिवस जुन्या विद्या व शास्त्रें यांचें पुनर्जीवन होण्यास प्रारंभ झाला,† ही गोष्ट शिवाजी महाराजांस अत्यंत भूषणास्पद होय. विद्वान् लोकांप्रमाणें महाराज इतर गुणी लोकांचाही परामर्ष घेत असत. चांगले गवय्ये, बजवय्ये, कवी यांचाही ते चांगला सत्कार करीत असत. त्यांचे पदरीं भूखान ह्मणून त्यावेळचा कोणी मोठा नामांकित दरबारी कवि होता असें लिहिलें आहे; तथापि दुर्दैवानें मराठी कविमालिकेंतील कोणी रत्नांनीं महाराजांचा दरबार भूषित झाला नव्हता. कारण, त्या

---

* वरील वर्णनावरून शिवाजी महाराजांचे राज्यांतील रयत, हल्लींप्रमाणें स्थाईक राज्यांतील रयतेप्रमाणें अगदीं अबादान असेल किंवा तेथील जमाबंदीची किंवा न्यायमनसुबीची पद्धत उत्तम सुधारलेली असेल, असें आपणांस समजतां येणार नाहीं. महाराजांचें राज्य नुकतेंच स्थापन झालें असल्यामुळें, त्यांत बरीच अव्यवस्था असेल यांत संशय नाहीं. तथापि फरायर व कित्येक मुसलमान इतिहासकार, मराठी राज्याची जितकी वाईट स्थिति होती ह्मणून ह्मणतात, तितकी ती खरोखरच नसावी असा डफ साहेबांचा अभिप्राय आहे.

† चिटणीस यांची बखर.

वेळचे प्रसिद्ध महाराष्ट्र कवी तुकाराम, रामदास, वामनपंडित हे केवळ विरक्त असून, त्यांस प्रापंचिक कवींप्रमाणें राजांचे वैभवाचें वर्णन, यवनांचा पाडाव व हिंदुराजांचा उत्कर्ष, हिंदुधर्माचें व विद्यांचें पुनर्जीवन वगैरे गोष्टींचें महत्व वाटत नसल्यामुळें, त्यांचे ग्रंथांत शिवराजाचें किंवा कोणा राजाचें किंवा मनुष्याचेंमुद्धां वर्णन सांपडत नाहीं; तथापि विशेष आनंद मानण्यासारखी ही गोष्ट आहे कीं, महाराष्ट्र देशाचे नवीन होणारे अभ्युदयाचें वर्णन संस्कृतभाषेंत मोठमोठे पंडितांनीं किंवा महाराष्ट्रभाषेंत कोणी प्रसिद्ध प्रसिद्ध कवींनीं केलें नाहीं, तरी तें अगदींच झालें नाहीं असें नाहीं. महाराष्ट्रवीरांचे पराक्रम दृष्टीस पडूं लागतांच, त्यांचें वर्णन करण्यास महाराष्ट्र शायीर पुढें सरसावले! हे अर्थातच ब्राह्मणेतर जातीचे असून, मुख्यत्वेंकरून गोंधळी जातींतीलच असत. त्यांनीं अफझुलखानाचा वध वगैरे महाराजांचे पराक्रमाचे कृत्यांवरच पोंवाडे रचून व लोकांमध्यें ते गाऊन, महाराजांची व त्यांचे सरदारांची चोहोंकडे कीर्ति पसरविली. महाराजही या नवीन कवींस, कडींतोडे, वस्त्रेंभूषणें वगैरे देऊन, त्यांचा चांगला बोज ठेवीत असत. यामुळें या वेळेपासून पोंवाड्यांची विशेष प्रसिद्धी होऊन, महाराष्ट्रवीरांचें व मुत्सद्यांचें वर्णन करण्याचा क्रम अधिकाधिक पडत चालला. येणेंप्रमाणें महाराजांनीं हिंदुधर्माची ग्लानि दूर करण्याकरितां वेदशास्त्रांचे अध्ययनास उत्तेजन दिलें; व महाराष्ट्रीयांचे पराक्रम उज्वलित करण्यास, शायीरांस चांगली बक्षिसी देऊन, महाराष्ट्र कवितेचा पोंवाडे ह्मणून मनोरम भाग आपले उत्तेजनानें नवीनच उत्पन्न केला!

---

# भाग ९.

## शिवाजी महाराज—मोंगलांबरोबर युद्ध व राज्याभिषेकविधि.

१. शिवाजी महाराजांबरोबर केलेला तह मोडून, त्यांस व त्यांचे मुख्य मुख्य सरदारांस पकडून आणण्यास, औरंगजेब बादशहा हा आपला पुत्र मोआझिम यास हुकूम पाठवितो. राजपुत्र महाराजांस अनुकूळ असल्यामुळें, तो आपले छावणींत असलेले मराठे सरदारांस गुप्त इशारा देऊन त्यांस पळवून लावितो. २. कोंडणा किल्लयावर छापा घालून तो घेण्याचा महाराज विचार काढतात. या मोहिमेवर तानाजी मालुसरे हा जाण्याविषयीं पत्करतो. किल्लयाच्या स्वरूपाचें व बंदोबस्ताचें वर्णन. ३. तानाजीची छापा घालण्याची कल्पना. मावळे लोक मोठे शिताफीनें काळोखांत किल्लयावर चढून जातात. किल्लयावरील शिबंदीचे लोक जागे होतात. त्यांची आणि मावळे लोकांची मोठी झटापट होते. तानाजी पडतो; परंतु इतक्यांत त्याचा भाऊ सूर्याजी हा बाकीचे मावळे-लोक घेऊन किल्ला चढून येतो. पुनः लढाई जुंपते. तींत शिबंदीचा अगदीं मोड होऊन तीं काळोखांत पळूं लागते. किल्ला सर होतो. शिवाजी महाराजांस किल्ला हस्तगत झाल्याबद्दल हर्ष व तानाजीचे मृत्यूमुळें दुःख हीं होतात. ४. मोरोपंत पेशवा हा, सर्व कोकणप्रांत सर करितो. जंजिरा येथें राज्यक्रांति होऊन फत्तेखान सिद्दी हा कैद केला जातो व त्याचे जागीं सिद्दी संबूल हा मुख्य होतो. सिद्दी संबूल हा सुरतेचे मोंगल अधिकाऱ्यांशीं संधान बांधून, आपणांस मोंगल बादशहाचा अंकित करून घेतो. शिवाजी महाराजांची सुरत शहरावरील दुसरी मोहीम. तेथें त्यांस पुष्कळ लूट प्राप्त होते, ती ते आपले मुलुखाकडे नेत असतां, मोंगलांच्या फौजा त्यांस वाटेंत आड येतात. महाराज त्यांचा पराभव करितात. ५. महाराजांचे आरमाराची व पोर्तुगीज लोकांची झटापट. प्रतापराव गुजर हा खानदेशांत खंडण्या वसूल करीत चालतो. चौथाईचा आरंभ. औरंगजेब बादशहा, राजपुत्र मोआझिम व यशवंतसिंग यांचे निरनिराळे विचार. बादशहा हा यशवंतसिंग यास परत बोलावून, त्याचे जागीं मोहबतखान ह्मणून नवीन अधिकाऱ्यास दक्षिणेचे सुभ्यावर नेमितो. नवीन सुभेदार, मराठ्यांचे किल्ले घेण्यास यत्न करितो.

प्रतापराव गुजर व मोंगलांचा सरदार इखलसखान यांची मोठी लढाई होते, तींत मोंगलांचा अगदीं मोड होतो. ६. औरंगजेब बादशहा मोहबतखानास परत बोलावून, त्याचे जागीं खानजहान बहादूर याची नेमणूक करितो. खान-जहान बहादूर आणि त्याचा दुय्यम दिलेलखान यांचा मतभेद. खानजहान हा भीमानदीचे कांठीं छावणी करून साधारणपणें स्वस्थच राहतो. ७. विजापूरचा सुलतान अल्ली आदिलशहा हा मरण पावल्यामुळें, त्याचे राज्यांतील अव्यवस्था. शिवाजी महाराज हुबळी शहरावर फौज पाठऊन तें लुटतात. मोंगलांबरोबर तह होतो. ८. शिवाजी महाराज विजापूरचे राज्यांतील पुष्कळ किल्ले व ठाणीं घेतात. प्रतापराव गुजर व विजापूरवाले यांची मोठी लढाई होऊन तींत विजापूरवाल्यांचा पराभव होतो. प्रतापराव विजापूरवाल्यांस स्वल्प अटीवर सोडून देतो. त्यावरून महाराज त्यास शब्द लावतात. त्यावरून तो रागावून वऱ्हाडाकडे महाराजांची परवानगी न घेतां निघून जातो. इतक्यांत विजापूरकर पन्हाळा किल्ला घेण्यासाठीं तिकडे फौज पाठवितात. प्रतापराव अकस्मात् वऱ्हाडांतून तिकडे जातो. महाराजांचा कठोर निरोप त्याचे कानांवर पडतो. तो त्वेषानें विजापूरकरांचे सैन्यावर तुटून पडून, हल्ल्यांत मरण पावतो. मराठ्यांचें सैन्य पळूं लागतें. इतक्यांत हंसाजी मोहिते ह्मणून महाराजांचा सरदार त्यास सांवरून धरितो, मराठ्यांचा जय व विजापूरकरांचा अगदीं मोड होतो. हंसाजी मोहिते यास हंबीरराव हा किताब मिळतो. ९. शिवाजी महाराजांचे मनांत स्वतःस राज्याभिषेक करून घेण्याविषयीं विचार येतो. ते आपले मानकऱ्यांचा दरबार भरवून त्यांचा त्याबद्दल सल्ला घेतात. ते सर्व तो पसंत करितात. गागाभट्ट ह्मणून कोणी काशीचे पंडित होते, त्यांस महाराज बोलावून आणितात. ते व इतर शास्त्री व पंडित राज्याभिषेकाचा शास्त्राधार व विधि ठरवितात. १०. राज्याभिषेकविधीचा वडा समारंभ. महाराज आपले अष्ट प्रधानांचीं पूर्वींचीं फारशी नांवें बदलून, त्यांचे जागीं संस्कृत भाषेंतील शब्द योजितात. तसेंच सर्व सरकारी कागदपत्रांतून राज्याभिषेक शक घालण्याविषयीं हुकूम पाठवितात. इंग्लिश व पोर्तुगीज लोकांबरोबर तह. जिजाबाईसाहेब यांचा मृत्यु.

१. सुलतान मोआझिम याचेमार्फत औरंगजेब बादशहाबरोबर, शिवाजी महाराजांनीं सन १६६८ सालीं जो तह केला, तो फार वर्षें टिकला नाहीं. तो फक्त दोन वर्षेंच चालला. तितके वेळांत महाराजांनीं मात्र मागील भागांत सांगितल्याप्रमाणें, आपले राज्याची बरीच

चांगली व्यवस्था लावून घेतली; परंतु वरील तह बादशहास पूर्वीपासूनच पसंत पडण्यासारखा नसून, तो त्यानें नाइलाज ह्मणून कांहीं वेळ कबूल केला होता. त्यास वाटलें कीं, शिवाजी महाराज विजापूरचे व गोंवळकोंड्याचे राज्यांत खंडणी वसूल करितात, किल्ले मुलूख घेतात; परंतु आपणांस त्यांबद्दल ते कांहींएक देत नाहींत. शिवाय राजपुत्र मोआझिम व यशवंतसिंग हे, शिवाजी महाराजांस आपले जाळ्यांत आणून देण्याची खटपट करण्याची सोडून देऊन, उलटें त्यांजपासून लांच खाऊन त्यांस आंतून साहाय्य करितात; ही स्थिति फार वाईट आहे. यावरून बादशहानें राजपुत्रास सक्त हुकूम लिहून पाठविला कीं, "तुह्मीं शिवाजी राजे, प्रतापराव गुजर व दुसरे मराठे सरदार यांस एकदम पकडावें, व त्यांस जे किल्ले व मुलूख दिले आहेत, ते त्यांजपासून परत घ्यावेत. तुमचे हातून असें न घडेल तर, आमची तुमचेवर पूर्ण इतराजी होईल, हें पक्कें लक्षांत ठेवावें." सुलतान मोआझिम हा बापाप्रमाणें उघड बेइमान करणारा मनुष्य नव्हता. त्यास हा हुकूम अर्थातच अगदीं गैर वाटला. त्यास दिल्लीचे दरबारांत काय काय चालतें याची गुप्त बातमी वरचेवर पोहोंचत असेच! हा अन्यायाचा हुकूम सुटल्याची खबर त्यास कळतांच, त्यानें प्रतापराव गुजर व निराजी रावजी यांस रात्रीं गुप्तपणें बोलावून आणून सांगितलें कीं, "तुह्मांस पकडण्याविषयीं दिल्लीहून बादशहाचा हुकूम सुटला आहे; तेव्हां तुह्मीं सैन्यासह गुप्तपणें आमचे छावणींतून निघून आपले देशांत परत जावें. एक दोन दिवसांत हुकूम येऊन पोहोंचेल. तो आल्यावर आह्मांस तुमची उपेक्षा करितां येणार नाहीं." सरनोबत व पंडितराव यांस हें वर्तमान कळतांच, त्याच रात्रीं त्यांनीं मोंगलांचे छावणींतून कांहीं निमित्तानें मुकाट्यानें बाहेर पडून आपला मुलूख सुधारला. ते निघून गेल्यानंतर दोन तीन दिवसांनीं, बादशहाचा हुकूम येऊन थडकला. राजपुत्रानें वरपंगी मराठ्यांचा पाठलाग करण्याकरितां मोंगलफौज पाठविली; परंतु प्रतापराव गुजर आपले सैन्यासह अगोदरच पुण्यास सुरक्षितपणें महाराजांचे जवळ येऊन दाखल झाला होता.

२. शिवाजी महाराज दोन वर्षें (१६६८–१६६९) आपले राज्यांत अगदीं स्वस्थ बसून होते व त्यांची कोठें धामधूम, लुटालूट वगैरे कांहीं ऐकूं येत नव्हती. यावरून कित्येक लोकांस असें वाटूं लागलें होतें कीं, त्यांचे पराक्रमाची हद्द होऊन चुकली. यापुढें त्यांची गडबड चालणार नाहीं. कारण, आतां ते जर कांहीं हालचाल करूं ह्मणतील, तर मोंगल बादशहाशीं गांठ पडणार. तेव्हां जितका पहाडी मुलूख त्यांचे ताब्यांत आला आहे, तितक्यांतच संतोष मानून त्यांस रहावें लागेल; परंतु हा समज अगदीं चुकीचा होता, व त्याचा प्रत्यय लवकरच लोकांस आला. औरंगजेब बादशहानें आपण होऊनच तह मोडून, शिवाजी महाराजांस तलवार उपसण्याचा प्रसंग आणिला असतां, मराठे लोकांची धामधूम पुनः सुरू झाली व तिनें पूर्वींपेक्षां अधिक प्रदेश मात्र व्यापिला. शिवाजी महाराजांचे राज्यांतील सिंहगड व पुरंदर हे किल्ले, मागें जयसिंग यानें मराठ्यांपासून घेतल्यापासून ते मोंगलांकडेसच होते. यामुळें महाराजांस पुणें व चाकण यांमधून येतां जातां फार अडचण होत असे. त्यावरून प्रथम महाराजांनीं ते किल्ले परत जिंकून घेण्याचा विचार चालविला.

एके दिवशीं दरबार भरला असतां, महाराजांनीं " कोंडण्याचा किल्ला आह्मांस कोण जिंकून देतो " ह्मणून प्रश्न केला असतां, तानाजी मालुसरे यानें, ' तें काम आपण फत्ते करून येतों ' ह्मणून ह्मटलें. यावरून त्यास विडा, वस्त्रें वगैरे देऊन, व बरोबर हजार निवडक मावळे लोक देऊन, महाराजांनीं त्यास गडाचे मोहिमेवर पाठविलें. असें सांगतात कीं, *यावेळीं तानाजीचे मुलाचें लग्न ठरून, तें होण्याची सर्व तयारी झाली होती; परंतु मध्येंच महाराजांची ही कामगिरी निघाल्यामुळें, त्यानें लग्नाचा बेत तूर्त रहित केला, व आपला भाऊ सूर्याजी यास बरोबर घेऊन, तो मोहीम फत्ते करण्यास तावडतोब निघाला. जातांना मात्र त्यानें महाराजांस निरोप पाठविला कीं, ' मी यश घेऊन जिवंतपणीं परत आलों, तर मुलाचें लग्न करतोंच आहे;

* तानाजी मालुसरे यांवरील पोवाडा.

परंतु मेलों गेलों तर मात्र त्याचें लग्न आपण करून द्यावें. ' यानंतर तानाजी हा सुमारें हजार निवडक मावळे लोक बरोबर घेऊन, माघ (फेब्रुआरी) वद्य नवमीचे काळोखी रात्रीं आपले गांवाहून निघाला. त्यानें सैन्याच्या लहान लहान टोळ्या करून, व त्यांस निरनिराळे रस्त्यांनीं रवाना करून, तो कोंडणा किल्ल्याचे रानांत मध्यरात्रीचे सुमारास येऊन दाखल झाला. कोंडणा किल्ला मोठा बिकट असून, तो बहुतेक असाध्यच आहे. प्रथम त्याचा डोंगरच चांगला उंच असून, त्याचे पूर्व व पश्चिम बाजूस पुरंदरचे प्रचंड डोंगर लागून आहेत. त्याचे उत्तरेचे व दक्षिणेचे बाजूला सुमारें अर्धा मैल चढण असून, तींत कित्येक ठिकाणीं एकसारखा नीट उभा असा भिंती-सारखा काळा फत्तर लागून गेला आहे. हा डोंगर चढून गेलें ह्मणजे, घांटमाथ्यावरील इतर डोंगरांप्रमाणें, येथें सुमारें चाळीस फूट उंचीचा एक प्रचंड काळ्या दगडाचा खडपा लागतो. त्यावर दगडी तट बांधला असून, त्यास कोनाकोनाला मजबूत बुरूज आहेत. एकंदर किल्ला त्रिकोण आकृतीचा असून, त्याचा परिघ कोस सव्वा कोसाचा आहे. त्याचें बाह्यस्वरूप असें भयंकर व भक्कम दिसतें कीं, त्याचे आंत दरवाजाशिवाय प्रवेश होण्याचा मार्गच दिसत नाहीं. हवा स्वच्छ असतांना किल्यावरून पाहिलें ह्मणजे, पूर्वेस नीरा नदीचें पात्र, उत्तरेस मोठें मैदान व पुढील भागीं पुणें शहर हीं दृष्टीस पडतात. दक्षिण व पश्चिम या दिशेस रायगडाचा किल्ला असून, त्या बाजूनें मोठे प्रचंड पर्वत केवळ गगनचुंबन करून राहिले आहेत, असे दिसतात. कोंडणा किल्ला जसा अतिशय भक्कम होता, तशी त्याजवरील शिबंदीही उत्कृष्टच होती. त्यांजवर उदेभान ह्मणून कोणी रजपूत मुख्य असून, तो फार दिवसांचा नांवाजलेला असा शूर शिपाई होता. तेव्हां ह्या किल्ल्यावर चढून जाऊन, त्याजवर हल्ला करून तो जिंकून घेणें ह्मणजे मोठेंच धाडसाचें व मर्दुमकीचें कृत्य होतें!

३. तानाजी मालुसरे यास या सर्व अडचणी माहीत होत्या; तथापि किल्ल्यावरचे लोक, किल्ला फार भक्कम आहे, व वरील

शिबंदी उत्कृष्ट आहे, या भरंवशावर जात असल्यामुळें ते बेसावध आहेत, हें त्यास ठाऊक होतें. तेव्हां रात्रीचे वेळीं कड्यावरून चढून जाऊन, किल्ल्यावरील लोक बेसावध असतां, त्याजवर एकाएकीं हल्ला केला तर किल्ला हस्तगत होईल, अशी त्यास उमेद होती. त्यानें वर सांगितल्याप्रमाणें नवमीचे रात्रीं काळोखांत आपले लोक किल्ल्याचे नैऋत्येचे बाजूस गोळा करून, तिकडच्या अवघड चढणीनेंच वर चढून जाण्याचा बेत केला. कारण, बिकट वाटेनें शत्रू येतील असें मोंगलांस मुळींच वाटत नसल्यामुळें, त्यांचा तिजसंबंधानें कांहींच बंदोबस्त नव्हता. तानाजी आपलें सर्व सैन्य घेऊन, किल्ल्याखालचा डोंगर चढून वर आला. त्यानें पांचशें पांचशें लोकांच्या दोन टोळ्या करून, तो एकीस घेऊन वर चढण्याचे कामीं लागला. दुसरी टोळी त्यानें आपला भाऊ सूर्याजी याचेजवळ मागें ठेऊन, त्यास सांगितलें कीं, ‘ आह्मीं प्रथम वर चढून जातों, तुह्मीं प्रसंग पडल्यास दुसरी टोळी वर घेऊन या. ’ येणेंप्रमाणें व्यवस्था करून, तानाजीनें प्रथम एका हुशार मावळ्यास कड्यावर चढवून, त्याजकडून खालीं दोर सोडविले. त्याजवरून एकामागून एक असे मावळे चढून, ते मुकाट्यानें किल्ल्याचे कोटांत उतरले व अगदीं गलबल न करितां तेथें खालीं पडून राहिले. सुमारें तीनशें माणूस याप्रमाणें चढून गेल्यावर, एकाएकीं कांहीं पडल्यासारखें वाटून मोंगलांचे शिबंदीमध्यें चाहूल झाली व त्यांपैकीं एकजण काळोखांतच पुढें येऊन काय आहे ह्मणून पाहूं लागला. इतक्यांत एका तिरंदाजानें त्याजवर बाणाचा नेम धरून त्यास तेथेंच ठार केलें; परंतु हळू हळू शिबंदीमध्यें अधिक अधिक गलबला ऐकूं येऊं लागून, व रजपूतलोक जबरदस्त होऊन, हातीं तोडे घेऊन, व हिलाल, चंद्रजोती लावून आपणांवर चालून येण्याचे तयारींत आहेत असें पाहून, तानाजी यानें वर चढून आलेल्या तीनशें लोकांनिशींच त्यांजवर एकदम तुटून पडून, होईल तर किल्ला हस्तगत करण्याचा विचार केला. या प्रसंगीं मावळे लोक व रजपूत शिबंदी या दोघांची मोठी झटापट झाली. रजपूतशिपायांचा जमाव फार मोठा असून मावळे लोक पुरेसे चढून आले नव्हते; तरी मावळ्यांनीं रजपुतांस दाद दिली नाहीं. त्यांस

ातां आपली सरशी होऊन किल्ला हस्तगत होतो असें वाटूं लागलें ; रंतु इतक्यांत तानाजीस मोठी जखम लागून तो खालीं पडला ! * आपला सुभेदार पडला हे मावळ्यांनीं पाहतांच, त्यांचा धीर सुटून ो जिकडून वर चढून आले होते तिकडे पळून जाऊं लागले; परंतु तक्यांत सुदैवानें सूर्याजी हा मावळ्यांची दुसरी टोळी घेऊन वर वढून येऊन पोहोंचला. त्यानें आपला भाऊ पडल्यामुळें, आपले ोक पळून जात आहेत असें पाहतांच, त्यांस धीर देऊन व गोळा रून मोठ्यानें ह्मटलें "काय हो! तुह्मीं आपले जातभाईना येथेंच डलेले टाकून पळून जातां? त्यांचे मुर्दे मुसलमान लोक महारांकडून वळींत गाडून टाकणार नाहींत काय? तुह्मीं पळून जातां तरी कोठें? ी वर चढून आल्याबरोबर मागें दोर अगोदरच कापून टाकले! आतां शत्रूंवर चालून जाऊन आपला व महाराजांचा नांवलौकिक राखण्या- शिवाय तुह्मांस दुसरा मार्गच राहिला नाहीं!!" सूर्याजीचें हें निकराचें भाषण ऐकून व आपणांस आतां चांगलें पाठबळ आलें हें पाहून, मावळ्यांस पुनः धीर आला व ते उलटून शत्रूंवर मोठे त्वेषानें चाल करून गेले. चोहोंकडे पुनः 'हर, हर, महादेव' हा रणशब्द मोठ्यानें होऊं लागला; व सुमारें घटका दोन घटका एकसारखी निकराची लढाई झाली. तींत रजपूत शिबंदीचा अगदीं मोड होऊन, सुमारें पांचशें रजपूत शिपाई व त्यांचा नाईक उदेभान हे पडले. शेंकडो लोक, काळोखांत कड्यावरून उड्या टाकून पळून जाण्याचा यत्न करतांना खालीं पडून ठार झाले. कित्येक खडकाखालीं दडून राहिले, ते दुसरे दिवशीं शरण आल्यावरून त्यांस जीवदान दिलें. माव- ळ्यांपैकीं सुमारें तीनशें माणूस कांहीं ठार, व कांहीं जखमी असे झाले. किल्ला मराठ्यांचे हातीं येतांक्षणींच, आपली मोहीम फत्ते झाली हें

* वरील वर्णन वाचतांना, इंग्लंदचे इतिहासांतील जनरल वुल्फ यानें क्वेबेक शहर घेण्याकरितां, फरेंच सरदार मॉटकाम याचे शिबंदीवर रात्रीं काळोखांत कशी बेमालूम चाल करून, आपली मोहीम फत्ते केली व त्यांतच जनरल वुल्फ हा अकस्मा- त् पडला, त्या प्रसंगाची आठवण झाल्यावांचून राहत नाहीं!

महाराजांस कळविण्याकरितां, पूर्वी संकेत ठरल्याप्रमाणें त्यांनीं तेथील एके सोप्यास आग लावून दिली व त्याचे ज्वालेनें, किल्ल्याकडे एक-सारखे टक लावून बसलेले महाराजांचे डोळे एकदाचे शांत केले( १६७० ).

दुसरे दिवशीं सकाळीं, किल्ला सर झाला ह्मणून आपले मनांत हर्ष मानून, मावळे लोकांची फौज जयघोष करीत रायगडाकडे येत होती, तिचा आनंदाचा देखावा शिवाजी महाराज पहात बसले असतां, त्यांनीं सर्व सैन्य वर चढून येतांना पाहिलें; परंतु त्यांचा नाईक तानाजी हा त्यामध्यें कोठें दिसला नाहीं. महाराजांनीं त्या-विषयीं शोध केला असतां, तो ठार मारला जाऊन त्याचें प्रेत पाल खींत घालून त्याचा भाऊ सूर्याजी घेऊन येत आहे असें त्यांस कळलें. अंमळशानें सूर्याजीही स्वतःच महाराजांजवळ येऊन दाखल झाला. सुभेदाराचे मृत्यूनें, कोंडणा किल्ला घेतल्याचा महाराजांचा सर्व हुरूप जाऊन, मोहीम फत्ते करून आलेले सरदाराकडे वळून ते दुःखानें ह्मणाले, " गड हातीं आला; पण सिंह गमावला. " महा-राजांस तानाजीचे मरणापासून फार दुःख झालें. त्यांनीं हिंदुबाद-शाहीचे उद्योगास आरंभ केल्यापासून, तानाजी केवळ त्यांचा उजवा हातच होता. अफजुलखानाचे झटापटींत, दिल्लीचे मोहिमेंत, सारांश हरएक आणीबाणीचे प्रसंगीं, तानाजी ह्मणजे महाराजांस मोठें पाठबळ असे. त्यांनीं सूर्याजीचे शौर्याची तारीफ करून, ' भावाचें नांव तं चांगलें राखिलें ' असें त्यास ह्मटलें, व त्यानें मोठे मर्दुमकीनें जो किल्ल सर केला, त्याचें काम त्याकडेसच सांगितलें. त्याचप्रमाणें तानाजीने मुलाचें लग्न करण्याविषयीं, मोहिमेस जाण्यापूर्वी जो निरोप पाठविल होता, त्याप्रमाणें महाराजांनीं तें कार्य त्याचेमागें मोठे समारंभानें केलें त्यांनीं तानाजीचे पराक्रमाचें स्मरण मागें रहावें ह्मणून, कोंडण किल्ल्याचें नांव बदलून त्यास 'सिंहगड' असें नवीन नांव दिलें. सिंह गड घेतल्यापासून सुमारें एक महिन्यानें, पुरंदरचाही किल्ला महारा जांचे फौजेचे हातीं आला. याही मोहिमेवर सूर्याजी हाच गेला होता ( मार्च १६७० ).

४. इकडे कोंकणांत मोरोपंत पिंगळे यानें, माहुलीचे किल्ल्यावर हल्ला केला; परंतु तेथील शिबंदीनें त्यास चांगली टक्कर देऊन, त्याचा हल्ला परत केला व त्याचे एक हजार लोक ठार केले. पेशव्यानें किल्ल्यास वेढा देऊन पुनः हल्ला केला; परंतु याही खेपेस त्यास अपयश घेऊन परत यावें लागलें. माहुलीचे किल्ल्यांतील लोकांस पुष्कळ वेळ आशा होती कीं, जुन्नर येथील मोंगलांचे ठाण्याकडून आपणांस कुमक पोहोंचेल; परंतु त्यांनीं दोन महिने त्यांची व्यर्थ वाट पाहून, नंतर निरुपाय होऊन किल्ला पेशव्याचे स्वाधीन करून दिला. यानंतर मराठे लोकांनीं करनाळ्याचे किल्ल्यास वेढा घालून तोही घेतला. येणेंप्रमाणें जून महिन्याचे अखेरीस त्यांनीं सर्व कल्याण प्रांत सर केला.

जंजिरा हस्तगत होण्यासाठीं, शिवाजी महाराजांचा यत्न १६६१ पासून नऊ वर्षें एकसारखा चालूं होता. दरसाल त्याजवर तोफांचा मारा चाले व सिद्धी आतां स्वाधीन होतो, मग स्वाधीन होतो, अशी महाराजांस एकसारखी आशा लागून राहिली होती. सन १६७० सालीं महाराजांनीं मोठी फौज त्या कामीं लावून, पावसाळा सुरू होण्याचे अगोदरच त्यांनीं किल्ला स्वाधीन व्हावा ह्मणून आपली अगदीं पराकाष्ठा केली. शिवाय सिद्धीस लालूच लागून त्यानें किल्ला एकदांचा आपले स्वाधीन करावा, यासाठीं 'तुला अमुक अमुक आह्मीं देऊं' अशीं महाराजांनीं त्यास वचनेंही दिलीं. शेवटीं फत्तेखान ह्याचें मन वळून, तो महाराजांस शरण येऊन जंजिरा त्यांचे स्वाधीन करून देण्याचा विचार करूं लागला. इतक्यांत फत्तेखानाचे हाताखालीं तीन सिद्धी सरदार— सिद्धी संबूल, सिद्धी याकूब व सिद्धी खैरू असे होते, त्यांना फत्ते-खानाचा हा बेत समजून त्यांस तो पसंत न पडून, त्यांनीं आपापसांत कट करून फत्तेखानास एकदम कैद केलें, व त्याचे जागीं सिद्धी संबूल यास सर्वांनुमतें नेमून, त्यांनीं औरंगजेब बादशहाचे सुरत येथील सुभेदाराकडे बोलणें लाविलें कीं, "आह्मीं जंजिरा हें तुमचे स्वाधीन करून देतों; आणि पूर्वीं विजापूरचे सुलतानाचे पदरचे आह्मीं जसे जहागीरदार होतों, तसे आह्मांस तुह्मीं आपले पदरीं घ्यावें व अमोंच

आरमारही आपले चाकरीस ठेवावें. " जंजिरेकरांचें हें बोलणें सुभेदारास पसंत पडून, त्यानें बादशहाकडून त्यांस आपले पदरीं घेवविलें. मुख्य सिद्धीचें इतके दिवस वजीर ह्मणून जें नांव चालत असे, तें बादशहानें बदलून, त्याचें नांव याकूबखान असें ठेविलें. येणेंप्रमाणें जंजिरा शिवाजी महाराजांचे स्वाधीन न होतां, तो मोंगलांचे ताब्यांत गेला. व यापुढें कित्येकवेळां तो घेण्यासाठीं मराठ्यांनीं जरी यत्न केला, तरी तो त्यांचे हातीं ह्मणून लागलाच नाहीं!

जंजिऱ्याची मसलत जशी वर सांगितल्याप्रमाणें फसली, तशीच शिवनेरी किल्ला—ज्यांत शिवाजी महाराज जन्मले तो घेण्याचा यत्न फसला; परंतु इतक्यांत महाराजांस या दोन मोहिमींपेक्षां एक फार मोठी शिकार प्राप्त झाली—ती सुरत शहर पुनः लुटण्याची होय. या शहरचा सुभेदार सप्टेंबर महिन्यांत एकाएकीं आजारी होऊन वारला होता; परंतु मराठे लोक शहर लुटण्यास येणार ही अवाई अगोदरच उठली असल्यामुळें, त्यानें मरणापूर्वीं कांहीं दिवस शहराचे बंदोबस्ताकरितां चांगली शिबंदी ठेविली होती. तो वारल्यावर यशवंतसिंग किंवा सुलतान मोआज्झिम या दोहोंपैकीं एकानें ती शिबंदी सहजच किंवा मुद्दाम शहरांतून काढून दुसरीकडे पाठवून दिली होती. महाराजांस ही बातमी लागतांच ते बरोबर पंधरा हजार फौज घेऊन, सुरत शहराचे वेशीबाहेर येऊन थडकले. ( आक्टोबर १६७०. ) किल्ल्यांत पुरती हजारसुद्धां शिबंदी नव्हती. मग काय विचारतां? मराठ्यांनीं तें श्रीमान् शहर पुनः एकवेळ तीन दिवस सावकाश लुटलें. यूरोपियन व्यापाऱ्यांपैकीं इंग्लिश लोकांनीं मात्र कायतो आपला बचाव केला. डच लोकांची वखार दूर एका कोपऱ्यास असल्यामुळें मराठे लोक तिकडे गेले नाहींत. वाटेंत फ्रेंच लोक होते, त्यांनीं मराठ्यांस, आपले वखारींतून कास्कर येथील पदभ्रष्ट झालेला राजा जो मक्केहून यात्रा करून नुकताच परत सुरत शहरास आला होता, त्याचे गोटाकडे जाण्यास वाट दिली ह्मणून, त्यांचे मालास त्यांनीं कांहीं

पद्रव दिला नाहीं; परंतु बिचारे राजाची सर्व चीजवस्त लुटली
ाऊन, त्याजपासून मराठ्यांस फारच मोठी द्रव्यप्राप्ति झाली.

तिसरे दिवशीं शिवाजी महाराजांस बातमी लागली कीं, बऱ्हाण-
राहून आपले अंगावर मोंगलांची एक फार मोठी फौज चाल करून
त आहे. त्यावरून त्यांनीं आपलें सैन्य शहरांतून काढून, तें सालेरचे
स्त्यानें त्यांनीं आपले देशीं परत जाण्यास रवाना केलें; तथापि सुरत
हर सोडून जाण्यापूर्वीं तेथील लोकांस त्यांनीं पत्र लिहिलें कीं,
तुह्मीं आह्मांस दरसाल बारा लक्ष रुपये खंडणी देत जाल, तर आह्मीं
मचे शहरास उपद्रव अगदीं देणार नाहीं; परंतु न दिल्यास आह्मीं
ळ पाहून आपला हात उगाविल्याशिवाय कधीं राहणार नाहीं.'
ांदूरचे जवळ कंचनमंचनचे डोंगरांवरून चालले असतां, मोंगलांचा
रदार दाऊदखान हा पांच हजार स्वारांनिशीं आपला पाठलाग
करून येत आहे असें त्यांस कळलें. त्याचप्रमाणें नाशिकाजवळ
ानदेशांतून कोंकणांत उतरण्याचा जो घांट आहे, त्याचे अलीकडे
ोंगलांची दुसरी एक मोठी फौज येऊन उतरली आहे हेंही त्यांस
मजलें. मोंगलांचे सपाट्यांतून मिळालेली लूट आतां निभावून कशी
ावी, याविषयीं महाराजांस मोठी पंचाईत पडली! त्यांनीं या प्रसंगीं
अशी युक्ति केली कीं, आपले फौजेच्या चार पांच टोळ्या केल्या;
एका टोळीनें शत्रूचे मोठ्या सैन्याबरोबर त्यांजवर वरचेवर छापे घालून
व ते अंगावर चालून आले असतां त्यांचेपासून पळून जाऊन धरसोडीची
लढाई चालविली; दोन टोळ्या त्या सैन्यावर तुटून पडण्याचा आंव
घालीत; परंतु सुरत शहराची मिळविलेली लूट महाराजांनीं एका
निराळेच टोळीचे स्वाधीन केली होती, व या टोळीचे व शत्रूचे सैन्याचे
धोरणानें बाकी टोळ्यांनीं चालावें अशी महाराजांनीं व्यवस्था ठेविली
होती. शेवटीं मिळालेली लूट शत्रूंचे टप्प्यांतून एकदांची काढून देऊन,
ती मोठे शिताफीनें घांटानें कोंकणांत पोहोंचवून दिली. महाराज
इतर टोळ्यांसह हळू हळू मागून कूच करीत चालले होते. इतक्यांत
दाऊदखान यानें येऊन त्यांस गांठलें; परंतु यावेळीं महाराजांनीं

एकाएकीं उलट खाऊन, खानावर हल्ला केला व त्यास मागें पळवून लाविलें; यानंतर आपले सैन्याचे पिछाडीचा नीट बंदोबस्त करून, मोंगलांची जी एक मोठी फौज वाटेंत एका तळ्याचे कांठावर त्यांशीं युद्ध करण्याकरितां मोठे तयारीनें उभी होती, तिजवर त्यांनीं मोठा निकराचा हल्ला केला. दोहोंपक्षांचें मोठें तुंबळ युद्ध झालें; परंतु अखेर मोंगलांनीं पळ काढिला. या लढाईत माहूरची देशमुखीण रायगावीण ह्मणून मोठी शूर बायको मोंगलांचे पक्षानें लढत होती, ती अखेर महाराजांस शरण आल्यावरून त्यांनीं तीस सोडून दिलें; व तीस वस्त्रें अलंकार देऊन व तिचा चांगला मान करून, तीस आपले गांवीं परत पाठवून दिलें.

९. येणेंप्रमाणें सुरत शहर दुसऱ्यांदा लुटून तेथील लूट सुरक्षितपणें रायगडास आणून पोहोंचविल्यावर, शिवाजी महाराजांनीं प्रतापराव गुजर याजबरोबर दहा हजार घोडा व पेशवा मोरोपंत पिंगळे याजबरोबर वीस हजार पायदळ असें देऊन त्यांस उत्तरेकडे पाठवून दिलें. प्रथम त्यांचा बेत भडोच शहर लुटण्याचा होता असें ह्मणतात, व त्या शहरावर समुद्राकडूनही हल्ला करण्याकरितां महाराजांनीं आपलें एकशेसाठ जहाजांचें आरमार तिकडेसच पाठवून दिलें; परंतु हा बेत कांहीं वेळानें फिरून, महाराजांनीं आरमार परत बोलाविलें. परत येतांना त्यास वाटेंत दमण येथें पोर्तुगीज लोकांचें एक मोठें जहाज आढळल्यावरून, मराठ्यांनीं त्याजवर हल्ला करून तें पाडाव करून, दाभूळ येथें तें घेऊन गेले; परंतु पोर्तुगीज लोकांनीं त्याचा वचपा महाराजांचीं बारा लहान मोठीं जहाजें वसई येथें पाडाव करून नेऊन, काढून घेतला. ( १६७१. )

इकडे महाराजांनीं फौजेस भडोच शहराचे रोंखावरून परत बोलावून, त्यांस खानदेशांत उतरण्यास हुकूम केल्यावरून, प्रतापराव गुजर हा त्या प्रांतांत फौजेसह शिरला. तेथें मोंगलांचा अगदीं बंदोबस्त नसल्याकारणानें, त्यानें गांवोंगांवीं खंडणी वसूल करण्याचा व कित्येक मोठमोठीं शहरें लुटण्याचा सपाटा चालविला. यावेळीं कारंजें या गांवीं

त्यास फार लूट मिळाली. त्यानें गांवोंगांवचे पाटीलकुळकर्ण्यांकडून असें लिहून घेतलें कीं, " आह्मीं सरकाराला दरसाल जो वसूल देतों, त्याचा एक चतुर्थांश शिवाजी महाराजांस देत जाऊं." हा पैसा पावल्याबद्दल प्रतापरावानें पावत्या देण्याचें कबूल केलें; व ज्यापाशीं त्या पावत्या असतील, त्यांस मराठ्यांपासून पुनः उपद्रव लागणार नाहीं असें सांगितलें. मोंगल बादशाहीचे मुलुखांत मराठे लोकांनीं चौथाई वसूल करण्याचा हा आरंभच होय! प्रतापराव येणेंप्रमाणें खंडणी वसूल करीत चालला असतां, मोरोपंत पेशवा यानें आवढा, पट्टा, साल्हेर वगैरे कित्येक किल्ले काबीज केले ( जानेवारी १६७१ ).

शिवाजी महाराजांच्या वर सांगितल्याप्रमाणें चोहोंकडे मोहिमी फत्ते होत चालल्या असतां, औरंगजेब बादशहा मनांत चडफडून दांत, ओंठ खात असेल यांत संशय नाहीं; परंतु नाइलाज ह्मणून त्यानें कांहींवेळ फारशी हालचाल केली नाहीं. दक्षिणेंत आपली फौज फार थोडी आहे व त्यामुळें मराठ्यांचा एवढा बंडावा चालू आहे हें त्यास माहीत होतें. त्यास यशवंतसिंगाचा किंवा सुलतान मोआझिम याचा किंवा कोणाचाही विश्वास वाटत नसल्यामुळें, तो त्यांस अधिक सैन्य ठेवण्यास परवानगी देत नसे. इकडे यशवंतसिंग हा तर, शिवाजी महाराजांनीं वरचेवर पैसा नजराणे वगैरे देऊन भारून टाकला होता ह्मणून मागें सांगितलेंच आहे. तेव्हां तो महाराजांस होईल तितकी मदत करीत असे हें उघड आहे. राजपुत्र मोआझिम यास वाटे कीं, बादशहाचें वय बरेंच झालें आहे; पुढें मागें शहाजहान बादशहास दुखणें लागलें असतां, आपल्या बापामध्यें व चुलत्यांमध्यें गादीविषयीं जसा भयंकर संग्राम झाला, तसा प्रसंग कदाचित् आपणासही येण्याचा संभव आहे; तेव्हां होतां होईल तोंपर्यंत, आपले धाकटे भावांना दाबून टाकण्याची आपणांमध्यें शक्ति जितकी राहील तितकी चांगली! मराठ्यांचा अधिकाधिक पुंडावा माजत चालला असतां, बादशहा आपणांस केव्हांना केव्हां तरी मोठी फौज ठेवण्यास परवानगी देईल व ती आपणांस शेवटीं दिल्लीचें तक्त हस्तगत करण्यास आयतीच उप-

योगीं पडेल, अशी त्याचे मनाची समजूत झाली असल्यामुळें, त्यास वरील पुंडाव्यापासून वाईट न वाटतां, उलट बरेंच वाटत होतें. यशवंतसिंग व राजपुत्र यांनीं वरचेवर बादशहास अर्ज पाठवून, सैन्य जास्त ठेविल्याशिवाय मराठ्यांचा बंदोबस्त होऊं शकत नाहीं, ह्मणून गाऱ्हाणें लिहून पाठविण्याचा सपाटा लाविला; परंतु बादशहास त्या दोघांचा कावा समजून, त्यानें यशवंतसिंग यास परत बोलावून घेतलें व *मोहबतखान याजबरोबर चाळीस हजार फौज देऊन त्यास दक्षिणेंत पाठवून दिलें. या नवीन सरदारास राजपुत्राचे हाताखालीं मुळींच न देतां, बादशहानें त्याचा अधिकार अगदीं स्वतंत्र केला होता; यामुळें तो राजपुत्रास जुमानीनासा होऊन त्याजपाशीं औरंगाबादेस त्यानें एक हजार स्वारसुद्धां ठेविले नाहींत! ( १६७१. )

येणेंप्रमाणें औरंगजेब बादशहानें सुभेदारींत बदल केली; परंतु तेणेंकरून दक्षिण प्रांताचे स्थितींत बदल नाहीं. मोहबतखानानें प्रथम मराठ्यांचे किल्ले घेण्यास आरंभ केला; परंतु पावसाळ्याचे आंत आवढा व पट्टा हे दोनच किल्ले त्याचे हातीं आले. मोहबतखान याचे हाताखालीं, बादशहानें पूर्वीप्रमाणें दिलेलखान यास दुय्यम ह्मणून दिलें होतें. त्यानें आपले फौजेच्या दोन टोळ्या करून, एकीनें त्यानें

---

* हा मोहबतखान कोण याविषयीं आह्मांस संशय आहे. मेडोज् टेलर यांचे बखरीमध्यें तर, ज्या मोहबतखानानें जहांगीर बादशहास १६२५ सालीं जेलम नदी ओलांडून जात असतां कैद केलें व ज्यानें पुढें शहाजान बादशहाचे कारकीर्दींत सन १६६२ सालीं दौलताबादचा किल्ला हस्तगत करण्याकरितां फत्तेखान व शहाजीराजे भोंसले यांजबरोबर मोठें उत्तम रीतीनें युद्ध केलें, तोच हा मोहबतखान होय असें ह्मटलें आहे; परंतु आह्मांस वाटतें कीं, वरील मोहबतखान जर तोच असेल, तर त्याचें वय या सुमारास ८० वर्षांचें असावें. तेव्हां अशा वयातीत सरदारास, औरंगजेबानें दक्षिणेंत पाठविणें अंमळ संशययुक्त दिसतें. कदाचित् हा सुभेदार मोहबतखान, वरील मोहबतखानाचा मुलगा असेल किंवा दुसराच कोणी मनुष्य असेल असें आह्मांला वाटतें.

चाकणचे किल्ल्यास व दुसरीनें सालेरीचे किल्ल्यास वेढा घातला. सालेरीच्या किल्ल्यास खानदेशाचें द्वारच ह्मणतात. या किल्ल्यांत मराठ्यांनीं दाणा, वैरण वगैरे सामानाचा नेहमींप्रमाणें यावर्षीं पुरवठा केला नव्हता; व महाराजांची या किल्ल्याचे आसपास दोन हजार घोड्यांची जी पागा होती, तिजवर पठाणांची एक टोळी एकदम पडून तिनें ती सर्व एकदम ठार केली. ही बातमी महाराजांस पोहोंचतांच, त्यांनीं सालेरीचे किल्ल्याचे रक्षणार्थ प्रतापराव गुजर व मोरोपंत पेशवा यांजबरोबर वीस हजार घोडा देऊन पाठविलें. मोहबतखान यास मराठ्यांची फौज येत आहे, ही खबर कळतांच त्यानें आपला सरदार इखलासखान याजबरोबर आपली बहुतेक फौज देऊन, शत्रूंस अडविण्याकरितां पाठवून दिलें. प्रतापराव हा मराठ्यांचे सैन्याचे अघाडीस होता, त्यानें मोंगलांचा सरदार हा आपणांवर हल्ला करण्याविषयीं अधीर होऊन आपली वाट पहात आहे असें पाहून, त्यास फसविण्याकरितां त्यानें आपले लोकांस शत्रूचा हल्ला होतांच खोटाच पळ काढून त्यांस गुलकावण्याचा हुकूम केला. त्याजवरून इखलासखान यानें मराठ्यांवर हल्ला सुरू करतांच ते लोक पळूं लागले. हें पाहून त्यांचे पाठीमागें मोंगलांचें सैन्य अधिक त्वेषानें लागून तें अंमळ पांगलें. इतक्यांत प्रतापराव यानें आपलें काम झालेंसें पाहून, आपले लोकांस एकदम शत्रूवर उलट खाऊन हल्ला करण्याची इशारत केली. त्यासरसें मराठ्यांचें सैन्य आयतेंच पांगलेल्या मोंगलांचे फौजेवर उलटलें व त्यावेळीं पेशव्यांचें सैन्यही संकेताप्रमाणें त्यास येऊन मिळाल्यामुळें, मराठे लोकांनीं मोंगलांवर असा जबर हल्ला केला कीं, त्यायोगानें त्यांची दाणादाण होऊन त्यांचा अगदीं मोड झाला. मोंगलांचे सरदारांनीं शेवटपर्यंत फौज गोळा करून, मराठ्यांस पुनः पुनः तोंड देण्याचा एकसारखा यत्न चालविला होता; परंतु मराठ्यांचे जबरदस्त माऱ्यापुढें त्यांचें कांहींएक चालेना. मोंगलांकडील नामांकित नामांकित बावीस सरदार पडले व कित्येकजण जखमी होऊन मराठ्यांचे हातीं लागले. मराठ्यांचे पक्षाकडीलही बरेच सरदार पडले; परंतु त्यांत विशेष नामांकित असा सुरेराव हा होता. हा

महाराजांचा लहानपणचा सवंगडी असून, तो त्यांच्या कामगाऱ्या चांगल्या बजावीत गेल्यामुळें, तो पांच हजारी सरदाराचे पदवीस चढला होता. वरकड शिपायांपैकीं पांचशें लोक कांहीं ठार मेले व कांहीं जखमी झाले. ही लढाई फार मोठी झाली. असें सांगतात कीं, ती चालत असतां पृथ्वीचा धुरळा असा उडाला कीं, तीन तीन कोस औरस चौरस आपल्या समोरील मनुष्य आपल्याकडील आहे किंवा शत्रूकडील आहे हें समजण्यास पंचाईत पडली. रक्ताचे पूर वाहिले. हजारों माणसें मरून पडलीं. या लढाईत मराठ्यांस शत्रूकडील सव्वाशें हत्ती, सहा हजार उंट व तितकेच घोडे सांपडले. खेरीज खजीना, जवाहीर, कपडा वगैरे पुष्कळ मालमत्ता हीं त्यांचे हातीं लागलीं.

मोंगलांकडील जखमा लागून हातीं लागलेले सरदारांस, शिवाजी महाराजांकडे रायगडास नेल्यावर, त्यांनीं त्यांचा चांगला मान करून त्यांस औषधोपचार केला, व ते बरे झाल्यावर त्यांस आपले मुलुखांत परत जाण्यास परवानगी दिली. कित्येकांस महाराजांचे पदरीं रहावेसें वाटल्यावरून, त्यांनीं त्यांस आपले पदरीं ठेवून घेतलें. मोंगल लोकांचे सैन्याबरोबर मराठे लोकांनीं मैदानांत, बरोबरीनें अशी लढाई खेळून तींत त्यांचा चांगला मोड करून कत्तल उडविली, असा हा प्रथमच प्रसंग होय. या लढाईपासून मराठ्यांचें नांव चोहोंकडे बरेंच गाजूं लागलें. मोंगलांचे सैन्याचा पराजय झाल्यावर, तें सालेरीचे किल्ल्याचा वेढा उठवून औरंगाबादेकडे आपले छावणीकडे परत गेलें.

६. आपले फौजेचा वर सांगितल्याप्रमाणें पराजय झालेला ऐकून, औरंगजेब बादशहानें मोहबतखान व सुलतान मोआज्झिम या दोघांसही दिल्लीस परत बोलावून, गुजराथचा सुभेदार खान जहान बहादुर याची दक्षिणचे सुभ्यावर नेमणूक केली; परंतु त्याचे हातांखालीं दुय्यम ह्मणून दिलेलखान यास तसेंच ठेविलें. नवीन सुभेदारास वाटलें कीं, आपले मुलुखांत एकंदर फौज थोडी आहे, तेव्हां ती बरोबर घेऊन मराठे लोकांचे मुलुखांत आपण चाल करून जाऊन त्यांशीं झुंज खेळत

बसण्यापेक्षां, त्यांनीं आपले मुलुखांत येऊन धामधूम न करावी ह्मणून, कोंकणांतून वर येणारे घांटच बंद करावे व बाकी दुसऱ्या ज्या वाटा असतील, त्यांजवर तोफा ठेवाव्या ह्मणजे झालें. दिलेलखानास हा बेत मुळींच पसंत न पडून, त्यानें सुभेदारास पुष्कळप्रकारें समजावून सांगितलें कीं, घांट बंद करण्यानें शत्रूंचा बंदोबस्त अगदीं होणार नाहीं. त्यांचे मुख्य मुख्य किल्ल्यांवर हल्ला करून ते काबीज केले तरच ते वंगतील; परंतु हा सल्ला खान जहान बहादुर याचे मनास मुळींच येईना. इकडे मराठ्यांनीं खानदेशांत न शिरतां, औरंगाबाद व अहंमदनगर याच मुलुखांत प्रवेश करून, तेथें गांवोंगांव खंडणी वसूल करण्याचा व खेडींपाडीं लुटण्याचा सपाटा चालविला. सुभेदारानें त्यांचा पाठलाग करण्याकरितां, निरनिराळे दिशेनें निरनिराळ्या फौजेच्या टोळ्या पाठविल्या; परंतु मराठ्यांचा हेतु शत्रुशीं लढण्यापेक्षां त्यांचे मुलखांत लूट करून ती नेण्याचाच असल्यामुळें, मोंगलांची फौज अंगावर चालून आली असतां, ते पुष्कळदां पळून जात हें खरें; तथापि मिळालेली लूट ह्मणून ते शत्रूंचे हातीं पुनः लागूं देत नसत. सुभेदाराचे या अशा अर्धवट बंदोबस्तानें, बादशाही मुलुखाची खराबी व्हावयाची ती कांहीं चुकेना. शेवटीं बरसातीस आरंभ होतांच, खान जहान बहादुर हा भीमा नदीचे कांठीं पेंडगांव येथें छावणी करून राहिला. तेथें त्यानें एक किल्ला बांधिला व त्यास बहादुरगड असें नांव दिलें. याच ठिकाणीं मोंगलांचे फौजेचा तळ या वेळेपासून पुढें सुमारें ४० वर्षें राहिला.

याच सुमारास शिवाजी महाराजांनीं गोंवळकोंड्यावर मोहीम करून, तेथील सुलतानापासून पुष्कळ मोठी खंडणी वसूल केली; परंतु ते तिकडे गेले असें पाहून, सुरत येथील मोंगलांचें आरमार व जंजिरा येथील हबशी याचें आरमार यांनीं, कोंकणांत महाराजांचे प्रांतांत उतरून, त्यांनीं कित्येक गांवें व शहरें लुटून महाराजांचे मुलुखाची मोठी खराबी केली. धुंडी राजापूर येथील मराठ्यांचे लोकांवर हल्ला करून, त्यांचा त्यांनीं बहुतेक नाश केला; या युद्धांत महाराजांचा फार दिवसांचा जुना सरदार रावो बल्लाळ हा पडला ( १६७२ ).

७. या वर्षाअखेर विजापूरचा सुलतान अल्ली आदिलशहा यानें, दारू, व्यभिचार वगैरे गोष्टींचा आतत्यायीपणा केल्यामुळें, त्यास एकाएकी अर्धांग वायु होऊन, तो मरणाचे पंथास लागला ( डिसेंबर १६७२ ). त्यास सुलतान शिकंदर नांवाचा पांच वर्षांचा एक मुलगा व पादशहा बिबी नांवाची एक मुलगी एवढींच कायतीं अपत्यें होतीं. आपले पश्चात् राज्याची कांहीं व्यवस्था रहावी ह्मणून, त्यानें आपला वजीर अबदुल महंमद व मुख्य मुख्य सरदार—कावसखान, अबदुल करीम, बहिलोलखान व मुसफरखान—यांस जवळ बोलावून, आपला मुलगा वयांत येईपर्यंत कशातऱ्हेनें राज्य चालवावें ह्मणून त्यांस सल्ला विचारला. अबदुल महंमद वजीर हा स्वतः मोठा संभावित खरा; परंतु तो धीराचा मनुष्य नसल्यामुळें, सुलतानाचे मागें राज्याची सर्व जबाबदारी आपले शिरावर घेण्याचा त्याचा हिय्या होईना. दुसरे तिघे वर सांगितलेले कावसखान वगैरे सरदार होते ते अत्यंत आपमतलबी असून, संस्थानचें हिताहित पहाण्यापेक्षां, आपले स्वतःचे हातांत राज्यसत्ता येऊन आपला पक्ष कसा सबळ करितां येईल, इकडेच त्यांची कायती दृष्टि होती! वजीर व सरदार यांचें बरेंच खलबत होऊन, शेवटीं त्यांनीं असा विचार काढला कीं, कावसखान यास प्रतिनिधि नेमून त्याचे हाताखालीं वजीर अबदुल महंमद यानें कलबुर्ग्याचा सुभा संभाळावा; अबदुल करीम याजकडे मिरज, पन्हाळा, धारवाड, सुंद, बेदनूर आणि कोंकणप्रांत हे द्यावेत, व मुजफरखान यास कर्नाटक प्रांतांत सुभेदार ह्मणून पाठवावें. ही व्यवस्था सुलतानास अगदीं पसंत नव्हती; परंतु त्याची प्रकृति अगदीं बिघडून गेली असल्यामुळें त्याचा नाइलाज झाला. शेवटीं त्यानें आपला मुलगा व मुलगी कावसखान याचे स्वाधीन करून, त्यास अखेरचे जे चार शब्द सांगावयाचे होते ते सांगून, तो मरण पावला.

सुलतान मरण पावून आपली सत्ता चांगली बसली असें पाहून, कावसखान हा आतां पूर्वी ठरलेले व्यवस्थेप्रमाणें वागण्याची टाळाटाळ करूं लागला. त्यानें मुजफरखान यास मात्र कर्नाटकांत पाठवून दिलें; परंतु अबदुल महंमद व अबदुल करीम यांस त्यांचे सुभ्यांवर पाठवा-

याचें, तें तो कांहींतरी निमित्त काढून आजचें उद्यांवर टाकूं लागला. त्याचे पोटांतील भाव हा कीं, हे एकदां आपले मुलुखांवर गेले ह्मणजे, ते आपणांस विचारिनासे होऊन, मोंगलांबरोबर ते परभारें मसलती करितील. या तिन्ही सरदारांमध्यें दिवसानुदिवस कलह अधिकाधिक वाढत जाऊन, विजापूरचे राज्यांत मनसुबा ह्मणून अगदीं राहिला नाहीं. आदिलशाहीची ही अत्यंत शोचनीय स्थिति शिवाजी महाराज व औरंगजेब बादशहा या दोघांसही समजून येऊन, तिजपासून जसा साधेल तसा आपला फायदा करून घेण्यास, ते दोघेही उद्युक्त होतेच !

शिवाजी महाराजांनीं, विजापूरचा वजीर अबदुल महंमद याचे मार्फत सुलतान अल्ली आदिलशहा याजबरोबर १६६८ सालीं जो तह केला होता, तो मोडण्यास शहाचे मरणानंतर विजापूर येथें जी बेबंदी होऊन गेली होती, तिजमधून महाराजांस सहजच कारणें सांपडलीं असतील. त्यांनीं विशाळगडास मोठें सैन्य गोळा करून, त्यांतील एक टोळी पन्हाळ्याचें किल्ल्याकडे पाठवून तो घेतला, व बाकी सर्व फौज अण्णाजी दत्तो याचे बरोबर देऊन, ती त्यांनीं दक्षिणेकडे हुबळी शहरावर रवाना केली. मराठ्यांनीं तें शहर लुटून, तेथें सुरतेहूनही फार मोठी लूट मिळविली. तेथें इंग्लिश, फ्रेंच, डच वगैरे सर्व देशांचे व्यापारी वखारी घालून होते, त्या सर्वांपासून मराठ्यांनीं खंडण्या उखळल्या ! इंग्लिश लोकांचे वखारींतून त्यांस या प्रसंगीं ७८९४ होन मिळाले असें सांगतात. ( मार्च १६७३. )

येणेंप्रमाणें आदिलशाहीबरोबर युद्ध सुरूं झालें असतां, विजापूरकर व मोंगल या दोघांबरोबर एकदम लढाई चालवून आपला निभाव लागणार नाहीं असें शिवाजीमहाराजांनीं पाहून, मोंगलांचा सुभेदार खान जहान बहादुर यास थापा देऊन, तो तूर्त स्वस्थ बसला तर बरें असें मनांत आणून, त्याशीं महाराजांनीं, "आह्मीं बादशहाचे पदरीं पूर्वीप्रमाणें राहण्यास राजी आहोंत" असें बोलणें लाविलें. सुभेदारास तरी हेंच पाहिजे होतें; तो महाराजांचे बोलण्यास लागलाच राजी होऊन, "तुह्मीं या उपर बादशाही मुलुखास जर उपद्रव देणार

नाहीं, तर आह्मांकडूनही तुह्मांस उपद्रव लागणार नाहीं " असें त्यानें महाराजांस कबूल केलें.

८. येणेंप्रमाणें आपले मागचा मोंगलांचा शह युक्तीनें नाहींसा करून, शिवाजी महाराज विजापूरकरांबरोबर नेटानें युद्ध करण्यास अगदीं मोकळे झाले. त्यांनीं आपलें आरमार सज्ज करून तें, समुद्र-कांठचीं कारवार, अंकोला वगैरे विजापूरकरांचीं शहरें काबीज करून सर्व किनारा सर करण्यास रवाना केलें. त्याचप्रमाणें महाराजांनीं त्या प्रांतांतील देशमुख, देशपांडे यांस बंड करण्यास व मुसलमान ठाणेदारांस ठिकठिकाणांहून हांकून देण्यास, उत्तेजन देण्यास हुकूम केला. हा चाललेला दंगा पाहून व हुबळी शहर मराठ्यांनीं लुटलें ही खबर लागून बेदनूरचा राणा घाबरला. त्यानें लागलीच महाराजांस दरसाल खंडणी देण्याचें कबूल केलें व त्यांचा वकील आपले राजधानींत ठेवून घेतला.

याच सालांत महाराजांचे फौजेनें परळी, सातारा, चंदनवंदन, पांडुगड, नांदगिरी आणि टाटोरा हे किल्ले काबीज केले. येणेंप्रमाणें मराठ्यांनीं आदिलशाहीचे पुष्कळ किल्ले घेतले व शहरें लुटलीं हें पाहून, शेवटीं कावसखान यानें, अबदुल करीम बहिलोलखान याजबरोबर बारा हजार फौज देऊन त्यास पन्हाळ्याकडे पाठविलें. त्यानें त्या मुलखांतील कित्येक ठाणीं मराठ्यांपासून परत जिंकून घेतलीं. ही खबर शिवाजी महाराजांस कळतांच त्यांनीं, प्रतापराव सरनोबत याज-बरोबर मोठी फौज देऊन त्यास, विजापूरचे फौजेचें निवारण करण्यास रवाना केलें. प्रतापराव हा एकदम आदिलशाहीचे मुलखांत शिरून तो खुद्द विजापूरापर्यंत गांवें लुटीत व जाळीत चालला. यावरून कावसखान यानें, अबदुल करीम यास मराठ्यांचे बंदोबस्ताकरितां परत बोलाविलें. विजापूरचे फौजेची व मराठ्यांचे फौजेची वाटेंत * उंबराणीस गांठ पडून, तेथें त्यांचें दोन प्रहर मोठें कडाक्याचें युद्ध

* सभासद यांची बखर.

झालें. मराठ्यांनीं विजापूरचे फौजेस चोहोंकडून कोंडलें. त्यांस पाणी मिळेना. इतक्यांत अस्तमान झाला. शेवटीं निरुपाय होऊन अबदुल करीम यानें, प्रतापराव सरनोबत याजकडे तहाचें बोलणें लावण्याकरितां मनुष्यें पाठविलीं. त्यानें सांगून पाठविलें कीं, 'आह्मीं याउपर महाराजांचे मुलुखांत येणार नाहीं, आह्मांस या खेपेस जाऊं द्यावें.' प्रतापराव यानें ती गोष्ट मान्य करून, अबदुल करीम याजबरोबर तह करून, त्याचे फौजेस विजापूराकडे परत जाऊं दिलें. विजापूरचा सरदार चांगला पेचांत आला असतां, इतके सुलभ अटीवर प्रतापराव यानें त्यास सोडून दिलें हें वर्तमान शिवाजी महाराजांस कळतांच, त्यांस त्याचें फार वाईट वाटलें. त्यांनीं त्याबद्दल प्रतापराव यास मोठा शब्द लावला. त्यावरून तो अम्मळ रागावून, महाराजांचे इच्छेविरुद्ध वऱ्हाडांत दूर पैणगंगेचे मुलुखांत स्वारी करण्याकरितां निघून गेला.

सरनोबत दूर मुलुखांत सैन्य घेऊन गेला आहे, तेव्हां पन्हाळा किल्ला घेण्यास ही संधि चांगली आहे असें पाहून, अबदुल करीम यानें पुनः मोठी फौज जमा करून, तो पन्हाळा किल्ल्याकडे चाल करून आला. या मोहिमेची खबर महाराजांस अगोदरच लागली होती; परंतु प्रतापराव हा दूर निघून गेला असल्यामुळें, व दुसऱ्या फौजा दुसरीकडे गुंतून राहिल्या असल्यामुळें, महाराजांचा नाइलाज झाला. इकडे विजापूरचें सैन्य पन्हाळा किल्ल्याजवळ येऊन पोहोंचलें, इतक्यांत शेवटीं प्रतापराव हा आपले फौजेसह येऊन दाखल झाला. याचवेळीं शिवाजी महाराजांचा निरोप त्यास पोहोंचला कीं, "तुह्मीं विजापूरकरांची फौज उंबराणीस अडवून धरली असतां, तिचा चांगला मोड करावयाचा सोडून, तीस तुह्मीं थोडे अटीवर सोडून दिलें हें तुह्मीं अगदीं गैर केलें. त्यामुळें ते पुनः पुनः आपले मुलुखास उपद्रव देण्यास येतात. तुह्मीं या खेपेस तरी त्यांची चांगली खोड मोडून तें सर्व सैन्य लुटून आणल्याखेरीज आमचे भेटीस परत येऊं नये." प्रतापराव विजापूरचे सैन्याबरोबर युद्ध करण्यास निघालाच होता, त्याचे कानीं महाराजांचा असा कडक निरोप पडतांच, त्यास मोठा

त्वेष येऊन, त्यानें नेहमींप्रमाणें आपले सैन्याची विशेष व्यवस्था किंवा खबरदारी न ठेवतां शत्रूवर निवडक स्वारांनिशीं एकदम चाल केली. विजापूरकरांचें सैन्य तयारच होतें; त्याजवर प्रतापरावाचा हल्ला लागू न पडून, तो व त्याचे बरोबरचे खासे लोक हे निकरानें लढतां लढतां मात्र ठार झाले. सरनोबत पडतांच त्याचें सैन्य चोहोंकडे पळूं लागून त्यांचे मागें विजापूरकरांची फौज लागली. तिनें त्यांस पन्हाळा किल्ल्यावरील तोफांचे माऱ्यापर्यंत पिटून लाविलें.

येणेंप्रमाणें सरनोबत यांचे सैन्याचा मोड होऊन, त्याची कांहीं वेळ अगदीं दाणादाण होऊन गेली असतां, सुदैवानें तेथून कांहीं अंतरावर हंसाजी मोहिते ह्मणून महाराजांचा पंचहजारी सरदार होता, त्यानें त्या सैन्याची दुर्दशा पाहून तो मोठे जलदीनें चाल करून आला व विजापूरचें सैन्य जें मराठ्यांचे मागें मोठ्या आवेशानें लागून पांगून गेलें होतें, त्यांजवर एकाएकीं जबर हल्ला केला. यामुळें थोडेच अवकाशांत लढाईचें पारडें पुनः फिरलें. प्रतापराव याचे लोकांस एकाएकीं नवीन कुमक येऊन पोहोंचतांच, त्यांस धीर येऊन ते चोहोंकडून शत्रूवर उलटले. मग काय विचारतां? विजापूरचें सैन्य जें इतके वेळ मराठ्यांचे पाठीस लागलें होतें, तेंच आतां पळूं लागून त्यांचे मागें मराठे लागले! नुकतांच त्यांस जय प्राप्त झाला ह्मणून जो आवेश चढला होता, तो सर्व जाऊन त्यांस आतां लज्जेनें विजापुराकडे पलायन करावें लागलें. ही लढाई *जेसरी येथें झाली. शिवाजी महाराजांस तिचें वर्तमान समजतांच, मोठा संतोष झाला. त्यांना प्रतापराव पडल्याबद्दल फार वाईट वाटलें. त्याचे मुलाबाळांचें महाराजांनीं चांगलें संगोपन केलें, व त्याची मुलगी आपला धाकटा मुलगा राजाराम यास बायको करून दिली. हंसाजी मोहिते—बांड परगण्याचा देशमुख—यानें मोठी शिपाईगिरी केली, ह्मणून महाराजांनीं त्याची मोठी तारीफ करून व त्यास हंबीरराव हा मोठा किताब देऊन, त्यास प्रतापराव गुजर याची रिकामी झालेली सरनोबतची

* सभासद यांची बखर.

जागा दिली. त्याचप्रमाणें संताजी घोरपडे व धनाजी जाधव जे महाराजांचे मागें मोठे प्रसिद्धीस आले, त्यांनीं या लढाईत चांगला पराक्रम केला, ह्मणून त्यांस महाराजांनीं जुमलेदारींतून काढून सरदारांचे पटांत घातलें ( फेब्रुआरी १६७४ ).

९. शिवाजी महाराज यांचे मनांत पुष्कळ दिवसांपासून विचार घोळत होते कीं, प्राचीनकाळीं ज्याप्रमाणें अनेक पराक्रमी हिंदुराजांस यथासांग राज्याभिषेकविधि होऊन त्यांनीं फौजफांटा, न्यायमनसुबा, प्रधान, मंत्री वगैरे सर्व व्यवस्था केल्या, तसें आपण करावें. त्यांस वाटूं लागलें कीं, आपला अंमल महाराष्ट्र देशभर चोहोंकडे पसरला आहे, आपणांपाशीं प्रधान, मंत्री वगैरे कारभारी झाले आहेत, एक लक्ष सैन्य आपले हातांखालीं होऊन, तें विजापूर, गोवळकोंडें येथील सुलतानांपासून दरसाल खंडण्या उखळीत आहे, दिल्लीचे बादशहाबरोबर युद्ध खेळून, त्याचे कित्येक चांगले चांगले सरदार आपण पाडाव केले आहेत, किल्ले कोट, ठाणीं, जागोजाग आपलीं झालीं आहेत, समुद्रांत आरमार होऊन त्याचा दरारा चोहोंकडे पसरला आहे, आपणांस चोहोंकडे महाराजा असें लोक ह्मणतात व आपलें नाणें चोहोंकडे चालूं आहे, न्यायमनसुबाही बऱ्या रीतीनें चालून प्रजापालन चांगलेप्रकारें चालत आहे, तेव्हां आपण स्वतः निर्माण केलेल्या हिंदुसाम्राज्याचें स्वतंत्र सिंहासन स्थापन करून, आपले पूर्वज ज्याप्रमाणें छत्रसिंहासनयुक्त राज्य करीत आले, तसें आपणांस करण्यास आतां अनुकूल आहे. सिंहासनारूढ होऊन यथाविधि राज्याभिषेक होईपर्यंत, आपली गणना केवळ पाळेगारांतच होणार. शेवटीं या सुमारास महाराजांनीं एक मोठा दरबार भरवून, त्यांत आपले मनांतील विचार आपले सरदार लोकांस कळविले. त्या सर्वांचे मनास महाराजांनीं काढलेली गोष्ट पसंत पडून, ती अवश्य करावी ह्मणून त्यांचें ह्मणणें पडलें. नंतर असें सांगतात कीं, महाराजांनीं श्री भवानीची एकांत प्रार्थना केली असतां, ती स्वप्नगत दृश्य होऊन ह्मणाली, ' पूर्वीं वर दिला आहे त्याप्रमाणें तुझे हातून धर्मस्थापना

व स्वराज्यस्थापना ह्या होतील यांत संशय नाहीं. तूं सिंहासनाधीश होऊन तुझे हेतु परिपूर्ण होतील असें माझें आशीर्वचन आहे'. शेवटीं जिजाबाईसाहेब, त्याचप्रमाणें रामदासस्वामी व इतर साधुसंत यांची महाराजांनीं आज्ञा घेऊन, आपला राज्याभिषेकाचा विचार पक्का केला.

महाराजांचा राज्याभिषेकविधि शास्त्रोक्त रीतीनें यथासांग व मोठे समारंभानें व्हावा अशी इच्छा महाराजांस जशी होती, तशी ती त्यांचे प्रधान, मंत्री, सरदार, शास्त्री, पंडित, व इतर प्रजा या सर्वांसच होती यांत नवल नाहीं. फार दिवसांपासून नष्ट झालेलें हिंदु साम्राज्य, यवनांशीं मोठ्या पराक्रमानें लढून पुनः उत्पन्न करणारे, हिंदुधर्माची परधर्मी लोकांचे छळणेनें दुर्दशा होऊन गेली असतां, त्याची पुनस्स्थापना करणारे, पठाण, आरब, मोंगल वगैरे परकीयांनीं हिरावून नेलेली हिंदुलोकांची वीरश्री पुनः महाराष्ट्रीयांमध्यें उज्वलित करणारे असे शिवाजी महाराज, त्यांचा पट्टाभिषेक-उत्सव ह्मणजे केवळ व्यक्ति-विशेषाचा उत्सव नसून, तो राष्ट्रीयच होता यांत संशय नाहीं. मोठमोठे शास्त्री, पंडित यांस बोलावून आणून, हा राज्याभिषेकविधि कसा करायाचा याबद्दल वाटाघाट चालली. कारण, महाराष्ट्राचे दुर्दैवानें त्यांतील हिंदुराज्यपद, सिंहासन, छत्रचामर, राजे, प्रधान, मंत्री वगैरे हरएक व्यवस्था अगदीं नष्ट होऊन गेल्यास, चारशेंवर वर्षें होऊन गेलीं असल्यामुळें, हिंदुराज्यपदाचा घाट घालणें ह्मणजे सर्व सृष्टिच नवीन करण्याप्रमाणें होतें! शेवटीं शास्त्री, पंडितांनीं महाराजांस सल्ला दिला कीं, गागाभट्ट ह्मणून कोणी चार वेद, सहा शास्त्र यांचें पूर्ण अध्ययन केलेले व सांप्रतकालीं धर्माचारासंबंधानें ज्यांचा आधार चोहीं-कडे चालतो, असे काशीक्षेत्रस्थ महा विद्वान् पंडित सहज पैठणास आले आहेत, त्यांस महाराजांनीं या महोत्सवास बोलावून आणिलें, तर सर्व विधि यथासांग शास्त्रोक्त असा अर्थात्च होईल. त्यावरून शिवाजी महाराजांनीं वरील पंडितरत्नास उत्तम आदरानें आणण्याक-रितां, आपले कांहीं सरदारांस, बरोबर पालख्या वगैरे इतमाम देऊन,

पाठविलें. त्यावरून गागाभट्ट हे पैठण वगैरे क्षेत्रांतील उत्तम उत्तम विद्वान् पंडितांस आपले बरोबर घेऊन, महाराजांनीं योजलेलें महाकार्य सिद्ध करण्यास रायगडावर येऊन दाखल झाले. ते आल्यावर शास्त्री, पंडित, वैदिक वगैरे लोकांची सभा भरून, तींत काशीकर पंडितांनीं सिंहासन, छत्रचामर वगैरे राजचिन्हें शास्त्रोक्तरीतीनें कशीं व कोणत्या प्रमाणांचीं करावीं; राज्याभिषेकविधीला लागणारीं द्रव्यें—समुद्र, महा नद्यांचीं उदकें, निरनिराळे धातूंचे कलश, निरनिराळीं वस्त्रें, हीं—कोणतीं आणिलीं पाहिजेत; तसेंच यज्ञ, ब्राह्मणभोजनें वगैरे शांतिदायक कृत्यें कोणतीं करावीं लागतात व शेवटीं हा मंगलविधि कोणते सुमुहूर्तावर करावयाचा, ह्या सर्व गोष्टी ठरविल्या व त्या त्यांनीं अखेर महाराजांचे कानावर घातल्या. त्या सर्व त्यांस पसंत पडून, त्यांनीं त्याप्रमाणें तयारी करण्यास सर्वांस हुकूम दिले.

राज्या-भिषेकाचा मुहूर्त, आनंदनाम संवत्सर ज्येष्ठ शुद्ध त्रयोदशी गुरुवार ( ६ जून १६७४ ) या दिवशीं ठरला; परंतु हा महोत्सव होण्यापूर्वीं महाराजांचा व्रतबंधविधि करण्याचा राहिला होता, तो प्रथम करणें शास्त्रानुमतें अवश्य होतें. महाराजांचें यावेळीं वय सत्तेचाळीस वर्षांचें असून, त्यांस दोन पुत्रही झाले होते; तथापि व्रतबंधाशिवाय राज्याभिषेकविधि शास्त्रानुमतें होत नसल्यामुळें, तो ज्येष्ठ शुद्ध चतुर्थीस महाराजांनीं करून घेतला. यानंतर दोन दिवस ब्राह्मणभोजनें, पंडित, वैदिक, शिष्ट यांची उत्तम रीतीनें संभावना होऊन, षष्ठीस पटबंधनविधि होऊन यज्ञास आरंभ झाला. तो सात दिवस एकसारखा चालून, दररोज पन्नास हजार ब्राह्मणभोजन होई. इष्ट, मित्र, सरदार, मानकरी यांस रोज मेजवान्या, गाणें, बजावणें वगैरे चालून चोहोंकडे आनंदमय झालें होतें. महाराज स्वतः व ऋत्विज हे मात्र घृत, पय, फलाहार करून सात दिवस व्रतस्थ होते.

१०. शेवटीं महाराष्ट्राचे—कदाचित् हिंदुस्थानचेही—इतिहासांतील केवळ सोनेरी अक्षरांनीं लिहून ठेवण्यासारखा दिवस ( ६ जून १६७४ ) हा उगवला. त्या दिवशीं सकाळीं रायगडावर एकच

मोठी गडबड उडून गेली. चोहोंकडे आनंदाचे शब्द, जयघोष, मंगल वाद्यांचे सुस्वर, ऋत्विजांचे वेदवाणीचा पवित्र घोष हीं ऐकूं येऊं लागलीं. शिवाजी महाराज पहाटेस उठून, पत्न्यां व पुत्रांसह मंगलस्नानें करून व उत्तम वस्त्रें व अलंकार घालून, व श्रीभवानी देवीस व मातोश्री जिजाबाई व कुलगुरु बाळंभट्ट व इतर विद्वान्, वैदिक, शास्त्री, पंडित यांस नमस्कार करून, सुमुहूर्तघटी प्राप्त होतांच अभिषेकास सिंहासनावर येऊन बसले. त्यांचे शेजारीं त्यांच्या स्त्रिया सोयराबाईसाहेब व पुतळाबाईसाहेब ह्या पटबंधन करून पट्टराण्या होऊन बसल्या. त्यांचे सन्निध संभाजीराजे व राजारामसाहेब हेही येऊन बसले. सिंहासनाचे भोंवतालून आठ दिशांस आठ प्रधान, कोणी सुवर्णकलश, कोणी रौप्यकलश, कोणी ताम्रकलश, कोणी छत्र, कोणी चामर, असे घेऊन उभे राहिले. त्यांचे पलीकडे गागाभट्टजी व इतर ऋत्विज, उत्तम वैदिक, शास्त्री, पंडित हे राजमंडळावर पवित्र मंत्रोदकांचें अभिषिंचन करीत उभे राहिले. हा विधि चालत असतां मंगलवाद्यें, भेरी, नृत्य, गायन, वाद्य, जयशब्द, तोफांची सरबत्ती इत्यादिकांनीं तो सर्व प्रदेश दणाणून गेला. जागोजाग स्वराज्यांत किल्ले, दुर्ग होते तेथें पूर्वीं सूचना पाठविली होती कीं, एकाचे तोफांचा आवाज ऐकून, पलीकडील दुसऱ्यानें तोफांची सरबत्ती करावी; त्याप्रमाणें चोहोंकडे किल्ल्यांवरून एकसारखा तोफांचे सरबत्तीचा व जयघोषाचा आवाज होऊं लागला! महाराजांनीं या प्रसंगीं दानधर्म फार केला. त्यांनीं आपली सुवर्णतुला करविली. त्यांचें वजन १६००० होन भरले. ते सर्व त्यांनीं ब्राह्मणांस वांटून दिले. गागाभट्टजी यांचा उत्तम मान करून त्यांस लक्ष रुपये दक्षिणा दिली. ऋत्विजांस पांच पांच हजार रुपये दिले. इतर विद्वान्, वैदिक, शास्त्री, पंडित यांस कोणास हजार, कोणांस पांचशें, कोणांस चारशें रुपये असे योग्यता पाहून महाराजांनीं दिले. गोसावी, गोरगरीब, भिक्षुक इत्यादिकांस, कोणांस दोन, कोणांस तीन, कोणांस चार असे रुपये वांटले. यानंतर महाराजांनीं आपले अष्ट प्रधान, सरदार, मानकरी,

सरकारकून वगैरे लोकांस, कोणांस हत्ती, कोणांस घोडे, कोणांस पालखी, कोणांस कंठ्या, कोणांस चौकडे असे बक्षीस दिलें.

यावेळीं महाराजांनीं आपले अष्ट प्रधानांचीं पूर्वींचीं फारशी नांवें बदलून, त्यांस संस्कृत भाषेंतील नांवें दिलीं. त्यांचीं कामें पूर्वीप्रमाणेंच ठेविलीं; परंतु सरनोबतीचे व न्यायाधीशीचे जागीं पूर्वीं दोन दोन इसम होते ते आतां एकएकच ठेविले. प्रधानांचा पगार व इतमाम हे पूर्वींपेक्षां अधिक वाढविले. यावेळीं अष्टप्रधान होते त्यांचीं नांवें:—

| नांव. | फारशी नांव. | संस्कृत नांव. | पगार (होन.) |
|---|---|---|---|
| १ मोरोपंत पिंगळे.* | पेशवा. | मुख्यप्रधान. | १५००० |
| २ रामचंद्रपंत बावडेकर¶ | मुजुमदार. | पंतअमात्य. | १२००० |
| ३ अण्णाजी दत्तो. | सुरनीस. | पंतसचीव. | १०००० |
| ४ दत्ताजीपंत. | वाकनीस. | मंत्री. | १०००० |
| ५ हंबीरराव मोहिते. | सरनोबत. | सेनापति. | १०००० |
| ६ जनार्दनपंत हनवंते. | डबीर. | सुमंत. | १०००० |
| ७ बाळाजीपंत. | न्यायाधीश. | न्यायाधीश. | १०००० |
| ८ रघुनाथपंत. | न्यायशास्त्री. | पंडितराव. | १०००० |

* महाराजांचे मागें, बाकी सात प्रधानांचे संस्कृत किताब चालले; परंतु मुख्य प्रधान हा किताब न चालून, त्याचे जागीं फारशी किताब 'पेशवा' हाच चालला.

¶ रामचंद्रपंत हे, निळोपंत ऊर्फ आबाजी सोनदेव यांचा धाकटा मुलगा. आबाजी हे मार्च १६७४ चे सुमारास वारल्यानंतर, त्यांचा थोरला मुलगा नारोपंत हा नालायक मनुष्य ह्मणून, महाराजांनीं त्यास गाळून त्यांचा धाकटा मुलगा रामचंद्रपंत हा बापाप्रमाणें हुशार असल्यामुळें, त्यासच पंतअमात्याची जागा दिली. शिवाजी महाराज वारसांची योग्यता मयतांप्रमाणें असल्यास, त्यांस त्यांच्या जागा देत, परंतु ते तसे नसल्यास, त्यांस वंशपरंपरा या हक्कावरूनच बढती कधीं देत नसत.

शिवाजी महाराजांनीं राज्याभिषेक होतांच त्या दिवसापासून सरकारी कागदपत्रांतून इतर सर्व शक बंद करून, आपला स्वतःचा राज्याभिषेकाचा शक सुरू केला. कागदपत्रांतून महाराजांचे नांवाचा मायना " क्षत्रियकुलावतंस श्री राजा शिव छत्रपति स्वामी " असा लिहावा, ह्मणून हुकूम केला. येणेंप्रमाणें महाराजांचा सिंहासनरोहणाचा समारंभ, यथासांग व मोठ्या थाटानें रायगडास ता० ६ जून १६७४ रोजीं झाला.

या समारंभास गोंवळकोंडें येथील सुलतानानें आपले वकील पाठवून, महाराजांस हत्ती, घोडे, जवाहीर हे नजराणा ह्मणून पाठवून दिले. त्याचप्रमाणें पाळेगार व मांडलिक राजे, व इंग्लिश, पोर्तुगीज वगैरे परदेशीय व्यापारी यांनींही आनंद प्रदर्शित करण्याकरितां महाराजांकडे वस्त्रें, अलंकार पाठवून दिले. या सुमारास इंग्लिश लोकांचा वकील मि० हेनरी ऑक्सिनडेन यास मुंबईहून महाराजांबरोबर तह करण्याकरितां पाठविला असून, तो या समारंभास हजर होता. इंग्लिश लोकांचा आणि शिवाजी महाराजांचा यापूर्वीं दोन तीन वेळां प्रसंग झाला होता. सन १६६१ सालीं महाराजांचे फौजेनें जेव्हां राजापूर लुटलें, त्यावेळीं तेथील वखार लुटून १०,००० होन किंमतीचा माल लुटून नेला, असा त्यांचा अजमास होता. यानंतर सुरत शहर मराठ्यांनीं दोनदां ( १६६४ व १६७० या सालीं ) लुटलें. त्यावेळीं तेथील इंग्लिश लोकांचे वखारीवर त्यांनीं हल्ले केले; परंतु त्यांचा लाग फारसा साधला नाहीं; तथापि इंग्लिश लोकांस मराठ्यांविषयीं भीति वाटत असून, महाराजांशीं कसातरी एकदां तह करावा अशी त्यांची इच्छा होती. शिवाजी महाराजही या गोष्टीस आड नव्हते. इंग्लिश लोकांपासून दारूगोळा वगैरे लढाऊ सामान मिळालें असतां, जंजिऱ्यावर मारा करण्यास तें आपणांस अत्यंत उपयोगीं पडेल; परंतु त्याचे उलट जर हेच लोक आपणांस शत्रु होऊन, जंजिरेकर सिद्दी व सुरतेचा मोंगलांचा सुभेदार यांस मिळाले, तर मुंबईचे बंदरांतून शत्रूंचीं जहाजें आपले समुद्रकांठचे मुलुखास अत्यंत त्रास देतील असें महाराजांस वाटत असल्यामुळें, तेही त्या लोकांशीं तुटून वागत नसत.

इंग्लिश लोक राजापूर येथें झालेलें नुकसान भरून देण्याकरितां, महाराजांस वारंवार अर्ज पाठवीत व महाराजही त्यांस तें देऊं ह्मणून ह्मणत; परंतु ते त्यांस अट लावीत कीं, 'तुह्मीं आह्मांस जंजिरा घेण्यास प्रथम मदत करा.' इंग्लिश लोक हे यावेळीं केवळ व्यापारीच असून, त्यांस हिंदुस्थानांतील राजकीय खटपटींत पडण्याचा प्रसंग व इच्छा हीं अद्याप प्राप्त न झाल्यामुळें, ते महाराजांचे अटीस कबूल होईनात. येणेंप्रमाणें दोहों पक्षांचें बरेंच दिवस नुसतें बोलणें चालणें चालून, शेवटीं महाराजांचे राज्याभिषेकाचे सुमारास दोहोंमध्यें तह ठरला. त्यांत मुख्य कलमें ठरलीं तीं येणेंप्रमाणें:—

१. राजापूर येथील इंग्लिश लोकांचे वखारींतून मराठ्यांचे फौजेकडून माल लुटला गेला, त्याबद्दल मराठ्यांनीं इंग्लिशांचें नुकसान भरून द्यावें. इंग्लिशांस राजापूर, दाभोळ, चौळ व कल्याण येथें व्यापाराकरितां वखारी घालूं द्याव्या.

२. महाराजांचे सर्व मुलुखांत पाहिजे तिकडे इंग्लिश लोकांनीं त्यांना वाटेल त्या किंमतीनें त्यांनीं आपला माल विकावा. त्यांस अमुक भावानें जिनसा विकाव्या ही अट नसावी.

३. इंग्लिश लोकांनीं शेंकडा अडीच रुपयेप्रमाणें जकात महाराजांस द्यावी.

४. दोहों पक्षांचीं नाणीं परस्परांचे व्यवहारांत चालावीं.

५. इंग्लिश लोकांचीं गलबतें फुटून किनाऱ्यास लागलीं असतां, त्यांतील माल त्या लोकांचा त्यांस द्यावा.

या तहाची हकीकत मूळ मि० ऑक्सिनडेन यांचे टिपणावरून घेतली आहे. त्यांत इंग्लिश लोकांचे तर्फेचींच तेवढीं कलमें दिलीं आहेत; परंतु त्यामोबदला इंग्लिश लोकांनीं महाराजांस काय द्यावें याचा उल्लेख दिसत नाहीं. दोहोंपक्षांचे या तहाचे संबंधानें जो

व्यवहार झाला, तेवढ्यावरून शिवाजी महाराजांस व्यापाराचें बरेंच इंगित कळतें, असें इंग्लिश लोकांस समजून आलें, व इंग्लिश व्यापारी हे व्यवहाराला बऱ्याच प्रकारचे लोक आहेत, असें महाराजांसही समजून आलें.*

दुसरे युरोपियन व्यापारी, ज्यांचा संबंध महाराजांस पडला व ज्यांचीही कांहीं तरी अखेर तोड निघाली, असे पोर्तुगीज लोक होत. या लोकांबरोबर १६६२ सालीं तह झाला, ह्मणून मागें सांगितलेंच आहे. तेव्हांपासून कांहीं वर्षेंपर्यंत दोहोंपक्षांचें साधारण बरेंच सख्य होतें; परंतु १६६८ सालीं दिल्लीचे बादशहानें शिवाजी महाराजांस विजापूरचे राज्यांत व कोंकण प्रांतांत चौथाई वसूल करण्याचा हक्क दिल्यापासून, महाराजांनीं पोर्तुगीज लोकांची वस्ती कोंकणांत असल्यामुळें, त्यावरही हा हक्क बसविण्याचा यत्न चालविला. यामुळें दोघांमध्यें पुनः लढाई सुरू होऊन दोघांनीं एकमेकांचीं कांहीं जहाजें पकडून नेलीं (१६७०) ह्मणून मागें लिहिलेंच आहे. महाराजांनीं कोंकणांत कोळी राजे, ज्यांपैकीं पुष्कळ या वेळपर्यंत स्वतंत्र होते, त्यांना कांहीं लढाई करून व कांहीं तह करून आपले ताब्यांत आणले, व पोर्तुगीज लोकांनीं खंडणी न दिली, ह्मणून त्यास समुद्र किनाऱ्यावरून हांकून देण्याचा महाराजांनीं मोठा प्रयत्न चालविला. साष्टी बेटांतील गोरें बंदर ह्मणून पोर्तुगीज लोकांचा किल्ला होता, त्याजवर मराठ्यांनीं हल्ला केला; परंतु पोर्तुगीज लोकांनीं तो मागें हटविला (१६७२). राज्याभिषेक झाल्यानंतर महाराजांनीं मोरोपंत पेशवे यांस बरोबर सैन्य देऊन, पोर्तुगीज लोकांचें ठाणें जें वसई त्यावर चौथाई वसूल करण्याकरितां पाठविलें; परंतु याहीवेळीं चौथाई घेण्याचा महाराजांचा हक्क पोर्तुगीज लोकांनीं कबूल न करितां, कांहीं तरी पैसा किंवा दारुगोळा वगैरे देऊन तडजोड पाडली असावी असें दिसतें.

---

* ग्रॅन्ट्‌डफ.

महाराजांचे राज्याभिषेकाचे समारंभानंतर सुमारें पंधरा दिवसांनीं$ त्यांची मातृश्री जिजाबाईसाहेब या वारल्या. ह्यांचें यावेळीं वय ८० वर्षांचें होतें. ज्यांनीं महाराजांचे बालपणीं अनेक संकटसमयीं यवनांचे हातून त्यांचें रक्षण केलें, ज्यांनीं महाराजांच्या वीरश्रीचा अंकुर आपल्या पूर्वजांच्या अद्भुत पराक्रमकथनानें वृद्धिंगत केला, ज्या महाराजांस पित्याचा फारसा वाळंदा नसल्यामुळें, बहुतेक त्यांचेच ठिकाणीं झाल्या व ज्यांनीं, आपले पुत्रानें आपले पूर्वजांपेक्षांही अतुल पराक्रम करून, हिंदु बादशाहीची स्थापना केली असतां, त्याचा राज्याभिषेकाचा सोहळा पाहिला, अशा या वीरमातेपेक्षां अधिक धन्य व भाग्यशाली अशी स्त्री एकीशिवायकरून* आमचे महाराष्ट्रांत आजपर्यंत क्वचित्च निपजली असेल ! !

---

$ ज्येष्ठ वद्य ९ चिटणिसांची बखर.

* अर्थात्च ही अहिल्याबाई होळकरीण ही होय.

# भाग १०.

---

## शिवाजी महाराज—कर्नाटकावरील स्वारी व मृत्यु.

---

१. औरंगजेब बंडाफितूरीच्या भयापासून मुक्त होतो. अफगाण लोक काबूलचे सुभेदाराविरुद्ध उठतात. पांच वर्षे बादशहाची भीती नसल्यानें मराठ्यांची सरशी—औरंगजेब बादशहा कांहीं प्रतिबंध करीत नाहीं. त्याचा आपल्या अम्मलदारावर गैरविश्वास. खुद्द आपल्या मुलावर बेभरवसा. मराठ्यांविषयींची त्यास भीतीच वाटत नसे. त्याचा स्वत: दक्षिणेंत येण्याचा हेतु. त्याचे सगळे बेत विजापूर व गोवळकोंडा यांच्या विरुद्ध चालले होते. कावसखानाची फितूरी. त्याचा खून. मोंगलांच्या सुभेदाराची स्वारी. त्यास तह करून परत जावें लागतें. विजापूर दरबारीं बादशहाच्या वकिलानें केलेल्या भेदामुळें, इमानी नोकरांस जाच होतो. गोंवळकोंड्यांतही मोंगलाचें बरेंच चाललें असतें; पण सुलतान अबूहसन आपल्या दोन ब्राह्मण प्रधानाचे तंत्रानें वागल्यानें बचाव होतो. २. दिलेरखान मराठ्यांबरोबरचा तह मोडण्यास कारण होतो. मराठे सरदारांचा पराक्रम. दिलेरखान कल्याण प्रांत लुटतात. मराठे आणखी किल्ले घेतात. ३. महाराजांचा आजार. दक्षिणेतील मोहिमेची तयारी. व्यंकोजी राजे वाईट निघतात. त्यांचा चांगला कारभारी त्यांस सोडून शिवाजी महाराजांचे आश्रयास जातो. त्याचा मान. कर्नाटकावर स्वारी करण्यास निमित्त. ४. या कामास अनुकूलता. कर्नाटकांत जाणेपूर्वी मागील व्यवस्था. गोंवळकोंड्यास मुक्काम व तेथील मसलती. ५. श्रीशैलाचेठायीं महाराजांस वैराग्य प्राप्त होतें. श्रीभवानीची उलट आज्ञा. जिंजी किल्ला काबीज करून तेथील व्यवस्था. त्रिनामल्ली येथील विजापूरकरांच्या सरदाराचा पराभव. वेल्होरचा किल्ला हस्तगत होतो. संभाजीची भेट व त्याचा आदर. ६. शिवाजी महाराजांचें आपल्या सावत्र बंधूस पत्र. व्यंकोजीची तयारी. त्यांचेकडील नाईक हे महाराजांकडे सामील होतात. व्यंकोजीराजे भेटीस येतात.

त्यांचें वरपंगी वर्तन. त्यांस पाठविलेला निरोप व्यर्थ होतो. महाराज इतर मुलूख जिंकितात. ७. दिलेरखान व अबदुल करीम यांची गोवळकोंड्यावर स्वारी. तींत त्यांचाच पराभव. अबदुल करीमच्या मरणानें विजापुरांत घोटाळा. ८. मलबाई देसाईण. किल्ला सर होण्यास २७ दिवस लागतात. तिचा मुलूख कोपलवेंडा हे स्वाधीन होतात. व्यंकोजीराजे यांचा पराजय. त्यांस महाराजांचें दुसरें पत्र. गृहकलह मिटविण्यांत शिवाजी महाराजांची युक्ति व खटपट. निळोजी काटकर यानें केलेला पराक्रम व महाराजांचा निरभिलाषीपणा. महाराजांची स्वारी रायगडास परत येते. कृष्णा व तुंगभद्रा यांमधील दुआबांत विजापूरचे सैन्याचा पराजय. महाराजांचा व गोंवळकोंड्याच्या शहाचा संबंध. सिद्दि याचा जोर. ९. दिलेरखानाची मसलत दिल्लीच बादशहास नामंजूर होते. दिलेरखानानें, राजकन्येस स्वाधीन करा, नाहींतर शहावर चालून येतों असा शहास निरोप पाठविला. राजकन्येस स्वाधीन करण्या न करण्याचे बाबतींत तट होतात. राजकन्येचें औदार्य व धारिष्ट. दिलेरखानानें केलेला वचनभंग. मसाउदखान शिवाजी महाराजांकडे मदत मागतो. त्यांचें आभिवचन. १०. महाराज मोंगलांचे प्रांतांत लूट करितात. जालना शहरीं खूप पैसा सांपडतो. संगमनेर येथें मोंगलांचा पराभव स्वतः महाराज करितात. मराठ्यांचें सैन्य मोंगलांस चुकवून निराळ्या वाटेनें जातें. ११. विजापुराहून मसाउदखानाचा महाराजांस निकराचा निरोप. संभाजीची फितूरी. हंबीरराव विजापुरास सैन्य नेतो. महाराजांचे आपल्या पुत्रांना शिक्षण देण्याचे कामीं हेतु व श्रम. संभाजीचा स्वभाव. त्याचे दुर्वर्तनाविषयीं महाराजांचे उद्गार. त्याच्या फितूरीची हकीकत औरंगजेब यास कळते. दिलेरखानाकडून मदत घेऊन संभाजीराजे भोपाळगड घेतात. तेथील लोकांस पडलेली पंचाईत. संभाजीचा क्रूरपणा. शिवाजीमहाराजांचा संभाजीस निरोप. १२. हंबीरराव व रणमस्तखान मोंगल सरदार यांची लढाई. मोंगलांचा मोड. दाणा, वैरण महाग झाल्यानें दिलेरखान विजापूरचा वेढा उठवितो. दिलेरखानाचा कर्नाटकांत पुनः पराभव. उत्तरेसही मराठ्यांची भरभराट होते. संभाजी, राजा, असें जाहीर करवून, मराठ्यांत फूट पाडण्याच्या विचारावर औरंगजेबाचें दिलेरखानास उत्तर. दिलेरखानाविषयीं बादशहाचें मत. खान जहानबहादूर यांची नेमणूक व दिलेरखानाचा अपमान. संभाजीराजे यांस कैद करून दिल्लीस पाठविण्याबद्दल हुकूम. संभाजी मोंगलाचे छावणींतून पळ काढून शिवाजी महाराजाकडे येतो. १३. महाराजांचा संभाजीराजे यांस एकांतीं बोध. १४. विजापूरचे शहाकडून महाराजांस मुलूख मिळतात. विजापूरकरांचे व महाराजांचें

सख्य. व्यंकोजीराजे यांस महाराजांचें पत्र. १५. महाराजांस गुडघी रोग होता. तें दुखणें अनावर होतें. महाराजांचें आपल्या प्रधानमंडळास अखेरचें सांगणें. महाराजांचा मृत्यु. १६. महाराजांविषयीं ग्रँटडफचा अभिप्राय. औरंगजेबाचें मत. महाराजांचा पाहिला विशेष, त्यांनीं अगदीं नवीन राष्ट्रच बनविलें व स्वराज्य स्थापिलें. आपल्या लुटारू फौजेवर महाराजांचा दाब. हस्तगत झालेल्या शत्रूंशीं महाराजांचें वर्तन. इंग्लिश इतिहासकारांनीं महाराजांस दिलेले दोष जगांतील सामान्य राजनीतीवरून पहातां अगदीं अविचारानें दिले आहेत असें सिद्ध होईल. महाराजांचें खासगी वर्तन. महाराजांची संतति.

१. दिल्लीचा औरंगजेब बादशहा ह्यानें ह्या सुमारास उत्तरहिंदुस्थानांतील आपले राज्याची बहुतेक व्यवस्था लाविली होती. त्यानें आपले सर्व लहान मोठे भावांचा त्यांचे पुत्रासह नाश करून, तो त्यांचे धाकांतून मागेंच मोकळा होऊन बसला होता. भावांचे मागें उरलेला त्याचा बाप—शहाजहान बादशहा यानेंही आपले दिग्विजयी पुत्राचे हातून सिंहासनावतरणाचा व बंदीवासाचा सोहळा भोगून शेवटीं आपले इतर हतभाग्य पुत्रांचा मार्ग धरिला होता ( १६६६ ). येणेंप्रमाणें औरंगजेब बादशहा हा आपले भाऊ किंवा बाप हे बंड उपस्थित करितील, ह्या धाकांतून अगदीं मुक्त झाला होता; तथापि त्यानें आपले मनांत फार दिवसांपासून योजलेला जो महत्हेतु—कीं एकदां दक्षिणेंतील मुसलमानी व हिंदू सर्व राज्यें जिंकून दिल्लीची बादशाही काबूलपासून रामेश्वरापर्यंत पसरवून द्यावयाची—तो साध्य होण्यास मध्यें कांहींना कांहींतरी आड येईच. १६७० सालीं अफगाण लोक हे बादशहाचा काबूल येथील सुभेदार—मिर जुमला याचा मुलगा—अमीनखान—याजवर एकदम उठून लोकांनीं त्याचे फौजेचा अगदीं मोड करून टाकिला. यामुळें बादशहास अफगाण लोकांशीं लढण्याकरितां पुष्कळ फौज व सरदार तिकडे पाठविणें भाग पडलें; परंतु ही लढाई पांच वर्षें चालून शेवटीं बादशहास त्या लोकांशीं सरासरी गोडीगुलाबीच करावी लागून त्यांस कसें तरी स्वस्थ करावें लागलें ( १६७५ ).

ा लढाईमुळें व दुसऱ्या कांहीं राजकीय गोष्टींमुळें, मराठे लोक अनावर ोऊन त्यांनीं मातबर शहरें लुटलीं, किल्ले कोट घेतले, मुलुखांतून ौथाई वसूल केली, अखेर मोंगलांचे फौजांचा एक दोन वेळां चांगला ्चकचीत पराभवही केला. तरी बादशहास तूर्त त्यांचेकडे लक्ष ्ण्यास सवड होईना. मागें सांगितल्याप्रमाणें त्याचा स्वभाव अत्यंत ंशयखोर असल्यामुळें, दक्षिणेंतील सुभेदाराचे स्वाधीन एखादी मोठी ौज करून त्याचेकडून मराठ्यांची खोड मोडून, विजापूर, गोवळकोंडें गैरे दक्षिणेंतील राज्यें जिंकून सर्व देश एकदम सर करावा हें याचे मनांत येईना. त्यास वाटे कीं, आपणांपासून इतके दूर अंतरावर असणारे वरील सुभेदारास येवढी मोठी फौज दिली, आणि तो कदाचित् आपणांवर उलटला, तर भलतेंच अरिष्ट आपण उत्पन्न करून घेतल्यासारखें होईल. त्यास खुद्द आपले पुत्रांचाही भरंवसा वाटत नसे. त्यानें आपला थोरला मुलगा सुलतान महंमद यास कांहीं संशयावरून, सन १६६०त कैदेंत टाकिलें, व अफगाण लोकांशीं लढाई उत्पन्न झाली तेव्हां १६७३ सालीं, त्यास कैदेंतून काढून त्याजबरोबर फौज देऊन त्यास काबुलाकडे पाठवून दिलें. दुसरा मुलगा सुलतान मोआझिम याजविषयीं तर बादशहास अधिकच संशय धरण्यास कारण होऊन, त्यानें त्यास दक्षिणेचे सुभेदारीवरून दोनदां काढून टाकिलें ह्मणून मागें सांगितलेंच आहे. तेव्हां अशा स्थितींत बादशहानें आपला असा मार्ग योजून काढिला होता कीं, आपण एकदांचे उत्तरहिंदुस्थानांतील भानगडींतून पार पडून, दक्षिणेंत स्वतः च मोठी फौज घेऊन जाऊन तो सर्व प्रदेश जिंकून घेईपर्यंत, मध्यंतरीं दक्षिणेंतील सुभ्यावर खानजहान बहादुरासारख्या कोणातरी सामान्य सरदारास ठेवावें; आणि विजापूर व गोवळकोंडा येथील राज्यांत युक्तीयुक्तीनें अधिकाधिक आपला पाय शिरकावून देऊन, तीं राज्यें अगदीं क्षीण करून टाकावीं, व शेवटीं आपणांस दक्षिण दिग्विजय करण्यास फावलें ह्मणजे एकादे लहानसे लढाईनेंच आपलें काम फत्ते करावें. बादशहास मराठ्यांचें फारसें महत्व किंवा भीति मुळींच वाटत नसे. यामुळें त्यांनीं विजापूर व गोवळकोंडा हीं राज्यें बहुतेक

ग्रासून टाकिलीं होतीं, तरी त्या लोकांचा अचाट उद्योग अखेरीस आपलाच महत् हेतु सिद्ध होण्यास आयताच उपयोगी पडेल असा त्यास व्यर्थ भ्रम होता! विजापूर व गोवळकोंडें हीं एकदां हातीं आलीं ह्मणजे मराठे लोकांचा विषय तो काय? ते सहजच थोडे वेळांत नाहींसे करितां येतील, असा औरंगजेब बादशहाचे मनांतील विचार असे. तेव्हां या धोरणांनीं त्यानें दक्षिण दिग्विजयाचा आपला महत् उद्योग मोठे युक्तीनें व धिमेपणानें एकसारखा चालविला होता. मराठ्यांची शक्ति दिवसेंदिवस वृद्धिंगत होत चालली होती, तिजकडे त्याचें लक्ष न पोहोंचून, त्याच्या सर्व खटपटी विजापूर व गोवळकोंडा यांचेसंबंधानेंच चालू होत्या. दोन्ही दरबारांत त्यानें जे आपले वकील ठेविले होते, त्यांचे मार्फत त्या दोन दरबारांत परस्पर वांकडें पाडून तें नेहमीं कायम ठेवण्याचा व प्रत्येक दरबारांतील मुख्य मुख्य सरदारांत वैमनस्यें उत्पन्न करून त्यांमध्यें तट राखण्याचा बादशहाचा नेहमीं यत्न चालू असे.

बादशहाचे भेद्यांनीं विजापूर येथील प्रतिनिधि कावसखान यास वश करून घेऊन, त्याचे मार्फत त्या राज्याशीं असा तह करून घेण्याचा घाट घातला कीं, ' यापुढें विजापूरची आदिलशाही हें दिल्लीचे बादशाहीचें मांडलीक राज्य असें समजावें, व अज्ञान सुलतान शिकंदर याची बहीण पादशहा बिबी, ही बादशहाचे एका मुलास बायको करून द्यावी. ' हें प्रकरण विजापूरचे इतर सरदारास समजतांच, त्यांस कावसखान याचा अधिकच राग येऊन त्यांनीं त्याजविरुद्ध कट केला. त्यांत अबदुल करीम हा मुख्य होता. थोडेच वेळांत कावसखान याचा खून होऊन विजापूरचे राज्याचा सर्व अधिकार अबदुल करीम ह्याचे हातीं आला. कावसखानाचा खून करून आपला बेत विजापूरकरांनीं फसविला हें पाहून, मोंगलांचा सुभेदार खान जहान बहादूर हा फौज घेऊन विजापूरचे राज्यावर स्वारी करून आला; परंतु आपली राज्यकन्या आवडती पातशाहा बिबी ही मोंगलांस द्यावी लागते ही गोष्ट समजून, विजापूरचे लोक बरेच खवळून गेले असलेमुळें, यावेळीं त्यांनीं

अबदुल करीम यास मनापासून साहाय्य केलें. यामुळें मोंगलांचें फारसें कांहीं चालेना. दोहोंपक्षांच्या कांहीं लढाया झाल्यानंतर अबदुल करीम यानें आपलेच पठाण जातीचा दिलेरखान ह्याचेच मध्यस्थीनें मोंगलांशीं तह करून घेऊन त्यांस परत लाविलें ( १६७९ ).

याप्रमाणें मोंगलांशीं तह झाला खरा; परंतु त्यापासून अबदुल करीम यास लवकरच पीडा उत्पन्न होऊं लागली. बादशहानें विजापूरचे दरबारांत काश्मीरचा राहणारा मलीक वरखोरडार यास आपला वकील ह्मणून पाठविलें. हा मनुष्य राज्यकारस्थानांत मोठा प्रवीण असून त्यानें विजापूरचे दरबारांतील लहान मोठे सरदारांस—कोणास पैसे, कोणास बढती, कोणास कांहीं, कोणास कांहीं असें अंशतः देऊन व यापुढें अधिक मिळेल अशी आशा लावून, त्यांस—आंतून बादशहाचे पक्षाकडे ओढून घेतलें. मलिक वरखोरडार याचीं अशीं आंतून कारस्थानें चाललीं असतां, त्याची बाह्य वागणूक फार अदबीची व नम्रतेचीही असे; यामुळें अबदुल करीम व त्यासारखे इतर इमानी सरदारांस अतिशय पीडा होई. त्यास असें वाटूं लागलें कीं, दिलेरखान याचे ह्मणण्यावरून बादशहाची जी आपण दोस्ती केली, तिजपेक्षां शिवाजी महाराजांशींसुद्धां ती केली असती तर बरें होतें; परंतु झाल्या गोष्टीस उपाय नसल्यामुळें, ते स्वस्थ मोंगलांचा त्रास सोसून राहिले!

गोंवळकोंडें येथील दरबाराची स्थिति, विजापूरचे दरबारापेक्षांही वाईट होती. तेथें मोंगलांचा पगडा, मीर झुमला याचे प्रकरणापासून फार दिवस चांगलाच बसला होता. तेथील सुलतान अबदुल कुतबशहा हा १६७२ सालीं मरण पावला. तेव्हां त्याचे मागें राज्यांत विशेष घोंटाळा उत्पन्न होऊन, त्यांत आपणांस हात घालण्यास अधिक फावेल; ह्मणून औरंगजेब बादशहास प्रथम आशा वाटली; परंतु ती फारशी सफळ झाली नाहीं. कारण, मयत सुलतानाचा जांवई अबू हसन हा पूर्ववयांत अगदीं गैरचालीचा असा होता, तरी तो गादीवर बसतांच बराच निवळला. तो जातीनें मोठा हुषार नव्हता खरा, तरी तो, मादण्णापंत व आकण्णापंत ह्मणून कोणी ब्राह्मण जातीचे त्याचे

मुख्य प्रधान होते, त्यांचे तंत्रानें चालत असे, यामुळें त्याची फारशी उघडीप पडत नसे. हे दोघे प्रधान भाऊ भाऊ असून मोठे हुषार होते; परंतु ते ब्राह्मण जातीचे असल्यामुळें, कुतुबशाहींतील इतर मुसलमान सरदार त्यांचा द्वेष करीत, हें औरंगजेब बादशहाचें अंतस्थ कारस्थानास अनुकूलच असे; परंतु सुलतान अबू हसन हा असल्य सरदारांचे फारसें ऐकत नसल्यामुळें, त्या दोघा प्रधानांचा, सुलतानाच व एकंदर राज्याचा तूर्त साधारण बराच निभाव होता!

२. इकडे मराठ्यांबरोबर खान जहान बहादूर यानें जो तह केल होता, तो दिलेरखान यानें महाराजांचे मुलुखांत कांहीं धामधूम करू मोडल्यामुळें, महाराजांस मोगलांचे मुलखांत पुनः लुटालूट करण्या आयतीच संधि सांपडली. मोरोपंत पेशवा यानें आवढा आणि प हे दोन्हीं किल्ले पुनः जिंकले. त्यानें त्यानंतर शिवाजी महाराजां जन्मभूमि जो शिवनेरी किल्ला तो घेण्याचा यत्न केला; परंतु या खेपे ही तो फसला. दुसरीकडे हंबीरराव यानें सुरतेजवळील घांट चढून जाऊन, आपले घोडेस्वारांच्या टोळ्या चोंहोकडे पसरवून मोंगलां मुलूख बऱ्हाणपूर, माहूरपर्यंत लुटला. त्याचे एका टोळीनें भड परगण्यांत शिरून तेथें खंडणी वसूल केली. मराठे लोकांनीं नर्म नदी ओलांडून तिचे पलीकडे लुटालूट केली असा हा पहिलाच प्र होय! हंबीररावाचे स्वारीची खबर दिलेरखान यास कळतांच, त्य मराठ्यांचा पाठलाग मोठ्या त्वेषानें केला; परंतु मराठ्यांनीं मि विलेली लूट नर्मदा नदी उतरून कशीतरी आपले देशांत आ पोंहोंचविली. या कृत्याचा सूड उगविण्याकरितां दिलेरखा महाराजांचा कल्याण प्रांत लुटला ( १६७९ ).

महाराजांचा पेशवा व सेनापति हे वर सांगितल्याप्रमाणें वि झाले असतां, त्यांचे दुसरे एके फौजेनें पौंड्याचा किल्ला सर के हा किल्ला महाराजांचे कोंकणांतील दोन मुलुखांमध्यें असल्या कार ता घेणें अवश्य असल्यामुळें, तो घेण्यास महाराजांचा तीन वर्षें चालला होता. त्यांनीं सुरतेहून फ्रेंच लोकांपासून बऱ्याच

व दारूगोळा खरेदी केला होता; परंतु त्यांचा किल्यावर चांगला मारा होईना. शेवटीं १६७५ सालीं महाराज स्वतः त्या कामगिरीवर जाऊन व पन्हाळा व टाटोरा यांचेमधील मुलूख पुनः जिंकून घेऊन, त्यांनीं किल्ल्याचे वेढ्याचें काम मोठे जारीनें चालविलें. किल्ल्याचे एका बुरुजाखालीं सुरुंग लावून तो उडविला, यामुळें मराठ्यांस किल्ल्यांत शिरण्यास मार्ग झाला. किल्लेदारानें तीन वर्षें नेट धरला; परंतु यापुढें निभाव नाहीं असें पाहून, किल्ला महाराजांचे स्वाधीन केला. येणेंप्रमाणें फोंड्याचा किल्ला सर करून, महाराज दक्षिणेकडे कोंकणांत शिरून त्यांनीं खंडणी गोळा करण्याचा व गांव लुटण्याचा झपाटा लावला. यानंतर ते घांट चढून जाऊन सुंदचे मुलुखांत घुसले व तेथून पुष्कळशी लूट घेऊन रायगडास परत आले ( १६७५ ).

३. पुढील सालीं ( १६७६ ) महाराजांनीं पन्हाळा व टाटोरा यांचेमधील मुलुखास विजापूरचे शेजारचे जहागीरदारांपासून उपद्रव होतो म्हणून, त्या दोन ठिकाणांमध्यें वर्धनगड, भूषणगड, सदाशिवगड, मच्छंदरगड असे नवीन किल्ले बांधिले; परंतु हें काम चाललें असतां, महाराजांस मोठें दुखणें होऊन, ते कित्येक महिनेपर्यंत साताऱ्याचे किल्ल्यांतच पडून होते. महाराजांचे विचार नेहमीं अचाट उद्योगांकडे लागलेले असल्यामुळें, त्यांनीं यावेळीं दुखणाईत असतांच, त्यांचे आयुष्यांतील अत्यंत मोठी व दुर्दैवानें शेवटलीच अशी जी दक्षिणदिग्विजयाची मोहीम, तिची पूर्ण तयारी केली.

शहाजी राजे यांचे कर्नाटकांतील जहागिरीचें काम पहाण्यास, त्यांजवळ नारोपंत हनुवंते म्हणून कोणी फारा दिवसांचा हुषार व विश्वासू असा कारभारी होता, तो १६६३ सालीं वारला. त्याचे मागें त्याचा मुलगा रघुनाथ नारायण हा त्याचें काम पाहूं लागला. तो बापापेक्षांही हुषार असल्यामुळें, त्यानें राजे यांचे जहागिरीचें काम फार उत्तम रीतीनें चालविलें. पुढें शहाजी राजे वारल्यानंतर, दहा बारा वर्षें व्यंकोजी राजे व रघुनाथ नारायण यांचें बरेंच सुरळीत चाललें होतें परंतु व्यंकोजी राजे ह्यांचे अंगीं, त्यांचे थोरले बंधु शिवाजी महाराज

यांचेप्रमाणें हुषारी व पराक्रम हीं नसून, ते कांहींसे हलके लोकांचे नादानें चालणारे असल्यामुळें, रघुनाथरावासारख्या पाणीदार कारभाऱ्यास ते आवडेनातसे झाले. राजे यांसही कारभाऱ्याचा डोईजडपणा सहन होईना. अखेर कांहीं गोष्टींवरून बाचाबाची होऊन, दोघांचीं मनें परस्परांविषयीं अगदीं विटून गेलीं. रघुनाथ नारायण यानें विचार केला कीं, कर्नाटकांतच कोणा पाळेगारास हातीं धरून राजे यांची आपण खोड मोडावी तर, ज्याचें अन्न इतके दिवस आपण खात आलों, त्याचेवरच कोणतेही कारणानें उठणें हें अगदीं अनुचित होय. तेव्हां आपण राजे यांचे थोरले बंधु शिवाजी महाराज यांचे पदरीं रहावयास जावें हें बरें. तेथें आपले गुणांचें चीज होईल. हा विचार पक्का करून, रघुनाथराव यानें शिवाजी महाराजांकडे जाण्याची तयारी केली. त्यानें मनांत आणलें कीं, आपल्यासारख्या मुत्सद्यानें रिकामे हातांनीं महाराजांकडे जाण्यापेक्षां, कांहीं मसलती बरोबर घेऊन जावें हें अधिक चांगलें. तेणेंकरून महाराजांची आपले कर्तृत्वाबद्दल प्रथमच चांगली खात्री होईल. ह्मणून जिंजी ( चंदी ) वगैरे ठिकाणच्या मसलती तयार करून रघुनाथराव हे रायगडाकडे येण्यास निघाले. वाटेनें त्यानें गोवळकोंड्यास जाऊन तेथील दिवाण मादण्णापंत यांची भेट घेतली. त्याचा युक्तियुक्तीनें आपणावर भरंवसा बसवून घेतल्यानंतर, त्यास त्यानें कर्नाटकांत कुतुबशहा व शिवाजी महाराज या उभयतांनीं स्वारी केली असतां, विजापूरकरांचा पुष्कळ मुलूख मिळण्यासारखा आहे असें दिवाणाचे मनांत भरवून दिलें. मादण्णापंताचें कुतुबशहापाशीं किती वजन होतें हें मागें सांगितलेंच आहे. त्यास रघुनाथ नारायण याचा बेत दिवाणानें सांगून, त्यापासून आपला पुष्कळ फायदा होणारा आहे अशी त्याची समजूत घालून दिली. त्यावरून सुलतानानें रघुनाथरावाची दरबारांत भेट घेऊन व त्याचा चांगला मान करून, त्यास कर्नाटकाचे मोहिमीबद्दल आपली पूर्ण संमति आहे असें कळविलें. येणेंप्रमाणें रघुनाथ नारायण हा, कर्नाटकांतील मसलतीच तयार करून रायगडास येण्यास निघाला असें नाहीं, तर त्या सिद्धीस नेण्यास जें एक मोठें साधन — गोवळकोंडें येथील सुलतानाच्या मदतीबद्दलचें वचन

तेंही सिद्ध करून बरोबर घेऊन आला. रघुनाथरावासारखा हुषार मुत्सद्दी आपण होऊन आपले पदरीं रहावयास येत आहे हें पाहून, शिवाजी महाराजांस अगोदर आनंद झाला होताच; परंतु आपले चाकरीस रहावयास येण्याचे पूर्वींच तो वर सांगितल्याप्रमाणें कामगिरी बजावून येत आहे हें पाहून तर, महाराजांचा त्याजविषयीं फारच अनुकूल ग्रह झाला. तो रायगडास येऊन पोहोंचल्यावर थोड्याच दिवसांत महाराजांनीं, रामचंद्र नीळकंठ यांची अमात्यगिरी काढून, रघुनाथपंतास, ती त्याची फार दिवसांपासून वडिलोपार्जित असल्यामुळें दिली. यानंतर महाराजांचे दरबारांत विचार निघाला कीं, कर्नाटकावर स्वारी करण्यास निमित्त काय उभें करावें? शेवटीं शहाजीराजे यांची कर्नाटकांतील जी जहागीर होती, ती व्यंकोजी राजे यांचे एकट्याचेच वहिवाटीस सुमारें बारा वर्षें असून, तिचें उत्पन्न ते एकटेच घेतात, तर त्या जहागिरींतील निम्मा वांटा मागण्याकरितां आपण त्या प्रांतांत स्वारी करीत आहों, हें निमित्त विशेष सयुक्तिक दिसून तें पुढें करावें, असा महाराजांनीं विचार ठरविला.

४. कर्नाटकांत स्वारी करण्यास महाराजांस ही संधि अत्यंत अनुकूळ होती. कारण, दिलेरखान याचेमार्फत विजापूरचा प्रतिनिधि अबदुल करीम यानें नुकताच जो तह केला होता, त्याजवरून कुतुबशाही-विरुद्ध विजापूरकरांची व मोंगलांची कांहीं गुप्त मसलत ठरली असावी, असा मादण्णापंत याचे पोटांत संशय आला होता. दिलेरखानाचें गोवळकोंड्याचे दरबारीं जसें हाडवैर असें, तसेंच त्याचें शिवाजी महाराजांशींसुद्धां असे. तेव्हां महाराजांनीं विचार पाहिला कीं, आपण कर्नाटक प्रांतांत दूर गेलों असतां, मागें मोंगल किंवा विजापूरकर आपले मुलुखावर स्वारी करतील, तर आपले पाठीवर कोणी स्नेही पाहिजे, याकरितां रघुनाथ नारायण यानें गोवळकोंडेकरांची दोस्ती करण्याचें जें राजकारण केलें आहे, तेंच पक्कें करावें. इकडे मादण्णापंत व कुतुबशहा यांसही, दिलेरखानाचे हाडवैरामुळें शिवाजीमहाराजांची दोस्ती करण्याची अर्थात्च इच्छा उत्पन्न झाली.

कर्नाटकचे मोहिमेवर निघण्यापूर्वी, आपले मागें आपले मुलुखाचा नीट बंदोबस्त रहावा ह्मणून, महाराजांनीं प्रथम खान जहान बहादूर यांस आंतून पैसे चारून त्यास वश करून घेतलें, व आपण बादशहाचे मांडलीकराजे आहोंत, व आह्मीं त्यास खंडणीदाखल पुष्कळ पैका देण्यास कबूल आहोंत, असा अर्ज सुभेदाराचे मार्फत महाराजांनीं बादशहाकडे पाठवून दिला, व त्यामुळें मोंगलांस तूर्त स्वस्थ केलें. पन्हाळ्याचे बाजूस निंबाळकर व घाटगे यांनीं पुन्हां उचल करूं नये, ह्मणून, नुकतेच महाराजांनीं नवीन किल्ले बांधले होते, ते त्या कामास बस होते; परंतु सिद्धी हा कोंकणांत वरचेवर समुद्रावरून येऊन त्रास देईल, ह्मणून त्याचे बंदोबस्ताकरितां महाराजांनीं अण्णाजी दत्तो सचीव याजबरोबर चांगली फौज देऊन त्यास कोंकणांत ठेविलें; व मागें महाराज दिल्लीस गेले असतां राज्याचा मुख्य अधिकार मोरोपंत पेशवा याचे स्वाधीन केला होता, तसा त्यांनीं यावेळींही केला; परंतु या खेपेस सचीव व पेशवा यांचेमध्यें कांहीं चमत्कारिक चुरस वाढून महाराजांचे मागें बराच त्रास उत्पन्न झाला.

मोहिमेस निघण्याची सर्व तयारी झाल्यावर, शिवाजी महाराज हे बरोबर तीस हजार स्वार व पन्नास हजार पायदळ इतकी फौज घेऊन निघाले. त्यांनीं आपण येत आहों हें कुतुबशहास कळविण्याकरितां, पुढें रघुनाथपंत पंडितराव व प्रल्हाद निराजी ( निराजीरावजीचा मुलगा ) यांस रवाना केलें. कुतुबशहाचे मुलुखांतून फौज जात असतां, त्यांनीं मुलुखास अगदीं उपद्रव देऊं नये, असा महाराजांचा अगदीं सक्त हुकूम होता. दाणा वैरण वगैरे सामान त्यांनीं विकत घ्यावें अशी त्यांस ताकीद होती. गोंवळकोंड्याचेजवळ महाराज जाऊन पोंहोंचतांच, मादण्णापंत त्यांस सामोरें येऊन त्यांच्या भेटी झाल्या. कुतुबशाहाही दादमहालावर आला. तेथें त्याची व महाराजांची भेट झाली. दोघांचें कांहीं वेळ भाषण होऊन एकमेकांचा विश्वास एकमेकांवर बसावा याबद्दल परस्परांची फार इच्छा दिसली. महाराज गोंवळकोंड्यास एक महिनाभर राहिले. दररोज परस्परांचे सरदार व मुत्सद्दी

यांच्या गांठी पडून, दोहों सरकारांचा कसा तह झाला असतां दोहों पक्षांस फायदा होईल याबद्दल चर्चा चाले. शेवटीं शिवाजी महाराज यांनीं कुतुबशहाचे मनांत भरवून दिलें कीं, दिल्लीचे बादशहाचें आणि विजापूरचे सुलतानाचें सध्यां सख्य झालें असून, त्या दोघांची, आपणां दोघांस बुडविण्याविषयीं मसलत चालली असेल, तेव्हां आपण एक विचारानें चाललों असतां आपला निभाव लागून फायदाही होणारा आहे. याप्रमाणें दोघांचा एक विचार झाल्यावर त्यांनीं आपसांत असें ठरविलें कीं, " कर्नाटकांतील स्वारीस महाराजांनीं स्वतःची फौज व शहाचा तोफखाना हीं घेऊन जावें ; व बाकी फौज शहानें आपले राज्यावर कदाचित् मोंगल चाल करून आले तर, त्यांचे बंदोबस्ता-करितां ठेवून सावधगिरीनें असावें. शेवटीं, स्वारी फत्ते होऊन शहाजी राजे यांचे मूळ जहागिरीपेक्षां विजापूरचे राज्यांतील जास्त मुलूख जो जिंकला जाईल, तो दोघांमध्यें वांटून घ्यावा. " यावेळीं शहाचें व महाराजांचें असेंही बोलणें झालें कीं, विजापूरचा प्रतिनिधि अबदुल करीम यास काढून टाकून, त्याचे जागीं मादण्णापंताचा भाऊ आकण्णापंत यास नेमावें. याप्रमाणें महाराजांच्या व सुलतानाच्या मसलती ठरून, शिवाजीमहाराजांची कर्नाटकाचे मोहिमेवर जाण्याची सर्व तयारी झाली. मादण्णापंत व कुतुबशहा यांनीं महाराजांस व त्यांचे सरदारांस मेजवान्या, वस्त्रें, अलंकार वगैरे देऊन त्यांस निरोप दिला. ( मार्च १६७७ ).

९. शिवाजीमहाराज गोंवळकोंडें सोडून दक्षिणेकडे चालले. तुंगभद्रा नदीचे कांठीं करनाळें, कडेंप वगैरे ठिकाणीं खंडण्या वसूल करून ते निवृत्तिसंगमावर गंगेचे स्नानास गेले. तेथून पायदळ हलक्या मजलांनीं पुढें जिंजीचे रोखानें रवाना करून देऊन, ते आपण स्वतः निवडक स्वारांनिशीं श्रीशैलाचें दर्शन घेण्यास पूर्वेकडे चालले. श्रीशैलाचें रम्य स्थान पाहून महाराजांस कांहीं वेळ असें वाटलें कीं, " आतां आपलें वय बरेंच झालें आहे. जन्मास येऊन जे कांहीं पराक्रम करावयाचे ते बहुतेक झाले. आतां यापुढें मोक्षाचें कांहीं

साधन करून देहाचें सार्थक करावें." असें सांगतात कीं, एके वेळीं त्यांचा असा निश्चय झाला कीं, श्रीस शिरकमल वाहून देह अर्पण करावा. इतक्यांत श्रीभवानी महाराजांचे अंगीं आविर्भाव पावून बोलूं लागली, 'तुला या गोष्टीपासून मोक्ष प्राप्त व्हावयाचा नाहीं. तूं हें कर्म करूं नकोस. तुझे हातून यापुढें आणखी पराक्रम घडविणें आहेत.' यानंतर देवी अंगांतून निघून गेल्यावर, सरकारकुनांनीं महाराजांस देवीची आज्ञा टिपून ठेविलेली वाचून दाखविली. त्यावरून 'श्रीची आज्ञा करणें प्राप्त' असें महाराजांनीं ह्मणून श्रीशैलास 'दहा बारा दिवस राहून व तेथें लक्ष ब्राह्मणभोजन व इतर दानधर्म करून, तेथून ते जिंजीकडे वळले. इतक्यांत त्यांची फौज दामुलचरीचे खिंडीनें कर्नाटकांत उतरली होती. महाराजांनीं तोफखाना वगैरे जड सामान, नरहरि बल्लाळ ह्मणून ब्राह्मण सरदार होता त्याचे स्वाधीन करून व त्याजपाशीं दहा बारा हजार मावळे देऊन, त्यास व्हेलोर (येल्लूर) येथील ठाण्यास वेढा घालण्यास पाठविलें, व आपण स्वत: घोडेस्वारांनिशीं मद्रासेवरून जिंजीकडे चालले. (मे १६७७). जिंजी येथें येऊन पोहोंचल्यावर, तेथील किल्ल्यावरील विजापूर सरकारचा अधिकारी अंबरखान यांचे मुलगे—रूपखान व नाझीरमहंमद यांशीं रघुनाथ नारायण यानें करार केल्याप्रमाणें, तो किल्ला महाराजांस मिळाला. या किल्ल्यावर महाराजांनीं रामजी नलगे यास हवलदार ह्मणून नेमिलें, व त्या प्रांतांतील किल्ले, कोट, ठाणीं वगैरे महाराजांनीं हस्तगत करून, तेथें विठ्ठल पिलदेव गोराडकर यास सुभेदार नेमिलें महाराष्ट्र देशांत किल्ल्यांच्या बंदोबस्ताकरितां ज्या व्यवस्था महाराजांनीं यापूर्वीच चालू केल्या होत्या, त्याच त्यांनीं कर्नाटक प्रांतांतही सुरू केल्या. जमिनीची मोजणी, प्रतबंदी व तिचे साऱ्याची आकारणी वगैरे करण्याच्या पद्धतीही महाराजांनीं या प्रांतांत महाराष्ट्रांतीलच चालू केल्या.

मराठे लोक आपले प्रांतांत उतरून ते मुलूख घेत चालले आहेत ही बातमी विजापूरसरकारचा त्रिनामली महालाचा शेरखान ह्मणून अधि

कारी होता त्यास लागून, तो पांच हजार निवडक फौजेनिशीं महाराजां-
वर चाल करून आला. दोहोंपक्षांचें चांगलें युद्ध होऊन, अखेर शेर-
खानाचा अगदीं मोड झाला. तो स्वतः कैद केला जाऊन, त्याचा
सर्व खजीना, हत्ती, घोडे वगैरे सर्व महाराजांस सांपडलें. इकडे
व्हेलोराचे किल्ल्यास नरहरि बल्लाळ यानें वेढा घातला ह्मणून मागें
सांगितलें आहे. त्याप्रमाणें त्यानें तो घालून, जवळ दोन डोंगर होते
त्यांजवर तोफा चढविल्या व त्यांचा मारा किल्ल्यावर चालू केला.
त्यामुळें कांहीं दिवसांनीं किल्ला त्याचे अधिकाऱ्यानें मराठ्यांचे स्वाधीन
केला. ( सप्टेंबर १६७७ ). नरहरि बल्लाळ यानें हे डोंगर बांधून
काढून, त्यांस "साजरा, गोजरा" अशीं नवीं नांवें दिलीं. याच
सुमारास, शहाजी राजे यांचे नाटकशाळेचे पुत्र संताजी राजे हे, व्यंकोजी
राजापासून निघून महाराजांचे भेटीस आले. त्यांचा महाराजांनीं चांगला
सत्कार करून, त्यांचेमध्यें भोसल्यांचे कुळाची हुषारी व थोर बुद्धि
आहे असें पाहून, त्यांस त्यांनीं जिंजीचे ठाण्यांत मुख्य ह्मणून नेमिलें.

६. यानंतर शिवाजी महाराजांनीं आपले सापत्न बंधू जे व्यंकोजी
राजे त्यांजकडे पत्र पाठविलें कीं, 'वडील शहाजी राजे यांनीं कैलास-
वास करून आज तेरा वर्षें झालीं. इतके काळांत त्यांनीं संपादन
केलेले तंजावर वगैरे जहागिरीचा व हत्ती, घोडे, जडजवाहीर वगैरे
दौलतीचा तुह्मींच सगळा उपभोग घेत आहां. या दौलतींत आमचा
अर्धा वांटा असतां, तुह्मीं तो इतके दिवस आह्मांस दिला नाहीं व
आह्मीं मागितला नाहीं; परंतु आतां आह्मीं या प्रांतीं मोहिमेवर
आलोंच आहों, तेव्हां तुह्मीं आतां आमचा वांटा आह्मांस द्यावा.
आह्मीं त्रिवेदी येथें येत आहों, तेथें आपण यावें, ह्मणजे भेटी होऊन
दोघांचे विचारें आपण दौलतीचे वांट्याचा निकाल करूं.' महाराजांचें
पत्र येण्यापूर्वींच व्यंकोजी राजे हे महाराजांचे स्वारीचा उद्देश जाणून
होते. त्यांनीं मदुऱ्याचा नाईक याशीं मसलत करून, शिवाजी महा-
राज हे वडिलोपार्जित जहागिरीचे वांट्यासाठीं लढाई करूं ह्मणतील तर,
त्यांशीं लढण्याकरितां त्यांनीं तयारी करून ठेविली होती; परंतु रघुनाथ

नारायण यानें नाईकास या कटांतून मोठे शिताफीनें फोडलें, यामुळें नाइलाज होऊन व्यंकोजी राजे हे महाराजांचे भेटीस आले. महाराजांनीं आपले सापत्न बंधूचा चांगला मान केला; परंतु दौलतीचे वांटणीची गोष्ट काढली असतां, व्यंकोजी राजे हे वरून नम्रभाव दाखवीत; परंतु ती करण्यास अखेर ते मुळींच कबूल होईनात. महाराजांचे एक वेळ मनांत आलें कीं, व्यंकोजी राजे यांस पकडून कैद करावें व आपला वांटा देईपर्यंत त्यांस सोडूं नये; परंतु अमळशानें महाराजांनीं विचार केला कीं, व्यंकोजी राजे हे आपण होऊन भेटीस आले आहेत, तेव्हां त्यांस कैद करणें हें आपले नांवलौकिकास शोभणार नाहीं; ह्मणून त्यांनीं आपले बंधूस आपले शिपाईप्यादे बरोबर देऊन, तंजावरास सुरक्षितपणें परत रवाना केलें; तथापि महाराजांनीं कांहीं वेळानें शामजीनाईक पुंडे व कोनेरीपंत यांस व्यंकोजी राजे यांजकडे तंजावरास पाठवून, त्यांजकडून राजे यांस बहुतप्रकारें समजाविलें कीं, ' आपापसांत गृहकलह वाढविण्यांत कोणासही फायदा नसून, उलटें नुकसान होणारें आहे; तेव्हां धर्मास स्मरून पितृधनाचा अर्धा वांटा आमचा आह्मांस द्यावा. जहागिरीचे वांट्याचा ह्मणजे आह्मीं कांहीं हिशेब समजतों असें नाहीं; परंतु वतन सोडून देणें ह्मणजे नांवास बट्टा लावून घेणें आहे, ह्मणून आह्मांस तें सोडतां येत नाहीं. ' परंतु व्यंकोजीराजे ह्यांनीं महाराजांचे माणसांस कांहीं निखालसपणाचें उत्तर न देतां तसेंच त्यांस परत पाठवून दिलें.

इकडे शिवाजी महाराज, व्यंकोजीराजे यांची त्रिवेदीस भेट घेऊन तेथून व्हेलोरास आले. ते येण्यापूर्वींच तो किल्ला नरहरि बल्लाळ याचे हस्तगत झाला होता. यानंतर महाराजांनीं महाराजगड व कर्नाटकगड हे घेतले, व तेथून ते कोल्हार, बाळापूर तालुक्यांत आले. तेथील कित्येक पाळेगार यांस जिंकून ते आर्नी येथें येऊन पोहोंचले. येथें वेदो भास्कर ह्मणून कोणी ब्राह्मण सरदार होता. त्यास येथें शहाजी महाराजांनीं ठेविलें असून, तो मोठा हुषार व शूर असा असे. तो महाराजांस शरण आला; त्यावरून त्यांनीं आर्नीचे कोटाचें काम

पूर्ववत् त्याजकडेसच ठेविलें. त्यास आठ पुत्र होते, त्यांपैकीं दोघांस महाराजांनीं आपले पदरीं ठेवून घेतलें. यापुढें १६७७ सालची अखेर होण्यापूर्वींच, महाराजांनीं शहाजी महाराजांचे जहागिरी मुलुखापैकीं कोल्हार, बेसकोटा, बंगरूळ, बाळापूर, सेरा ( सिरकटे ) वगैरे प्रांत जिंकून घेतले, आणि विजापूर सरकाराकडे कर्नाटकांतील जो भाग होता, त्यांत खंडणी वसूल करण्याचा, व जेथें ती न मिळेल तेथें गांव लुटण्याचा सपाटा चालविला.

७. इकडे दिल्लीस औरंगजेब बादशहाकडे खान जहान बहादूर यानें, शिवाजी महाराजांची खंडणी व तहाचा मसुदा पाठवून दिला ह्मणून मागें सांगितलें आहे, ती गोष्ट बादशहास पसंत पडली नाहीं. याच वेळीं दिलेरखानानें बादशहास अर्ज केला कीं, “ सरकारची परवानगी मिळेल तर, मी व विजापूरचा प्रतिनिधि अबदुल करीम असे मिळून गोंवळकोंड्यावर स्वारी करितों. ” बादशहास दुय्यमाचें बोलणें मान्य होऊन, त्यानें खान जहान बहादूर यास त्याचे सुभ्यावरून परत बोलाविलें व त्याचे जागीं दिलेरखानाचीच नेमणूक केली. दिलेरखान यानें लागलेंच विजापूरचे प्रतिनिधीस बरोबर घेऊन, त्यानें दोघांच्या फौजा एकत्र केल्या व गोंवळकोंड्यावर एकदम चाल केली. ही स्वारी अशा तऱ्हेनें एकाएकीं करण्यास मोंगलांस सबब ह्मणून, कुतुबशहानें शिवाजी महाराजांबरोबर नुकताच केलेला तह हीच होय; परंतु जेथें लढाई उकरूनच काढायाची, तेथें सबबीचीहीसुद्धां जरूर लागत नाहीं ! मादण्णापंतास हें भविष्य अगोदरच कळून आलें होतें, व ह्मणून त्यानें त्याचे निवारणार्थ चांगली कडेकोट तयारी करून ठेविली होती. मोंगल व विजापूरकर यांशीं गोंवळकोंडेकरांनीं उत्तम प्रकारें टक्कर देऊन त्यांनीं शत्रूचें अगदीं काहीं चालूं दिलें नाहीं; विजापूरचे फौजेचे या मोहिमेंत फार हाल झाले. त्यांस दाणागोटा वगैरे मिळेनासा झाल्यामुळें व पुष्कळांचा पगार सरकाराकडे थकला गेल्यामुळें ते अगदीं बिथरून गेले होते. त्यांस शत्रूंवर चालून नेण्याची अगदीं सोय राहिली नव्हती. इतक्यांत अबदुल करीम हा एकाएकीं दुख-

णाईत होऊन तो कांहीं वेळानें मरण पावला ( जानेवारी १६७८ ). मग तर विजापूरकरांमध्यें जो घोंटाळा माजला, तो कांहीं विचारूंच नये! अगोदरच त्यांचेमध्यें तट पुष्कळ होते, आणि आतां तर त्यांस अगदीं धरबंद नाहींसा झाला. शेवटीं दिलेरखानानें मध्यें पडून त्यांमधील तट कांहींसे मोडून, अबदुल करीम याचे जागीं सिद्धीजोहार याचा जांवई मसाऊदखान यास नेमिलें. नवीन प्रतिनिधि हा हबशी असून तो आडोनी येथील जहागीरदार होता. त्याजपाशीं पुष्कळ दौलत होती व याच कारणामुळें मुख्यत्वें त्याची प्रतिनिधीचे जागीं नेमणूक झाली. त्यानें दिलेरखानाची मागील सर्व बाकी चुकती करून, सैन्याचा थकलेला सर्व पगार देऊन टाकण्याचा पतकर घेतला. त्याचप्रमाणें दिलेरखानापाशीं त्यानें कबूल केलें कीं, "मागें कावसखानाबरोबर जो करार ठरला होता--कीं शिकंदर आदिलशाहा हा दिल्लीचे बादशहाचा मांडलिक राजा असा समजावा व त्याची बहीण पातशहा बिबी हिचें बादशहाचे पुत्राबरोबर लग्न करून द्यावें—तो मी अमलांत आणीन ; याशिवाय शिवाजी महाराजांशीं मी कोणत्याही प्रकारें संबंध ठेवणार नाहीं, व नेहमीं तुह्मीं जसा सल्ला सांगाल त्याप्रमाणें मी वागेन."

याप्रमाणें विजापूरकरांमध्यें बखेडा उत्पन्न झाल्यामुळें व गोंवळकोंडेकरांची लढाईची तयारी कडेकोट असल्यामुळें, दिलेरखानास या खेपेस अपयश येऊन, तो आपले मुलुखांत पेंडगांव येथील आपले छावणीकडे परतला, व मसाऊदखान हाही आपली फौज घेऊन, विजापुरास माघारा गेला. त्यानें सैन्याचे थकलेले पगारापैकीं कांहीं पैसा दिला; परंतु बाकीचा तो कांहीं देईना, व घोडेस्वारापैकीं त्यानें पुष्कळ चाकरींतून काढून टाकिले. यामुळें पुष्कळ लोक मोरोपंत पेशवा याचे सैन्यांत जाऊन राहिले, व कांहीं मोंगलांचे सैन्यांत शिरले. विजापुरास चोहोंकडे लोक नाइराज होऊन जाऊन, मसाऊदखान हा त्यांचे अगदीं मनांतून उतरून गेला. यामुळें त्यानें अंमळ धैर्य करून, पादशहा बिबी, जी त्यानें मोंगलांकडे पाठवून देण्याचें कबूल केलें होतें, तीस

तिकडे पाठविण्याचें नाकारलें, व यामुळें लोकांचीं मनें त्याजवर पुनः बसूं लागलीं.

८. शिवाजी महाराज ह्यांस गोवळकोंड्यावर झालेले स्वारीचें वर्तमान पोहोंचतांच, त्यांनीं कर्नाटकांतून निघून स्वदेशीं परत येण्याची तयारी केली. त्यांनीं जिंजी व तिचे भोंवतालचा जिंकलेला मुलूख हीं संताजी राजे व रघुनाथ नारायण यांचे स्वाधीन करून, त्यांचे मदतीस हंबीरराव याजबरोबर बरीच फौज देऊन, त्यास तो प्रांत चांगले वहिवाटीस येईपर्यंत ठेविलें, व स्वतः बाकीचें सैन्य बरोबर घेऊन ते बल्लारी येथें परत आले. तेथें मलबाई देसाईण हिनें महाराजांचे कांहीं लोक दाणावैरण गोळा करण्यास गेले असतां त्यांस ठार मारिलें. त्यावरून कज्जा उपस्थित होऊन, महाराजांनीं तिचे ठाण्यास मोर्चे लाविले; परंतु देसाईण बरीच जबर असल्यामुळें, तिनें बल्लारीचा किल्ला सत्तावीस दिवसपर्यंत भांडविला. शेवटीं ती जेर होऊन शरण आल्यावरून, तिजकडे एक दोन गांव ठेऊन, बाकी मुलूख महाराजांनीं आपले ताब्यांत घेतला. बल्लारीहून महाराज कोपल येथें येऊन त्यास वेढा घालून त्यांनीं तें घेतलें. यानंतर, बहादूर बेंडा, हेंही महाराजांनीं काबीज केलें. या नवीन जिंकलेले प्रांताचा बंदोबस्त करण्याकरितां त्यांनीं जनार्दनपंत यास नेमून, आपण तुरगळ येथें येऊन मुक्काम करून राहिले. महाराज या गांवीं असतां त्यांस बातमी लागली कीं, आपले मागें व्यंकोजीराजे यांनीं कर्नाटकांत संताजीराजे व रघुनाथ नारायण यांजवर कित्येक पाळेगारांचें साहाय्य घेऊन हल्ला केला; परंतु त्यांत त्यांचाच अगदीं मोड होऊन गेला. हें वर्तमान ऐकून महाराजांनीं व्यंकोजीराजे यांस पत्र पाठविलें कीं, ‘ तुह्मीं आह्मांस वडिलोपार्जित दौलतीचा वांटा देण्याचें नाकारल्यावरून, आह्मांस वडिलांचे जहागीर मुलूख जिंकणें भाग पडलें. तुह्मीं आमचे सरदारांवर आपण होऊन हल्ला केला, त्यामुळें त्यांस आपणांशीं लढणें भाग झालें. तुह्मीं हलके लोकांचे नादीं लागून सरळभाव टाकून वेडेपणानें वांकड्यांत शिरला, हें तुह्मीं अगदीं गैर केलें. तुमचे आमचे आपापसांतील

लढाईंत तुमचे पक्षाकडील जे मुसलमान शिपाई पडले, त्याबद्दल आह्मांस वाईट वाटत नाहीं; परंतु प्रतापजीराजे, भिवजीराजे, शिवाजीपंत डबीर वगैरे शूर मराठे सरदार जे या युद्धांत पडले, त्यांबद्दल मला अतिशय वाईट वाटतें. आपण यापेक्षां एक चित्तानें वागलों असतां त्यांत दोघांचेंही हित आहे. तुह्मीं जर आमचे विचारानें चालाल व कर्नाटकांतील सर्व प्रांत आमचे स्वाधीन कराल, तर त्याच्या बदला आह्मीं पन्हाळ्याचे बाजूचा तितकाच मुलूख तुह्मांस देऊं, किंवा तुमची मर्जी असल्यास, कुतुबशहा याचे प्रांतांत कोठें ह्मणाल तेथें तीन लक्ष होनाचा मुलूख तुह्मांस देववूं'.

महाराजांचें हें पत्र व्यंकोजी राजे यांस पावल्यावर त्यांस वाटलें कीं, आपण कृत्य केलें तें अविचाराचें होय. आतां तरी आपले वडील बंधू आपण होऊन थोरपणानें तह करूं ह्मणतात, तेव्हां आतां अधिक वेडेपणांत शिरण्यानें आपला नाश होईल. यावरून त्यांनीं रघुनाथपंताशीं तहाचें बोलणें लावण्याकरितां माणसें पाठविलीं. त्यांस त्यानें उत्तर दिलें कीं, "आह्मीं आतां शिवाजी महाराजांचे पदरीं आहों, तेव्हां महाराजांचे आज्ञेवांचून आह्मांस तुह्मांशीं तहाबद्दल बोलतां येणार नाहीं." कांहीं वेळानें महाराजांचें पत्र रघुनाथपंतासही आलें कीं, "व्यंकोजी राजे हे किती झालें तरी आमचे बंधूच होत. त्यांस तंटा न लावितां आब राखून त्यांशीं कसें तरी सख्य करावें." याप्रमाणें शहाणपणानें आपले बंधूस व सरदारांस वेगळे वेगळे तऱ्हेनें सामोपचाराचीं पत्रें लिहून महाराजांनीं गृहकलह मिटविला. रघुनाथपंतास महाराजांचें पत्र पावतांच, त्यानें व्यंकोजी राजे यांजकडे जाऊन त्यांशीं तह ठरविला. त्यांत असें ठरलें कीं, व्यंकोजी राजे यांजकडे तंजावर व शहाजीराजे यांचे जहागिरी मुलूख हे असावेत; परंतु त्यांनीं महाराजांस दरवर्षी जहागिरीचे उत्पन्नाचा अर्धा वांटा देत जावा. त्याचप्रमाणें शहाजी राजे यांचे जें जडजवाहीर असेल; त्यांतीलही निम्मे हिस्सा व्यंकोजीराजे यांनीं महाराजांस द्यावा. येणेंप्रमाणें तह करून, रघुनाथपंत व संताजीराजे हे जिंजीस परत गेले.

शिवाजी महाराज तुगरळ येथें असतां, विजापूरचा सरदार बावली-खान व निंबाळकर व घाटगे, हे पन्हाळ्याचे मुलखांत शिरून, त्यांनीं तेथें पुष्कळ लुटालूट करून, ते कऱ्हाडाकडे चालले. त्यांजवर महाराजांनीं, निळोजी काटकर याजबरोबर फौजेची एक टोळी देऊन पाठविलें. त्यानें विजापूरचे फौजेस कुर्ली (* दुर्गाबाज) येथें गांठून, त्यांची अगदीं दाणादाण करून, त्यांस पळवून लाविलें. निळोजीनें त्यांचेपासून, ते घेऊन जात असलेली लूट परत आणून, महाराजांपाशीं हजर केली असतां, त्यांनीं, ज्या ज्या लोकांचा तो माल त्यांनीं लुटून नेला होता, त्यांचा त्यांस, आपणाला कांहीं एक तनसडी-सुद्धां न ठेवून घेतां, सर्व जशाचा तसाच परत देऊन टाकला.

यानंतर महाराजांनीं बल्लारी, कोपळ, बहादुर, बेंग वगैरे प्रांतांत, जनार्दनपंत सुमंत यांस बंदोबस्ताकरितां ठेविलें ह्मणून मागें सांगितलें आहे. त्यावर विजापूरचे दोन सरदार हुसेनखान माईणा व लोदीखान हे चालून येत आहेत असें महाराजांस कळतांच, त्याचे मदतीस महाराजांनीं कांहीं फौज परत पाठविली व आपण सुरक्षितपणें, स्वदेश सोडल्यापासून अठरा महिन्यांनीं, रायगडास परत येऊन दाखल झाले. इकडे जिंजीकडील मुलखाचा बंदोबस्त झालासा पाहून रघुनाथपंतानें, हंबीरराव सेनापति यास फौजेसुद्धां स्वदेशीं रवाना केलें.

हंबीरराव हा आपले मुलखाजवळ येऊन पोंचला आहे असें जनार्दनपंत सुमंत यास कळतांच, त्यानें हंबीरराव याशीं संकेत करून, दोघांनीं, विजापूरचे सरदार हुसेनखान माईणा व लोदीखान यांस कृष्णा व तुंगभद्रा या नद्यांमधील दुआबांत एकाएकीं गांठून त्यांजवर असा जबरदस्त हल्ला केला कीं, विजापूरचे फौजेचा अगदीं मोड झाला. हुसेनखान माईणा व लोदीखान हे मराठ्यांचे हातीं सांपडले व त्यांचे पांचशे घोडे व पांच हत्ती हे मराठ्यांस या लढाईत मिळाले. यानंतर हंबीरराव व जनार्दनपंत यांनीं सर्व दुआब प्रांत जिंकून तेथील कित्येक

* चिटणीस यांचे बखरींत दुर्गाबाज हें गांव दिलें आहे.

पाळेगार व देशमुख जे विजापूरचे सरकारास न जुमानून त्यास कधीं खंडणी देत नसत, त्यांस अगदीं जेर करून शरण आणिलें व आम्हीं महाराजांस वक्तशीर खंडणी देत जाऊं, म्हणून त्यांजकडून कबूल करून घेतलें. इकडे विजापुरास नवीन प्रतिनिधि मसाऊदखान याचे स्वतःचे राज्यांतच तंटेबखेडे असल्यामुळें व त्यानें पुष्कळ फौज कमी करून टाकिली असल्यामुळें, त्यास मराठ्यांपासून आपले प्रांत परत जिंकून घेण्याची अर्थात्च सवड राहिली नव्हती. इकडे गोंवळकोंड्यास, शिवाजी महाराज कर्नाटकची मोहीम फत्ते करून आले ही बातमी कळतांच, मादण्णापंतानें महाराजांकडे वकील रवाना करून, त्याजबरोबर महाराजांस वस्त्रें, अलंकार वगैरे आनंददर्शक नजराणे पाठवून दिले. कुतुबशहास कर्नाटकांतील जिंकलेले मुलुखाचा निम्मे हिस्सा द्यावयाचा, तो काय कारणानें राहिला हें कांहीं समजत नाहीं; तथापि यानंतरही महाराजांचे व गोंवळकोंडेकरांचे जें सख्यच चाललें होतें, त्यावरून महाराजांनीं, कुतुबशहाशीं दुसरी कांहीं तडजोड केली असावी असें वाटतें; परंतु महाराजांनीं शहास या कामांत अगदीं पोराप्रमाणें फसविलें, असें ग्रांटडफ वगैरे इंग्लिश इतिहासकार म्हणतात, त्यास विशेष आधार आहेसें दिसत नाहीं.

शिवाजी महाराज हे कर्नाटकांत स्वारीवर गेले असतां, कोंकणांत जंजिऱ्याचे सिद्धचाबरोबर मधून मधून लढाई चाललीच होती. सिद्धयास सुरतेहून मोंगल लोकांचे आरमाराची मदत असून, तो वारंवार कोंकणांत समुद्रकांठीं उतरून, महाराजांचे प्रांतांत लुटालूट करी. इकडे उलटपक्षीं मोरोपंत पेशवा यानें सिद्धी याचें आरमार जाळून टाकण्याचा प्रयत्न चालवून, जंजिऱ्यावर तोफांचा मारा चालूच ठेविला होता. शिवाय दोवांपक्षांचे जहाजांच्या गांठीं पडल्या म्हणजे मोठ्या निकराच्या चकमकी झडत. येणेंप्रमाणें सिद्धी व मराठे यांमध्यें मोठे चुरसीची लढाई चालू होती. याच सुमारास जंजिरा येथील मुख्य अधिकारी सिद्धी संभोल यास औरंगजेब बादशहाचे हुकुमावरून काढून टाकून, त्याचे जागीं सिद्धी कासीम यास नेमिलें. यासही बादशहाकडून याकूबखान हा किताब मिळाला.

९. विजापूर येथें मसाऊदखानास प्रतिनिधी नेमून त्याजपासून कित्येक गोष्टी कबूल करून घेतल्या वगैरे हकीकत, दिलेरखानानें जेव्हां बादशहास लिहून कळविली, तेव्हां ती वाचून बादशहा नाखुष झाला. त्यावरून त्यानें खानास ताबडतोब उत्तर पाठविलें कीं, "तुह्मीं विजापुरास केलेली व्यवस्था आह्मांस अगदीं पसंत नाहीं. तिजपेक्षां तुह्मीं प्रथम आपले-तर्फेचे जे तेथें सरदार आहेत, त्यासाठीं चांगली तरतूद करून व सैन्याचा थकलेला पगार देऊन टाकून, तें सर्व राज्यच आपले आश्रयाखालीं घ्यावयाचें होतें. अजूनही तुह्मांस आपली चूक सुधारून घेतां येईल. तुह्मीं घोडेस्वारांचा थकलेला पगार एकदम देऊन टाका, आणि त्यांजवरचे सरदार जितके आपले पक्षास आणवतां येतील तितके आणा." बादशहा एवढेंच करून राहिला नाहीं. त्यानें दिलेरखानास दक्षिणेचे सुभ्यावरून काढून टाकून, त्याचे जागीं आपला पुत्र सुलतान मोआझिम यास पुनः नेमिलें; मात्र सुभ्याची सर्व फौज खानाचेच हातीं राहूं दिली. बादशहाची मर्जी अंमळ गेली असें दिलेरखानानें पाहून, तो यापुढें कांहींतरी मोठी कामगिरी बजावून त्याची मर्जी पुन्हां संपादावी अशा खटपटीस लागला. त्यानें लागलाच विजापुरास वकील पाठवून, "राजकन्या पातशहा बिबी ही प्रथम आमचे स्वाधीन करा, नाहीं तर आमच्या फौजा विजापुरावर रवाना झाल्या ह्मणून समजा" असा मसाऊदखानास मोठा पेंच लाविला. ही राजकन्या विजापूर येथील लोकांस फार आवडत असल्यामुळें, तीस अशा तऱ्हेनें मोंगलांचे स्वाधीन करणें, ह्मणजे आपणांस अत्यंत लांछन आहे असें त्यांस वाटूं लागलें. जे सरदार बादशहाचे पक्षास अगोदरच वळवून घेतलेले होते, ते अर्थात्च कांहीं वेळानें, पातशहा बिबीस मोंगलांकडे पाठवून देण्यास तयार झाले; परंतु दुसरे जे कांहीं सरदार होते, ते जरी मसाऊदखानास अनुकूल नव्हते, तरी त्यांस मोंगल लोकांचा अगदीं तिटकारा वाटत असे. विजापुरास येणेंप्रमाणें अनेक तट उत्पन्न होऊन घोंटाळा चालला असतां, बादशहाचा वकील मलिक बरखोरदार यानें, सय्यद मुखतूम ह्मणून एका सरदारास चिथावून देऊन, त्याजकडून एक मोठी फौज गोळा केली, आणि त्याजकडून राजकन्येस

मोंगलांचे स्वाधीन करण्याविषयीं प्रतिनिधीस मोठा नेट लाविला. मसाऊदखान याचे मनांत राजकन्येस द्यावयाचें नव्हतें; परंतु इतर सर्व लोक त्याजवर उलटले असून त्याचेजवळ फारशी फौज नव्हती, यामुळें त्याचा इलाज चालेना. अशा प्रसंगीं राजधानींतच मोठें युद्ध माजायाचें; परंतु राजकन्या मोठी समजूतदार व थोर मनाची असल्या-मुळें, ती जेथें फौजेसह सरदार जमले होते, तेथें स्वतः जाऊन ती ह्मणाली कीं, "आपापसांत तुह्मीं तंटे कशाला माजविता? माझेकरतांच जर एवढें भांडण असेल व त्याजकरितांच शहराची खराबी व्हावयाची असेल, तर मीच स्वतः होऊन मोंगलांचे छावणीस जातें. माझें काय होईल तें होवो! मी गेल्यानें तरी माझे भावाचें, विजापूरचे राज्याचें व इतर लोकांचें बरें होवो ह्मणजे झालें!!" विजापूरचे मुसलमान लोकांत अजून ह्या थोर *राजकन्येची गोष्ट प्रसिद्ध असून, त्या लोकांत तिची चांदबिबीप्रमाणेंच मोठी चहा आहे, व ती अगदीं वाजवी आहे असें कोणीही कबूल करील.

बिचारे राजकन्येस जें वाटलें होतें कीं, आपण मोंगलांचे स्वाधीन झालों ह्मणजे आपले राज्यावरचें संकट टळेल, तें अगदीं व्यर्थ होतें! हव्यासी व नीच अशा दिलेरखानास अशा राजकन्यारत्नाची काय पाड? बिचारी पादशहा बिबी ही विजापुराहून मोंगलांचे छावणी-कडे येण्यास निघण्याचे अगोदरच, मोंगलांची फौज विजापुराकडे रवाना झाली होती. राजकन्या मोंगलांचे छावणींत येऊन पोंहोंचतांच, दिले-रखानानें तिजबरोबर कांहीं शिपाई प्यादे देऊन तीस औरंगाबादेस रवाना केलें; परंतु राज्यकन्या स्वाधीन होतांच मोंगलांची फौज माघारी जावयाची, ती न जातां ती विजापुराकडे तशीच चालली (१६७९). मसाऊदखानास ही बातमी कळल्यावर, तो मोठे गोंध-ळांत पडला. त्यास या गोष्टीस काय तोंड काढावी हें सुचेना! शेवटीं त्यानें, शिवाजी महाराजांकडेस साहाय्य मागण्याकरितां माणसें

---

* ही गोष्ट वाचून कृष्णाकुमारीचे गोष्टीची आठवण होते.

पाठविलीं. त्यांस महाराजांनीं सांगितलें कीं, " मी मोंगलांचे फौजे-वर प्रत्यक्ष हल्लाच करून ह्मणा किंवा त्यांचे मुलुखांत शिरून तिकडे दंगा उठवून देऊन ह्मणा, ती तुमचा मुलूख सोडून माघारी जाईल अशी तजवीज करून तुमचें साहाय्य करितों. तुह्मी अगदीं निर्धास्त रहा. "

१०. महाराजांनीं ताबडतोब पन्हाळा येथें आपले घोडेस्वारांची एक मोठी फौज गोळा करून, ते विजापुराकडे चालले ; परंतु मोंगलांचे छावणीपासून बारा कोस दूर असतां महाराजांनीं विचार केला कीं, शत्रूचे सैन्यांत पठाण जातीचे शिपाई फार असून, त्यांशीं हाताहातीं लढाई केल्यानें आपले फौजेचा उगाच फार नाश होईल, त्यापेक्षां दौलताबाद, जालना वगैरे मोंगलांचे मुलुखांत शिरून तिकडे दंगा उसळून दिला असतां, मोंगलांची फौज सहजच स्वतःचे मुलुखाचे रक्षणार्थ विजापूरचा वेढा उठवून परत जाईल. याप्रमाणें महारा-जांनीं एकदम आपले फौजेचा रोंख फिरवून, त्यांनीं मोठ्या झपाट्यानें भीमा नदी उतरून गोदावरी नदीपर्यंत सर्व प्रांत लुटून जाळून फस्त केला. दिलेरखानास हें वर्तमान कळलें, तरीही तो विजापूरचा वेढा उठवीना. त्यावरून शिवाजी महाराजांनीं गोदावरी नदीही उतरून जाऊन मोंगलांचे तिकडील प्रांतांत पुनः दुसरी भरारी मारली. त्यांनीं जालना शहरावर हल्ला करून जवळच औरंगाबादेस सुलतान मोआझिम असतां, त्याची पर्वा न धरितां तें शहर स्वस्थपणें तीन दिवस लुटलें. या शहरांत महाराजांस पुष्कळ लूट मिळाली. जेथें जेथें ह्मणून द्रव्य सांपडेल, तें तें स्थळ अगदीं खणून लुटलें. असें सांगतात कीं, पीर किंवा मुसलमान लोकांचे महंत यांची पवित्र मानलेलीं स्थानें, जीं महाराजांनीं यापूर्वीं कधीं लुटलीं नव्हतीं, तींसुद्धां या खेपेस त्यांचे तडाक्यांतून वांचलीं नाहींत! येणेंप्रमाणें महाराज मोठी लूट गोळा करून ती पटागडाकडे चालवून नेत असतां, सुलतान मोआझिम यानें चोहोंकडून सुमारें दहा हजार फौज गोळा करून, ती रणमस्तखान, आसादखान व झांबितखान यांजबरोबर देऊन त्यांस

मराठ्यांचा पाठलाग करण्यास पाठविलें. मोंगल सरदारांची व महाराजांची गांठ संगमनेराजवळ पडली. तेथें उभय पक्षांचें मोठें निकराचें युद्ध झालें. प्रथम संताजी घोरपडे यानें कांहीं उतावीळपणानें मोंगलांवर हल्ला केला असतां, तो फसून मराठ्यांचें सैन्य मागें हटून त्यांत कांहीं घोंटाळा झाला. त्यांचा पंचहजारी सिदोजी निंबाळकर हाही पडला. सैन्यांत अव्यवस्था झालेली पाहून महाराज स्वतः पुढें सरसावले, व बरोबर निवडक स्वारांचा जमाव घेऊन व कांहींसे जिवावरही उदार होऊन, त्यांनीं शत्रूवर अशी निकराची चाल केली कीं, तेणेंकरून मोंगलांचें सैन्य फुटून चोंहोंकडे पळूं लागलें. येणेंप्रमाणें महाराजांनीं आपले अंगमेहनतीनें हा प्रसंग पार पाडला. मोंगलांचे फौजेचा पराजय झाला खरा, तथापि महाराज पश्चाकडे पुनः चालूं लागले असतां, शत्रूंच्या चोहोंकडून टोळ्या येऊन त्या एकत्र होऊन त्यांजवर हल्ला करूं लागल्या. राजा जयसिंग याचा नातू किसनसिंग हा, महाराज ज्या खिंडीनें उतरून जाणार होते, तीच अडवून बसला. आतां लढाई करावी तर शत्रूचें सैन्य जमतां जमतां अतिशयच मोठें झालें. येणेंप्रमाणें महाराज मोठे संकटांत पडले असतां, त्यांतून त्यांस त्यांचे एका वाटाड्यानें मोठे युक्तीनें पार पाडलें. त्यानें महाराजांचें सैन्य मोंगलांस माहित नसलेल्या अशा एका आडवाटेनें डोंगरांतून घेऊन जाऊन, शत्रूंचे पुढें कित्येक कोस आबाडीस आणिलें व त्यामुळें मराठ्यांचें सैन्य, शत्रंनीं त्यांस गांठण्यापूर्वीच, पश्चास जाऊन सुरक्षितपणें पोहोंचलें. मोंगलांचे फौजेची येणेंप्रमाणें शिकार चुकून, ती नाउमेद होऊन परत औरंगाबादेस गेली. शत्रू निघून जातांच महाराजांनीं कोंकणांतून कांहीं पायदळ बोलावून, तें मोरोपंत पेशवा याजबरोबर देऊन व त्याशिवाय कांहीं घोडेस्वारही देऊन, त्यास पश्चाशेजारचे किल्ले काबीज करण्यास हुकूम केला. यावरून पेशव्यानें त्या प्रांतांतील सत्तावीस किल्ले हस्तगत केले.

११. शिवाजी महाराज कांहीं दिवस पश्चास येऊन राहिले न राहिले तोंच, विजापूरचा प्रतिनिधि मसाऊदखान याजकडून सांडणी-

स्वार पत्र घेऊन आला कीं, " दिलेरखान तर हट्टास पडून तो वेढा कांहीं उठवीत नाहीं. तो अगदीं कोटानजीक येऊन भिडला. यावेळीं तुह्मीं कांहीं दुसरा विचार न पाहतां इकडे निघून येऊन, विजापूरची पातशाही राखिली पाहिजे. " हें पत्र पावतांच महाराजांनीं पुनः विजापूराकडे कूच करण्याची तयारी केली; परंतु तिकडे जात असतां वाटेंतच त्यांस एक दुःखकारक बातमी समजली कीं, त्यांचे ज्येष्ठ चिरंजीव संभाजी राजे हे पळून जाऊन दिलेरखान यास जाऊन मिळाले. ह्या अरिष्टाचें निवारण लवकरच केलें पाहिजे असें महाराजांस वाटून, त्यांनीं हंबीरराव यास फौज घेऊन तसेंच पुढें विजापुराकडे जाण्यास हकूम केला, व आपण स्वतः पन्हाळ्यास जाऊन पुत्रास ताळ्यावर आणण्याचे खटपटीस लागले.

शिवाजी महाराजांस दोन राण्यांपासून दोन पुत्र झाले होते—वडील सईबाईसाहेब, ह्यांजपासून वडीलपुत्र संभाजी राजे व धाकट्या सोयराबाई साहेब ह्यांजपासून धाकटे पुत्र राजारामसाहेब. ह्या राजपुत्रांनीं आपले मागें मराठी राज्याचा चांगला सांभाळ करून त्याचा दिवसेंदिवस उत्कर्ष करावा, व आपण जी धर्मस्थापना केली, ती त्यांनीं वृद्धिंगत करावी, ह्मणून शिवाजी महाराजांनीं त्यांस उत्तम शिक्षण देण्याचा यत्न केला. त्यांस थोडेंबहुत लिहिणें वाचणें शिकवून घोड्यावर बसणें, तिरंदाजी, तालीम, शस्त्रविद्या वगैरे उपयुक्त गोष्टींचा त्यांजकडून अभ्यास करविला. उत्तम वृद्ध सेवक हे त्यांचेजवळ ठेऊन, चांगले पंडितांचा सहवास त्यांस घडावा असें केलें. त्यांस महाराजांनीं नित्य चांगले लोकांची संगत धरावी, नीच व दुर्व्यसनी लोकांचा कधीं संपर्क लागूं नये, त्याचेयोगानें आपला, आपले कुळाचा व राज्याचा असा सर्वांचा नाश होतो, वगैरे बोधाच्या गोष्टी, पुराणांतील दुर्योधन, रावण, वगैरे लोकांचे दाखले देऊन वारंवार सांगाव्या. त्यांस राज्यकारभार माहीत व्हावा ह्मणून, त्यांस दरबारांत घेऊन महाराज बसत असत. शिवाय रामदासस्वामींचे दर्शनास व सहवासास महाराज पुत्रांस वारंवार पाठवीत असत; परंतु महाराजांची सुशिक्षणाची ही सर्व

खटपट संभाजी राजे यांचेसंबंधानें बहुतेक व्यर्थच झाली. हा राजपुत्र स्वभावताच क्रूर व मूर्ख असून, त्याची आई सईबाईसाहेब ह्या, तो दोन वर्षांचा असतांच सन १६५९ सालीं मरण पावल्यामुळें, चांगल्या आईचे शिक्षणाचे जे कित्येक सुसंस्कार मुलाचे मनावर घडतात, ते अर्थात्च संभाजी राजे यांचे मनावर घडले नाहींत. यामुळें ते हळूहळू स्वछंदी होऊन वयांत आल्यावर, ते महाराजांचे कह्यांत फारसे राहीनातसे झाले. राजपुत्रानें ह्या सुमारास एके दिवशीं, राजवाड्यांत हळदकुंकवाचा समारंभ होत असतां, एका ब्राह्मण जातीचे स्त्रीवर बलात्कार केला. महाराजांस परस्त्रीअभिलाषाचा फारच तिटकारा असे, आणि ब्राह्मणज्ञाती तर त्यांस अत्यंत पवित्र व पूज्य वाटत असल्यामुळें, पुत्राचें हें दुष्ट कृत्य ऐकून त्यांस त्याचा अतिशय राग आला. ते मोठे तिरस्कारानें बोलले, "हे आमचे पुत्र !! पूर्वजन्मीं कोणतें पापाचरण झालें ह्मणून हे आमचेच पोटीं उत्पन्न झाले ! आमचे मागें हे सर्व राज्याचे अधिकारी होणार ! प्रजा हीं राजाचीं अपत्यें, आणि यांची तर ही राक्षसी वागणूक !—पुत्र झाला ह्मणून काय झालें ? शिक्षाच करीन."

महाराजांचा आपणांवर फार राग झाला व ते बोलल्याप्रमाणें शिक्षाही करवितील अशी संभाजीराजे यांस भीति वाटून, ते मागें सांगितल्याप्रमाणें, कांहीं शिपाई माणसें बरोबर घेऊन दिलेरखानाचे छावणीकडे पळून गेले. शिवाजी महाराजांचा पुत्र बापावर रुसून आपणांकडे आला, ही गोष्ट आपणांस फार फायद्याची झाली असें वाटून, दिलेरखानानें त्याला चांगला मान करून व त्यास मोठी नेमणूक करून देऊन त्यास आपलेपाशीं ठेवून घेतलें. त्यानें ही आनंदकारक बातमी बादशहास तात्कडतोब लिहून पाठविली, व सध्यां मराठे लोक इतके बळावर चालले आहेत, तर त्यांत फूट पाडण्याकरितां संभाजी राजे यांस, त्या लोकांचे एका पक्षाचे मुख्य करून त्यांस आपण पाठबळ दिलें असतां, त्यांचे हांतून मराठ्यांचे किल्ले वगैरे घेण्यास सहज बरें पडेल, असें दिलेरखानानें आपलें मत बादशहास कळविलें. खानास पक्की खात्री वाटली कीं, बादशहाचीं

विजापूर व गोंवळकोंडें येथील दरबारांत अशींच कुटिल कारस्थानें नेहमीं चालू असतात, तेव्हां आपण सुचविलेली मसलत तो मोठे हौसेनें मान्य करील. ह्मणून दिलेरखानानें बादशहाचे हुकुमाचीसुद्धां वाट न पहातां, त्यानें संभाजी राजे यांस मराठ्यांचा राजा असें जाहीर करून व त्यांजबरोबर आपले फौजेंतूनच एक टोळी देऊन त्यांस भोपाळगड घेण्यास रवाना केलें. किल्ल्यास मोर्चे लावून संभाजीराजे हे किल्ल्यासमोर उभे राहिले. त्यावेळीं किल्ल्यावर हवालदार फिरंगाजी नरसाळा, ज्यानें मागें सन १६६२ सालीं चाकण किल्ला मोठे शौर्यानें शाहिस्तेखानाबरोबर लढविला, तो होता. त्यास व किल्ल्यावरील इतर माणसांस पंचाईत पडली कीं, किल्ल्यावरून गोळीबार केला तर खालीं किल्ल्यासमोरच महाराजांचे चिरंजीव उभे; त्यांस गोळी वगैरे लागून कमी जास्त कांहीं झालें तरी पंचाईत! शिवाय संभाजी राजे यांनीं किल्लेदारास सांगून पाठविलें कीं, “ बरे बोलानें किल्ला आमचे स्वाधीन करा, नाहीं तर सर्वांचा शिरच्छेद करीन. ” त्यावरून किल्ल्यावरील लोकांनीं विचार केला कीं, किल्ला सोडून जाणें बरें. मग बहुतेक लोक रात्रीं किल्ल्यांतून पळून गेले. थोडे जे किल्ला धरून राहिले, त्यांस दुसरे दिवशीं संभाजी राजे यांनीं पकडून आणून. कोणाचे उजवे, कोणाचे डावे असे हातपाय तोडले. असें क्रूर कर्म करून व किल्ला हस्तगत करून, राजे हे दिलेरखानाचे छावणीकडे गेले.

मागें सांगितल्याप्रमाणें, शिवाजी महाराज हे पन्हाळा किल्ल्यावर येऊन, त्यांनीं पुत्राची समजूत पाडण्याकरितां कांहीं चतुर माणसें संभाजी राजे यांचेकडे रवाना केलीं. त्यांजकडून महाराजांनीं पुत्रास सांगविलें कीं, ‘ आज जन्मभर इतकी खटपट करून आह्मीं जें राज्य संपादन केलें, तें केवळ तुह्मांसाठींच नव्हे काय? आमचें वय दिवसेंदिवस उतार होत चाललें आहे, तेव्हां आमची इच्छा आहे कीं, तुह्मीं सर्व राज्यकारभार संभाळून असावें. तें न करितां तुह्मीं यवनांस मिळून आपलें राज्य पुनः त्यांचेच घरांत घालतां, याला काय ह्मणावें? आमचें आतां

काय ? दहा गेले आणि पांच उरले! आह्मीं कोठें तरी पुण्यक्षेत्रीं जाऊनसुद्धां वास करण्यास राजी आहोंत; परंतु तुह्मीं आपलेच हातानें आपलें नुकसान करून घेत आहा, हें तुह्मांस कसें समजत नाहीं ? मागील गोष्टी झाल्या त्या झाल्या. यापुढें तरी तुह्मीं मोंगलांचे नादीं न लागतां माघारें आपलें मुलुखांत या. पाहिजे तेथें तुमचे खाजगी खर्चास तालुका लावून देतों. ' येणेंप्रमाणें महाराजांनीं कित्येक ममतेच्या व समजुतीच्या गोष्टी पुत्राकडे सांगून पाठविल्या.

१२. इकडे विजापुराकडे मसाऊदखान याचे मदतीस हंबीरराव याजबरोबर महाराजांनीं सैन्य पाठविलें, ह्मणून नुकतेंच वर सांगितलें आहे. त्याप्रमाणें तें तिकडे कूच करीत असतां, त्यांजवर मोंगलांचा सरदार रणमस्तखान हा आठ नऊ हजार घोडेस्वारांनिशीं आडवा आला. यावेळीं दोन्ही सैन्यांची मोठी लढाई होऊन तींत मोंगलांचा पुनः अगदीं मोड होऊन गेला. यानंतर हंबीररावानें दिलेरखानाचे छावणी-भोंवतालीं राहून मोंगलांचे लष्करास दाणावैरण वगैरे सामान अगदीं पोंहोंचेनासें केलें. रुपयास अर्धाशेरसुद्धां धान्य मिळूं नये अशी अवस्था झाली. यामुळें मोंगलांकडील हत्ती, घोडे व माणसें भराभर मरूं लागलीं. इकडे मराठेलोक हे विजापूरशहरांत वरचेवर दाणागोटा, दारुगोळा वगैरे पोंचवीत गेल्यामुळें, विजापूरकरांस लढण्याचें अवसान येऊन ते शत्रूंस चांगली टक्कर देऊं लागले. इतकें झालें तरी दिलेर-खान विजापूरचा वेढा उठवीना. शेवटीं धान्य सामुग्री अगदीं सरली असें पाहून, तो एकदांचा वेढा उठवून कोपाल प्रांताकडे कर्नाटक लुटण्याचे हेतूनें चालला. त्या प्रांतांत जनार्दनपंत सुमंत हा चांगले फौजे-निशीं होताच. त्याचें आणि खानाचें युद्ध होऊन मोंगलांचा येथेंही पुनः अगदीं पराभव झाला. याप्रमाणें दिलेरखान हा चोंहींकडे पराभव पावलेला असा मनांत फार खट्टू होऊन, पेंडगांव येथें छावणीस परत आला ( १६७९ ). मराठ्यांस जसा दक्षिणेंत जिकडे तिकडे जय मिळत चालला होता, तसाच त्यांस उत्तरेंतही तो मिळत चालला होता. याच सुमारास खानदेश व बागलाण या प्रांतांत मोरोपंत पेशवा यानें

अहिवंत व नाहावागड हे बळकट किल्ले मोंगलांपासून जिंकून घेतले, व ते प्रांत सर्व लुटून फस्त केले.

दिलेरखानानें संभाजी राजे यांचेसंबंधानें, त्यांस मराठ्यांचा राजा असें जाहीर करून, मराठ्यांमध्यें फूट पाडण्याची जी कुटिल मसलत औरंगजेब बादशहास सुचविली ह्मणून वर लिहिलें आहे, ती बादशहास मुळींच पसंत पडली नाहीं. त्यानें खानास उत्तरादाखल परत लिहिलें कीं, ‘ मराठे लोक जे अगोदरच अनावर होऊन इतकी लुटालूट करीत आहेत, त्यांस तुह्मीं ह्मणतां तसें केल्यानें लुटालूट करण्यास आपणच होऊन अधिकार दिल्यासारखें होऊन, त्यांस अधिक उत्तेजन मिळेल.’ यानंतर दिलेरखानाची विजापूरचे वेढ्यांत व कर्नाटकचे स्वारींत जी फजीती उडून गेली, तिचींही वर्तमानें बादशहास पोहोंचलीं. त्यावरून बादशहाचा ग्रह दिलेरखानाविषयीं पुनः बदलून त्यास वाटूं लागलें कीं, ‘ दिलेरखान हा कांहीं अंशीं पाणीदार पठाण सरदार खरा; परंतु याचे नादीं लागून विशेष उपयोग नाहीं. याचे कारकीर्दींत विजापूर तर हातीं आलें नाहींच; पण मराठ्यांचें बल मात्र फार वाढलें, व आपले बादशाहीचा आंब मात्र गेला. यापेक्षां अंमळ थंड स्वभावाचा खान जहान बहादूर हासुद्धां बरा. त्याचे हातून मोठे पराक्रम जरी झाले नाहींत, तरी त्याजपासून येवढें नुकसानही झालें नव्हतें.’ यामुळें बादशहानें, सुलतान मोआझिम यास परत बोलाविलें व खान जहान बहादूर याची पुनः दक्षिणेचे सुभ्यावर नेमणूक केली, व सैन्याचाही अधिकार दिलेरखानाकडून काढून घेऊन तो खान जहान बहादूर यासच दिला, व दिलेरखानास पुनः दुय्यम केलें. त्याचप्रमाणें बाद-शहानें, संभाजीराजे यांस कैद करून दिल्लीस पाठविण्याविषयीं हुकूम पाठविला. ही बातमी दिलेरखानास अगोदरच कळून, त्यानें, शिवाजी महाराजांकडून जीं माणसें संभाजीराजे यांची समजूत पाडण्याकरितां आलीं होतीं ह्मणून नुकतेंच वर सांगितलें आहे, त्यांची खानानें संभाजी राजांची भेट करून दिली, व शेवटीं राजे यांनीं मोंगलांचे छावणींतून बापाकडे परत पळून जाण्याचा जो बेत केला, त्याजकडे खानानें

मुद्दाम कानाडोळा केला. दिलेरखानाचा संभाजीराजांस, ' तुह्मीं आह्मां-वर विश्वास ठेवला, तर तुह्मांस कोणतेही प्रकारें धक्का पोहोंचणार नाहीं,' असा शब्द गुंतला होता व बादशहाची आपण इतकी इमान-इतबारें चाकरी केली असतांही, त्यानें आपला अपमान केला असें खानास वाटलें. यामुळें त्यानें, कांहीं उदारपणा व कांहीं चुरस या बुद्धीनें, संभाजी राजास आपले छावणींतून पळून जाऊं दिलें.

१३. संभाजीराजे हे शिवाजी महाराजांकडे परत आल्यावर, महा-राजांनीं कांहीं काळ जाऊन देऊन नंतर पुत्रास एकांतीं घेऊन त्यास ह्मटलें कीं, ' तुह्मीं मोंगलांचे तावडींतून श्रीकृपेंकरून सुटून आला, ही आह्मांस मोठी जोडच झाली. तुह्मीं याउपर राज्यकारभार संभा-ळावा, हें आह्मीं इच्छितों. तुह्मां दोघां पुत्रांकरितां आह्मीं दोन राज्यें करून ठेविलीं आहेत — एक जिंजीचें व दुसरें महाराष्ट्राचें. तुह्मीं वडील पुत्र; ते तुह्मीं जिंजीचें राज्य संभाळावें; व राजारामानें महा-राष्ट्राचें संभाळावें. आपापसांत भांडण न करितां, हिंदुपद जें आह्मीं इतकें कष्टानें स्थापन केलें आहे, त्याचें उभयतांनीं रक्षण करून तें तुह्मीं वृद्धिंगत करावे. त्याचप्रमाणें यवनी बादशहांनीं आपले हिंदुधर्माचा उच्छेद करण्याविषयीं जी खटपट चालविली होती व गोब्राह्मणांस ते जी इतकी पीडा करीत होते, त्याचें निवारण करण्यासाठीं आह्मीं आजन्म मेहनत केली, तीच तुह्मीं दोघांनीं पुढें चालवून आपले धर्माचा पूर्ण जीर्णोद्धार करावा. अशा सत्कृत्यांनींच तुह्मीं आपले शिसोदे कुळास भूषणरूप व्हाल! प्रजा ही आपलीं लेकरें होत. त्यांचें राजानें यथान्याय रक्षण केलें पाहिजे. त्यांजवर जुलूम करून त्यांचे द्रव्याचे हरण करणें किंवा परस्त्रीचे अभिलाषाची बुद्धि धरणें, ह्मणजे राजाचे यशास र्‍हास लागलाच असें समजावें. राजानें वाटेल तितकीं लग्नें करावीं, अनेक सुंदर नाटकशाळा ठेवाव्या; परंतु त्यानें परस्त्रीवर नजर ठेवणें ह्मणजे अत्यंत पाप होय. ही दुष्ट बुद्धि धरल्यानें, पुराणांतरीं सांगितलेले रावण, दुर्योधन वगैरे अनेक मोठमोठ्या राजांचीं अगदीं धुळधाण होऊन गेली आहे हें तुह्मीं ऐकिलेंच आहे. तेव्हां या सर्व

गोष्टींचा तुम्हीं नीट विचार करून, ज्याप्रमाणें तुमचे वाडवडिलांनीं इतके दिवस नांवलौकिक मिळविला, तसाच पुढें आपण मिळवूं अशी तुम्हीं उमेद धरा.' याप्रमाणें संभाजी राजांस अनेकप्रकारें ममतेनें बोध करून, त्यांचें चित्त स्वस्थ होण्यासाठीं महाराजांनीं खटपट केली. राजे यांस पन्हाळा किल्ल्यांतच ते कांहीं निवळेपर्यंत ठेविलें, आणि त्यांजजवळ हिरोजी फरजंद, जनार्दनपंत सुमंत, सोनाजी नाईक बंकी व बाबाजी ढंढेरे असे सरदार बंदोबस्ताकरितां ठेऊन महाराज रायगडास निघून गेले. ( १६७९ ).

१४. विजापुरास दिलेरखानानें वेढा घातला असतां, शिवाजीमहाराजांनीं आदिलशाहीस मोठी मदत केली ; त्याबद्दल मसाउदखान यानें महाराजांस कोपाल आणि बल्लारी हे प्रांत दिले. त्याचप्रमाणें द्रविड प्रांतांतील तंजावर व शहाजी महाराजांचे जहागीर मुलूख यांजवरचें स्वामित्वही खानानें महाराजांस दिलें. यानंतर विजापूरकरांचें व महाराजांचें मोठें सख्य जमून, महाराज विजापुराजवळ गेले असतां, मसाऊदखान हा शहराबाहेर येऊन त्यानें महाराजांची गांठ घेतली व दोघांचें कांहीं वेळ बरेंच खलबत झालें. ( १६८० ).

तंजावर वगैरे प्रांतांचें स्वामित्व, विजापूरसरकाराकडून निघून जाऊन तें शिवाजी महाराजांकडे आल्यानें, व्यंकोजीराजे हे यापुढें अर्थात्च महाराजांचे मांडलिक राजे बनले. ह्या गोष्टीचें व्यंकोजी राजे यांस वैषम्य वाटूं लागलें. शिवाय रघुनाथ नारायण याचा स्वभाव कांहींसा उलाढाल्या करण्याचा असून, तो व्यंकोजी राजे यांचे कारभारांत हात घालूं लागला, तें राजे यांस खपेनासें झालें. महाराजांस रघुनाथपंताची बाजू खरी वाटे, यामुळें व्यंकोजीराजे यांस आपलें कांहीं चालत नाहीं असें वाटून, त्यांची वृत्ति अगदीं उदास होऊन गेली. ते आपले जहागिरीचा कारभार मुळींच पाहिनातसे झाले. त्यांस कशांतच उल्हास वाटेना. त्यांनीं नित्यकर्मेंसुद्धां सोडून दिलीं व एकादे वैराग्या-प्रमाणें ते राहूं लागले. हें वर्तमान रघुनाथपंतानें महाराजांस कळविल्यावरून, त्यांनीं आपले धाकटे बंधूस पुढें दिलेलें पत्र लिहिलें :—

चिरंजीव व्यंकोजी राजे मुक्काम तंजावर यांस.

शिवाजी महाराज मुक्काम रायगड यांचे अनेक आशीर्वाद.

लिहिण्यास कारण कीं, तुह्मांकडून आज पुष्कळ दिवसांत पत्र आलें नाहीं, यामुळें आह्मांस फार काळजी लागली आहे. रघुनाथ पंताकडून नुकतेंच पत्र आलें कीं, तुमची वृत्ति अगदीं उदास झाली आहे. तुह्मांस कशांत गोडी ह्मणून वाटत नाहीं. तुह्मीं आपले शरीराची किंवा कसलीच काळजी घेत नाहीं. तुह्मीं आपली फौज रिकामी बसूं देता व राज्याचा कारभार कसलाच पहात नाहीं. तुह्मीं केवळ बैरागी बनून, कोठें तरी पुण्यक्षेत्रीं राहून कालक्षेप करावा असें तुह्मांस वाटतें. रघुनाथपंतांनीं ही हकीकत कळविल्यापासून आह्मांस अगदीं चैन पडत नाहीं. आपले वडील कैलासवासी शहाजी राजे यांचें उदाहरण तुह्मांपुढें ढळढळीत असतां, तुह्मीं असें कसें करिता याचें आह्मांस नवल वाटतें. महाराजांनीं, संकटें प्राप्त झालीं असतां अगदीं न डगमगतां, त्यांतून कसें युक्तीनें पार पडून जावें! त्यांनीं केवढे मोठे पराक्रम करून व महा बिकट प्रसंगांतून मोठे हिंमतीनें व धैर्यानें निभावून जाऊन केवढी कीर्ति संपादन केली, या सर्व गोष्टी तुह्मांस माहीत आहेतच; आह्मीं सांगाव्या असें कांहीं नाहीं. तुह्मांस वडिलांचा सहवास होताच व त्यांची हुषारी व शहाणपण हीं तुह्मांस हरप्रसंगीं पाहण्याची संधि वारंवार येत असे. आह्मांस-सुद्धां कितीदां मोठे बिकट प्रसंग येऊन आह्मीं त्यांतून कसे पार पडलों व शेवटीं आह्मीं हिंदुपदबादशाही कशी स्थापन केली हेंही तुह्मीं पाहिलें आहे. तेव्हां इतक्या सर्व गोष्टी तुह्मांस अनुकूळ असतां, तुह्मीं संसाराचा त्याग करून बैरागी व्हावें, आपला सर्व कारभार कारकुनाकडे सोंपवून, त्यांना दौलत खाऊं घालावी व आपले राज्याचा व आपले प्रकृतीचा नाश करून घ्यावा, हें तुह्मांसारख्या सुज्ञांस योग्य दिसतें कां? हें कोणते प्रकारचें शहाणपण ह्मणायाचें? याचा परिणाम तरी काय होणार? आह्मीं तुह्मांस वडिलांप्रमाणें असून, तुमचें संरक्षण करण्यास आह्मीं तत्पर आहोंत. आह्मांपासून तुह्मांस

कोणतेही प्रकारें उपद्रव लागेल याची शंकासुद्धां तुह्मीं मनांत धरूं नये. तुह्मीं याउपर उदासीनता अगदीं टाकून द्या. बैरागी होऊं नका. संसारकृत्यांत हौस धरून आनंदांत दिवस काढा. सण, वार, महोत्सव हे पूर्वींप्रमाणें चालूं द्या. पुनः राज्यकारभारांत लक्ष घाला, आपली फौज चांगली तयार ठेवा व कारकून वगैरे कसा कारभार करितात हें पहा. त्यांजकडून नीट चाकरी करून घ्या, व वडिलांप्रमाणें नांवलौकिक मिळवा. तुमचा नांवलौकिक झालेला ऐकून आह्मांस किती सुख व समाधान वाटेल बरें? रघुनाथपंत हे तुमचे प्रांताजवळच आहेत. त्यांचा तुमचा परिचय कांहीं नवीन नाहीं. तुह्मांस कांहीं अडचण वाटल्यास त्यांचा सल्ला घेत जावा. ते तुह्मांस आमचेच ठिकाणीं लेखतात. आमचा त्यांजवर पूर्ण विश्वास आहे; तुमचाही त्यांजवर ठेवा. तुह्मीं व ते असे दोघे एक विचारें चाला ह्मणजे दोघांचेंही नीट प्रकारें चालेल, व तुमचा चांगला नांवलौकिक होईल. अखेर हेंच सांगतों कीं, आळस सोडा. फौजेस फुकट पगार खाऊन बसूं देऊं नका; तिजपासून कांहीं ना कांहीं तरी कामगिरी बजाऊन घ्या. सध्यांचें वय ह्मणजे मोठाले पराक्रम करण्याचेंच आहे. ह्मातारपणीं बैरागी होतां येईल! तेव्हां अवसान धरा; कंबर बांधा; व तुह्मीं पूर्ववत् पराक्रम करायला लागलात हें ऐकून आह्मांस संतोष पावूं द्या. सुज्ञांस अधिक काय लिहावें?

१९. येणेंप्रमाणें महाराजांनीं आपले धाकटे बंधूंस मोठें समजूतीचें व ममतेचें असें पत्र *पाठविलें. त्यावरून त्यांचे स्वभावाचेंही कांहींसें स्वरूप कळून येण्यासारखें आहे. हें पत्र पाठविल्यावर लवकरच शिवाजी महाराज हे रायगडावर असतां, त्यांस गुढघ्यांत मोठें गळूं होऊन, त्याचे वेदनेपासून त्यांस फार मोठा ताप आला. तो एकसारखा सात दिवस राहिला. महाराजांस आपण आतां वांचत नाहीं

* महाराजांचें अनेक पत्रांपैकीं वर दिलेलें एकच तें कांहींसें लहान व विशेष खुबीदार असल्यामुळें, ग्रांटडफ् यांनीं, आपले इतिहासांत दिलें आहे. तथापि येवढ्या मोठ्या शककर्ते राजाचीं जितकीं उपलब्ध होतील तितकीं पत्रें छापून प्रसिद्ध केलीं असतां, महाराष्ट्रीयांवर मोठा उपकार केल्यासारखा होणार आहे हें उघड आहे.

असें करून येऊन, त्यांनीं प्रधानादि कारभारीमंडळी व विश्वासू असे आप्त जवळ बोलावून, त्यांजपाशीं आपले शेवटचे खेदोद्गार काढिले. ते ह्मणाले, “ आह्मीं श्रीचे कृपेकरून हिंदु साम्राज्य स्थापन केलें, चोहोंकडे किल्ले, कोट बांधून व फौजा ठेऊन मुलुखाचा बंदोबस्त केला, यवनांची गोब्राह्मण देवतादिकांस पीडा होत होती ती दूर करून, धर्म वृद्धिंगत केला. इतके दिवस आमचेकडून श्रीनें सेवा करून घेतली; परंतु यापुढें आमची आयुर्मर्यादा दिसत नाहीं. आमचे मनांतील तर सर्व हेतु परिपूर्ण झाले; परंतु एका गोष्टीची आह्मांस मोठी फिकीर लागून राहिली आहे. तेवढ्यानेंच आमचा जीव कायतो तुटतो आहे. आमचे मागें आमचे राज्याचें काय होईल, आमचे प्रजांचें रक्षण कोण करील, या गोष्टींनीं आमचें चित्त अगदीं व्याप्त झालें आहे! वडील पुत्र संभाजीराजे हे उग्र प्रकृति व व्यसनी पडले; यांचे हातून नीट व्यवस्था लागणें कठिण! धाकटे पुत्र रामराजे हे अद्याप लहान आहेत; त्यांजवर राज्य टाकतां येत नाहीं. आमचे राज्याबद्दल आह्मांस फार काळजी वाटते. आमचे मागें विजापूरकर, सिद्धी वैगेरे आपलीं डोकीं वर काढूं लागतील. औरंगजेब बादशहास दक्षिणेंतील राज्यें बुडविण्यास आतां अवसर होईल! असो; विना-कारण पुढील गोष्टींची काळजी करण्यांत कांहीं उपयोग नाहीं. श्रीनें इतके दिवस जसें निभावून नेलें, तसें ती यापुढेंही खचित नेईल. तुह्मीं सर्व पराक्रमी आहां. तुह्मीं सर्व एक विचारें चाला व हरएक प्रयत्न करून, आपले राज्याचें व धर्माचें रक्षण करा. श्री तुह्मांस खरोखर यश देईल! ” असें बोलून महाराज स्तब्ध झाले. यानंतर त्यांनीं प्रायश्चित्त वैगेरे घेऊन पुष्कळ दानधर्म केला. भगवद्गीता व सहस्रनामें यांचे पाठ चालविले. त्यांचा घोष होत असतां चैत्र शु० १५ श० १६०२ ता० ५ एप्रिल सन १६८० रविवार रोजीं दोनप्रहरीं शिवाजीमहाराज यांचा अंत झाला. यावेळीं त्यांचें वय ५३ वर्षांचें होतें. $

---

$ चिटणीस यांची बखर.

१६. या जगांत जीं विलक्षण बुद्धिमान् व पराक्रमी मनुष्यें होऊन गेलीं, त्यांत शिवाजी महाराजांची गणना खरोखर करण्यासारखी आहे. आमचे जुने महाराष्ट्रीय लोक तर त्यांना, अवतारी पुरुष समजून त्यांची मूर्ति करून तिची पूजा आराधना करितात; परंतु परदेशां-तील लोकसुद्धां, ज्या महा पुरुषानें अति दरिद्री व दिसण्यांत अगदीं नादान अशा मावळे लोकांस हातीं धरून, त्यांजमध्यें विजयश्रीचें वारें भरून देऊन त्यांचे हातून हिंदुस्वराज्याची स्थापना केली; ज्यानें महा बिकटप्रसंगींसुद्धां धैर्य न सोडतां, मोठे युक्तीनें व शौर्यानें आपणांस व आपले लोकांस पार पाडून नेलें; जो आणीबाणीचे प्रसंगीं स्वसैन्याचे अग्रभागीं सरसावून शत्रूंवर तुटून पडणारा, किंवा निरूपायास्तव फौजेस मागें हटावें लागलें तर, त्यांस खराबा न होतां व्यवस्थेनें परत आणणारा; ज्याची एखादा किल्ला घेण्याचे कामांत ह्मणा, किंवा दूरचा एखादा देश जिंकण्याचे मसलतींत ह्मणा, सारखीच उत्कृष्ट योजक बुद्धि; जो रणांगणांत जसा केवळ सिंह, तसाच राज्यकारभाराचे गूढ व बिकट बाबींची व्यवस्था लावण्यांत मोठा धिमा, मेहनती व अत्यंत कुशल; जो सैन्यांतील लोकांस मोठा प्रिय खरा, परंतु खर्चाचे कामांत मोठा जपणारा; ज्यास अतिशय लूट सांपडली असतांही लोभास वश न होऊन, त्यानें लूट गोळा करण्याचे संबंधानें जे कांहीं नियम केले होते, त्यांचें कधींही उल्लंघन केलें नाहीं, त्याचे बुद्धिवैभवाबद्दल व त्याचे व्यवस्थितपणाबद्दल तारीफ करितात. ※ महाराजांचा मोठा शत्रू जो औरंगजेब बादशहा, त्यानेंसुद्धां त्यांचे मृत्यूची बातमी ऐकून ह्मटलें कीं, " शिवाजी हा निःसंशय मोठा सेनानायक खरा; आह्मीं दक्षिणेंतील जुनीं राज्यें बुडवीत असतां, त्यानें एकट्यानेंच कायतें नवीन राज्य स्थापन करण्याची मोठी हिंमत धरली. आमच्या फौजा त्याज-बरोबर आज एकोणीस वर्षें लढत आहेत; परंतु त्याचें राज्य एकसारखें वाढतें आहे तें आहेच! " ¶

---

※ वरील मत ग्रॅन्ट डफ यांचें आहे.

¶ आर्मीचा इतिहास.

शिवाजी महाराजांचें, आमचे जुने महाराष्ट्रीयांनीं व युरोपीयन इतिहासकारांनीं वर सांगितलेलें जें वर्णन केलें आहे, त्यापेक्षां अधिक असा महाराजांचे ठिकाणीं जो एक विशेष आढळून येतो; परंतु ज्याचा निदान स्पष्ट असा उल्लेख कोठें केलेला आढळत नाहीं, त्याजविषयीं येथें चार शब्द लिहिणें जरूर आहे. महाराजांनीं मोठमोठ्या लढाया मारल्या, मोठमोठे मुलुख जिंकले, राज्यसंपादन केलें, धर्मस्थापना केली वगैरे गोष्टी, ज्या शिकंदर बादशहा, ज्युलियस सीझर, नेपोलियन वगैरे इतिहासप्रसिद्ध पुरुषांनीं केल्या, त्यांचाच फक्त वर लिहिलेल्या इतिहासकारांनीं निर्देश केला आहे; परंतु वरील कृत्यांपेक्षांही मोठें कठीण व महत्वाचें कृत्य कीं, ज्यास जगाचे सर्व इतिहासांत दुसरी तोड नाहीं, असें जें—राष्ट्रजनन —तें शिवाजी महाराजांनीं केलें. आपलें शौर्य व बुद्धिविशेष यांचेयोगानें देशचेदेश जिंकलेले शिकंदरासारखे राजे, किंवा अगदीं नीच अवस्थेपासून केवळ स्वपराक्रमानेंच सिंहासनारूढ झालेले नेपोलियन किंवा * नादिरशहासारखे विलक्षण पुरुष हे जगाचे इतिहासांत बरेच सांपडण्यासारखे आहेत; परंतु मुळीं जेथें राष्ट्राचाच ठिकाण नाहीं, तेथें तें उत्पन्न करून स्वराज्यस्थापन केलें, असें उदाहरण जगाचे इतिहासांत, शिवाजी महाराजांचें कदाचित् एकटेंच आढळेल! शिकंदर बादशहाचा बाप राजा असून, त्यानें आपले पुत्राचे दिग्विजयाची बहुतेक सामुग्री करून ठेविली होती. नेपोलियन हा सार्वभौम तक्तावर आरूढ होण्यापूर्वी, फ्रान्समध्यें राजतक्त होतें व फ्रेंच लोकांचें चांगलें बलाढ्य राष्ट्र होतें; परंतु महाराजांस मागें सांगितल्याप्रमाणें तक्तारूढ होण्यापूर्वी, ज्याप्रमाणें गागाभट्ट वगैरे मंडळीस आणून व मोठा खटाटोप करून नवीनच तक्त निर्माण करावें लागलें व सन्याशाचें लग्न ह्मणजे शेंडीपासून सर्व नवी तयारी, त्याप्रमाणें महाराजांस तक्त करण्यापूर्वी राष्ट्रजननापासून सर्व खटपट करावी लागली! शिकंदर, नेपोलियन, किंवा नादिरशहा यांचे

---

* हा इराणचा बादशहा असून तो पूर्वी धनगर होता, व त्या नीच स्थितीपासून तो वर चढला. यानें १७३९ सालीं हिंदुस्थानावर स्वारी केली, ती प्रसिद्धच आहे.

कृतींत आणि शिवाजी महाराजांचे कृतींत फरक ह्मटला ह्मणजे, आयत्या बांधलेल्या इमारतीस शोभा आणणें, आणि ती दगड, विटा, चुना गोळा करून पायापासून सर्व नवीनच सुरेख बांधणें यांतील फरकच होय. महाराजांचे जन्मापूर्वी, मावळे ह्मणजे शेतकरी किंवा मजूर यापेक्षां अधिक योग्यतेचे लोक नव्हते; ब्राह्मण, परभू यांची योग्यता कुलकर्णी, मोजणीकारकून यांहून अधिक नव्हती; मराठ्यांची मोठी हांव ह्मटली ह्मणजे—फार फार झालें तर बारगीर, शिलेदार व मनसबदार व्हावें, यापेक्षां अधिक कांहीं नसे; परंतु या सर्व निरनिराळे लोकांचें एकीकरण करून, त्यांचें एक नवीनच राष्ट्र बनवून, त्यांचे हातून आपले हयातींत स्वराज्य व स्वधर्म यांची स्थापना करून व आपले पश्चात् परदेशीय व परधर्मी असे जे मोंगल, पठाण वगैरे लोकांचा पूर्ण पाडाव होऊन, सर्व देशभर हिंदुबादशाहीचा व हिंदुधर्माचा प्रसार व्हावा, अशी ज्या महात्म्याची विलक्षण योजकबुद्धि, त्यास वर लिहिल्याप्रमाणें जगाचे सर्व इतिहासांत जोड सांपडणें कठीण आहे!

शिवाजी महाराजांचे अंगचा दुसरा जो विशेष ध्यानांत ठेवण्यासारखा आहे, तो हा कीं, त्यांचें सैन्य इतर सामान्य सैन्याप्रमाणें नव्हतें. तें त्यांनीं स्वदेशीयामध्यें लुटालूट करण्याची प्रवृत्ति उत्पन्न करून उत्पन्न केलें असून, त्याचेयोगानें त्यांनीं राज्य संपादन केलें; परंतु हें लुटारू सैन्यरूपी वावटळ, शिवाजी महाराजांचे पूर्ण आटोक्यांत असे.* जें मराठे लोकांचें सैन्य शत्रूचे मुलखांत शिरलें असतां, त्यानें चोंहोंकडे एकसारखी भयंकर लुटालूट करावी, तेंच स्वतःचे किंवा दोस्त सरकाराचे मुलखांतून चाललें असतां, त्यानें इतकें कैदबार वागावें कीं, त्यानें कोणाचेही पडलेल्या मालास हात लावूं नये! त्याचप्रमाणें लूट मिळविण्यासंबंधानें व लष्करांत शिपायांनीं कसें वर्तन ठेविलें पाहिजे यासंबंधानें, महाराजांचे जे कित्येक नियम असत, ते कसे कडक रीतीनें त्यांचे सैन्याकडून पाळले जात असत, यावरून त्यांचा असले लुटारू सैन्यावरही किती विलक्षण दाब असे हें स्पष्ट दिसून येतें. याशिवाय

* ओव्हेन साहेबांचे 'इंडिया आॅन् दी ईव्ह ऑफ् ब्रिटिश कॉंक्केस्ट!'

महाराजांचें सैन्य लुटालूट करीत असतां, शत्रूचे मुलुखांतील लोकांस पुष्कळदां जी विपत्ति व दुःख हीं सोसावीं लागत असत, तीं आपणां-कडून होतांहोईल तोंपर्यंत कमी करण्याची त्यांची इच्छा, त्याचप्रमाणें शत्रूकडील लढाईंत पाडाव झालेले सरदारांचा व स्त्रियांचा महाराज किती आदर करीत, व शत्रूंनीं आपले प्रजेची लूट केली असून, ती महाराजांचे सैन्यानें परत आणली असतां, ज्याचा त्याला माल अगदीं चोख रीतीनें महाराजांनीं द्यावा, ह्याविषयीं उदाहरणें मागें आलींच आहेत.

आतां शेवटीं महाराजांचे अंगीं कित्येक दोष होते, ह्मणून कांहीं * इंग्लिश इतिहासकारांचें मत आहे, त्याविषयीं लिहितों. महाराजांचे दोष लबाडी, कापट्य, दुटप्पीपणा, घातकीपणा, क्रूरपणा व देवभोळेप-णा हे मुख्य ह्मणून सांगितले आहेत. यांपैकीं पहिले चार एकमेकांशीं लागून असल्यामुळें, त्या सर्वांचा एकत्रच विचार केला असतां चाल-णार आहे. यामागें सातवे भागांत अफजूलखानाचे वधासंबंधानें लिहीत असतां, या गोष्टींविषयीं सामान्यत्वें आह्मीं आपलें मत सांगितलेंच आहे. आतां या स्थळीं कांहीं अवांतर गोष्टींचा मात्र निर्देश करणें आहे, तो येथें करितों. प्रथम वाचकांनीं सामान्य व्यवहारनीति व राजनीति, या निदान आजपर्यंतचे तरी वस्तुस्थितीला पुष्कळ अंशीं भिन्नच मानिल्या पाहिजेत. सामान्यव्यवहारांत लबाडी, कपट, दुटप्पी-पणा, दुष्टपणा वगैरे गोष्टी जितक्या निंद्य समजल्या जातात, तितक्या त्या राजकीयव्यवहारांत मानिल्या जात नाहींत; उलट्या त्या कांहीं-अंशीं हुषारी किंवा अक्कलविशेषाखालींही ओढल्या जातात. ह्या गोष्टींची माहिती पुष्कळांस असेलच! मेकॉलेसारख्या कांहींअंशीं थोर मनाचे व कांहींअंशीं लब्धप्रतिष्ठित अशा मुत्सद्यांचे मतें, सामान्यव्यवहारांत व राजकीयव्यवहारांत भेद नसून, ते दोघांसही एकच विषय लागू करूं पाहतात. लॉर्ड साहेबांचें ह्मणणें आहे कीं, दोन्हीं व्यवहारांत 'व्यवहारसरलता हीच उत्तम राजनीति होय' हेंच प्रमेय लागू आहे;

* ग्रांटडफ, मेकॉले.

परंतु आजपर्यंतचा जगाचा इतिहास पाहिला तरी, कोणते व्यक्तीची किंवा राष्ट्राची किंवा कोणते धर्माचीमुद्धां जी उन्नति झाली आहे, ती केवळ सत्वस्थपणा, व्यवहारसरलता वगैरे गोष्टींनींच झाली आहे, व त्यांत लबाडी लचांडीची बिलकुल भेसळ नाहीं असें बहुधां आढळणार नाहीं ! फार करून राजनीतीविषयीं भर्तृहरीनें जें ह्मटलें आहे त्याचें मराठी भाषांतर वामन पंडित यांणीं केलेलें खालीलप्रमाणें आहे.—

केव्हां सत्य वदे वदे अनृत ही केव्हां वदे गोड ही ।
केव्हां अप्रिय ही दयालु हि असे केव्हां करी घात ही ॥
जोडी अर्थ हि जे यथेष्ट समयीं कीं वेच ही आदरी ।
ऐशी हे नृपनीति भासत असे वारांगनेचे परी ॥

याच तत्वाचें वरील उन्नत झालेले व्यक्तीनें किंवा राष्ट्रानें किंवा धर्मानें अवलंबन केलेलें आढळेल. तेव्हां आजपर्यंत चालत आलेल्या राजनीतिमत्तेकडे दृष्टि दिली असतां, शिवाजीमहाराजांकडे फारसा दोष येतो असें ह्मणतां येणार नाहीं. जेव्हां राष्ट्रां राष्ट्रांमध्यें अगदीं सरलतेनेंच व्यवहार सुरू होईल, व फितूर, विश्वासघात, कापट्य वगैरे गोष्टींची गरज न पडतां, केवळ धर्मयुद्धानेंच राज्यें जिंकली जातील, तेव्हां महाराजांचीं कृत्यें वरील भयंकर दोषास पात्र होतील असें आह्मीं ह्मणतों. जोंपर्यंत आपले शत्रू आपणांशीं कपट, विश्वासघात, दगा इत्यादि गोष्टी करीत आहेत, तोंपर्यंत त्यांचे निवारणार्थ आपणांस इतर सौम्य उपाय चालत नाहींत, ह्मणून त्याच गर्हणीय उपायांचा उपयोग केला असतां, न्यायदृष्ट मनुष्य आपणांस खरोखर दोष लावणार नाहीं. ओमीचंदानें खुशाल खोटें बोलावें, फितूर करावा, विश्वासघात करावा, आणि त्याचे निवारणार्थ मात्र क्लाइव साहेबांनीं खोटी सही करूं नये, हा कोठचा न्याय! अल्लाउद्दीनानें, मी चुलत्यापासून भांडून निघालों आहे, मी दक्षिणेंत कोणत्यातरी हिंदुराजाचे आश्रयास रहावयास जातों आहे, असें ह्मणून एकाएकीं देवगडावर चाल करून तें काबीज करावें; पद्मिनीचें दर्शनसुख घेऊन, वरील बादशहा, चितूरचे किल्ल्यावरून राणा भीमसिंगापासून अगदीं दगा न पावतां, त्याचेबरोबर खालीं उतरला असतां, त्यानें बिचारे पूर्ण इमानी राण्यास विश्वासघातानें

कैद करावें; विजापूरचे इब्राहिम आदिलशहानें, कर्नाटकांतील शिलेदारांस फुसलावून विजापुरास आणावें आणि तेथें त्यांचा विश्वासघातानें शिरच्छेद करावा; अफजुलखानानें महाराजांचे वडील बंधू संभाजीराजे यांस शत्रूचे तोंडी देऊन त्यांचा घात करवावा व त्यानेंच महाराजांस पकडण्याची किंवा सवड सांपडेल तर मारण्याचीही खटपट करावी; परंतु तिचें निवारण करण्याकरितां महाराजांनीं खानाहून अधिक तयारी करून, आपला हात साधून घेतला असतां, त्यांचेवर विश्वासघाताचा व खुनाचा आरोप! शामराजपंतानें शिवाजी महाराजांवर छापा घालून त्यांस ठार मारून येतों, ह्मणून विजापूरचे सुलतानाजवळून विडा उचलून निघावें व त्यास चंद्रराव मोरे यांचें साहाय्य असावें; परंतु चंद्रराव मोरे यांचे वधास रघुनाथ बल्लाळ यांस महाराजांचे अनुमोदन व पाठबळ असलें ह्मणून, त्यांजवर खुनास मदतीची शाबिती करावी, हा अत्यंत अन्याय होय! महाराजांचें चरित्र जो लक्षपूर्वक अवलोकन करील, त्यास, जसा मनुष्य भला किंवा लबाड, संभावित किंवा हलकट असेल, त्याप्रमाणें त्याशीं त्यांचें वर्तन असे, असें दिसून येईल. राजा जयसिंग किंवा कुतुबशहा किंवा अबदुल महंमद किंवा मसाऊदखान यांशीं महाराजांचें वर्तन अगदीं सरळ; परंतु औरंगजेब बादशहा, अफजूलखान किंवा चंद्रराव मोरे यांशीं कपटाचें, विश्वासघाताचें व घाताचेंच असे. क्लाइव साहेबांनीं आपले शत्रूंविषयीं ह्मटलें आहे कीं, ' जे लबाड लोक असू, शपथ वगैरे कोणतेही बंधनांनीं बांधले जाऊं नयेत, त्यांशीं व्यवहार करतांना आपले मात्र हातपाय आपण वरील बंधनांनीं बांधून घ्यावेत, त्यांस खरें खरें सर्व सांगत जावें; परंतु त्यांनीं मात्र आपणांस कधीं तें सांगू नये, आपण मात्र आपलें नुकसान करून घेऊन आपलेकडील सर्व करार मदार करून चुकावें; परंतु त्यांनीं मात्र ते कधीं पुरे करूं नयेत, अशा वर्तनानें मला कधींही त्यांजबरोबर टक्कर मारतां आली नसती.' आमचे भारतीय युद्धांतसुद्धां दुर्योधनमित्र जो कर्ण, त्याचें रथचक्र पृथ्वीनें गिळलें असून, त्याजवर तसल्या प्रसंगीं अर्जुन शरप्रहार करूं लागला असतां, मद्राधिप मोठ्या सद्धर्माच्या गोष्टी अर्जुनास सांगू लागला, तेव्हां भगवान् श्रीकृष्णानें जें त्यास कठोर उत्तर केलें कीं,

' यापूर्वी तुह्मीं जीं अनन्वित कर्मे केलीं, त्यावेळीं तुह्मांस धर्माची आठवण झाली नाहीं व आतां मात्र संकटसमय आला असतां, त्याचा येवढा तुह्मीं गौरव करिता, तेव्हां तुमचेसाठीं आह्मांजवळ धर्मन्याय कांहीं नाहीं! ' त्याचें स्मरण महाराजांस असल्या प्रसंगीं येत असेल! शेवटीं या मुद्यासंबंधानें हीही गोष्ट लक्षांत आणली पाहिजे कीं, महाराज जर भले मनुष्यांशींसुद्धां प्रसंग पडल्यास कपट, विश्वासघात, खून वगैरे करिते, तर त्यांचेजवळ महाडचा बाजी देशपांडे, पुरंदर किल्ल्यावरील मुरार बाजी, चाकणचे किल्ल्यावरील फिरंगोजी नरसाळा, तानाजी मालुसरे, हिरोजी फर्जंद वगैरे जीं लाखीं लाखों मनुष्यें—ज्यानीं महाराजांचे चाकरींत प्राण खर्च केले; परंतु शत्रूंस हार गेले नाहींत तीं—शिवाजी महाराजांस एवढीं चिकटून राहण्याचा अगदीं संभव नव्हता! महाराजांवर क्रूरपणा व देवभोळेपणा या दोन दोषांचें जें आरोपण इंग्लिश इतिहासकारांनीं केलें आहे, त्यांतील पहिल्यावरून महाराजांचे चरित्रांत उदाहरणच नाहीं; उलटें त्यांनीं वर सांगितल्याप्रमाणें शत्रूकडील मुलुखांत त्यांचें सैन्य लुटालूट करीत असतां, त्यांनीं तेथील लोकांस होतां होईल तोंपर्यंत कमी उपद्रव होण्याबद्दल यत्न करावा व शत्रूकडील सरदार किंवा स्त्रिया हातीं सांपडल्यास, त्यांचा त्यांनीं आदर करून त्यांची नीट बरदास्त ठेवावी, याबद्दलचीं उदाहरणें यामागें कित्येक दिलीं आहेत. आतां देवभोळेपणाविषयीं लिहितांना, परधर्मी लोकांचा आणि आमचे लोकांचा मतभेद सहजच पडणार आहे. आह्मांस जो धर्म वाटतो, तोच परधर्मीयांस देवभोळेपणा वाटतो, व ह्मणून इंग्लिश इतिहासकारांनीं महाराजांस धर्माचेसंबंधानें टोमणे मारले आहेत; परंतु या बाबतींत निदान आमचे हिंदुवाचकांसाठीं विशेष लिहिण्याची गरज दिसत नाहीं.

आतां, महाराजांचे एका मिथ्या दोषाविषयीं लिहून हें त्यांचें गुणदोषविवेचनप्रकरण संपवितों. पुष्कळ इंग्लिश इतिहासकारांचें ह्मणणें आहे कीं, महाराजांनीं प्रथमारंभीं डोकें मारून व लुटालूट करून राज्यस्थापन केलें. आह्मीं ह्मणतों, केलें; परंतु स्वदेश स्वतंत्र करून हिंदुसाम्राज्याची व धर्माची जर स्थापना करायाची, तर ती

कशी करायाची? वरील कृत्य प्रत्येक न्यायदृष्ट मनुष्यास अत्यंत अवश्य व संतोषप्रद आहे खरें, पण तें व्हावें कसें? वरील कामाकरितां लागणारा खजिना, फौज, व लढाऊ सामान हीं कां कांहीं दैविक कृतीनें आकाशांतून उतरावयाचीं, कीं जमिनींतून वर यावयाचीं? मानुषिक साधनांनींच जर कृत्य साधायाचें, तर वरील कांहींअंशीं गर्हणीय साधनांचा उपयोग केल्याशिवाय दुसरा इलाज कोणता? आतां महाराज होतां होईल तितका लुटलेल्या प्रदेशास कमी त्रास देत, यापेक्षां त्यांनीं त्यांचे त्यावेळचे स्थितींत दुसरें तें काय करावयाचें होतें? मोंगल, विजापूर वगैरे मुलुखांतील लोकांना, ते महाराजांचे ताब्यांत येईपर्यंत त्यांचे लुटालुटीपासून कांहीं त्रास सोसावा लागला हें खरें; परंतु तो कांहीं वेळ सोसून पुढें स्वातंत्र्य, स्वराज्य, स्वधर्मोन्नति वगैरे गोष्टींचा अनुभव घेणें बरें, किंवा एकदम लुटालूट मात्र नाहीं; परंतु अक्षय्य पारतंत्र्य, परदेशीयांचें राज्य, स्वधर्मविटंबना वगैरे अनेक तऱ्हेनें राष्ट्राचा ऱ्हास होणें हें बरें, हें कोणीही न्यायप्रिय व राष्ट्राचे खरे हक्क जाणणारा मनुष्य सांगू शकेल!

आतां शेवटीं महाराजांचे खाजगी वर्तनाविषयीं थोडेसें लिहून, हा भाग आटोपतों. महाराजांची सर्वांशींच वागणूक मोठी प्रसन्न असे. त्यांचे भाषणाची शैली अशी कांहीं विलक्षण असे कीं, ऐकणाराचे मनावर त्याची छापच पडावी. सर्वांस असें वाटे कीं, महाराज आपल्याशीं अगदीं मन मोकळें करून बोलतात; तथापि त्यांच्याशीं घसट करण्याची कोणाची छाती होत नसे. ते स्वभावानें तापट असत खरे; तथापि हाताखालचे सर्व लोक, आप्तवर्ग यांविषयीं ते मायाळू असत.

महाराजांस चार स्त्रिया होत्या. पहिली सयीबाईसाहेब. ही निंबाळकरांची कन्या असून, संभाजी राजे यांची आई. ही १६५९ सालीं वारली. दुसरी सोयराबाईसाहेब: ही शिरके यांची कन्या असून, तीस राजारामसाहेब हे पुत्र झाले. तिसरी पुतळाई ही मोहित्यांची कन्या होती. चवथीचें नांव किंवा घराणें कांहीं कोठें लिहिलेलें नाहीं.

———————

# भाग ११.

## संभाजी महाराज.

१. शिवाजी महाराजांच्या मृत्यूच्यावेळीं त्यांच्या राज्याचा विस्तार. त्याची संपत्ति. मोंगलास ह्या राज्यविस्ताराची व संपत्तीची इतकी भीति नसे, तर महाराजांनीं अमलांत आणलेल्या युद्धपद्धतीचेंच त्यांना भय वाटे. २. तूर्त मराठी राज्यावर आलेला प्रसंग. शिवाजी महाराजाचे मागें संभाजीराजे यांस होते तसे पन्हाळ्यास राहूं देऊन, राजाराम साहेबांसच गादीवर बसविण्याची मसलत. महाराजांच्या द्वितीय पत्नीस कांहीं प्रधान मंडळीची अनुकूलता. त्यांनीं केलेली व्यवस्था. या सर्व बेताचा डळमळीतपणा. त्याचें कारण. ३. संभाजीराजे यांस हा बेत कळतो. त्यानंतरचें संभाजीराजे यांचे वर्तन--हंबीरराव राजे यांच्या पक्षास मिळतो. मोरोपंत पेशवा सामील होतो. संभाजींची रायगडावर चाल. सर्व लोक त्यांस मिळाल्यामुळें त्यांना जय प्राप्त होतो. विरुद्धपक्ष मोडण्याचे कामीं संभाजीराजे यांचें चातुर्य व पराक्रम. पाडाव झालेल्या लोकांशीं राक्षसी वर्तन. सोयराबाईचा क्रूर वध—कडेलोट व इतरप्रकारें देहांतशासन—संभाजी महाराजांस राज्याभिषेक. त्यावेळीं झालेलीं दुश्चिन्हें. ४. संभाजी पन्हाळ्याकडे जातो. औरंगजेबाचा चौथा मुलगा ड फितुरी करून संभाजीच आश्रयास येतो. मध्यंतरीं राजारामाचे तर्फे फितुरीची खटपट—संभाजीचे व सुलतानाचें सख्य. फितूरींत असलेल्या लोकांचें पारिपत्य. अण्णाजी दत्तोच्या वधाबद्दल सर्व लोकांची हळहळ. त्याचा प्रतिस्पर्धी मोरोपंत पेशवा याचें निस्पृह भाषण. संभाजी महाराजांची पत्नी येसूबाई इचें वजन, तिनें केलेल्या कानउघाडणीचा उपयोग. ५. महाराजांचे कैफाचें व्यसन—हिंदुस्थानांतून कलुषा नामक कनोज ब्राह्मण येतो—त्याचे ढंग, अनुष्ठानें वगैरे. त्याचें महाराजावर वजन. राज्यकारभारांत त्याचा शिरकाव. मोरोपंत पेशव्यास कैद. रामदास स्वामींचें संभाजीस उपदेशपर पत्र. तें व्यर्थ जातें. समर्थांचा मृत्यु. कलुषाचें अधिक वजन. त्याचें तोंडपुजेचें वर्तन. ६. रघुनाथ नारायण यांची सरंजामानिशी भेट. त्यांचा मानमरातब. ते उपदेशाच्या गोष्टी सांगूं लागले तों मर्जी बिघडते. वरकरणी चांगले वागण्याचें वचन. रघुनाथपंताची औरंगजेबाचे स्वारीविषयीं खबरदारीची

मसलत. रघुनाथपंताचा मृत्यु. थोडावेळ महाराजांची सुवृत्ति; पण कवजीच्या वजनापुढें व्यर्थ. ७. जंजिऱ्याच्या सिद्दीवर स्वारीचा निश्चय. खंडूजी फर्जंद यास फितूरी करण्यास सिद्दीकडे नोकरीस पाठविणें. दादाजी रघुनाथास स्वारी-वर धाडणें. मदतीस स्वत: जातात; पण मोंगलांची मराठी मुलुखावर स्वारी. मोंगल मागें हटतात. जंजिऱ्याच्या किल्लयावर निकराचा हल्ला. त्यांत अपयश व हानि. सिद्दीची मराठी मुलुखास पीडा. सिद्दीमिसरी फितूर. त्याचे हाता-खालीं मराठी आरमार शूरपणानें लढलें, तरी त्यांचा अगदीं मोड होतो. ८. पोर्तुगीज व इंग्लिश ह्यांचा मराठ्यांशीं संबंध. महाराजांचा इंग्लिश लोकांस त्रास देण्याचा बेत. औरंगजेबाच्या दाक्षिणेवरील स्वारीची खबर. इंग्रजाशीं तहाचें बोलणें. जमत नाहीं. मोंगलाची फौज मराठी मुलुखावर येते; पण महाराज तीस मागें सारतात. ९. पोर्तुगीज लोकांची पुंडाई व क्रूर वर्तन. मराठ्यांच्या व्यापारास त्रास. पोर्टुगीज गव्हर्नरचा पोंडा येथील किल्लयास वेढा. संभाजी महा-जांच्या हिम्मतीनें वेढा उठतो. पोर्तुगीज लोकांचे फार हाल. गोव्यावर हल्लयाची खटपट. त्यांचें धाडस व शौर्य. खाडीस पाणी चढल्यामुळें महाराजांच्या हल्लाचा परिणाम, पुष्कळ लोकांचा प्राणनाश ह्या पलीकडे कांहीं होत नाहीं. दुसरे ठिकाणीं पोर्तुगीजांचें पुष्कळ नुकसान, तहाचें बोलणें निष्फळ. १० संभाजी महाराजावर आळस व दुर्व्यसन यांचा पगडा व मोरोपंत पेशवे यांच्या मृत्यु-मुळें कलुषाचें पूर्ण वजन. कवजींचा पंडितराव होऊन अष्ट प्रधानांत प्रवेश. शिवाजी महाराजांचे लष्कर संबंधीं कायदे कानू अंमलांत येईनासे होतात. पैशाचा तुटवडा. संभाजी महाराजांचा उधळेपणा. धारा वाढविणें. वसूल तटतो. तालुके मक्त्यानें लावून दिल्यानें प्रजेवर जुलूम. लोक देशत्याग करूं लागतात. ११. औरंगजेबास सर्व हिंदुस्थानभर मोंगल राज्य करण्यास संधि. हिंदुलोकांशीं विषम वर्तन ठेविल्यामुळें, बंडें. व रजपूत संस्थानिकांचें बंड. ती औरंगजेब आतां दक्षिणेकडे लक्ष पुरवितो. स्वत: बऱ्हाणपुरास आला. मागची सर्व व्यवस्था लावून टाकतो. आपल्या दोघा मुलास फौजा देऊन पुढें पाठवितो. सालेरीच्या किल्लयावर जाण्यास तिसरा मुलगा सुलतान आझिम यास हुकूम. सैन्य जवळ येतांच आंतील हवालदार फितूर होऊन किल्ला हस्तगत करतो. रामसेजे या किल्लयावर हल्ला करणाऱ्या मोंगल सैन्याचा पूर्ण पराजय. सुलतान मोआझिम सर्व कोंकण मुलूख जाळून टाकतो. संभाजी महाराजांचें विशाळगडावर राहणें. देश उद्ध्वस्त. मोंगलास दाणा वैरण मिळेना. मराठे वाटा आडवितात. महाराज आपली पागा देशावरून बोलावून मोंगल सैन्याचा पिच्छा पुरवितात. बादशहाचे हुकुमानें सुरतेहून पुरवठ्याची आलेल्या जहाजांतून बराच माल मराठे लुटतात

मोआझिमच्या सैन्याचे हाल. शहाबुद्दीन याचा निजामपूर येथें थोडासा जय. बादशहा त्यास किताब देतो. औरंगजेब ब-हाणपुराहून औरंगाबादेस येतो. उत्तरेप्रमाणें गिझिया कर दक्षिणेंतही जुलमानें वसूल करावितो. १२. दिलेर-खानाचा मृत्यु. १३. पोर्तुगिज लोकांशीं युद्ध. संभाजी महाराज पन्हाळ्यावर येऊन राहतात. १४. विजापूर दरबारची स्थिति. औरंगजेबाच्या वकीलानें मसाऊदखानाविरुद्ध उभारलेल्या फळीमुळें त्याचें वजन कमी होतें. सैन्याची वाईट स्थिति. घोडेस्वार कमी केल्यामुळें झालेली फजिती व नुकसान. मसा-ऊदखान राज्यकारभार सोडतो. नवीन कारभारी मराठ्यांशीं केलेला तह मोडतो. हा मराठ्यांचा आधार तुटल्यापासून नुकसान. विजापूरप्रमाणें गोंवळकोंडें येथेंही अशीच फितूरी सुरू झाली. मादण्णापंताचें वजन कमी करण्याची खटपट. मराठे, विजापूर व गोंवळकोंडें या तिनीही राज्यांत औरंगजेब बादशहाचे लोक सारखी मेहनत करीत होते. त्यांना आलेलें यश. १५. मराठे लोकांत वतना-संबंधीं हक्काचे बाबतींत चुरस व भाऊबंदी. त्याजपासून मोंगलांचा फायदा. १६. औरंगजेब बादशहाची तयारी. स्वारीचा शाट. घोडेस्वार, पायदळ, तोफखाना, सुरुंगवाले, लढाऊ हत्ती, सामानाचे व अंबारीचे हत्ती, सजविलेले बसण्याचे घोडे, शिकारखाना, छावणीची व्यवस्था. स्वतः बादशाहाची राहणी अगदीं साधी. बाहेरच्या डामडौलाचा हेतु. त्यापासून होणारी गैरसोय व नुकसान. १७. हंबीरराव यांची ब-हाणपुरावर स्वारी व लूट. सुलतान आझिम सोलापूर घेतो; पण विजापूर येथें शिरझीखानापुढें त्याचें कांहीं चालत नाहीं. सुलतान मोआझिम वाळव्याभोंवतालचा मुलूख काबीज करतो. त्यास घांटावर आण्याचा हुकूम. त्याचें सैन्य कमी होऊन, विजापूरकरांच्या हल्ल्यापुढें निभाव लागेना व फार नासाडी झाली. १८. आझिमास विजापुरास वेढा देण्यास हुकूम. औरंगजेब बादशहाचा सोलापूर येथें मुक्काम. दुष्काळ पडतो. गाझीउद्दीनानें आझिमच्या सैन्यास केलेला पुरवठा. विजापूरकरांचा पराजय. १९. मराठे भडोच घेतात. औरंगजेबास मराठ्यांची इतकीशी भीति वाटत नव्हती. मादण्णापंताची विजापूर दरबारी खटपट व उपदेश. मराठ्यांशीं गोवळकोंड्याचा तह. खानजहानाची गोवळकोंड्यावर स्वारी. मादण्णापंताची तयारी. खानजहानाचे मदतीस सुलतान मोआझिम येतो. एकत्र झालेली फौज हैदराबादेवर जाते. इब्राहीमखान फितूर होऊन शत्रूस मिळाला. हैदराबाद लुटलें. मादण्णापंताचा खून. मोंगलांशीं सुलतान अबूहसनाचा तह. औरंगजेब बाद-शहाचें संशयखोर वर्तन. २० औरंगजेबाचा विजापूर शहरापुढें मुक्काम. विजा-पूरचे लोकांचे हाल व निकराचें शौर्य. शहर मोंगलांचे स्वाधीन होतें. शिरजी-

खानास सरंजाम. शिकंदर आदिलशहास नजरकैद. आदिलशाही बुडाली. २१ आदिलशाही बुडविल्यावर कुतुबशाही बुडविण्याची औरंगजेबाची खटपट. त्याचें मायावीपणाचें वर्तन. अखेर अबूहसनवर केलेले आरोप. गोंवळकोंड्याचा वेढा. सात महिनेपर्यंत शहाचें निकराचें लढणें. अखेर फितूरीनें किल्ला मोंगलांकडे जातो. कुतुबशाहीचा नाश. हैदराबादेस कुतुबशाहींतील इमारती. कुतुबशहाच्या वर्तानें बादशहाजवळ सुलतान माआझिम यानें केलेल्या तरफदारीचा परिणाम. २२ शिरजीखानास औरंगजेब मराठ्यांच्या दक्षिणकडील मुलखावर पाठवितो. वाईजवळ त्याचा पराभव. हंबीररावाचा मृत्यु मोंगल मसाऊदखानाचें आडोनी गांव काबीज करतात. कर्नाटकांतील बेरडांचा नाईक बादशहास शरण येऊन चाकरीस राहतो. त्याचा मुलगा नोकरी सोडून पूर्ववत् लुटारू होतो. २३ मोंगलांची दक्षिणेवर स्वारी. तिकडील मुलूख राखण्याकरितां केसोपंत पिंगळे यांची मोहीम. तिकडील मसलती फसून अपयश. बंगलूरची हकीकत. केसोपंत व महाडीक यांचे आपसांत कलहानें शत्रूस फायदा. २४. औरंगजेब विजापूर सोडून वाख्यामुळें अकलूज येथें मुकाम करता. कांहीं किल्ले खेरीज मराठ्यांचा सर्व मुलूख मोंगलांनीं घेतला. संभाजी महाराजांच्या दुर्वर्तनाची कमाल. दुर्जनांचा सुकाळ. चांगल्या लोकांचा निरुपाय. सुलतान अकबराचा देशत्याग. २५. बादशहा मराठ्यावर तीन फौजा तिन्हीकडे पाठवितो. संगमेश्वर येथें संभाजीस पकडण्याचा तकरीबखानाचा हेतु. तो त्यानें मोठे धूर्ततेनें तडीस नेला. महाराज धुंद असल्यामुळें, इशारा मिळाला तरी तो देणाऱ्यावरच घसरले. महाराजांस पकडून, बादशाहाचा तळ अकलूजाहून तुळापूर येथें गेला होता तेथें नेलें. महाराजांच्या बरोबर पकडलेल्या लोकांची विटंवना. बादशहाच्या उमरावांचा सल्ला. औरंगजबाचें धर्मवेड. महाराजांच्या मनाची स्थिति व वागणूक. महाराज व कलुषा यांचा क्रूर वध. २६. संभाजी महाराजांच्या कारकिर्दीचें सामान्य स्वरूप. त्यांचा स्वभाव व वर्तन. त्यांच्या वधापासून मराठे लोकांच्या मनावर झालेला परिणाम.

१. मागील भागांत सांगितल्याप्रमाणें शिवाजीमहाराजांचा अंत झाला! यावेळीं त्यांचें राज्य गोवें, खालचें चौल, साष्टी आणि वसई हीं पोर्तुगीज लोकांचीं ठाणीं, सिद्धी याचें जंजिरा हें ठाणें, व इंग्लिश लोकांचें मुंबई हें ठाणें, याशिवायकरून सर्व कोंकणप्रांतांत गंडावीपासून पोंडापर्यंत पसरलें होतें. महाराजांचीं ठाणीं कारवार, अकोला

वगैरे प्रांतांतून समुद्रकांठावर असून, तेथील मुलूख कांहीं त्यांचे व कांहीं तेथील पूर्वीचे देशमुखांचे ताब्यांत होता. सुंद येथील राजा आपणांस महाराजांचा मांडलिक राजा असें ह्मणवूं लागला होता; व बेदनूरचा राणा हा दरवर्षी त्यांस करभार देत असे. कर्नाटक प्रांतांत, महाराजांस नुकतेंच बल्लारी, कोपाळ वगैरे प्रांत आदिलशाहीकडून मिळाले होते, व तंजावर व शहाजीराजे यांचे जहागीर मुलुखांचा अर्धा हिस्सा हीं व्यंकोजीराजे यांजकडून महाराजांस मिळालीं होतीं. महाराष्ट्रांत दक्षिणेस हरवकाशी नदीपासून उत्तरेस इंद्रायणी नदीपर्यंत ह्मणजे पुणें व जुन्नर यांमधील मुलूख, महाराजांचे ताब्यांत होता. सुपें, बारामती व इंदापूर हे आपले वडिलोपार्जित जहागीर गांव आहेत, असा हक्क महाराज सांगत असून, ते त्यांचे ताब्यांत कधीं कधीं असत; आणि टाटोऱ्यापासून पन्हाळ्यापर्यंत जी किल्ल्यांची एकसारखी ओळ महाराजांनीं बांधून काढली होती, ती त्यांचे स्थाईक राज्याची पूर्वसीमा बनली होती. याशिवाय शंभूमहादेवाजवळ सिंगणापूर, दमणाजवळ पारनेरा, व खानदेश व बागलाण या प्रांतांत कित्येक मजबूत किल्ले व गांवें हीं तुटक तुटक अशीं महाराजांचे ताब्यांत होतीं. त्यांचा खजिना मोठा होता, व त्यांत निरनिराळ्या देशांचीं निरनिराळीं नाणीं कित्येक कोटी अशीं होतीं.

महाराजांचे राज्याचा ह्मणजे विस्तार फार होता, किंवा त्यांचा खजिना फार प्रचंड होता, अशी कांहीं गोष्ट नाहीं, त्यांजपासून मोंगलांस भिण्याचें येवढें कारण नव्हतें; परंतु मोंगलांशीं लढण्याची *नवीन रीत -- कीं, त्यांचे मुलुखांवर वरचेवर चालून जाऊन लुटालूट

* ह्या नवीन युद्धपद्धतीनें परकीय मुलुखांतून येऊन स्वारी करणारा शत्रू तर फारच बेजारून जात असे. मराठ्यांच्या जयाची गुरुकिल्ली या लढाईच्या रीतींतच होती. तिचा एकवार शिवाजी महाराजांनीं प्रारंभ करून दिल्यावर, त्यांचेमागून प्रसिद्धीस आलेल्या वीरांनीं तोच कित्ता गिरविला पुढें सोनपत पानपतच्या लढाईंत ही युद्ध करण्याची पद्धति सोडून दिल्यामुळें, मराठ्यांच्या सैन्यास अपयश आलें. इंग्रज व इतर युरोपीयन लोकांसुद्धां मराठ्यांनीं अनेकवेळां जर्जर करून सोडलें, तें याच पद्धतीच्या जोरावर. या युद्धपद्धतीचे

करावी, ठाणीं हस्तगत करावीं, त्यांच्या फौजा चालून आल्या असतां त्यांचेबरोबर हाताहातीं कचकचीत लढाई खेळण्याचे भरीस न पडतां त्यांजपासून दूर निघून जाऊन त्यांचे भोंवतालीं आसपास रहावें, त्यांस दाणावैरण वगैरे कांहीं पोहोंचूं देऊं नये, व शत्रूंशीं अशा तऱ्हेनें लढावें कीं, त्याजपासून आपले लोकांचें नुसतें शौर्य दिसण्यापेक्षां त्याजपासून लूट, पैसा वगैरे लढाईचा मुख्य मतलब हा साधावा—ही जी महाराजांनीं विशेष प्रचारांत आणली व जिचें त्यांचेमागें त्यांचे महाराष्ट्रीय अनुयायी वीरांनीं अवलंबन करून सर्व भरतखंडभर हिंदुसाम्राज्य पसरविलें, ती मोंगलांचे बादशाहीस विशेष भयप्रद होती.

२. परंतु महाराजांचे अंतकाळीं त्यांस पुढील अरिष्टाचीं जीं कांहीं चिन्हें दिसत होतीं, त्याप्रमाणें कांहीं काळ महाराष्ट्र देशास मोठा विपत्तींत काढावा लागला. मागील भागांत सांगितल्याप्रमाणें महाराजांनीं संभाजीराजे यांस पन्हाळा किल्ल्यावर अटकेंत ठेविलें असल्यामुळें, महाराजांचा रायगडीं एकाएकीं अंत झाला, त्यावेळीं राजे हे त्यांचेजवळ नव्हते. त्यांस जवळ आणण्याबद्दल कोणी कारभाऱ्यांनीं कदाचित्

---

आह्मीं पूर्वी सविस्तर वर्णन दिलें आहेच. या रीतीचें हंटर साहेबांनीं आपल्या 'इंडयन एम्पायर' नामक पुस्तकांत थोडक्यांत वर्णन दिलें आहे. तें असें.—

His (Sivaji's) troops consisted of Hindu spearmen, mounted on hardy ponies. They were the peasant proprietors of southern India, and could be dispersed or called together on a moment's notice, at the proper season of the agricultural year. Sivaji had therefore the command of an unlimited body of troops, without the expense of a standing army. With these he swooped down upon his enemies, exacted tribute, or forced them to come to terms. He then paid off his soldiery by a part of the plunder; and while they returned to the sowing or reaping of their fields, he retreated with the lion's share to his hillforts.

(*Hunter's Indian Empire.*)

महाराजांनींसुद्धां इच्छा दर्शविली नसेल. महाराजांचा अंत झाल्यावर त्यांचे राज्यावर हक्क संभाजीराजे यांचाच होय; परंतु ते कोणा प्रधानांस त्यांचे दुष्ट, दुर्व्यसनी स्वभावामुळें आवडण्यासारखे नव्हते. महाराजांची दुसरी पत्नी सोयराबाईसाहेब ह्यांचें महाराजांवर व कारभाऱ्यांवरही पुष्कळ वजन असे. तेव्हां त्यांनीं कांहीं प्रधानांस मिळून घेऊन, मसलत काढली कीं, संभाजीराजे यांस आहेत तसेच पन्हाळा किल्ल्यावर अटकेंत ठेऊन, राजारामसाहेब यांचे नांवानें प्रधान मंडळींनीं कारभार चालवावा; व ही मसलत पक्की होऊन संभाजीराजे यांचा नीट बंदोबस्त होईपर्यंत, महाराज वारल्याची बातमी फुटूं देऊं नये. येणेंप्रमाणें व्यवस्था ठरल्यावर महाराजांचा प्रेतसंस्कारविधि व क्रिया हीं लोकांस फार जाहीर न होऊं देतां, बेतानेंच शहाजी भोसले ह्मणून महाराजांचे कोणी जवळचे आप्त होते त्यांजकडून करविलीं. यानंतर प्रथम रायगड किल्ल्यावर शिबंदी वाढवून नीट बंदोबस्त केला. व जनार्दनपंत सुमंत यांस प्रसंग पडल्यास जवळ असावें ह्मणून पन्हाळ्याकडे फौज घेऊन जाण्यास हुकूम केला. मालसावंत वगैरे मावळे लोकांचे सरदार यांस दहा हजार फौजेनिशीं पांचवड येथें ठेविलें. सेनापति हंबीरराव यांस एक मोठी फौज घेऊन, कऱ्हाड येथें राहण्यास सांगितलें. त्याचप्रमाणें पन्हाळा किल्ल्यावर हिरोजी फरजंद यास महाराजांचा घडलेला मृत्यु, त्यांचे मागें राज्यकारभाराची प्रधान मंडळींनीं केलेली व्यवस्था, व त्यांचे आज्ञेवरून संभाजीराजे यांस नीट अटकेंत ठेवण्याचा ठरलेला विचार, हें सर्व कळविण्याकरितां बाळाजी आवजी चिटणीस याचा मुलगा आवजी बल्लाळ याजकडून पत्र लिहविलें, व तें जासुदाचे हातीं पाठवून दिलें.

येणेंप्रमाणें सोयराबाईसाहेब व कांहीं प्रधान यांनीं राज्याचा बंदोबस्त करून त्यांनीं राजारामसाहेब यांस गादीवर बसवून, त्यांचे नांवानें कारभार चालू केला; परंतु ही मसलत फार वेळ टिकण्यासारखी नव्हती. राजारामसाहेब हे दहा वर्षांचे असून, केवळ अज्ञान होते. त्यांची आई सोयराबाईसाहेब ह्या पडल्या बायको माणूस, शिवाय मोरोपंत

पेशवा व अण्णाजी दत्तो सचीव यांचेमध्यें बरेच दिवस चुरस होती, व इतर कारभाऱ्यांचींही मनें या पक्षास मिळावें किंवा त्या पक्षास मिळावें याविषयीं अनिश्चितच होतीं. यामुळें सोयराबाईसाहेब व त्यांची प्रधानमंडळी यांनीं बांधलेला मसलतीचा कोट फारसा मजबूत नव्हता.

३. संभाजीराजे यांस महाराजांचे मृत्यूबद्दलची बातमी कोणी गुप्तपणें कळविली ह्मणा किंवा त्यांस त्याबद्दल फक्त संशयच आला होता ह्मणा, कसेंही असो; त्यांनीं जासूद लखोटा घेऊन किल्ल्यावर येत आहे असें पाहून त्यास त्यांनीं एकदम पकडून, पत्रें हवालीं केलीं नाहींत, तर तुह्मांस आतांच ठार मारीन, ह्मणून दहशत घातली व त्यांचेपासून लखोटा हस्तगत करून घेतला. लखोटा उघडून पत्रें वाचून पहातांच आपणाविरुद्ध सावत्र आई व प्रधानमंडळी यांनीं रचलेला सर्व व्यूह त्यांचे लक्षांत आला. हा घडलेला प्रकार पाहून, हिरोजी फरजंद तर कोंकणांत पळून गेला. सोमाजी नाईक बंकी व सूर्याजी कंक यांस, संभाजीराजे यांनीं एकदम पकडून ठार मारलें, व पन्हाळा किल्ला सर्व आपले ताब्यांत घेतला. किल्ल्याखालीं जनार्दनपंत सुमंत हा फौजेनिशीं होता; परंतु राजे यांनीं त्याचे फौजेंतील सरदारांस फितूर करण्यास आरंभ केला. सेनापतीकडेही तसेंच संधान लाविलें. इतक्यांत एके दिवशीं रात्रीं किल्ल्यावरून उतरून राजे हे जनार्दनपंत याचे कांहीं फितलेले सरदारांचे मदतीनें, कोल्हापूर येथें त्याचे छावणींत एकदम शिरले व तेथें त्यास कैद केलें. यानंतर ते त्यास घेऊन माघारे पन्हाळा किल्ल्यावर परत चढून गेले. संभाजीराजे यांचा हा पराक्रम पाहून हंबीरराव यास वाटलें कीं, शिवाजी महाराजांचें पाणी पुत्रांत बरेंच आहे, व तो लागलाच राजे यांचे पक्षाकडे वळला. यानंतर मोरोपंत पेशवा हा जनार्दनपंत सुमंत कैद केला गेला, ही बातमी ऐकून फौजेसह पन्हाळा किल्ल्याकडे चालला असतां, वाटेंतच त्याचें मन फिरून तोही संभाजीराजे यांचे पक्षास मिळाला. राजे यांचा पक्ष येणेंप्रमाणें बळावत गेल्यामुळें, त्यांनीं पन्हाळ्यावरून निघून

जाऊन रायगडावर एकदम चाल करण्याची तयारी केली. तेथील शिबंदी अगोदरच संभाजीराजे यांस अनुकूल असल्यामुळें, ती त्यांचेतर्फे उलट पक्षावर उठली. पांचवड येथील फौजही एकदम वळून राजे यांचेकडे येऊन मिळाली. येणेंप्रमाणें सोयराबाईसाहेबांचा चोहोंकडे पाडाव होऊन, संभाजीराजे हे शेवटीं रायगडावर विजयी असे वर चढून आले. ( जून १६८० ).

विरुद्ध पक्ष मोडून टाकण्यांत संभाजीराजे यांनीं जी हुषारी दाखविली, तिजवरून त्यांचे अंगीं त्यांचे वडिलांचे कांहीं गुण आहेत, अशी लोकांची खात्री झाली, व त्यांचा राजे यांचेविषयीं बरा ग्रह होत चालला; परंतु राजे ह्यांनीं रायगड किल्ला हस्तगत केल्यानंतर विरुद्धपक्षाचे लोकांस शिक्षा देण्याचा जो झपाटा लाविला, तो केवळ राक्षसीच होय! त्यांनीं प्रथम अण्णाजी दत्तो यास कैद करून त्याचे पायांत बिड्या घातल्या व त्याची सर्व जिनगी जप्त केली. राजाराम साहेब यांस कैद केलें, व त्यांची आई सोयराबाईसाहेब यांस पकडून आपणांसमोर आणवून त्यांची अत्यंत निर्भत्सना करून ‘ तूं महाराजांस विषप्रयोग करून मारिलेंस, तुझे पुत्रास राज्य पाहिजे नाहीं काय? ’ असें त्यांस ह्मटलें. नंतर त्यांस भिंतींत कोनाड्यांत बसवून तेथें चिणून टाकण्यास हुकूम केला. सोमाजी नाईक बंकी यांचे मुलास कड्यावरून खालीं लोटून दिलें. मालसावंतापैकीं पंधरा असामींस एकदम ठार केलें. सुमारें दोनशें मोठमोठे सरदारांस याप्रमाणें संभाजी राजे यांनीं अशी क्रूर शिक्षा केली. हा भयंकर प्रकार पाहून राजे यांचेविषयीं सोयराबाईसाहेबांचे आप्त शिरके वगैरे सरदारांत द्वेष तर वाढला हें उघड आहे; परंतु सामान्य लोकांमध्येंसुद्धां कांहीं वेळ जो बरा ग्रह होत चालला होता, तो पालटून त्यांचेविषयीं अप्रीति, संशय व भीति हीं उत्पन्न झालीं.

यानंतर संभाजीराजे यांस आगष्ट १६८० मध्यें राज्याभिषेकविधि झाला. यावेळीं कित्येक दुश्चिन्हें झालीं असें सांगतात. प्रथम त्या दिवशीं अभ्रामुळें सूर्यदर्शनच झालें नाहीं. यानंतर सिंहासनारूढ

झाल्यावर महाराज रथावर बसून काळपुरुष मारण्याचा विधि करावयास चालले असतां, वाटेंत रथच मोडला. चालीप्रमाणें यज्ञ, ब्राह्मणभोजनें, दक्षिणा वगैरे सर्व झालें. महाराजांनीं पूर्वींचेच प्रधान तूर्त राहूं दिले; परंतु त्यांचे हातून कामें न घेतां त्यांचे गुमास्ते—उद्धव पुंगदेव व बहिरोपंत—यांजकडून कामें घेऊं लागले.

४. यानंतर संभाजीमहाराज हे पन्हाळा किल्ल्याकडे विजापूरचे सरकाराबरोबर कांहीं बोलणें लावण्याकरितां किंवा दुसरें कांहीं काम करण्याकरितां गेले. ते तेथें असतां, औरंगजेब बादशहाचा चवथा मुलगा सुलतान महंमद अकबर, ज्यानें कांहीं रजपूत राजांचे नादीं लागून बापाविरुद्ध बंड उपस्थित केलें होतें; परंतु तें पुढें पार मोडून जाऊन जो मोठे शर्तीनें हिंदुस्थानांतून दक्षिणेंत जागोजाग सुभेदारांच्या फौजा पहारे इत्यादिकांचे तडाक्यांतून चुकून आला होता, तो आपला आश्रय मागण्याकरितां रायगडीं आला आहे, हें वर्तमान त्याचे वकीलांचेमार्फत महाराजांस समजलें. त्यावरून महाराजांनीं राजपुत्राचें आगतस्वागत करण्याकरितां आपला एक कारभारी पुढें पाठवून देऊन, त्यास राहण्यास रायगडाजवळ धोंडसें ह्मणून गांव आहे तें नेमून दिलें व त्यास तेथें योग्य अशी नेमणूक करून दिली. कांहीं वेळानें धोंडसें गांवाचें नांव बदलून महाराजांनीं त्यास सुलतान अकबर याचे स्मरणार्थ पादशहापूर असें नवीन नांव दिलें. असो; इकडे संभाजी महाराज हे पन्हाळा प्रांतीं बरेच दिवस राहिल्यामुळें, त्यांचेमागें अण्णाजी दत्तो यांचे पक्षाचे मंडळीस अवसर फावून त्यांनीं सुलतान अकबर याचेबरोबर राजाराम साहेबांचेतर्फें बोलणें लावण्यास आरंभ केला. ह्या नवीन फंदाची बातमी महाराजांस महाडचा देशपांडे दादाजी रघुनाथ याजकडून कळली. त्यावरून त्यांस प्रथम सुलतानाचा संशय उत्पन्न झाला; परंतु त्या राजपुत्रानेंच स्वतः होऊन ती गोष्ट महाराजांस सविस्तर सांगितल्यावरून, त्याजवरचा त्यांचा संशय उडाला. यापुढें महाराज रायगडास आल्यावर त्यांचें व सुलतानाचें बरेंच रहस्य जुळलें ( १६८१ ).

अण्णाजी दत्तो याचे पक्षाचे लोकांनीं जो फंद केला ह्मणून वर लिहिलें, त्यास कोंकणांतील सर्व शिरके मंडळींचें साहाय्य होतें; याशिवाय शिवाजी महाराजांचे वेळचा त्यांचा विश्वासू चिटणीस बाळाजी आवजी हाही या कटांत पुढारी होता, असा त्यांजवर आरोप होता. दादाजी रघुनाथ देशपांडे याचा आणि चिटणीस याचा पूर्वींपासून द्वेष असून, अलीकडे देशपांडे याजवर संभाजी महाराजांची मर्जी विशेष बसत चालल्यामुळें, देशपांडे यानें महाराजांचे मनांत असें भरवून दिलें कीं, प्रथम पन्हाळा किल्ल्यावर महाराजांस कैद करून ठेवण्याबद्दल व फौजा आणविण्याबद्दल जीं रायगडाहून पत्रें लिहून गेलीं, तीं बाळाजी आवजी यांनीं आपला मुलगा आवजी याचेकडून लिहविलीं, तेव्हां त्यांचा पहिल्यापासून विरुद्ध पक्षांत हात आहे. त्याचप्रमाणें बाळाजीचा भाऊ शामजी आवजी हाही फितव्यांत होता. महाराजांस देशपांडे यांचें ह्मणणें खरें वाटून, त्यांनीं बाळाजी आवजी चिटणीस, त्याचा मुलगा आवजी बल्लाळ व त्याचा भाऊ शामजी आवजी अशा तिघांस हत्तीचे पायीं देण्यास हुकूम दिला. त्याचप्रमाणें अण्णाजी दत्तो, हिरोजी फरजंद, व जितकी ह्मणून शिरके मंडळी हातास लागली तितकी, ह्या सर्वांसही तेंच घोर शासन दिलें. बाकी राहिलेले शिरके हे पळून जाऊन मोंगलांचे चाकरीस राहिले. अण्णाजी दत्तो पंतसचिव याचा अशा तऱ्हेनें अंत झालेला पाहून, पुष्कळांस फार वाईट वाटलें. पन्हाळा किल्ला १६५९ सालीं घेतल्यापासून त्यानें शिवाजी महाराजांच्या अनेक जोखमीच्या व विश्वासाच्या कामगिऱ्या बजावून देऊन तो पंतसचिवाचे अधिकारावर चढला होता. शिवाय तो ब्राह्मण जातीचा असल्यामुळें त्याचे वधानें महाराजांनीं ब्रह्महत्या केली, ह्मणून एकंदर लोकांचे मनांत त्यांजविषयीं विशेष वाईट ग्रह बनत चालला! मोरोपंत पेशवा ह्याची पंतसचिवाविषयीं जरी चुरस असे, तरी त्यासही आपले प्रतिस्पर्ध्याचा अशा तऱ्हेनें झालेला शेवट पाहून उगें राहविलें नाहीं. त्यानें महाराजांचे तोंडावर "तुह्मीं पंतसचिवाचा वध केला हें फार वेडेपणाचें व अधर्माचें कृत्य केलें; ह्यापासून परिणाम चांगला होणार नाहीं" असें निर्भिडपणें सांगितलें.

संभाजी महाराजांचे सुदैवानें त्यांस चांगली समजूतदार अशी बायको मिळाली होती. तिचें नांव येसुबाईसाहेब असें होतें. त्यांजविषयीं महाराजांचाही बराच चांगला ग्रह असून, त्यांनीं सांगितलेली गोष्ट महाराज सहसा अमान्य करीत नसत. त्यांनीं चिटणीसांचेतर्फे महाराजांस ह्मटलें कीं, "ते महाराजांचे फार दिवसांचे विश्वासू चाकर; त्यांचेहातून अपराध झाला असला, तरी एवढी घोर शिक्षा द्यावयाची नव्हती. आपले राजलक्षणास हें शोभत नाहीं." महाराजांनीं उत्तर दिलें, "शिक्षेबद्दल हुकूम दिल्यावर मग मला वाईट वाटलें; परंतु चौकशी केली तों, त्यांचा वध अगोदरच होऊन गेला होता." त्यावरून येसूबाईसाहेबांनीं महाराजांकडून बाळाजी आवजीचे दोन धाकटे मुलगे—खंडो बल्लाळ व निळो बल्लाळ—यांजकडेसच वडिलोपार्जित चिटणिशी व कारखाननिशी ह्या चालविल्या. महाराजांनीं आपले शिक्के येसूबाईसाहेबांचे स्वाधीन करून ठेविले व हुकूम झाल्यावर कागदपत्रांवर खंडो बल्लाळ यांनीं बाईसाहेबांचे समक्ष शिक्के करीत जावे ह्मणून हुकूम केला.

९. महाराजांची सुवृत्ति अशी थोडे वेळच असे. नेहमीं ते बहुधां कैफांत चूर असल्यामुळें, त्यांच चित्तवृत्तीचा नेम सांगवत नसे. अशा स्थितींत त्यांचे हातून राज्यकारभार अर्थात्च चांगला चालत नसे. यांतच आणखी भर पडण्याकरितां मराठी राज्याचे दुर्दैवानें याच सुमारास हिंदुस्थानांतून कोणी कलुषा नांवाचा कनोजा ब्राह्मण महाराजांजवळ येऊन राहिला. हा स्वतः विद्वान् असून, आपणांस मंत्रविद्या चांगली येत आहे, व तिचे सामर्थ्यानें धनवृद्धि, राज्यवृद्धि वगैरे वाटतील तीं कामें आपण करून देऊं, असा भ्रम त्यानें महाराजांस करून दिला. त्यानें रेडे मारून त्यांचे ओले कातड्यांवर बसून, अनुष्ठानें चालविलीं. त्याचें महाराजांवर हळू हळू चांगलें वजन पडूं लागून, तो राज्यकारभारांतही हात घालूं लागला. कवजी* सांगतील

* कलुषा हा कविता करीत असे. यामुळें त्यास कविजी किंवा कवजी असें लोक ह्मणत.

ती पूर्व दिशा, असें होऊं लागलें. त्यानें महाराजांचें मनांत मोरोपंत पेशव्याविषयीं वाईट वाईट भरून देऊन "जुना चाकर झाला म्हणून त्यानें आपले तोंडावर अमर्याद भाषण करावें हें बरोबर नाहीं. येवढें नाकापेक्षां मोती जड कशास पाहिजे? त्याचा कारभार कोणास करितां येणार नाहीं कीं काय? आपणसुद्धां हुकूम झाल्यास त्याचें काम करून देऊं." असें म्हटलें. संभाजी महाराजांस कलुषाचें हें भाषण रुचून, त्यांनीं मोरोपंतास कैदेंत टाकून त्याचें काम त्याचा मुलगा नीळकंठ मोरेश्वर यास सांगितलें. परंतु नीळकंठ मोरेश्वर हा केवळ नांवाचा मुख्य प्रधान झाला. सर्व राज्यकारभार महाराज व कवजी हेच पाहत चालले.

याच सुमारास रामदासस्वामी हे समाधिस्त झाले (१६८१). त्यांनीं मरणापूर्वीं संभाजी महाराज यांस एक उपदेशपर चांगलें ओवीबद्ध पत्र पाठविलें. ज्या सत्पुरुषानें शिवाजी महाराजांची धर्मबुद्धि वृद्धिंगत केली, महाराष्ट्र राज्य स्थापन करण्याविषयीं त्यांस पूर्ण प्रोत्साहन दिलें, जो महाराजांचा आमरणांत सदुपदेशक व गुरु असा होऊन राहिला, व ज्यांचे बुद्धिवादानें संभाजी महाराज कदाचित् ताळ्यावर येण्याचा कांहीं संभव होता, याचा याच वेळीं दुर्दैवानें अंत झाला. या वेळेपासून तर कवजींचें माहात्म्य अधिकच वाढूं लागलें. कोणी लोक मधूनमधून कवजीचे तंत्रानें इतकें चालूं नका म्हणून महाराजांस सांगत; परंतु महाराजांस ती गोष्ट न आवडून अशा कित्येक लोकांवर त्यांची मोठी खप्पा मर्जी होई, व कधीं कधीं त्यांस दरबारांत पुन: न येण्याविषयींसुद्धां ताकीद होई. असा प्रकार होऊं लागल्यामुळें, लोकांनीं कवजीचें नांव घेण्याचें टाकून दिलें व जो जो प्रकार होईल तो तो मुकाट्यानें पाहण्याचा त्यांनीं विचार केला. कवजींत म्हणजे कोणते मोठे दुर्गुण होते असें नाहीं; परंतु जुन्या कारभाऱ्यांविषयीं महाराजांस भलभलतें सांगून सर्व राज्यकारभार त्यांचेकडून काढून घेऊन तो त्यांचे गुमास्त्यांचे मदतीनें करीत असे. तो स्वत: मूळचा कारभारांत वाकबगार नसून, तो परदेशस्थ असल्या-

मुळें त्यास पुष्कळ गोष्टी कळतही नसत. शिवाय महाराजांचा स्वभाव हेकट असून, ते पुष्कळदां कैफामुळे देहभानावर नसल्यामुळें, कवजीचें-सुद्धां त्यांजपुढें चालत नसे; तथापि महाराजांची मर्जी राखण्याकरितां, तो त्यांचे मनाजोगेंच नेहमीं बोले व तसेंच वर्तनही करी. महाराजांवर कांहीं मंत्र करून या कनोजा ब्राह्मणानें त्यांस आपले स्वाधीन करून ठेविलें आहे व तो त्यांस पाहिजे तें करण्यास सांगतो, असा साधारण लोकांचा समज असल्यामुळें, कवजी हा अर्थात्च त्यांस आवडेनासा होता.

६. इकडे कर्नाटक प्रांतांत शिवाजी महाराजांनीं रघुनाथ नारायण यास मुख्य करून ठेविलें होतें ह्मणून मागें सांगितलेंच आहे. त्यानें, शिवाजी महाराजांचा अंत होऊन त्यांचे गादीवर संभाजी महाराज बसले हें ऐकून, तो नवीन महाराजांचे भेटीस येण्याकरितां निघाला. त्यानें प्रांताचे बंदोबस्ताकरितां मागें हरजीराजे महाडीक यांस ठेविलें. रघुनाथपंतानें बरोबर पांच हजार स्वार, दहा हजार पायदळ व प्रांताचे वसुलाची शिल्लक तीस चाळीस हजार होन इतकी घेऊन तो रायगडास येऊन दाखल झाला. आपले वडिलांचा फार मोठा विश्वासू व हुषार असा कारभारी प्रांताची मोठी शिल्लक घेऊन येत आहे हें ऐकून, संभाजी महाराज यांनीं पंत अमात्य यांची भेट, विरवडीस नदीचे कांठीं मोठा मंडप घालून, तेथें मुख्य मुख्य कारभारी लोकांसह मोठा दरबार भरवून घेतली. महाराजांनीं पंतांचा मोठा मान केला. परंतु कांहीं वेळानें त्यानें महाराजांस ह्मटलें कीं, "दिवसेंदिवस आपलें राज्य वृद्धि न पावतां कमीकमीच होत चाललें आहे; चोहोंकडे पाळेगार बळावत चालले जाऊन प्रजा हवालदील होत चालली आहे; प्रांत उजाड होत आहेत; महाराज कैलासवासी होऊन दोन वर्षेंसुद्धां झालीं नाहींत, इतक्यांतच असा प्रकार झाला याचें कारण काय? ब्राह्मण सरदार यांस किल्ल्यावर कैदेंत ठेवण्याचें सोडून, त्यांचा शिरच्छेद करून ब्रह्महत्त्येचें पातक लावून घेतलें, ह्यास काय ह्मणावें? औरंगजेब बादशहा दक्षिणेंत येऊन

स्वारी करितो, याचा तुह्मीं काय विचार केला आहे ?" पंतांचें हें अम्मळ धिटाईचें व निर्भिडपणाचें भाषण ऐकून, महाराजांस त्यांचा मनांत राग तर आलाच; परंतु त्यांस कमीजास्त कांहीं करूं गेल्यास, पंत सर्व कर्नाटक प्रांत व्यंकोजी राजे यांचे स्वाधीन करतील हा विचार आणून, त्यांनीं आपला राग गिळून, पंतांस फारसें कांहीं उत्तर केलें नाहीं; मात्र त्यांनीं मोरोपंत पेशवे व जनार्दनपंत सुमंत यांस कैदेंतून काढून पुनः कामावर घेतों ह्मणून ह्मटलें. रघुनाथपंतानें रायगडास येण्यापूर्वीं, औरंगजेब बादशहा दक्षिणेंत स्वारी करून तो विजापूर व गोंवळकोंडें हीं राज्यें जर बुडवूं पाहील, तर महाराजांनीं दोन्ही सुलतानांस मदत करून, तिघांनीं मोंगलांबरोबर टक्कर द्यावी, अशी मसलत दोन्ही सुलतानांबरोबर तयार करून आणली होती; परंतु महाराजांजवळ कवजीचें अतोनात प्राबल्य, हलकीं माणसें दरबारांत भरलेलीं, त्यांचे सल्ल्यानें महाराज वागतात, व आपण दोन्ही सुलतानांबरोबर करून आणलेली मसलत महाराजांस पसंत नाहीं असें पाहून, पंत अमात्य यानें विचार पाहिला कीं, अशा स्थितींत महाराजांजवळ राहण्यांत आपली शोभा नाहीं. तेव्हां जिंजी प्रांताचा बंदोबस्त राहिला पाहिजे, तिकडे मोंगलांच्या फौजा येतील असें निमित्त करून, रघुनाथपंतानें लवकरच कर्नाटकची वाट धरली; परंतु रघुनाथपंतास वाटेंतच कांहीं दुखणें होऊन, तो मरण पावला. महाराजांनीं रघुनाथपंतापाशीं ह्मटल्याप्रमाणें मोरोपंतास व जनार्दनपंतास कैदेंतून काढून जनार्दनपंतास त्याचे भावाची ह्मणजे रघुनाथपंताची अमात्याची जागाही दिली. जिंजी प्रांताचा सर्व अधिकार हरजी राजे महाडीक यांजकडेसच ठेविला व त्यांचे हाताखालीं मुतालिक ह्मणून, मोरोपंत पेशव्याचा मुलगा नीलकंठ मोरेश्वर यास नेमून पाठवून दिलें ( १६८१ ). परंतु संभाजी महाराजांची ही सुवृत्ति फार वेळ राहिली नाहीं, व या वेळेपासून पुढें कवजींचा पगडा महाराजांचे मनावर अगदीं पूर्ण बसून, ते दुसरे कोणाचें अगदीं ऐकेनासे झाले !

७. संभाजी महाराज व सुलतान अकबर यांची जेव्हां प्रथम गांठ पडली, तेव्हां लोकांत अशी अफवा उठली कीं, मराठे व रजपूत हे

एकत्र होऊन, औरंगजेब बादशहास पदच्युत करून, सुलतान अकबर यास गादीवर बसविण्याविषयीं दोघांची मसलत घाटत आहे; परंतु हें मोठें धोरणाचें, धिम्मेपणाचें व सतत उद्योगानें साध्य होणारें महत्कृत्य, संभाजी महाराजांसारख्या उतावीळ, रागीट व पोकळ डौली स्वभावाचे पुरुषाचे मनांतसुद्धां भरण्यासारखें नव्हतें! त्यांचें लक्ष प्रथम जंजिऱ्याचे सिद्धयाकडे गेलें. सिद्धी हा वारंवार आपले प्रांतांत उतरून गांवें लुटतो, जाळतो, लोकांस कैद करून नेतो, तेव्हां त्याबद्दल त्याचा सूड घ्यावा, व शिवाजी महाराज एवढे मोठे पराक्रमी; परंतु त्यांनीं जंजिऱ्यांतून सिद्धीस खणून काढण्याकरितां कित्येक मोठे निकराचे प्रयत्न केले, तरी त्यांचेहातून तें कृत्य झालें नाहीं; तेव्हां हें महद्यश आपण घ्यावें, असा संभाजी महाराजांनीं विचार केला.

याकुबखान सिद्धी हा मोंगलांचा ताबेदार होता खरा; तथापि मराठ्यांचें आणि त्याचें असें हाडवैर पडून गेलें होतें कीं, शिवाजी महाराजांनीं कर्नाटकाचे स्वारीवर जाण्यापूर्वी, दक्षिणेचा सुभेदार खान जहानबहादूर याजबरोबर सन १६७६ त तह ठरविला असतांही, सिद्धी याची लढाई चालूच होती. विजापूरकर, मोंगल वगैरे सरकारांबरोबर मराठ्यांचें युद्ध मधून मधून चाले; परंतु जंजिऱ्यांचे हबशाबरोबर शिवाजी महाराजांचे कारकीर्दीचे अगदीं आरंभापासून तें जें एकदां सुरू झालें, तें शिवाजी महाराजांचा अंत होऊन जाऊन संभाजी महाराजांचीही कारकीर्द सुरू झाली, तरी मध्यंतरीं फारसा खंड न पडतां, कधीं मध्यें मोठें हातघाईचें व कधीं नुसतें रेंगाळत असें तें चाललेंच होतें. संभाजी महाराजांनीं यावेळीं कंबर बांधून हबशी अगदीं नाहींसा करण्याचा निश्चय केला. त्यांनीं आपले मर्जींतील एक मनुष्य,—खंडोजी फर्जंद—यास, आपण महाराजांपासून फितूर होऊन आलों आहे, असा बाहणा करून जंजिऱ्यास जाऊन याकूबखानाचे चाकरीस राहण्यास, रवाना केला. तेथें त्यानें सिद्धयाचे कांहीं लोक फितूर करून, मराठ्यांनीं बाहेरून जंजिऱ्यावर हल्ला सुरू केला म्हणजे, इकडे आंत दारूखान्यास बत्ती लावून द्यावी असा बेत ठरविला. इकडे महाराजांनीं

जंजिऱ्यावर हल्ला करण्याकरितां दादाजी रघुनाथ देशपांडे याजबरोबर मोठें सैन्य देऊन रवाना केलें. जंजिऱ्याची मोहीम फत्ते करून दिल्यास आह्मीं तुह्मांस अमात्य करूं, असें महाराजांनीं दादाजीस वचन दिलें.

खंडोजी फर्जंद याचेमार्फत फितुराची जी खटपट महाराजांनीं केली, ती कांहीं वेळानें उघडकीस येऊन, हबशांनीं खंडोजी व त्याचे दुसरे साथी यांस ठार मारलें; तथापि मनांत आणलेली गोष्ट कशी तरी सिद्धीस न्यावयाचीच, असा महाराजांनीं विचार करून ते स्वतः दादाजी देशपांडे याचे मदतीस निघाले. त्यांनीं आपलेबरोबर सुलतान अकबर यासही घेतलें. जंजिऱ्याची खाडी दगड माती घालून बुजवून काढून मग किल्ल्यावर हल्ला करावा, अशा बेतानें महाराजांनीं तें काम सुरूं सुद्धां केलें; परंतु इतक्यांत अहंमदनगराहून जुन्नरचे वाटेनें मोंगलांचा सरदार हुसेन अल्लीखान हा कल्याणप्रांत लुटण्याकरितां आला असून, त्यानें पनवेलचे उत्तरेकडील भाग बराच लुटला, ही खबर महाराजांस लागतांच ते जंजिऱ्याचे हल्ल्याचें काम सोडून देऊन, मोंगलांचे फौजेचे रोखानें चालले. दोन्ही सैन्यांची लवकरच गांठ पडली. संभाजी महाराजांनीं मोंगलांचे फौजेचे अघाडीवर चांगला निकराचा हल्ला करून व त्यांची दाणावैरण चोहोंकडून बंद करून, त्यांस पावसाळा लागण्यापूर्वींच अहंमदनगराकडे परत जाण्यास लाविलें. ( १६८२ ).

इकडे दादाजी रघुनाथ यानें जंजिऱ्याचे वेढ्याचें काम तसेंच चालविलें. त्यानें तोफा वगैरे लावून किल्ल्याच्या पुढील भिंती पाडल्या, व नावा पाण्यांत घालून व शिड्या लावून त्यांवर माणसें चढविलीं, व किल्ल्यावर चोहोंकडून एकदम मोठा जोराचा हल्ला केला; परंतु तेथील खडकावर फार निसरडें असून, पाण्याच्या लाटा वरचेवर येऊन आदळत असल्यामुळें, हल्ला करणारे लोकांचे पाय ठरतनासे झाले. सिद्दी हाही वरून मोठे निकरानें मारा करीत होता. अखेर अशा स्थितींत मराठे लोकांचा निभाव न लागून त्यांस मागें हटावें लागलें. या हल्ल्यांत त्यांचा फार नाश झाला; सुमारें दोनशें

मनुष्यें ठार झार झालीं, व यापुढें जंजिऱ्यावर ह्मणून हल्ला करण्याचा बेत अगदीं रहित झाला.

मराठ्यांचें सैन्य जंजिऱ्याचा वेढा उठवून निघून गेल्यावर, सिद्दी हा महाराजांचे प्रांतावर वरचेवर स्वाऱ्या करूं लागला. त्यानें गाई माराव्या, बायका धरून न्याव्या, व गांवचेगांव जाळून टाकावे, असा क्रम चालविला. त्यानें एके स्वारींत महाडापर्यंत चाल करून, खुद्द दादाजी रघुनाथ देशपांडे यांचीच बायको धरून नेली, व चौलावरही स्वारी करून तेथूनही लोक धरून नेले. सिद्दी याप्रमाणें अनावर होत चालला असें पाहून, संभाजी महाराज रागानें अगदीं वेडे होऊन गेले. त्यांनीं पोर्तुगीज व इंग्लिश लोकांस धमकावून सांगितलें कीं, 'तुह्मीं जंजिऱ्याचे सिद्दयावर न उठतां, त्याजबरोबर सलोखा ठेवतां, तर त्याबद्दल आह्मीं तुह्मांसच शासन करूं.' त्याचप्रमाणें सिद्दी मिसरी ह्मणून याकूबखान सिद्दी याचा कोणी नातलग असून, तो त्याजपासून निघून येऊन मराठ्यांस मिळाला होता; त्याचे हाताखालीं महाराजांनीं आपलें आरमार देऊन त्याजबरोबर माय नामक भंडारी, संताजी पवळा, गोविंदजी जाधव वगैरे आपले सरदार मदतीस दिले, व त्यास याकूबखानावर पाठविलें. महाराजांचें आरमार नागोटण्याचे नदींतून निघून सिद्दयाचे आरमाराचे शोधार्थ निघालें, तोंच तें मुंबईचे बंदरांत माझगांवाजवळ उभें राहिलेलें त्यांचे दृष्टीस पडलें. सिद्दी यानें मराठ्यांचें आरमार आलेलें पाहून, आपलीं जहाजें हांकारून तीं ठाण्याचे नदीजवळ उभीं केलीं, व तेथें तो मराठ्यांचे जहाजांचीं वाट पहात उभा राहिला. सिद्दी मिसरी व मराठ्यांचे दुसरे सरदार यांनीं सिद्दीचीं पंधरा जहाजें होतीं त्यांजवर हल्ला सुरू केला. दोन्ही आरमारांचें मोठें निकराचें युद्ध झालें; परंतु मराठ्यांचीं जहाजें सिद्दयाचे जहाजांपेक्षां दुप्पट असतांही अखेर त्यांचाच समूळ मोड झाला. सिद्दी मिसरी ह्यास जखमा लागून त्याचे जहाजासुद्धां तो याकूबखान सिद्दी याचे हातीं लागला. याशिवाय मराठ्यांचीं आणखीं तीन जहाजें शत्रूंचे हातीं लागलीं. कित्येक आपण शत्रूंचे हातीं लाग

नये, ह्मणून त्यांशीं शेवटपर्यंत मोठे आवेशानें लढले; परंतु अखेर उपाय हरला, तेव्हां त्यांनीं आपलीं जहाजेंही पाण्यांत बुडवून टाकिलीं!

८. हा पराजय झाल्यानें तर, संभाजी महाराजांचा इंग्लिश लोकांविषयीं व पोर्तुगीज लोकांविषयीं राग अगदीं अनावर झाला. इंग्लिश लोकांबरोबर शिवाजी महाराजांनीं मि० हेनरी ऑक्सेन डॅान याचेमार्फत सन १६७४ सालीं तह ठरविल्यापासून सुमारें पांच वर्षें, मराठ्यांचें व इंग्लिश लोकांचें साधारण बरेंच सूत होतें; परंतु सन १६७९ सालीं शिवाजी महाराजांनीं मुंबईबंदराचे तोंडाशीं हेनरी ह्मणून एक लहान बेट होतें, त्यावर किल्ला बांधला. त्यावरून इंग्लिश लोकांना मराठ्यांचा राग आला व त्यांनीं जंजिऱ्याचे सिद्धीचे मदतीनें मराठ्यांस हेनरी बेटांतून काढून देण्याचा यत्न केला; परंतु तो सफळ झाला नाहीं. यानंतर संभाजी महाराजांस इंग्लिश लोकांचा विशेष राग येण्याचें कारण नुकतें सांगितलेंच आहे कीं, ते लोक जंजिऱ्याचे सिद्धीवर न उठतां त्याशीं सलोख्यानें वागत असत. महाराजांचे आरमाराचा ठाण्याचे नदीचे मुखापाशीं जो पूर्ण पराजय झाला, त्याची बातमी महाराजांस कळतांच त्यांनीं इंग्लिश लोकांस त्रास देण्याकरितां व सिद्धी यास आपलें आरमार पावसाळ्यांत माझगांव येथें ठेवतां येऊं नये ह्मणून, मुंबईबंदरांतील एलिफंटा नांवाचे बेटावर किल्ला बांधण्याचा हुकूम दिला; परंतु इतक्यांत त्यांस बातमी लागली कीं, औरंगजेब बादशहा हा दक्षिणेंत स्वारी करण्याकरितां मोठी तयारी करीत आहे, व त्यानें आपला मुलगा सुलतान मोआझिम यास चवथ्यांदा दक्षिणेचे सुभ्यावर नेमिलें असून, तो बादशहापुढें औरंगाबादेस येऊन दाखलही झाला. तेव्हां संभाजी महाराजांनीं इंग्लिश लोकांस उपद्रव देण्याचा जो विचार मनांत आणिला होता, तो तूर्त सोडून देऊन, त्यांनीं आपला वकील मुंबईस पाठविला व त्याजकडून मोंगल बादशहा व सिद्धी यांजविरुद्ध इंग्लिश लोकांशीं तह करण्याकरितां बोलणें लाविलें. महाराजांचे वकीलानें इंग्लिश लोकांस अशी गप्प दिली कीं, मोंगलांचे मनांत मुंबई ही हस्तगत करून घ्यावी असें

आहे व त्याबद्दल बादशहाचा बेत चालला आहे. मुंबईचे कौन्सिलानें तरी वेड्याचें सोंग घेऊन, वकीलानें सांगितलेली गोष्ट जशी काय आपणांस खरीच वाटत आहे असें त्यास भासवून दिलें, व कॉरोमांडल किनाऱ्यावरील इंग्लिशांच्या वखारीपासून संभाजी महाराजांचे अधिकारी ज्या कित्येक जकाती घेत होते, त्या महाराजांनीं माफ कराव्या अशा-बद्दल उलट बोलणें लावलें. दोहोंपक्षांचें बोलणेंचालणें पुष्कळ वेळ चाललें; परंतु त्याचा शेवटीं कांहीं निकाल झाला नाहीं.

इकडे सुलतान मोआझिम यानें कल्याण, भिंवडी या प्रांतावर स्वारी करून तो लुटण्याकरितां, रणमस्तखान व रोहो उल्लाखान या दोन मोंगल सरदारांस फौज देऊन रवाना केलें; परंतु संभाजी महाराजांनीं मागील खेपेप्रमाणें याही खेपेस मोंगलांचे फौजेस दाद दिली नाहीं; यामुळें तीस पावसाळा लागण्याचे अगोदरच परत अहंमदनगराकडे जावें लागलें. ( १६८३ ).

९. संभाजी महाराजांनीं इंग्लिश लोकांबरोबर लवकरच ज्याप्रमाणें सरासरी समेट करून घेतलें, त्याप्रमाणें पोर्तुगीज लोकांबरोबर त्यांनीं केलें नाहीं. त्यांनीं त्या लोकांचे चौल येथील ठाण्यावर हल्ला केला; परंतु महाराजांचे हातीं तें ठाणें लागेना. इकडे गोव्याचे गव्हरनर यानें बरोबर बरेंच मोठें सैन्य घेऊन मराठ्यांचे मुलुखावर स्वारी केली. त्याचे सैन्यांत बाराशें युरोपियन शिपाई होते. पोर्तुगीज लोकांनीं मराठ्यांचीं पुष्कळ गांवें लुटून, जाळून फस्त केलीं; पुष्कळ देवळें पाडून त्यांचा नाश केला व जे लोक त्यांचे हातीं सांपडले, त्यांस जुलमानें ख्रिस्ती करण्याचा त्यांनीं यत्न केला. या वेळीं पोर्तुगीज लोकांनीं मराठ्यांचे पेंढारापेक्षांही कदाचित् अधिक क्रूरपणाचें व रानटीपणाचें वर्तन केलें असें ह्मणतात. *

संभाजी महाराज अंजीदेव बेटावर किल्ला बांधतील ह्मणून, त्यांचे अगोदरच गोंव्याचे गव्हरनरानें तो आपण स्वतः बांधून घेतला, व तेथून आपलीं लढाऊ जहाजें धाडून तो महाराजांचे आरमाराशीं नेहमी

* ऑर्म साहेबांचा इतिहास.

दाई खेळूं लागला, व कारवाराकडील मराठ्यांचे व्यापाऱ्यांस त्रास
ऊं लागला. समुद्रावर अशी व्यवस्था केल्यानंतर, गोंव्याचा गव्हरनर
रोबर मोठें सैन्य घेऊन पोंडा येथील किल्ल्यास वेढा घालण्यास स्वतः
ाला. ही बातमी महाराजांस कळतांच, ते बरेंच मोठें सैन्य घेऊन
किल्ल्याचा वेढा उठविण्यास चालून आले. यावेळीं मराठ्यांचें सैन्य
र्तुगीज लोकांचे सैन्यापेक्षां जरी पुष्कळ कमी होतें, तसेंच संभाजी
हाराजांचे अंगीं त्यांचे वडिलांचें धोरण किंवा बुद्धि हीं जरी नव्हतीं,
री त्यांचे अंगीं शिवाजी महाराजांची हिम्मत व आवेश हीं असल्या-
ळें, त्यांनीं पोंड्याचा किल्ला दिसूं लागतांच, शत्रूचे पिछाडीवर हल्ला
रण्यास सुरुवात केली. यावेळीं गव्हरनर हा किल्ल्याच्या भिंतीस
वंड पाडून, त्यावर हल्ला करून तो घेण्याचे बेतांत होता; परंतु
भाजी महाराज आले, असें पाहून, त्यास भीति पडली कीं, मराठे
ोक आतां गोंव्यास परत जाण्याचा आपला रस्ता आडवितील व
कदाचित् ते गोंव्यावरही हल्ला करतील; तेव्हां होईल तितकें करून,
ोंव्यास परत कूच करावें हें बरें असें त्यास वाटलें. पोर्तुगीज
ोकांचा गव्हरनर हा कूच करून सैन्य घेऊन साधारण सुरक्षितपणें
रत गोंव्यास गेला खरा; परंतु त्यास पोंडा येथें आपले लष्कराचें
ाणागोटा, दारूगोळा वगैरे सर्व सामान टाकून जावें लागलें. शिवाय
रत कूच करीत असतां, त्याचे बाराशे लोक ठार झाले व यांत
ीनशें युरोपियन शिपाई होते !

येणेप्रमाणें पोंड्याचा वेढा उठवून लावून, पोर्तुगीज लोकांस परत
ांकून लाविल्यामुळें, संभाजी महाराजांस विशेष वीरश्री चढून ते
ात्रूंचे पाठीस लागले. त्यांचे मनांत आलें कीं, शत्रूंची फौज माघारी
ोंव्याकडे पळून जात असतां, त्यांचे मधून घुसून गोंव्याचे खाडीस
ओहोटी असतां ती वलांडून जाऊन गोंव्यावर हल्ला करावा; परंतु
महाराज खाडीशीं जाऊन पोंहोंचले, तों खाडीस भरती येऊं लागली होती;
तथापि त्यांनीं धिटाईनें तसाच आपला घोडा खाडींत ढकलला. त्यांज-
बरोबर दुसरे सरदारांनीं व शिपायांनींही खाडींत उड्या टाकिल्या;

परंतु खाडीचें पाणी चढतच जाऊन तें महाराजांचे घोड्याचे जिनास लागूं लागलें, तेव्हां निरुपाय होऊन ते माघारे फिरले. या प्रसंगीं संभाजी महाराजांनीं मोठा पराक्रम केला व त्यांचे सैन्यास शिवाजी महाराजांची आठवण होण्यासारखें त्यांनीं धारिष्ट व शौर्य दाखविलें; परंतु खाडी वलांडून गोंवें हस्तगत करण्याचा ते आपला हेका सोडीनात. त्यांनीं नावा आणवून त्यांत दोनशें मनुष्यें बसवून खाडींत ढकलिल्या, व मागून आणखी निघत होत्या; परंतु पोर्तुगीज लोकांनीं समोरचे किनाऱ्यावरून नावा पाठवून अघाडीस आलेल्या दोनशें लोकांसच गांठून त्याजवर हल्ला केला व त्या सर्वांचा बहुतेक नाश करून टाकला. ( आक्टोबर १६८३ ).

इकडे मराठे लोक चौलास वेढा घालून तसेच बसले होते; परंतु अखेर तें त्यांचे हातीं आलें नाहीं. कारंजें हें त्यांचे स्वाधीन झालें; परंतु तें त्यांचे ताब्यांत फक्त वर्षभरच राहिलें. याशिवाय वसई व दमण यांमधील पोर्तुगीज लोकांचे कित्येक ठाण्यांवर मराठे लोकांनीं हल्ला करून त्यांचा नाश करून टाकिला. यामुळें गोंव्याचे गव्हरनर यानें संभाजी महाराजांजवळ वकील पाठवून तहाचें बोलणें लाविलें; परंतु महाराजांनीं वकिलास अशी अट सांगितली कीं, ‘ तहाचें बोलणें चालू करण्यापूर्वीं तुह्मीं आह्मांस प्रथम पांच कोट होन द्यावे. मग आह्मी त्या गोष्टीविषयीं विचार करूं. ’ महाराजांचें हें चढीचें बोलणें ऐकून पोर्तुगीज लोकांचे वकील उठून गेले.

१०. संभाजी महाराजांचे विशेष पराक्रमाचा कथाभाग येथें संपला. यानंतर ते स्वतः होऊन कोणतेही लडाईंत किंवा कोणते मोहिमेवर गेले नाहींत; व त्यांचे अंगीं शिपाईगिरीचाच काय तो गुण विशेष असल्यामुळें, लढाई नसली ह्मणजे, तर त्यांचा वेळ निव्वळ आळसांत किंवा दुर्व्यसनांत असा जात असे. त्यांनीं नेहमीं दारू पिऊन गुंगून पडावें, व कलुषावर सर्व राज्यकारभार टाकून द्यावा. याच सुमारास मोरोपंत पेशवा हाही मरण पावला; तेव्हां तर कवजींचे विरुद्ध चकार शब्दही काढण्याची कोणाची छाती होईना! महाराजांपुढें जाण्यास कोणांसही

परवानगी नसे; फक्त कवजी यांनीं त्यांचेपुढें जावें. त्यास महाराजांनीं पंडितराव करून अष्ट प्रधानांत घातलें, व त्यांस ' छंदोगामात्य कवि-कलश पंडितराव ' असा बडा किताब दिला. कवजी हे विद्वान् ब्राह्मण, कवन करण्यांत हुषार, वगैरे सर्व खरें; परंतु राज्यकारभारांत ते मागें सांगितल्याप्रमाणें अगदीं गैर वाकबगार होते. यामुळें कारभा-रांत चोहोंकडे गोंधळ माजला. शिवाजी महाराजांनीं सैन्यांत नीट व्यवस्था राहण्याकरितां जे कायदेकानू केले होते—कीं, शिपायांना जी लूट मिळेल, ती त्यांनीं महाराजांकडे आणून द्यावी, त्यांस नियमित वेळीं पगार मात्र मिळत जावा, लष्करांत कोणीही बायकामाणसें ह्मणून नेऊं नयेत—ते आतां सर्व सुटले. शिस्त किंवा कैद ही फौजेंत अगदीं नाहींशी झाली. ज्यास जी लूट सांपडेल ती त्यानें दाबून ठेवावी, व शत्रूंचे मुलुखांतून बायका धरून आणून, त्या रांडा ह्मणून स्वतःच लष्करांत बाळगाव्या किंवा त्यांस बटकी ह्मणून विकून टाकाव्या. अशी अवस्था झाल्यामुळें सरकारांत जमा थोडी होऊं लागून, फौजेस वेळचेवेळीं पगार पोहोंचेनासा झाला. यामुळें अर्थात्च त्यांस लुटीपैकीं कांहीं अंश स्वतः घेण्यास महाराजांकडून परवानगी मिळाली. ही गोष्ट शिपायांस अर्थात्च आवडण्यासारखी होती; कारण, मोजका पगार घेण्यापेक्षां लूटच आपणांस ठेवतां आली, तर ती त्यांस कांहीं काळ तरी अधिक फायद्याची वाटण्यासारखी होती!

संभाजी महाराजांस पुष्कळ वेळ हा भ्रम होता कीं, शिवाजी महाराजांनीं पुष्कळ द्रव्यसंचय करून ठेवला आहे. यामुळें ते खर्चास अगदीं मागें पुढें पहात नसत; परंतु नवीन द्रव्य संपादन कर-ण्याचा ओघ जर न चालेल, तर सांचवून ठेवलेलें द्रव्य किती दिवस पुरणार? रघुनाथपंत वारल्यापासून कर्नाटक प्रांतांतून वसूल मुळींच येईनासा झाला. संभाजी महाराजांनीं ज्या ज्या लढाया केल्या, त्यांपासून नवीन पैसा मुळींच प्राप्त न होतां, उलटें त्यांजपासून नुकसान मात्र होत गेलें. यामुळें पैशाची मोठी टंचाई पडूं लागली. तथापि कवजीससुद्धां खजिन्याची ही भयंकर स्थिति महाराजांस कळविण्यास

धीर होईना! त्यांची प्रकृति अति रागीट व अविचारी असल्यामुळें, खरी गोष्ट सांगितली असतां, त्यांची कदाचित् आपणांवरच खप्पा मर्जी होऊन काय भयंकर परिणाम होईल याचा नेम नाहीं, असा कवजीससुद्धां धाक वाटे. यामुळें नवीन प्रधानानें पैशाची ही तूट भरून आणण्याकरितां, आपणच स्वतःचे बुद्धीनें निरनिराळ्या बाबी उत्पन्न करून जमिनीचा धारा वाढविला; परंतु तो वसूल करतेवेळेस शिवाजी महाराजांचे वेळीं तो जितका येत असे, त्यापेक्षां आतां तो पुष्कळच कमी आला; व जमीनदारांचे नांवावर बाकीचा रिकामा मोठा आंकडा मात्र चढून राहिला, असें आढळून आलें. तालुकदार, मामलेदार यांनीं पैसे खाऊन लोकांकडे पोकळ बाक्या ठेविल्या, असें कवजीस वाटून त्यानें कित्येकांस शिक्षा केली, व यापुढें तालुके मक्तयानें लावून टाकण्याचा त्यानें क्रम सुरू केला. यामुळें रयत त्रासून जाऊन, कोणी हबशी, कोणी मोंगल, कोणी विजापूर वगैरे राज्यांत उठून जाऊं लागले.

११. इकडे दक्षिणेंत मराठी राज्याची अशी हालहवाल चालली असतां, उत्तर हिंदुस्थानांत औरंगजेब बादशहा याचे मनांत, दक्षिणेंतील मुसलमानी, हिंदु वगैरे सर्व राज्यें बुडवून, सिंधू नदीपासून कन्याकुमारीचे टोंकापर्यंत मोंगल बादशाही व तिजबरोबरच महंमदी धर्म हीं पसरवून देण्याचा जो प्रचंड बेत सुमारें पंचवीस वर्षे घोळत होता, तो आतां तडीस जाण्याचा समय आला असें त्यास वाटूं लागलें. हा बेत, मधून मधून मागें सांगितलेलीं कारणें—कोणी सरदार बंड उपस्थित करून शहाजहान बादशहास कैदेंतून सोडवून पुनः गादीवर बसवितील ही धास्ती, त्याचप्रमाणें बादशहाचा थोरला मुलगा सुलतान महंमद यानें बादशहाविरुद्ध केलेली मसलत, यापुढें इराणचे शहाबरोबर युद्धाचा संभव व १६७० सालीं उपस्थित झालेली अफगाण लोकांबरोबर लढाई,—यामुळें सन १६७५ पर्यंत बादशहास साधारण रहितच करावा लागला. यानंतर त्यास थोडा थोडा अधिक अवसर सांपडून, तो दक्षिणेकडे अधिक लक्ष पोंचवूं लागला. तथापि १६७

साली संतरामी पंथाचे लोकांचें एक प्रचंड बंड माजून त्यापासून बादशहास कांहीं वेळ बराच त्रास झाला. तसेंच यानंतर बादशहानें जिझिया नांवाचा कर सर्व हिंदूंवर बसविण्याचा व्यर्थ दुराग्रह धरल्यानें, त्याचप्रमाणें होतां होईल तोंपर्यंत हिंदूस सरकारी जागा न देतां त्या मुसलमानांसच द्याव्या, असा वेडेपणाचा हुकूम केल्यानें, तसेंच हिंदु-देवस्थानांच्या जत्रा बंद करण्याबद्दल यत्न केल्यानें, हिंदुप्रजा बादशहाचे अमलास अगदीं नाराज होऊन गेली असल्यामुळें, राज्यांत बंडें उपस्थित होण्याचा बराच धाक होता. शिवाय याच सुमारास यशवंतसिंग हा काबुलाकडे मरण पावला असतां, त्याचे बायकोस व लहान मुलांस बादशहानें अटकेंत ठेवण्याचा यत्न केल्यामुळें, यशवंतसिंग याचा विश्वासु सरदार दुर्गादास यानें, उदेपूरचा राणा राजासिंग व दुसरे रजपूत राजे यांस मिळवून घेऊन, रजपूतस्थानांत एक प्रचंड बंड उपस्थित केलें होतें. तें मोडण्याकरितां औरंगजेब बादशहानें आपला विशेष भरंवशाचा मुलगा सुलतान अकबर हा पाठविला असतां, दुर्गादास यानें अकबरास वश करून घेऊन त्यास आपले पक्षाकडे ओढून घेतलें. पुढें बादशहानें अकबर याचे बादशाही सरदार व फौज ही मोठ्या युक्तीनें व हुषारीनें फितवून, अकबर यास अखेर दक्षिणेंत पळून लाविलें व त्यामुळें तो मागें नुकतेंच सांगितल्याप्रमाणें संभाजी महाराजांचे आश्रयास येऊन राहिला. असो; येणेंप्रमाणें एकामागून एक सर्व संकटें व अडचणी यांतून पार पडून औरंगजेब बादशहा हा आतां अखेर आपले दक्षिण दिग्विजयाचे प्रचंड उद्योगास हात घालण्यास सरसावला. सुलतान अकबर दक्षिणेंत पळून गेल्यावरसुद्धां राजपुतान्यांत साधारण युद्ध चालूंच होतें; परंतु त्यास फारसें न जुमानतां बादशहानें चोहोंकडून फौजा गोळा करून दक्षिणेचे स्वारीची तयारी चालविली. तो खुद्द बऱ्हाणपुरास येऊन दाखल झाला (१६८३) व तेथें कांहीं महिने राहून दक्षिणेंत आपण गेलों असतां, तिकडे कदाचित् बरेच दिवस राहवें लागेल, तेव्हां हिंदुस्थानांत व्यवस्था चांगली रहावी व वसूल वगैरे नीट रीतीनें चोहोंकडून येत जाऊन, आपणांस दक्षिणेंतील लढाईकरितां लागणारा पैसा वेळचेवेळीं पोहोंचत

जावा, याबद्दल सर्व तजवीजी त्यानें नीट केल्या. त्याचप्रमाणें आपण स्वतः दक्षिणेंत उतरण्यापूर्वी आपले महत् कार्याची सिद्धता होण्याकरितां त्यानें आपले दोन मुलगे, त्यांजबरोबर चांगल्या फौजा देऊन पुढें पाठविले. त्यानें सुलतान मोआझिम यास शहाअलम हा बडा किताब देऊन, त्यास फौजेसह अहंमदनगराहून निघून संभाजी महाराजांचा दक्षिणेकडील प्रांत काबीज करण्यास पाठविलें. त्याचप्रमाणें तिसरा मुलगा सुलतान अझिम यास खानदेश, बागलाण, संगमनेर वगैरे मुलखांतील मराठ्यांचे किल्ले सर करण्यास चांगली फौज देऊन रवाना केलें, व प्रथम सुरवातीस सालेरीचा किल्ला हस्तगत करावा ह्मणून त्यास हुकूम केला; कारण, हा किल्ला खानदेशाचें नाक असून तेथून मराठे लोक वरचेवर निघून खानदेशांत लुटालूट करीत असत.

सुलतान अझिम हा सालेरीचे किल्ल्यावर चालून गेला असतां त्यास प्रथम वाटलें कीं, या ठिकाणीं शत्रू बराच वेळ टिकाव धरून, आपणांस बराच पराक्रम दाखविण्याचा प्रसंग येईल; परंतु मोल्हेर किल्ल्याचा किल्लेदार नेकनामखान यानें, सालेरीचे हवालदाराबरोबर अगोदरच मसलत ठरवून 'मोंगलांची फौज किल्ल्यापुढें येतांक्षणींच मी किल्ला तुमचे स्वाधीन करून देतों' ह्मणून त्याजपासून वचन घेतलें होतें; परंतु अशा मसलती ह्मणजे नेहमीं खातरीच्याच असतात असें नाहीं, असें समजून नेमनामखान यानें ही मसलत गुप्तपणें बादशहास मात्र कळविली होती. तिची बातमी सुलतान अझिम यास मुळींच दिली नव्हती. यामुळें तो फौजेसह सालेरीचे किल्ल्यापुढें येतांच, किल्ल्याचे मराठे हवालदारानें किल्ला कांहीं एक लढाई न करितां एकदम मोंगलांचे स्वाधीन केला. यामुळें सुलतान अझिम याचा मोठा हिरमोड झाला. तें लक्षांत आणून बादशहानें त्यास परत बऱ्हाणपुरास बोलावून नेलें, व 'तुला पुढें विजापूरचे स्वारीवर पाठवीन' ह्मणून त्यास सांगून त्याचें तूर्त शांतवन केलें. यानंतर सुलतान अझिम याचे जागेवर बादशहानें शहाबुद्दिनखान यास पाठवून देऊन, खानदेशांतील मराठ्यांचे बाकीचे सर्व किल्ले सर करण्याविषयीं त्यास

हुकूम केला. तो लागलाच रामशेजे या किल्ल्यास वेढा घालण्यास गेला; परंतु किल्ल्यावरील हवलदारानें त्याचे सैन्याचे हल्ले मोठे शौर्यानें माघारे फिरविले, येवढेंच नाहीं, तर त्याचा पराजयही केला. यानंतर बादशहानें खान जहान बहादूर यास शहाबुद्दिनखान याचे जागेवर पाठविलें; परंतु त्याचाही चांगला पराजय होऊन, त्यास माघारें जावें लागलें.

सुलतान मोआज्ञिम हा नाशिकाजवळ अंबादरीचे घाटानें कोंकणांत उतरला. तो येण्याचें अगोदरच कल्याण प्रांत उद्ध्वस्त होऊन गेला होता. त्यांतून तो पुढें वेंगुर्ल्यापर्यंत सर्व देश लुटीत व जाळीत चालला. येणेंप्रमाणें मोआज्ञिम हा सर्व कोंकणप्रांतभर सैन्य घेऊन फिरला खरा; तथापि त्याचेजवळ तोफा, दारूगोळा वगैरे किल्ले घेण्याचें सामान नसल्यामुळें, मराठ्यांचे किल्ले त्याचे हातीं येईनात. इकडे संभाजी महाराजांनीं आपली सर्व पागा देशावर पोट भरण्यास पाठवून देऊन, ते स्वतः सुलतान अकबर यास घेऊन विशाळगडास जाऊन राहिले. मोंगलांनीं कोंकणप्रांत सर्व जाळून लुटून फस्त केला म्हणून वर लिहिलें आहे, त्याचें फळ त्यांस लवकरच प्राप्त झालें! त्यांस कोठें दाणा वैरण वगैरे कांहीं मिळेनाशी झाली. यामुळें त्यांचे लष्करांचे मोठे हाल होऊं लागले. इतक्यांत संभाजी महाराजांनीं आपली पागा देशावरून खालीं बोलावून आणून ती मोंगलाचे पाठीस लाविली. तिनें मोंगल लोकांच्या टोळ्या दाणा वैरण मिळविण्या-करितां पसरल्या असतां त्यांजवर छापे घालावे, त्यांचे रस्ते आडवावे व त्यांना ठार करावें, असा क्रम चालविला. मराठ्यांचें पागेस किल्ल्यांवरून यापूर्वींच दाणा वैरण वगैरे सांठवून ठेविली होती, ती अर्थात्च मिळे; परंतु मोंगलांचे फौजेस ती अगदीं मिळेनाशी झाली. यामुळें त्यांचे लष्करांत हजारों गुरें, घोडे व माणसें मरूं लागलीं. सुलतान मोआज्ञिम याचे फौजेची अशी अवस्था झाली, ही बातमी बादशहास कळतांच, त्यानें शहाबुद्दिनखान याजबरोबर फौज देऊन त्यास मोआज्ञिम याचे मदतीस पाठविलें, व सुरतेचे सुभेदारास धुंडी,

राजापूर व वेंगुर्लें या बंदरांस, मोआझिम याचे फौजेकरितां दाणागोटा ज़हाजांतून लवकर पाठवावा ह्मणून हुकूम पाठविला. धान्याची फार निकड आहे असें समजून, सुभेदारानें लगेंच जहाजें भरून त्यांचे संरक्षणार्थ शिपाई प्यादे जे बादशहानें पाठविले होते, ते येण्याची वाट न पाहतां जहाजें तशींच रवाना केलीं. सुरतेहून हा धान्याचा सांठा येत आहे, ही बातमी संभाजी महाराजांचे आरमारावरील लोकांस अगोदरपासून होतीच; त्यांनीं त्याजवर एकाएकीं हल्ला करून त्यांतील पुष्कळ सामानसुमान आपणच उपटलें! अखेर धान्य फारच थोडें येऊन पोहोंचलें व लष्करांत माणसांचे फार हाल होऊं लागले, तेव्हां सुलतान मोआझिम हा निरुपाय होऊन अंबा घाटानें देशावर चढून येऊन, त्यानें पावसाळा आला ह्मणून कृष्णानदीचे कांठीं वाळवें या गांवीं छावणी केली.

बादशहानें सुलतान मोआझिम याचे मदतीस शहाबुद्दिनखान यास पाठविलें ह्मणून नुकतेंच वर सांगितलें आहे, त्याप्रमाणें तो रायगडाजवळ निजामपूर ह्मणून गांव आहे, तेथपर्यंत फौजेसह गेला. इतक्यांत संभाजी महाराजांचे फौजेची व त्याची गांठ पडून, दोघा सैन्यांची थोडी चकमक उडाली, तींत मोंगलांची कांहीं सरशी झाली. शहाबुद्दीन हा बादशहाचे मर्जींतील असल्यामुळें, त्याचा रामशेजे या किल्ल्यापुढें जरी चांगला पराजय झाला होता, तरी त्यास सद्ध्यां जें थोडेसें यश मिळालें, तेवढ्यावरूनच त्यानें खानास गाजीउद्दीन हा किताब दिला. हा शहाबुद्दिनखान मूळ एका तुराणी मोंगलाचे टोळीचा मुख्य असून, तो पुढें प्रसिद्धीस आलेल्या निजाम उल्मुल्काचे घराण्याचा मूळपुरुष होय.

येणेंप्रमाणें बादशहानें आपले दोन पुत्रांबरोबर मोठमोठ्या फौजा देऊन आबाडीस जें पाठविलें होतें, त्याजपासून ह्मणण्यासारखा फायदा कांहीं न होतां, उलटें या मोहिमेंत त्याचें बरेंच नुकसान व कांहींशी अपकीर्तिही झाली; तथापि त्याजवरून त्याचें धैर्य न खचतां, तो बऱ्हाणपुराहून निघून औरंगाबादेस येऊन दाखल झाला. बऱ्हाणपुरास

असतांना त्यानें असा हुकूम चोहोंकडे पाठविला कीं, जे कोणी मुसलमानी धर्म पाळीत नसतील, त्या सर्वांपासून जिझिया हा कर घेत जावा, व तो उत्तर हिंदुस्थानाप्रमाणें दक्षिणेंतही अगदीं सक्तीनें वसूल करावा. औरंगजेब बादशहासारख्या धूर्त व चाणाक्ष अशा राजधुरंधर पुरुषानें अशा तऱ्हेचा वेडेपणाचा कर व तोही दक्षिणप्रांतांत कीं, जो जिंकण्याचा उद्योग बादशहानें नवीनच आरंभिला होता, तेथें बसविण्याविषयीं हुकूम काय हेतूनें दिला हें कळत नाहीं. धर्मवेडानें चांगले धूर्त मनुष्याचीही अक्कल कधीं कधीं नष्ट होतें असें जें ह्मणतात, त्याप्रमाणें बादशहाचे मनाचीं स्थिति यावेळीं झाली असावी, असें पुष्कळांचें ह्मणणें आहे. आपण आरंभिलेल्या मोठ्या उद्योगांत पैगंबरानें आपणांस यश द्यावें ह्मणून, जे कोणी महंमदी धर्म स्वीकारणार नाहींत, त्यांचेकडून निदान पैसा तरी आपण वसूल करितों, अशी बादशहानें आपले मनाची समजूत काढली. विजापूर व गोवळकोंडें येथें बादशहानें भारून ठेवलेले जे त्याचे लोक असत, ते असें बोलण्याचा आव घालीत कीं, बादशहा हा दक्षिणेंतील मूर्तिपूजक धर्म मोडून टाकून, महंमदी धर्माचा प्रसार व्हावा येवढ्याकरितां मुसलमान लोकांचें राज्य चांगलें दृढ करून तें वाढविण्याकरितां येत आहे!

१२. याच सुमारास बादशहाचा फार दिवसांचा हुषार सरदार जो दिलेरखान हा मरण पावला. याचा सुमारें सव्वीस वर्षे दक्षिणेंतील निरनिराळ्या राज्यांबरोबर निकटसंबंध असून, त्यानें कधीं कधीं त्यांजबरोबर बादशहाचेतर्फेनें लढायाही चांगल्या मारल्या असल्यामुळें याचे इतका दक्षिण मुलुखाचा माहितगार असा यावेळीं बादशहापाशीं दुसरा कोणी सरदार नव्हता; तथापि मागें सांगितलेल्या कित्येक कारणांवरून त्याजवर बादशहाचा फारसा विश्वास नसे, व त्यामुळें त्यास त्यानें दक्षिणेचे प्रांतांवर पूर्णमुखत्यार सुभेदार असा कधीं न नेमतां, त्यास त्यानें नेहमीं दुय्यमच ठेविलें; व शेवटीं शेवटीं ह्मातारपणीं तर बादशहानें खानाची बरीच हेळसांडही केली. मोठा उदार, मोठा भरवंसा ठेवणारा, परंतु कम नशिबाचा असा

जो दारा त्याचा पक्ष फितुरीनें सोडन देऊन, कपटी व कृतघ्न असा जो औरंगजेब त्यास मिळाल्याबद्दल हें दिलेरखानास कांहीं अंशीं योग्यच शासन झालें असें ह्मणण्यास हरकत नाहीं.

१३. संभाजी महाराजांची पोर्तुगीज लोकांबरोबर अजून लढाई चाललीच होती. त्या लोकांनीं सुंदचा राजा व कारवारचे देसाई यांस महाराजांविरुद्ध उठण्यास उत्तेजन दिलें. इकडे महाराजांनीं उत्तर कोंकणांतील पोर्तुगीज लोकांचे मुलूख लुटण्यास आपलें सैन्य पाठवून देऊन आपण स्वतः, सुलतान मोआझिम, जो मागें सांगितल्याप्रमाणें कृष्णानदीचे कांठीं वाळवें या गांवीं छावणी करून राहिला होता, तो आतां कोणत्या मुलुखाकडे जातो हें पहाण्याकरितां पन्हाळ्यास जाऊन राहिले.

औरंगजेब बादशहानें दक्षिणेंतील विजापूर व गोंवळकोंडें या मुसलमानी राज्यांवर आपणांस स्वतः स्वारी करण्यास फुरसत फावेपर्यंत, त्यानें त्या राज्यांस निर्बळ करण्याची सुमारें वीस वर्षेपर्यंत जी खटपट चालविली होती ह्मणून मागें लिहिलें आहे, ती या वेळपर्यंत बरीच सफळ झाली होती. त्यानें विजापूरचे दरबारांत मलिक बरखोरदार ह्मणून जो आपला वकील ठेविला होता, त्यानें युक्ती युक्तीनें त्या राज्यांतील बहुतेक मुख्य मुख्य अधिकारी, कांहींकांस बादशहाकडून पेन्शनें देववून व कांहींकांस कांहीं हुद्याचीं कामें सांगवून, आपलेतर्फेचे करून घेतले होते. यामुळें विजापूरचे राज्याचा प्रतिनिधि जो मसाऊदखान याचें तेज हळू हळू नष्ट होऊं लागलें. त्याचेविरुद्ध सरदारांचा एक तट उपस्थित होऊन, त्यांत सय्यद मुखतुम ह्मणून कोणी एक उमराव व शिरझीखान ह्मणून कोणी एक फौजेकडील घोडेस्वारांवरील हुषार अधिकारी, असे प्रमुख होते. विजापूरचे फौजेची आलीकडे फार वाईट स्थिति झाली असून, तींत शिरझीखानच काय तो नांव घेण्यासारखा सरदार उरला होता. शिरझीखानाचें आणि मसाउदखान याचें वांकडें येण्याचें कारण येवढेंच झालें कीं, मसाउदखान यास घोडेस्वारांपेक्षां पायदळ हें अधिक उपयोगाचें आहे असें वाटत

असल्यामुळें, त्यानें विजापूरचे फौजेंतून शिरझीखानाचे हाताखालील घोडेस्वार अगदीं कमी केले. असें करण्यानें राज्यास अपाय होईल वगैरे शिरझीखानानें प्रतिनिधीस पुष्कळ सांगितलें; परंतु त्यानें तें कांहीं ऐकिलें नाहीं. यापुढें १६७९ सालीं जेव्हां दिलेरखानानें विजापुरावर चाल करून त्यास वेढा दिला, तेव्हां विजापूरकरांपाशीं घोडा चांगला राहिला नसल्यामुळें, मसाऊदखान यास शिवाजी महाराजांची मदत मागावी लागली, व तेवढ्याबद्दल मराठ्यांस कर्नाटकांतील कित्येक उत्तम प्रांत द्यावे लागले. येणेंप्रमाणें प्रतिनिधीची फजीती उडून त्याची अगदीं नाचक्की झाली. शेवटीं त्यास राज्यकारभार सोडून आडोरा येथें जाणें भाग पडलें ( १६८१ ). मसाऊदखान याचे मागून राज्यकारभार कोण पाहूं लागला हें कळत नाहीं; परंतु नवीन कारभाऱ्याचें मनांत औरंगजेब बादशहाचे वकिलानें असें भरवून दिलें कीं, ' तुह्मीं मराठ्यांबरोबर तह केला, त्यावरून बादशहास तुमचा मोठा राग आला आहे; तेव्हां तुह्मीं तो अगोदर मोडा. ' त्यावरून कृष्णानदीचे कांठचा प्रांत जो शिवाजी महाराजांनीं मागें जिंकून घेतला होता, तो परत जिंकून घेण्याकरितां विजापूरकरांनीं खटपट चालविली व त्यांनीं प्रथम मिरज हें घेतलें; परंतु या वेडेपणाच्या कृत्यामुळें, औरंगजेब बादशहा हा विजापुरावर चालून आला असतां, संभाजी महाराजांपासून विजापूरकरांस मदत मिळण्याचा जो संभव होता, तो अगदीं नाहींसा झाला, व त्या दोघांमध्यें पूर्ण हाडवैर बनून गेलें.

गोंवळकोंडें येथेंसुद्धां औरंगजेब बादशहाची अंतस्थ खटपट कमी सफल झाली होती असें नाहीं. तेथील सुलतान अबू हसन ह्यांचेजवळ खजीना मोठा असून त्याजवळ फौजही बरीच चांगली होती. त्याचा सर्व विश्वास त्याचा दिवाण मादण्णापंत याजवर असे. मादण्णापंत हा बराच हुषार, धार्मिक व वजनदार असा असल्यामुळें, राज्यांतील बहुतेक हिंदुप्रजा त्याजवर व त्याजवरून सुलतानावरही राजी असे; तथापि मादण्णापंत हा हिंदु असल्यामुळें, त्याचें सुलतानापाशीं जें एवढें वजन असे, त्यामुळें राज्यांतील पुष्कळ मुसलमानी

अधिकारी त्याचा द्वेष करीत. औरंगजेब बादशहाचे गोंवळकोंड्यास जे हस्तक असत, त्यांनीं हा परस्परांतील द्वेष वाढविण्यास नेहमीं यत्न करावा. मादण्णापंतानें विजापूरकर, गोंवळकोंडेकर व संभाजी महाराज या तिघांनीं मिळून मोंगलाशीं टक्कर द्यावी, व त्यांचें दक्षिणेंत पुढें पाऊल शिरकवूं देऊं नये म्हणून मसलत चालविली होती; परंतु प्रत्येक राज्यांत इतके तट व इतकीं परस्परांत वैमनस्यें वाढलीं होतीं कीं, तीं स्वतःचे संरक्षणार्थसुद्धां लढण्यास एकएकटीं अशीं तयार नव्हतीं. मग तिघांचा एक मिलाफ होऊन, त्यांची मोंगलांबरोबर झुंजण्याची गोष्ट तर दूरच राहिली! इकडे औरंगजेब बादशहाचे वरील दरबारांतून ठेवलेले लोक हे, दरबारांतील प्रत्येक मनुष्यास असें भासवीत असत कीं, बादशहाची विशेष भक्ति याच राज्याविषयीं आहे, त्यास दुसरे राज्याविषयीं कांहीं वाटत नाहीं; तें तो खालसादेखील करणार आहे. बादशहाचे लोकांच्या या थापा कित्येक भोळसर लोकांस तर खऱ्याच वाटत; परंतु अशा मूर्ख लोकांशिवाय प्रत्येक दरबारांत मोंगलांस फितूर झालेले असे कित्येक सरदारही होते. अशी स्थिति दोन्ही मुसलमानी राज्यांची असल्यामुळें, जे लोक तेथें तूर्त राज्यकारभार चालवीत होते, त्यांस आपलेपाशीं असलेले लोकांचा मुळींच भरंवसा वाटत नसे, व आपण होऊन राज्याचे रक्षणार्थ एखादी मसलत केली, तर त्यापासून आपला आजच खास खून होईल किंवा आपणांवर बादशहाचा राग होईल, अशी त्यांस भीति वाटत असे.

१९. विजापूरचे सरकारचे पदरीं जे मराठे सरदार, जहागीरदार, इनामदार वगैरे होते, ते आपला सरंजाम पुढें तसाच चालावा म्हणून, अद्याप आपणांस विजापूर सरकारचेच नौकर म्हणून म्हणवीत असत; परंतु त्यांचे कांहीं कांहीं भाऊबंद हे त्या सरकारास सोडून शिवाजी महाराजांस जाऊन मिळाले होते, व शिवाजी महाराजांचे मागें ते संभाजी महाराजांसही तसेच धरून राहिले. त्याचप्रमाणें पूर्वीचे निजामशाहीमधील जे मराठे मनसबदार होते, ते बहुतेक मोंगल बादशहाचे पदरीं राहिले, व त्यांचे भाऊबंद हे संभाजी महाराजांस येऊन मिळाले. मराठे लोकांविषयीं लिहितांना मागें सांगितलेंच आहे कीं, त्यांचेमध्यें जहागीर, इनाम

वतन वगैरेसंबंधाचे वडिलोपार्जित हक्कांविषयीं मोठी चुरस असते, व त्यावरून त्यांमध्यें नेहमीं भाऊबंदी तंटे एकसारखे चालू असतात. त्याप्रमाणें यावेळीं ज्या लोकांचे हक्क मारले गेले होते, त्यांनीं ते पुनः आपणांस प्राप्त व्हावेत व दायादांचा सूड उगवितां यावा ह्मणून, जो नवीन शत्रू आपले देशावर चालून येणारा असेल, त्यास त्यांनीं जाऊन मिळावें, व त्या शत्रूची सरशी होऊन त्याचे ताब्यांत देश आला ह्मणजे, दायादांचे हक्क काढून घेऊन ते त्यांस मिळावेत. यानंतर दायादही पुनः दुसरी राज्यक्रांति होऊन पुनः आपले हक्क आपणांस मिळण्याची वाट पहात बसत. कधीं ज्यांकडे ते हक्क असत, ते दायादांचे अगोदरच नवीन येणारे शत्रूंशीं संधान लावून आपले हक्क जाऊं देत नसत. ह्या वतनांचे हक्कांबद्दल कधीं कधीं इतकी चुरस वाढे कीं, कित्येक लोक हा हेतु साधण्यासाठीं बाटून मुसलमानही होत! मराठे लोकांचे स्वभावांतील ह्या सर्व गोष्टी औरंगजेब बादशहास चांगल्या ठाऊक होत्या, व त्यांपासून तो फायदाही करून घेण्यास नेहमीं तत्पर असे.

१६. येणेंप्रमाणें औरंगजेब बादशहानें दक्षिण प्रांतावर स्वारी करून, तो सर्व सर करण्याचा महदुद्योग आरंभिला असतां, त्याची साधारण स्थिति होती. बादशहानें कांहीं महिने औरंगाबादेस राहून, नंतर तेथें बंदोबस्ताकरितां खानजहान बहादूर यास ठेऊन, तो स्वतः बरोबर अपरंपार सैन्य, त्यास लागणारा सर्व सज्ज व भपकीदार असा सरंजाम व बादशाही थाटाचें एकंदर ऐश्वर्य — कीं जेणेंकरून दक्षिणेंतील लोक सर्व दिपून जावेत — हीं घेऊन, अहंमदनगरास येऊन दाखल झाला. या प्रचंड स्वारीचें वर्णन ग्रांटडफचे इतिहासांत मोठें चटकदार असें दिलें आहे, तें येथें खालीं देतों.

औरंगजेब बादशहाचे या प्रचंड स्वारींत एकंदर लोक किती होते, याची गणति कोठें बरोबर अशी दिली नाहीं;* तथापि येवढें खचित

* जेमेली नामक प्रवाशानें ती मनुष्यांची तारीफ केली आहे. एलफिनस्टन साहेबांचा इतिहास.

आहे कीं, आजपर्यंत येवढी अवाढव्य व इतकी थाटामाटाची स्वारी यापूर्वी दक्षिणप्रांतांत क्वचित्च झाली असेल. या प्रचंड सैन्यांत परदेशांतून आणलेले शिपायांखेरीज त्यांत काबूल, कंदाहार, मुलतान, लाहोर, राजपुताना वगैरे दूरदूरचे प्रांतांतून आणलेले असे मोठे उंचपुरे, भव्य, बडीं बडीं हत्यारें बाळगणारे, व मोठ्या उंच धिप्पाड घोड्यावर बसलेले असे स्वारांचा मोठा जमाव होता. या अशा आपल्या शिपायांवर, किरकोळ अंगाचे व हलकीं हत्यारें बाळगणारे असे दक्षिणेंतील मराठे लोक यांस चालसुद्धां करून येण्याची छाती होणार नाहीं असें बादशहास वाटत होतें. ही घोडेस्वारांची मोठी तरफ ह्मणजे बादशहाचे सैन्याचें केवळ नाकच होतें. ह्यांचे खालोखाल त्यांचें पायदळ असून तेंही फार मोठें होतें. त्यांत बंदुक मारणारे, तीर मारणारे, दुरून नेम मारणारे वगैरे सर्व प्रकारचे लोक होते. याशिवाय मावळे लोकांशीं युद्ध करण्याकरितां बुंदेले, मेवाडी वगैरे पहाडींत राहणारे कडवे लोक—जे लुटालूट करण्यांत मोठे प्रवीण असत—तेही हजारों असे बादशहानें आपले सैन्यांत ठेविले होते. त्याचप्रमाणें कर्नाटकांतूनही पुष्कळ दांडगे असे शिपाई आणिले होते. बादशहाचा तोफखाना मोठा प्रचंड असून, त्याचे तंबूबरोबर असणारे तोफांखेरीज लढाईंत उपयोगीं पडण्यासारख्या त्याजपाशीं उत्कृष्ट निरनिराळ्या आकाराच्या अशा शेंकडों तोफा होत्या, व त्या चालविण्यास त्यांजवर हिंदुस्थानांतील उत्तम शिपाई ठेविले होते, व त्यांची एकंदर व्यवस्था युरोपियन गोलंदाजांकडे असे. या तोफखान्यासच जोडलेला असा सुरुंगवाल्यांचा एक मोठा ताफा असे, व त्याजबरोबर हरतऱ्हेचे कारागीर असत. या बड्या स्वारींत लढाऊ हत्तींची एक मोठी रांग पुढें चालत असून, त्यांचे मागून बादशहाचे जनानखान्यांतील स्त्रिया अंबारींत बसून नेण्याकरितां किंवा जे मोठमोठे तंबू उंटांवरून जाण्यासारखे नसत, तें वाहून नेण्याकरितां साधे हत्तींचा मोठा तांडा एकसारखा चालत होता. त्यांचे मागून नानातऱ्हेचे मौल्यवान् कपड्यांचीं मढवलेलीं जिनें घातलेले व खिजमतगारांनीं हातांत धरलेले असे बादशहाचे बसण्याचे घोडे शेकडों चालत. या स्वारीबरोबर बादशहाचा शिकारखा-

ही होता. त्यांत सिंह, वाघ, चित्ते वगैरे चमत्कारिक चमत्कारिक पशु
सून, त्यांचा तमाशा कधीं कधीं बादशहा व त्याचा दरबार यांपुढें
त असे. त्याचप्रमाणें बहिरीससाणें, शिकारी कुत्रे, शिकारी वाघ,
ाकविलेले हत्ती, वगैरे बादशहाचे शिकारीस लागणारा सर्व सरंजाम
ारीबरोबर चालविला होता. बादशहाचे तंबूसभोंवतालीं कनाथी
ावून आंत जी जागा घेतली असे, तिचा एकंदर परीघ १२००
ाडांचा होता. एवढी विस्तीर्ण जागा असल्यामुळें, दिल्लीस बादशहाचे
ाजवाड्यांत ज्या ह्मणून सोयी असत, त्या सर्व या छावणींत केल्या
ोत्या. दरबार भरविण्याकरितां हजारों लोक बसण्यासारखे मोठे प्रशस्त
से दिवाणखाने; त्यांसच लागून मसलती करण्याकरितां वगैरे लहान
ोल्या; प्रत्येक दिवाणखाना उत्तम तऱ्हेनें शृंगारलेला असून, त्यांत
ादशहास बसण्याकरितां मध्यें एक उंच सिंहासन केलेलें; त्यांतील
र्व खांब सोनेरी शाईनें लखलखीत केलेले असून, डोक्यावरील सर्व छत
उत्तम मखमालीचें बसविलेलें; त्याचे सभोंवतालीं उत्तम झालर लावलेली
असून त्याजवर मधून मधून कशीद्याचें काम केलेलें; अशा प्रकारचा
र्व थाट केलेला होता. याशिवाय निमाज पढण्याकरितां वेगळेच
ंबू दिलेले होते. हमामखाने, तालीमी, तिरंदाजखाने हेही वेगवेगळाले
केलेले होते. जनानखाना थेट बादशहाचे दिल्लींतील वाड्यांतल्या-
प्रमाणें असून, त्यांत ऐषआरामाच्या व परके पुरुषाचा वापर अगदीं
न पडे अशा तऱ्हेच्या सर्व सोयी केलेल्या होत्या. सर्व तंबूतून इराणी
गालीचे, दमास्कस येथील रेशमी पडदे, युरोपांतील मखमाली व
साटणी, चीन देशांतील रेशमी कापड, हिंदुस्थानांतील मलमली व
किनखाप यांची चोहोंकडे अगदीं रेलचेल दृष्टीस पडून, पहाणाराचे
डोळे अगदीं दिपून जात असत. बादशहाचे तंबूवरून सोनेरी मुलामा
चढविलेले घुमट व कळस लकलकत असत, व तंबूचे व कनाथींचे
बाहेरील बाजू अशा उत्तम चटकदार रंगांनीं रंगविल्या होत्या कीं,
त्याजवरून पहाणारांचे डोळे अगदीं दिपून जावे. बादशहाचे तंबूचे
पटांगणांत जाण्याचा एक मोठा दरवाजा असून, त्याचे दोन बाजूस दोन
मोठे तंबू ठोकिले असत. यांचे दुतर्फा तोफांच्या भल्या लांब अशा

दोन रांगा असत, व त्यांमधून एक मोठा रस्ता दोरीसूत असा सरळ असे. तोफांचे शेवटीं एक मोठा तंबू दिला असून त्यांत मोठे नगारखाने, तासेवर्फे, वगैरे रणवाद्यें वाजविणाऱ्यांचे ताफे असत. यांचे अंमळ पुढें गेलें असतां बादशहाची मोठी चौकी असून, तेथील संत्रिलोक नेहमीं हत्यारें घेऊन पहारा करीत असत व त्यांजवर एका स्वतंत्र सरदाराची नेमणूक असे. पटांगणाचे दुसरे बाजूस एक तंबू बादशहाचीं शस्त्रें, दुसरा घोड्यांचें सामान, तिसरा गारपाणी, चवथा फळफळावळ, पानसुपारी वगैरे ठेवण्याकरितां पृथक पृथक मारिले होते. बादशहाचे तंबू वगैरे सर्व सामान दुहेरी असून, त्यांतील एक संच पुढें पाठवून तो सर्व ठोकून तयार झाला ह्मणजे बादशहाचा मागला मुक्काम हालून तो पुढील मुक्कामास जाई. परमुलुखांवर स्वारी करून जाणारे लष्करांत इतके थाटाची व ऐषआरामाची केलेली व्यवस्था इतिहासांत फार क्वचित् आढळणारी आहे. औरंगजेब बादशहाची ही स्वारी ह्मणजे केवळ एक मोठे थाटाची लग्न वरातच ह्मणायाची ! तो नवीन मुक्कामास येऊन पोहोंचला ह्मणजे सर्व लष्करास व इतर लोकांस कळण्याकरितां पन्नास साठ तोफांची सरबत्ती होत असे. सारांश जे जे मानपान व रीतरिवाज बादशहा दिल्लीस असतांना चालत, ते ते सर्व तो लष्करांत असतांनाही चालवी.

बादशहाचे स्वारीचा जरी एवढा मोठा थाट व भपका होता, तरी त्याचे स्वतःचा पोषाख व राहण्याची राहटी अगदीं साधी असून, किंचित्‌ फकीराचे धर्तीवरसुद्धां गेलेली असे; तथापि येवढा बाहेरील डामडौल राखण्यांत बादशहाचा असा हेतु होता कीं, त्याजवरून लोकांचे डोळे दिपून जाऊन त्यांना वर मान करण्याची छाती होऊं नये; परंतु या डामडौलापासून असा एक प्रकारचा त्रास उत्पन्न झाला कीं, बादशहाचे सर्व सरदार व अधिकारी त्याचेप्रमाणें मोठा डौल करूं लागल्यामुळें, फौजा इकडून तिकडे नेण्याचीं वगैरे लढाईचीं कामें त्वरित व वेळचेवेळीं होण्यास अडचण पडूं लागली, व याहूनही अधिक वाईट गोष्ट ही झाली कीं, अशा थाटमाटास अतिशय खर्च

होऊं लागून, त्यामुळें पैशाची टंचाई होऊं लागली, व लवकरच अगदीं जरूरीच्या मोठमोठ्या मोहिमी व मसलती यांचेही वांट्यास पैसा येईनासा झाला!

१७. मोंगलांची फौज खानदेश वगैरे उत्तरेकडील मुलूख उघडे टाकून महाराष्ट्रांत उतरली आहे, हें हंबीरराव सेनापती यांचे लक्षांत येतांच, तो कोंकणांतून निघून मोठमोठ्या मजली मारून व वाटेनें अधिकाधिक सैन्य गोळा करून एकाएकीं ब्ऱ्हाणपुरापुढें येऊन दाखल झाला. तेथें मोंगलाचा कांहींएक बंदोबस्त नसल्यामुळें, मराठ्यांस तें शहर कित्येक दिवसपर्यंत लुटण्यास सांपडलें. तेथून पुष्कळ दौलत लुटून घेऊन व ब्ऱ्हाणपूर व नाशीक यांमधील सर्व प्रांत जाळून पोळून टाकून, हंबीरराव यास जितक्या त्वरेनें आपली लूट आपले देशीं आणवितां येईल तितके त्वरेनें त्यानें ती आणली.

बादशहाचा तिसरा मुलगा सुलतान अझिम, यास त्यानें मागें कबूल केल्याप्रमाणें या वर्षीं विजापूरावर स्वारी करण्याकरितां पाठविलें. त्यानें प्रथम सोलापुरास वेढा घालून ते घेतलें ( १६८९ ). यानंतर सुलतान अझिम यानें विजापूराकडे कूच केलें; परंतु विजापूरकरांचे सैन्यापुढें त्याचा निभाव लागेना. यावरून बादशहानें त्याचे मदतीस खान जहान बहादूर यास पाठवून दिलें; परंतु तो येऊन पोहों-चण्याचे अगोदरच विजापूरकरांचा सरदार शिरझीखान याचे नेटामुळें सुलतान अझिम यास भीमा नदी उतरूनही आलीकडे परत यावें लागलें. यामुळें खान जहान याचे कुमकेची तूर्त जरूर राहिली नाहीं.

मराठ्यांनीं ब्ऱ्हाणपूर लुटलें ही बातमी खानजहान यास लागली; परंतु तो एकदम चांदुरास जाऊन, अंकाई टंकाईचे घांटानें उतरून, त्यास आडवा न होतां, तो अंजिरा घाटानें खालीं उतरून पश्चिमेकडे वळला. यामुळें मराठे लोक त्याचे हातींच लागतना. ते नेहमीं त्याचे पुढें सुमारें पांच मजला असत. खान यानें बराच वेळ त्यांचा पाठलाग केला, इतक्यांत बादशहाकडून त्यांस हुकूम मिळाला कीं,

" तुह्मीं जुन्नर व सिंहगड यांचेमध्यें ठाणीं घालावीं. कारण बऱ्हाणपूरचे प्रांतांवर राजपुत्र *खामबक्ष याची स्वतंत्र नेमणूक केली आहे."

मागें सांगितल्याप्रमाणें सुलतान मोआझिम हा कृष्णानदीचे कांठीं वाळवें येथें छावणी देऊन राहिला असतां, त्यानें सभोंवारचा प्रदेश बादशहाचे नांवानें काबीज केला, व विजापूर सरकारानें पूर्वी ज्यांस जमिनीच्या, इनामांच्या वगैरे सनदा करून दिल्या होत्या, त्यांतील कित्येक यावेळीं आपले सहीनें मुकरर करण्यास यानें सुरवात केली. इतक्यांत त्याचे छावणींत महामारीचा मोठा सपाटा एकाएकीं उठून त्याचे सैन्यांतील पुष्कळ लोक मेले. यानंतर त्यास बादशहाकडून हुकूम आला कीं, ' तुह्मीं वाळवें येथील मुक्काम हालवून घांटावर नैऋत्य दिशेकडील विजापूरचे जे प्रांत पूर्वी शिवाजीनें घेतले होते, ते जाऊन काबीज करावेत. ' हा हुकूम पावतांच सुलतान मोआझिम हा ताबडतोब तो बजावण्यास चालता झाला ( आक्टोबर १६८९ ). त्यानें गोकाक, हुबळी, आणि धारवाड हीं ठाणीं सहज घेतलीं; परंतु त्याचे फौजेंत दाणागोट्याचा चांगला पुरवठा नसल्यामुळें, व मधून मधून त्यांत महामारीचा उपद्रव होत असल्यामुळें, व जागोंजाग ठाणीं घेतलीं ह्मणजे त्यांत सैन्यांतूनच शिबंदी ठेवावी लागत असल्यामुळें, त्याची फौज एकंदर इतकी कमजोर झाली कीं, विजापूरकरांनीं तिजवर जेव्हां हल्ला केला, तेव्हां तिचा त्यांजपुढें साधारण निभावसुद्धां लागण्याची पंचाईत पडली. सुलतान मोआझिम याचे सैन्याची अशी स्थिति आहे, ही बातमी बादशहास कळतांच, त्यानें लागलींच रोहउल्लाखान यास पुढें त्याचे मदतीस पाठवून मागाहून मोठी फौज देऊन, खान जहान बहादूर यास रवाना केलें; परंतु ही कुमक येऊन पोहोंचे तोंपर्यंत सुलतान मोआझिम याचे फौजेवर विजापूरकर वरचेवर येऊन हल्ले करीत व मोंगलांचे फौजेंतील बहुतेक घोडे मरून गेले असल्यामुळें, मोठमोठे उमराव व साधारण घोडेस्वार ह्या दोघांस सारखेच पायीं कूच करण्याचा व लुटण्याचा प्रसंग येऊन ठेपला, व त्यास अशा

* बादशहाचा पांचवा मुलगा.

गोष्टीची फारशी संवय नसल्याकारणानें त्यांस तें फार जड गेलें. शेवटीं ह्या उत्कृष्ट फौजेची येणेंप्रमाणें अगदीं दुर्दशा उडून जाऊन—कदाचित् पुष्कळ पराजयांनींही ती इतकी झाली नसती—ती अहंमदनगरास परत येऊन दाखल झाली ( १६८९ ).

१८. येणेंप्रमाणें खान जहानबहादूर यानें, सुलतान मोआझिम याचे मोडकळीस आलेले सैन्यास अहंमदनगरास आणून पोहोंचविल्यावर, त्यास व रोहउल्लाखान यांस, बादशहानें सुलतान अझिम याचे मदतीस पाठवून देऊन, त्यास विजापुरास वेढा घालण्यास हुकूम दिला. व त्यानें स्वतःचा मुक्काम अहंमदनगराहून हलवून, तो सोलापुरास तळ देऊन राहिला, व अहंमदनगर प्रांताचे बंदोबस्ताकरितां गाजीउद्दीन खान यास पाठवून दिलें. बादशहाची मोठी छावणी आपले नजीक सोलापुरास येऊन भिडल्यामुळें, व सुलतान अझिम याची फौजही मोठी झाली असल्याकारणानें, विजापूरचे सरदारांनीं सरहद्द सोडून देऊन, ते खुद्द विजापूरचेंच संरक्षण करेंतरीं होवो, ह्मणून आपले राजधानींत शिरले. विजापूरकरांनीं केलेली ही पिछेहाट पाहून, सुलतान अझिम यास विशेष आवेश येऊन तो एकदम राजधानीस येऊन भिडला; परंतु यावर्षीं पाऊस अगदीं थोडा पडला असल्यामुळें, विजापूरचे आसपास पीक फारच थोडें झालें होतें; व तेंही विजापूरकरांनीं या पूर्वींच शहरांत नेऊन किल्ल्यांत ठेविलें होतें. उत्तरेस औरंगाबाद प्रांतांतील पीक अधिक चांगलें होतें खरें; परंतु तें सर्व बादशहाचे सोलापूर येथील बडे छावणीस घेऊन गेले. यामुळें सुलतान अझिम हा विजापुरास येऊन लागल्यावर, हळू हळू त्याचे फौजेंत धान्याचें वगैरे दुर्भिक्ष वाटूं लागलें. इकडे शत्रूंनींही त्याजवर वरचेवर हल्ले करावेत, त्यांचे लोक धान्य, वैरण वगैरे मिळविण्याचे खटपटींत गुंतले असतां, त्यांच्या टोळया गांठून त्यांस लुटावें व ठार मारावें असा क्रम चालविला. सोलापूरची बडी छावणी आणि सुलतान अझिम याची फौज, यांमध्यें रसिदी पोंहोचेनाशा झाल्या, व कांहीं वेळ राजपुत्र मोठ्या पेंचांत येऊन पडला. बादशहास ही बातमी कळली; परंतु

स्वतः त्याचे छावणींतच धान्याची साधारण महर्गता असल्यामुळें, त्यास तेथून राजपुत्राचे फौजेकडे धान्य पाठवितां येईना; तथापि त्यानें गाजीउद्दीनखान यास, अहंमदनगराहून वीस हजार बैलांचा धान्यानें लादलेला तांडा सुलतान अझिम याचे सैन्याकडे नेऊन पोहोंचवावा ह्मणून हुकूम केला; व या धान्याचे सांठ्याचे संरक्षणाकरितां, मुख्य छावणींतून बादशहानें दौलतराव यास बरोबर चांगली मोठी फौज देऊन, रवाना केलें. धान्याचा पुरवठा करण्याची अशी तजवीज बादशहानें केल्याची बातमी विजापूरकरांस कळतांच, गाजी उद्दीनखानाचा बैलांचा तांडा राजपुत्राचे छावणींत पोहोंचूं नये ह्मणून, त्यांनीं खानाचेबरोबर मोठी निकराची झटापट केली; परंतु अखेर विजापूरकरांचा पराजय होऊन त्यांस परत जावें लागलें. बादशहानें पाठविलेला धान्याचा सांठा शत्रूंचे हातीं लागता किंवा तो उशीरानें येऊन पोहोंचता, तर राजपुत्राचे फौजेचे जे हाल झाले असते ते, व त्याची जी फजिती होती ती, गाजीउद्दीनखानाचे पराक्रमानें चुकली. असें सांगतात कीं, गाजीउद्दीनखानाचे फौजेबरोबर सुलतान अझिम याची बायको जानी बेगम ही नवऱ्याकडे जात असून, तिनें या प्रसंगीं मोठें शौर्य प्रकट केलें. दोघा सैन्याचें मोठें तुंबळ युद्ध चाललें असतां, त्यांत तिनें आपले लोकांस उत्तेजन येण्याकरितां आपला हत्ती पुढें ढकलला!

१९. मोंगलांची व विजापूरकरांची लढाई येणेंप्रमाणें मोठे हातघाईवर येऊन पोहोंचली असतां, मराठ्यांनीं पुनः एकवार उत्तरेकडे भरारी मारून, भडोच शहरावर एकाएकीं हल्ला करून तें घेतलें. ही स्वारी सुलतान अकबर याचे सांगण्यावरून झाली असें ह्मणतात; व या प्रसंगीं भडोच प्रांतांत सुलतानची बादशहा ह्मणून द्वाही फिरविली. मराठ्यांनीं भडोच शहर सफई लुटलें, व गुजराथ प्रांताचा सुभेदार हा फौज गोळा करून त्यांचे अंगावर चालून येईपर्यंत त्यांनीं तें शहर सोडलें नाहीं. ( १६८९ ). येणेंप्रमाणें बादशहानें बहुतेक सर्व सैन्य दक्षिणेंत नेऊन उत्तर प्रांताचा चांगला बंदोबस्त न ठेवल्यामुळें, त्याचे

राज्यांतील दोन मोठीं शहरें एक वर्षांतच लुटलीं गेलीं. औरंगजेब बादशहास पहिल्यापासून मराठ्यांविषयीं मोठीशी भीति वाटत नसे. हेच लोक थोडकेच अवकाशांत आपले प्रचंड सैन्यास अनावर होऊन, आपले मागें आपली सर्व बादशाही बुडवून टाकतील, ही कल्पना त्याचे डोक्यांत कधींच आली नाहीं. राज्याचे विनाशकारण समजलेवर किंवा रोगाचें निदान झाल्यावर मग काय पाहिजे?

औरंगजेब बादशहाचे स्वारीनें दक्षिणेंत वर लिहिल्याप्रमाणें मोठी चलबिचल होऊन गेली असतां, मादण्णापंत हा विजापूरकरांशीं सख्य करून दोन्हीं राज्यांनीं मोगलांशीं लढावें ह्मणून खटपट करीत होता; परंतु विजापूर येथील सर्वच स्थिति अगदीं बिघडून गेली असल्यामुळें, त्याचे यत्न अगदीं निष्फळ झाले. शेवटीं कोणीतरी आपल्यास साहाय्य पाहिजे ह्मणून, त्यानें संभाजी महाराजांबरोबर त्यांस एक लक्ष होन खंडणी देऊन तह करून घेतला. बादशहास ह्या तहाची बातमी लागतांच, त्यास कुतुबशहाचा मोठा राग आला. त्यानें लागलीच, खान जहान यास फौजेस घेऊन एकदम गोंवळकोंड्याचे राज्यांत शिरण्यास हुकूम केला. सुलतान अबूहुसेन याजकडे कांहीं खंडणी थकलीच होती; तेव्हां तें आयतेंच निमित्तही होतें. खान-जहान याजबरोबर बादशहानें सादतखान ह्मणून वकील दिला होता, तो विजापूर येथील बादशहाचा महा लबाड वकील मलिक बरखोरदार याचाच केवळ धाकटा भाऊ शोभण्यासारखा होता. सादतखानास बादशहानें सांगून ठेविलें कीं, " कुतुबशहानें संभाजीबरोबर तह करून आपली अवज्ञा केली, त्याबद्दल त्याजपासून दंड घेऊनच रहावयाचें नाहीं; तर कांहीं तरी कुरापत काढून सुलतानाबरोबर लढाई उत्पन्न करावी. "

बादशहाचे हुकुमाप्रमाणें खान जहानबहादूर हा गोंवळकोंड्याचे राज्यांत शिरला; परंतु मादण्णापंत आपली तयारी करूनच होता. त्यानें सत्तर हजार फौज गोळा करून, ती इब्राहिमखान ह्मणून सरदार होता त्याचे हातीं देऊन, त्यास मोंगलांचे तोंडावर रवाना केलें.

दोन्ही सैन्याची गांठ मलखेड या गांवीं पडली. खानजहान याची फौज कुतुबशहाचे फौजेपुढें अगदींच थोडी असल्यामुळें, व शत्रूंपासून आतां पिछेहाट करूं जाणें हें अत्यंत भयंकर आहे असें जाणून, त्यानें आपले फौजेचे संरक्षणार्थ भोंवताली खंदक खणण्याची व मातीचे तट घालण्याची तजवीज चालविली, व आपण कोणत्या संकटांत येऊन पडलों आहों, त्याचें वर्तमान बादशहास त्यानें लिहून कळविलें. बादशहानें ताबडतोब खानजहान याचे मदतीस सुलतान मोआझिम यास पाठवून दिलें; परंतु इतक्यांत गोंवळकोंड्याचे सेनापतीचेजवळ चांगली फौज असून, त्याचे हातांत शत्रू अगदीं आला असतांही, त्यानें त्यांजवर चांगलें तुटून पडून हल्ले करावयाचे ते न करितां, तो साधारण स्वस्थच बसला. यानंतर सुलतान मोआझिम हा येऊन पोहोंचल्यावर तर सेनापती फितूर झाला ह्मणा, किंवा शत्रूंस अडविण्याची त्याची खटपट इतकी कमकुवत होती कीं, मोंगलांची फौज त्यास फारसा अडथळा न होतां, एकदम हैदराबादेवर येऊन थडकली. शत्रूंची चाल झालेली पाहून सुलतान अबूहुसेन हा गोंवळकोंड्याचे किल्ल्यांत हटला. मादण्णापंतानें सुलतानास किल्ल्यांत न शिरण्याविषयीं पुष्कळ प्रकारानें सांगितलें; परंतु त्याचा कांहींएक उपयोग झाला नाहीं. इकडे गोंवळकोंडेकरांचा सेनापति इब्राहीमखान हा उघडपणें मोंगलांस जाऊन मिळाला, त्यासरसें त्यांनीं हैदराबादशहर हस्तगत केलें व सुलतान मोआझिम यानें तें न लुटण्याविषयीं फौजेस हुकूम केला असतांही त्यांनीं तें लुटलें. राज्यावर एखादें मोठें संकट गुदरलें ह्मणजे, अतिशय मोठा शहाणा जरी दिवाण असला, तरी असल्या प्रसंगीं त्याचेच डोक्यावर सर्व खापर फुटावयाचें! मादण्णापंताविषयीं मुसलमान सरदारांचा अगोदरच मोठा कटाक्ष होता. त्यांनीं आपला सेनापति फितून राजधानी शत्रूंचे हातीं लागलेली पाहून, दिवाणावर एकदम मोठा गहजब केला. सुलतानाचे सासूनें ह्मणा किंवा मोंगलाचे साथी जे सरदार होते त्यांनीं ह्मणा, सुलतानाचे दिवाणाविषयीं कान फुंकून त्यास मारेकरी घालून ठार मारिलें. सुलतान अबूहुसेन हा साधारण बऱ्याच चांगल्या स्वभावाचा राजा होता खरा; परंतु

अशा विकट प्रसंगास अत्यवश्य जी बुद्धीची स्थिरता, ती त्यास नसल्यामुळें व मादण्णापंतासारखा शहाणपणाचा सल्ला देण्यासारखा त्याजजवळ कोणी मुत्सद्दी नसल्यामुळें, त्यानें मोंगलांशीं तहाचें बोलणें सुरू केलें. बादशहासही, गोंवळकोंडेकरांपाशीं सैन्य, खजिना वगैरे गोष्टींची साधारण तारंबळच असेल असें जें प्रथम वाटलें होतें, त्याविषयीं त्याचा आतां बराच भ्रम फिटला होता, व याचवेळीं विजापूरचे सुलतानाशीं जें युद्ध चालूं होतें, त्यांत विजापूरकरही बराच नेट धरितील असा त्यास अदमास वाटला, ह्मणून तो सुलतान अबूहुसेन याचे बोलण्यास लवकरच कबूल झाला. त्यानें सुलतान मोआझिम यास गोंवळकोंडेकरांपासून दोन कोट रुपये—पैकीं कांहीं रोकड व कांहीं जिन्नस असे मिळून—घेऊन त्यांशीं तह करावा ह्मणून हुकूम लिहून पाठविला; परंतु राजपुत्र व खानजहान यांनीं हैदराबाद शहर लुटून घेण्यांत कसूर केल्यामुळें, त्यांजवर बादशहाची फार इतराजी झाली. त्या शहरांत १६९९ सालीं स्वतःस अतिशय लूट मिळाली असल्याची त्यास आठवण असल्यामुळें, आपण, आपला बाप व भाऊ यांचे विरुद्ध खटपट करण्याचे कामीं, ज्याप्रमाणें त्या लुटीचा उपयोग केला, त्याप्रमाणें राजपुत्र व खानजहान ह्यांनीं कदाचित् ही लूट स्वतःच छपविली असून, ते पुढें तशीच खटपट करण्याकडे तिचा उपयोग करतील, असाही त्यास संशय उत्पन्न झाला. त्यानें लागलींच खानजहानबहादूर यास लाहोरास बदललें व त्यास पुनः कांहीं वर्षांनीं जरी त्यानें दक्षिणेंत परत आणलें, तरी त्याजला त्यानें मोठ्याशा मोहिमेवर पुनः कधींही पाठविलें नाहीं.

२०. यानंतर औरंगजेब बादशहानें आपले छावणीचा मुक्काम सोलापुराहून हालवून विजापुरास नेला. आदिलशाहीचे राजधानीस मोंगलांचा वेढा पडून बरेच दिवस झाले होते. त्यामुळें शहरांतील लोकांची अन्नसामुग्री बरीच संपून गेली होती. विजापूरकरांचे मुख्य मुख्य सरदार शिरजीखान, अब्दुल राऊफ, सिद्धी जालीम आणि सिद्धी जमशेड हे राजपुत्र शिकंदर यासह किल्ल्यांत शिरून तेथून लढत

होते. विजापूर शहराचा तटच मोठा जबरदस्त असून, शिवाय आंतील किल्ला येवढा विस्तीर्ण आहे कीं, त्याचा परीव तीन कोस आहे. येवढ्या मोठ्या किल्ल्यास वेढा घालणें ह्मणजे बादशहाचे प्रचंड सैन्याखेरीज अशक्यच होतें! ह्मणूनच बादशहानें आपला मुक्काम हालवून तो विजापूर शहरापुढें येऊन उतरला. मोंगलांचे फौजेनें निरनिराळे ठिकाणीं सुरंग लावले होते; परंतु त्यांतील विशेष प्रचंड व भरंवशाचा असा दक्षिणेचे बाजून असून, त्याची व्यवस्था टरबीतखान ह्मणून सरदार होता, त्याजकडे बादशहानें दिली होती. विजापूरची शिबंदी थोडीच राहिली होती, त्यांचा पगारही बराच थकला होता, त्यांची अन्नसामग्रीही तुटत चालली होती, तरी या निकराचे प्रसंगीं तिनें चांगले शौर्यानें लढून शत्रूंस बरेच वेळ दाद दिली नाहीं. शेवटीं दक्षिणबाजूचा सुरंग उडून त्यानें तटास मोठी खिंड पडली; परंतु बादशहानें पाहिलें कीं, किल्ला तर हस्तगत होतोच; परंतु आतांच खिंडींतून आपले लोक घाडून त्यांजकडून हल्ला केला तर, आंतील किल्ल्यांतील शत्रूंची शिबंदी, जी अन्नसामुग्री संपल्यामुळें जिवावर उदार झाली आहे, ती त्यांजवर तुटून पडून आपले फौजेचा विनाकारण नाश होईल; परंतु कांहीं वेळ गेला असतां शत्रूंस आपली खरी स्थिति कळून येऊन, त्यांस कांहीं पोक्त विचार सुचेल व ते जिवावर उदार होऊन, आपला व दुसऱ्याचा नाश करूं पहाणार नाहींत. बादशहाचा हा अदमास खोटा ठरला नाहीं. कारण, शहराचे तटास जरी खिंड पडली होती, तरी आंतील किल्ला चांगला मजबूत असून, तो अजून विजापूरकरांचे स्वाधीन होताच; परंतु अन्नसामग्री अगदीं संपून गेल्यामुळें, विजापूरकरांस सर्व शहर मोंगलांचे स्वाधीन करणें भाग पडलें. शिरजीखान यानें गाजीउद्दीनखान याचेमार्फत बादशहाबरोबर कांहीं अटी ठरवून घेऊन, विजापूर शहर सुमारें १९ आक्टोबर १६८६ रोजीं मोंगलांचे स्वाधीन करून दिलें. आदिलशाहीचे मुख्य मुख्य सरदारांस बादशहानें आपले पदरीं ठेऊन घेतलें, व शिरजीखान यास सात हजार घोडेस्वारांची मनसब सांगितली, व त्यास रुसतुमखान असा किताब दिला. विजा-

पूरचे गादीचा मालक शिकंदर आदिलशहा यास बादशहानें आपले छावणींतच नजर कैदेंत ठेविलें, तो तेथें तीन वर्षें होता. त्यानंतर तो एकाएकीं एके दिवशीं मरण पावला. कोणी ह्मणतात त्यास बादशहानें विष घालून ठार मारिलें ( १६८९ ).

येणेंप्रमाणें विजापूरची आदिलशाही, जिचा आरंभ सुलतान युसफ आदिलशहा हा १४८९ सालीं स्वतंत्र राजा झाला, तेव्हांपासून झाला होता, तिचा बरोबर दोनशें वर्षांनीं शेवट झाला. मोंगलांचे स्वाधीन विजापूर शहर होतांच, तेथील सर्व राज्यवैभव एकदम नष्ट होऊन, तें लवकरच उजाड पडूं लागलें.

२१. विजापूरचें राज्य मोडून टाकल्यावर औरंगजेब बादशहानें, लागलीच गोंवळकोंड्याचेंही राज्य मोडून टाकण्याची जबरदस्त तयारी चालविली; तथापि सुलतान मोआझिम याचेमार्फत नुकताच गोंवळकोंडेकरांबरोबर बादशहानें जो तह केला होता, तो मोडण्यास कांहीं तरी निमित्त पाहिजे होतें, तेव्हां मध्यंतरीं, बिचाऱ्या कुतुबशहास सादतखान वकील याचेमार्फत कांहीं भीति व कांहीं आशा दाखवून, त्याजपासून पैका व जवाहीर हीं जितकीं काढून घेतां येतील, तितकीं काढून घेण्याचा नीचपणाचा क्रम बादशहानें चालूं केला. इकडे गोंवळकोंड्यास बादशहाचे साथीदार जे होते, त्यांनीं कुतुबशहाचे सैन्यांत फितूर करून, त्याजवरील बरेच अधिकारी यांस कांहीं लांच देऊन व कांहीं आशा लावून आपलेसें करून घेतलें. सादतखान यानें अतिशय हलकटपणा करून, कुतुबशहापासून त्याचे राण्यांचे दागिनेसुद्धां हिराऊन घेतले. बिचारे शहास वाटलें कीं, बायकांचे दागिने स्वाधीन करून दिल्यानें तरी बादशहास आपली दया येईल; परंतु ही त्याची चूक होती. औरंगजेब बादशहास शत्रू शरण येऊन हातीं पायीं लागूं लागला ह्मणून, त्याची दया येई, असें कधींही होत नसे! कलबुर्ग्यास कोणी प्रसिद्ध महंताची कबर आहे, तिचें दर्शन घेण्याचें निमित्त करून बादशहा स्वतः त्या शहराकडे चालला; व कुतुबशहाबरोबर लढाई सुरूं केली असतां त्यास सगर, आडोनी वगैरे कर्नाटकाचे बाजूनें कोणी-

करून कुमक मिळूं नये, ह्मणून त्यानें त्या दिशेस गाजीउद्दीन याजबरोबर कांहीं सैन्य देऊन रवाना केलें. (१६८७). शेवटीं कुतुबशहावर स्वारी करण्याची सर्व तयारी झालीसें पाहून औरंगजेब बादशहानें त्याजबरोबर लढाई करण्याबद्दल जाहीरनामा प्रसिद्ध केला. त्यांत शहावर मुख्य मुख्य आरोप बादशहानें आणले, ते हे होते कीं, त्यानें आपली दिवाणगिरी ब्राह्मणास सांगितली असून, मूर्तिपूजक लोकांचा राजा संभाजी याजबरोबर त्यानें दोस्ती ठेविली होती. याशिवाय शहाची एकंदर वर्तणूक बतफैलीपणाची होती, असाही एक त्याजवर आरोप केला होता. औरंगजेब बादशहाचें असें निर्दय व लबाडपणाचें वर्तन पाहून, सुलतान अबू-हुसेन ह्या शेवटीं अतिशय संतापला, व त्याचे पुष्कळ सरदार जरी त्यास सोडून मोंगलांस जाऊन मिळाले होते, तरी अशा बेमान व नीच बादशहावर विश्वास न धरितां, होतां होईल तोंपर्यंत त्याजबरोबर निकरानें लढण्याचा त्यानें निश्चय केला. तो हैदराबाद शहर सोडून त्याचेजवळ जे अद्याप कांहीं इमानी सरदार व शिपाई राहिले होते, त्यांसह तो पुनः गोंवळकोंड्याचे किल्ल्यावर चढला. येथें त्यानें मोठे शौर्यानें सात महिनेपर्यंत बादशहाचे फौजेस अगदीं दाद लागून दिली नाहीं. या त्याचे पराक्रमावरून, दक्षिणेंतील मुसलमान लोकांमध्यें शौर्याच्या गोष्टी निघाल्या असतां, त्याचें अद्यापपर्यंत *तानशहा ह्मणून कधीं कधीं नांव निघतें! गोंवळकोंड्यास सात महिने वेढा पडून राहिल्यावर, अखेर कोणी फितूरी केल्यामुळें, किल्ला मोंगलांचे

---

* सुलतान अबुहुसेन यास गाण्याचा मोठा शोक होता. त्याजविषयीं ग्रांटडफ यांनीं अशी एक मजदार दंतकथा लिहिली आहे कीं, हा सुलतान दौलताबादेचे किल्ल्यांत जाऊन पडण्याचे पूर्वी तो मोंगलांचे छावणींत असतां, बादशहाचे वाजंत्र्यांनीं एके दिवशीं अशी कांहीं बहारेची तान घेतली कीं, तिनें शहा अगदीं खूष होऊन गेला. तो ह्मणाला कीं, "मजपाशीं जर आतां लाख रुपये असते, तर ते मी ही तान घेणारे वाजंत्र्यास दिले असते"! बादशहास शहाचें हें भाषण कळविल्यावर, त्यानें लागलींच शहाचे इच्छेप्रमाणें वाजंत्र्यास एक लाख रुपये देवविले!!

स्वाधीन झाला. बिचारा सुलतान अबूहुसेन हा बादशहाचे ताब्यांत येतांच, त्यास त्यानें कैद करून दौलताबादेचे किल्ल्यांत ठेवण्यास रवाना केलें. ( सप्टेंबर १६८७ ). व याच ठिकाणीं कुतुबशहा मरेपर्यंत कैदेंत राहिला. येणेंप्रमाणें कुतुबशाही, जिचा आरंभ, सुलतान कुतुब उलमुलुक हा प्रथम १५१२ सालीं स्वतंत्र राजा झाला, तेव्हांपासून झाला, तिचा शेवट १६८७ सालीं विजापूरचे आदिलशाहीप्रमाणें औरंगजेब बादशहाचेच हातून झाला. कुतुबशाही सुलतानाची राजधानी जें हैदराबाद शहर, तें विजापुराप्रमाणें हल्लीं उजाड स्थितींत नसून, तें निझामसरकारचे राजधानीचें शहर आहे. तेथें कुतुबशहा यानें बांधलेली मोठी मशीद, व सुंदर सोनेरी मुलामा चढविलेले घुमट ज्यांस आहेत, अशा इतर सुलतानांच्या कबरी व त्या सर्वांवर उंच व भव्य दिसणारा असा गोंवळकोंड्याचा किल्ला, ह्यांचा मोठा चित्तवेधक देखावा असून, तो पाहून, इतिहासज्ञ प्रेक्षकांस कुतुबशाहीची आठवण झाल्याशिवाय रहात नाहीं.

गोवळकोंड्याचा हा वेढा चालू असतां, सुलतान मोआझिम यानें बादशहापाशीं, विचारी सुलतान अबूहुसेन याचे वतीनें, ' कुतुबशहा याचा विनाकारण फार छळ झाला, एरवीं तो फार लायक पुरुष आहे ' अशी मोठे उदारबुद्धीनें तरफदारी केली; परंतु बादशहाचा स्वभाव हट्टी व संशयखोर असल्यामुळें, बिचारे शहाचे दैन्यांत कांहीं कमतरपणा न होतां, उलटें बादशहास राजपुत्राविषयीं मागें पुष्कळ दिवसांपासून संशय उत्पन्न झाला होता, तो दृढ होऊन त्यानें त्यास लागलींच कैद करण्यास हुकूम केला! सुलतान मोआझिम बादशहाचे छावणींत यापुढें सहा वर्षें कैदेंतच होता. त्यानंतर बादशहानें त्यास काबूल येथें सुभेदार करून रवाना केलें.

२२. आदिलशाहीचा नाश झाल्यानंतर, तिचा बराच नांवाजलेला सरदार शिरजीखान यास, बादशहानें सात हजार घोडेस्वारांची मनसब दिली ह्मणून मागें सांगितलेंच आहे. त्याचेबरोबर बादशहानें कांहीं फौज देऊन, त्यास संभाजी महाराजांचे दक्षिणेकडील मुलखावर स्वारी करून, तो

काबीज करण्याकरितां रवाना केलें. त्याचे मदतीस पूर्वी विजापूरचे पदरीं जे मराठे मनसबदार असून, हल्लीं बादशहाचे पदरीं राहण्यास राजी होते, त्यांस जाण्यास बादशहानें हुकूम केला. शिरजीखान हा मराठ्यांचे मुलुखांत शिरून तो वांई येथें येऊन पोहोंचला. तेथें हंबीरराव सेनापति व खान यांचे फौजांची गांठ पडून लढाई झाली. तींत शिरजीखानाचा पराजय झाला; परंतु हंबीरराव यास जखम लागून तो मरण पावला. सेनापति पडल्यानें मराठ्यांचे फौजेची हिंमत न खचतां, त्यांच्या निरनिराळ्या टोळ्या कांहीं विजापूरचे बाजूस व कांहीं गोवळकोंड्याकडे व कांहीं कर्नाटकाकडे पसरल्या.

औरंगजेब बादशहानें आडोनी, सगर वगैरे ठिकाणांहून कुतुबशहास कुमक मिळूं नये ह्मणून, त्या प्रांतांकडे गाजीउद्दीनखान यास मुद्दाम रवाना केलें ह्मणून वर नुकतेंच सांगितलें आहे. थोडेच वेळानें सुलतान अझिमही खानाचे मदतीस गेला. ते दोघे आडोनीवर चालून गेले. विजापूर येथील माजी प्रतिनिधि मसाऊदखान याचें आडोनी हें जहागीर गांव होतें. मोंगलांचे फौजेबरोबर लढून आपला निभाव लागणार नाहीं असें पाहून, मसाऊदखानानें आपलें जहागीर गांव मोंगलांचे स्वाधीन करून दिलें; व त्यास बादशहाचे पदरीं राहण्यास आग्रह केला असतां, त्यानें ती गोष्ट मान्य केली नाहीं. तो मरेपर्यंत तसाच साधारण अप्रसिद्ध अशा स्थितींत परंतु अब्रूनें असा राहिला.

सगर येथील किल्ला कलबुर्गा व विजापूर यांचेमध्यें असून, तो मोठ्या बिकट डोंगरांत व आड रानांत असा होता. तो बेरड ह्मणून कर्नाटकी रामोशांची एक जात आहे, तिचे एका नाइकाचे स्वाधीन होता. हा नाईक बरेच दिवसांपासून स्वतंत्र पाळेगार ह्मणून मोडला जात असे. त्याचे हाताखालीं बारा हजार पायदळ फौज असे. मोंगलांची फौज आपणांवर चालून येते ही बातमी ऐकून तो बादशहास शरण आला. यामुळें बादशहा खूष होऊन, त्यास त्यानें पांच हजार स्वारांची मनसब करून देऊन त्यास आपले पदरीं राहून घेतलें;

परंतु हा नाईक लवकरच मरण पावला. त्याचा मुलगा पेमनाईक यास बादशाही ताबेदारीचा थोडे दिवसांतच कंटाळा येऊन, तो पुनः अरण्यांत जाऊन त्यानें आपले लोक जमा करून, सगरशेजारीं वाकीन-खेडा ह्मणून एक तटबंदी गांव होतें, तेथें लूट वगैरे करून पूर्ववत् राहूं लागला; व त्याची शक्ति हळू हळू बरीच वृद्धिंगत होऊं लागली.

२३. विजापूरचे सुलतानाचा कृष्णानदीचे पलीकडे कर्नाटक प्रांत काबीज करण्याकरितां बादशहानें कासीमखान याजबरोबर कांहीं सैन्य देऊन रवाना केलें. त्या प्रांतांतील देसाई व जमीनदार लोक हे जितके बादशाहीचे पदरीं येण्यास राजी होतील, तितक्यांस पदरीं राहून घ्यावें ह्मणून बादशहाचा हुकूम होता. मोंगलांची फौज कर्नाटकाकडे चालली हें पाहून, संभाजी महाराज यांनीं केसोपंत पिंगळे ह्मणून, माजी पेशवा मोरोपंत पिंगळे याचा भाऊ होता, त्याजबरोबर कांहीं फौज देऊन कर्नाटकांतील आपले प्रांताचा बंदोबस्त राहून, शिवाय शहाजी महाराजांचा जहागीर मुलूख जो व्यंकोजी राजे यांचेकडे सर्वच राहिला होता, तोही साधून घेतां आला तर साधून घ्यावा, या हेतूनें त्यास पाठवून दिलें. कारण व्यंकोजीराजे यांनीं संभाजी महाराज गादीवर बसल्यापासून, शिवाजी महाराजांबरोबर ठरविल्या-प्रमाणें त्या प्रांतांचा वांटा किंवा त्याचा वसूलही कांहींच त्यांस दिला नव्हता. महाराजांनीं केसोपंतास सांगितलें होतें कीं, जिंजी प्रांता-वरील मुख्य अधिकारी हरजी राजे महाडीक व त्याचा दुय्यम निळोपंत पिंगळे ( माजी पेशव्याचा मुलगा ) यांजबरोबर पूर्वीं मस-लत ठरवून, मग व्यंकोजीराजे यांचे संबंधानें खटपट करावी; परंतु केसोपंत हा जिंजीस येऊन पोहोंचल्यावर, लवकरच चुलतेपुत-ण्यांत वैरभाव उत्पन्न होऊन तंटे उपस्थित झाले. हरजीराजे याचे मनांत निळोपंतानें असें भरवून दिलें कीं, "महाराजांनीं तुह्मांस जिंजींतून काढून टाकण्यास केसोपंतास फौजदार रवाना केलें आहे." येणेंप्रमाणें संभाजी महाराजांचे फौजेंत तंटे बखेडे उत्पन्न झाल्यामुळें केसोपंताची मोहीम अखेरीस फसली.

इकडे व्यंकोजी राजे यांस केसोपंताचे मोहिमेची बातमी अगोदरच लागली होती ह्मणा किंवा शहाजी महाराजांचे जहागीर मुलूख आपणांस राखतां येणार नाहींत असें त्यांस वाटलें ह्मणा, त्यांनीं अगोदरच बंगलूर हें ह्मैसूरचा राजा यास विकून टाकण्याबद्दल बोलणें चालवून तें मुकरर केलें होतें. ह्या गोष्टीची बातमी जिंजी येथें मराठ्यांचे सरदारांस कळतांच, बंगलूर हें ह्मैसूरकरांचे ताब्यांत जाण्यापूर्वींच तें आपण घ्यावें ह्मणून त्यांनीं मसलत चालविली; परंतु त्यांमध्यें तंटे बखेडे चालू असल्यामुळें, ती ताबडतोब त्यांस फत्ते करितां आली नाहीं. त्याचे अगोदरच मोंगलांचा सरदार कासीमखान हा बंगळूरास येऊन पोंहोंचला. त्यानें त्याजवर एकदम हल्ला करून तें घेतलें व लागलीच तें ह्मैसूरचे राजास तीन लक्ष होनास — ज्या रकमेस व्यंकोजी राजे यांनीं ह्मैसूरकरांस तें शहर विकण्याचें कबूल होतें तीस—देऊन टाकलें. केसोपंताचा येणेंप्रमाणें बेत फसल्यामुळें त्यास बरेंच वाईट वाटलें. तो ह्मैसूरचे मुलुखांत शिरून त्यानें तेथें खंडणी वसूल करण्यास आरंभ केला; परंतु कोणता एकादा मुलूख काबीज करून, तेथें नेहमींचा आपला अंमल बसविण्याची त्यानें खटपट केली नाहीं; परंतु मोंगलांचे फौजेचा लवकरच फैलावा होत चाललासें पाहून, केसोपंत हा जिंजी येथें आपली फौज घेऊन माघारा आला. मधून मधून त्याचें व हरजी राजे महाडीक यांचें जुळे; परंतु एकंदरींत त्यांचीं मनें परस्परांविषयीं अगदीं कधीं निर्मळ न झाल्यामुळें, ते मधून मधून जरी कांहीं प्रांत जिंकीत, तरी त्यांस ते पुष्कळ वेळ स्वाधीन ठेवितां आले नाहींत, व पलीयार नदीचे दोन बाजूस पूर्वीपासून जे त्यांचे किल्ले होते, तेच त्यांस संभाळतां संभाळतां पंचाईत पडूं लागली ( १६८८ ).

२४. औरंगजेब बादशहा विजापुरास एक वर्षावर कांहीं काळ राहिला. त्याच्या फौजा दक्षिणेंत चोहोंकडे पसरून जिकडे तिकडे त्या देश काबीजच करीत चालल्या. संभाजी महाराजांचे फक्त मजबूत किल्ल्याशिवाय सर्व मुलूख मोंगलांचे हातीं लागला. त्यांतून टाटोरा व पन्हाळा

यांमधील किल्लेही बादशहाचे हातीं क्रमाक्रमानें आले ( १६८९ ). आतां सिंहगड, पुरंदर वगैरे विशेष मजबूत किल्ले कायते घेण्याचे राहिले, व तेही घेण्याची तयारी बादशहानें चालू केली. इतक्यांत बादशहाचे बडे छावणींत एकाएकीं वाखा उत्पन्न होऊन पुष्कळ लोक मरण पावले. यामुळें बादशहानें आपला मुक्काम विजापुराहून हालवून, नीरा नदीचे कांठीं अकलूज ह्मणून गांव आहे तेथें आणिला. या स्थलांतरानें वाखा कमी होऊन, बादशहाचे लढाईचें काम पुनः सुरू झालें.

येणेंप्रमाणें विजापूर व गोवळकोंडा या शाह्या नाश पावून व मराठ्यांचे राज्याचा बहुतेक मुलूख मोंगलांचे हातीं जाऊन, बादशहाची चोहोंकडे एकसारखी चढती चालू असतां, इकडे संभाजी महाराज दारू वगैरेचे व्यसनांत अगदीं निमग्न होऊन राहिले होते. आदिलशाही बुडविल्यावर मोंगलांच्या फौजा आपले राज्यावरच येऊन पडतील, असें महाराजांस त्याचे धुंदींत फारच थोडेवेळ ध्यानांत येत असेल! कधीं कधीं ते शुद्धीवर आले ह्मणजे, मागें पोर्तुगीज लोकांवर त्यांस कांहीं काळ जो जय आला होता, त्याचें त्यांस स्मरण होऊन, गोवें शहर घेण्याविषयीं त्यांच्या मसलती चालत; परंतु या कामांत त्यांस ह्मणण्यासारखें कधींही यश आलें नाहीं. अलीकडे महाराज सर्वकाळ पन्हाळा व विशाळगड यांचे दरम्यान किंवा संगमेश्वर येथें रहात असत. त्यांनीं राज्यकारभारांतून बहुतेक अगदीं मन काढून घेतलें असून, तो सर्व कलुषाकडे सोंपविला होता. कांहीं काम असो, 'कवजीकडे जा' असें त्यांनीं ह्मणावें. महाराज दुसरे कोणाचें कांहीं-एक ऐकतनासे झाले; कवजींनासुद्धां राज्याचें कामकाज पहाण्यापेक्षां, महाराजांची तऱ्हेवाईक तब्बेत संभाळतां संभाळतां पुरेपुरेसें होऊन जात असे. मराठीराज्यांत पुष्कळ जुने शहाणे मुत्सद्दी व शूर सरदार होते; परंतु त्यांचेविषयीं कवजीस अर्थात्च वैषम्य वाटत असल्या-मुळें, व महाराजांस त्यांचे गुणांची परीक्षा नसल्यामुळें, त्यांचा राज्यास कांहीं उपयोग होण्यासारखा नव्हता. त्यांस मराठी

राज्याची ही वाईट स्थिति पाहून अत्यंत दुःख होई; परंतु बिचारे करितात काय? काळावर नजर देऊन काय होईल तें पहात स्वस्थ होते. सुलतान अकबरसुद्धां, अशा स्थितीस कंटाळून जाऊन त्यास वाटलें कीं, 'विजापूर, गोवळकोंडा वगैरे राज्यें तर बुडून गेलीं. आतां हिंदुस्थानांत राहिलों असतां आपण बादशहाचे तावडींत खास सांपडूं;' तेव्हां संभाजी महाराजांची गोडीगुलाबीनें परवानगी घेऊन, तो राजापूराचे बंदरांत एका इंग्रजांच्या गलबतांत बसून इराणचे शहाचे आश्रयानें राहण्यास इसपाहान शहरास निघून गेला ( १६८८ ). या शहरीं तो अठरा वर्षें राहून १७०६ या वर्षी मरण पावला.

बादशहा आकलूज येथें येऊन पोहोंचल्यावर, त्यानें संभाजी महाराजांचे राज्यावर तीन निरनिराळ्या फौजा रवाना केल्या. उत्तरेस नाशिकाचे बाजूस मराठ्यांचे सैन्याचा बराच जमाव तो तेथें बराच धुंडावा करीत आहे असें ऐकून, त्यानें सुलतान अझिम याजबरोबर एक मोठी फौज देऊन, तिकडील मुलुखाचे बंदोबस्ताकरितां त्यास रवाना केलें. तसेंच बादशहाचा मुख्य वजीर असदखान याचा मुलगा यातिकदखान यास, कोंकणप्रांत जिंकून घेण्यास दुसरी एक मोठी फौज देऊन पाठविलें. त्याचप्रमाणें तकरीबखान ह्मणून माजी कुतुबशहाचे पदरीं कोणी हुषार सरदार होता, त्याजबरोबर बादशहानें तिसरी एक फौज देऊन, व त्यास कोल्हापूर प्रांताचा फौजदार नेमून तिकडे पाठवून दिलें. तकरीबखानानें आल्याबरोबर पन्हाळा किल्ल्याखालचा सर्व मुलूख जिंकून घेतला, व किल्ला घेण्याचे तयारीस लागला. त्यानें संभाजी महाराजांच्या फौजा, सरदार कोठें कोठें आहेत, व महाराज खुद्द कोठें व काय करीत असतात, या सर्व गोष्टींचा बारीक रीतीनें तल्लास लाविला असतां, त्यास बातमी समजली कीं, महाराज संगमेश्वर येथें पुष्कळ वेळ येऊन राहतात, व तेथें त्यांचा विशेष बंदोबस्तही नसतो. त्यावरून तकरीबखान याचे मनांत विचार आला कीं, संगमेश्वर येथें गुप्तपणें एकाएकीं जाऊन महाराजांस पकडलें, तर बादशहाचें एक मोठें काम केल्यासारखें होऊन, त्याबद्दल तो आपणांस मोठी शाबासकी देईल.

येणेंप्रमाणें विचार करून तकरीबखानानें, संभाजी महाराजांचे जाण्यायेण्याची पक्की बातमी ठेऊन व आपणाबरोबर तेथील घांटांची, डोंगरांतील वांकडे तिकडे व अवघड अशा रस्त्यांची ज्यांस चांगली माहिती आहे असे वाटाडे व निवडक पायदळ व घोडेस्वार असें घेऊन तो कोल्हापुराहून निघाला. त्याजबरोबर इकलासखान ह्मणून, त्याचा मोठा हुषार व हिंमतवान् असा मुलगा होता. तकरीबखान यानें फारसा बोभाटा होऊं न देतां, विशाळगडाचे घांटानें उतरून आपण महाराजांकडे वकीलीस जात आहों असा बहाणा करून, एकदम संगमेश्वरावर दौड केली. मोंगलांचे लोक लबाडी करून गढीशीं येऊन ठेपले ह्मणून, जासुदांनीं घाबऱ्या घाबऱ्या धांवत येऊन महाराजांस बातमी कळविली; परंतु महाराज दारूचे अंमलांत असल्यामुळें, ते उलटें त्यांचेच अंगावर धांवत जाऊन दटावून त्यांस ह्मणाले, "गाढव लुच्चे भलत्याच खोट्या बातम्या आणतात. मोंगल येथें कोठून येतील? पुनः असें बोलाल तर तुमचीं नाकेंच कापीन." इतक्यांत तकरीबखान व त्याचे लोक गढीशीं येऊन पोंहोंचले. ते आलेसे पाहून घाईघाईनें गढीचे लोक दरवाजे लावूं लागले; परंतु इकलासखान यानें थोडेसे लोक बरोबर घेऊन पुढें चाल करून येऊन दरवाजांत घुसला व तो बंद करणारे लोकांस ठार मारून आपली सर्व फौज गढींत घेतली. मोंगल गढींत शिरलेसे पाहून संभाजी महाराजांचे बहुतेक लोक पळून गेले. कलुषा व आणखी थोडे लोक शत्रूंशीं लढले; परंतु कलुषास बाण लागून तो जखमी झाल्यामुळें, त्याचे लोकांचा लवकरच पाडाव झाला. संभाजी महाराजांनीं कांहींसें वेषांतर केलें होतें; परंतु त्यांचे अंगावर कांहीं अलंकार अजून तसेच राहून गेले होते, त्यांजवरून मोंगलांनीं त्यांस ओळखून पकडलें. महाराजांचे बरोबर त्यांचा मुख्य प्रधान कलुषा व आणखी चोवीस लोक पकडले गेले. ( १६८९ ).

तकरीबखान यानें संभाजी महाराज व त्यांचे लोक यांस कैद करून कोल्हापुरास आणिलें. तेथून त्यानें बादशहास आपली मोहीम फत्ते

झाल्याची बातमी कळविली, व आतां पुढें काय हुकूम आहे ह्मणून विचारिलें. यावेळीं बादशहाची छावणी आकलूज येथून उठून इंद्रायणी नदीचे संगमाजवळ तुळापूर या जागीं चालली होती ; ह्मणून संभाजी महाराजांस मोठे बंदोबस्तानें तुळापूर मुक्कामींच घेऊन यावें ह्मणून बादशहानें लिहून पाठविलें. त्याप्रमाणें तकरीबखान हा संभाजी महाराजांस घेऊन चालला असतां, त्यांस शत्रूचे हातून सोड-विण्यास कोणीही मराठे सरदारांनीं वगैरे यत्न केला नाहीं. महाराजांचें दुर्वर्तन व कलुषाचा बेअकली राज्यकारभार यांमुळें महाराजांविषयीं एकंदर लोकांचीं मनें अगदीं विटून गेलीं होतीं. शिवाय कोणी एकादे सरदारानें पुढें होऊन महाराजांस सोडविण्याचें धाडस केलें असतें, तरी फौजेची अशी अव्यवस्थित व बेकैद स्थिति होऊन गेली होती कीं, त्यास त्या कृत्यांत यश येण्याचा फारच थोडा संभव होता.

तुळापूर येथें येऊन पोहोंचतांच, संभाजी महाराज व त्यांचे लोक यांस उघडे बोडके करून, त्यांच्या मुसक्या बांधून, त्यांस उंच असे उंटांवर बसवून, पुढें तासेमरफे, तुताऱ्या वगैरे कर्कश अशीं वाद्यें मोठमोठ्यानें वाजवीत असे, त्यांस बादशहाचे बडे छावणीकडे चालविलें. तेथें सभोंवतालीं लाखों मनुष्यें तो तमाशा पाहण्याकरितां गोळा होऊन, त्यांचा प्रचंड थवा बिचारे महाराजांभोंवतालून चालला होता. शेवटीं छावणींत बादशहापुढें महाराजांस नेऊन गुदरल्यावर, बादशहानें त्यांस तूर्त कैदेंत ठेवण्यास हुकूम केला. यानंतर बादशहानें संभाजी महाराजांचेसंबंधानें काय व्यवस्था करावी ह्मणून आपले मुख्य मुख्य उमरावांचा सल्ला घेतला. त्यांचें ह्मणणें पडलें कीं, "संभाजी महाराजांस ठार मारूं नये, त्यांस जिवंतच ठेवावें ; कारण त्यांचे सरदारांचे हातीं जे कित्येक मजबूत किल्ले आहेत, ते त्यांचेपासून लढाई करून घेण्यास फार श्रम लागतील व फौजेची विनाकारण खराबी करावी लागेल. तेव्हां महाराजांचे लालचीनें ते हळू हळू आपले स्वाधीन होण्याचा संभव आहे". उमरावांचा हा सल्ला बादशहास मान्य झाला; परंतु त्याचे मनांत धर्मवेड भरलें असल्यामुळें,

संभाजी महाराजांस बाटवून मुसलमान करावें, ह्मणजे आपलें सर्व काम झालें असें त्यास वाटलें ; परंतु इकडे संभाजी महाराजांस झालेली अप्रतिष्ठा न साहून, अशा स्थितींत जिवंत राहण्यापेक्षां मरण येईल तर बरें असें त्यांस वाटूं लागलें. बादशहाचे छावणीकडे त्यांस चालविलें असतां, शत्रूंचे शिपायांस उघड मोठमोठ्यांनीं ते शिव्या देऊं लागले ; मनांत हेतु कीं, अशानें तरी कोणी शिपाई चिडून आपणांस ठार करील. त्यांचे मनाची अशी स्थिति होऊन गेली असतां, त्यांस बादशहाकडून निरोप आला कीं, " तुह्मीं जर मुसलमान व्हाल, तर आह्मीं तुह्मांस जीवदान देऊं ". महाराज अगोदरच जिवावर उदार झाले होते त्यांस हा निरोप पावतांच त्यांनीं संतापून ह्मटलें, " बादशहास जाऊन कळवा कीं, आह्मीं मुसलमान होतों ; परंतु तुह्मीं आपली बेटी आह्मांस दिली पाहिजे ". शेवटीं बादशहाची निंदा करून व महंमद पैगंबरावरही एक शिवी हासडून बादशहाचा निरोप आणणारे लोकांस महाराजांनीं परत लावून दिलें.

महाराजांचें अशाप्रकारचें दांडगेपणाचें व निर्भत्सनापर उत्तर ऐकून, बादशहास अत्यंत राग आला, हें सांगणें नकोच. महाराजांस जीवदान देऊन त्यांचेकडे असलेले किल्ले युक्तीयुक्तीनें काबीज करण्याचा जो शहाणपणाचा विचार त्यानें यापूर्वीं केला होता, तो रागाचे आवेशांत तो अगदीं विसरून गेला. त्यानें लागलींच लोखंडाची सळई तापवून लाल करून, संभाजी महाराजांचे डोळे काढण्यास व त्यांची जीभ कापून टाकून त्यांचा शिरच्छेद करण्यास हुकूम दिला. त्यावरून छावणीचे बाजारांत भोंवतालीं हजारों लोक तो तमाशा पाहण्यास गोळा झाले आहेत, अशा ठिकाणीं संभाजी महाराज व कलुषा यांचा बादशहाचे हुकुमावरून हाल हाल करून वध झाला (आगष्ट १६८९).

२६. येणेंप्रमाणें संभाजीराजे यांणीं आपले वडिलांचे वेळचे जुने हुषार प्रधानमंडळास कामावरून काढून टाकून, त्यांचे जागीं बेवाकबगार व मूर्ख अशा कनोज ब्राह्मणाची योजना करून, व आपण स्वतः दुर्व्यसनांत निमग्न राहून, आपला व आपले राज्याचा अवघे नऊ वर्षांतच नाश

करून घेतला. महाराजांचे अंगचे गुणावगुणांविषयीं येथें निराळें लिहिण्याची आतां विशेष जरूर राहिली आहे असें नाहीं. वर दिलेले त्यांचे हकीकतीवरून ते साधारण समजण्यासारखे आहेतच. संभाजी महाराज त्यांचे वडिलांप्रमाणें बरेच शूर व धाडसी होते यांत संशय नाहीं; परंतु शिवाजी महाराजांप्रमाणें त्यांचे अंगीं तारतम्य मुळींच नसे. पोर्तुगीज लोक, मोंगल लोक यांच्याबरोबर त्यांनीं ज्या लढाया केल्या, त्यांत त्यांनीं कित्येकवेळां चांगली तलवार मारली व साधारणत: त्यांस लढाईचे कामांत यशच आलेलें आढळून येईल; परंतु जय मिळाला असतां, त्याजपासून फायदा करून घेण्याची अक्कल संभाजी महाराजांस नसल्यामुळें, त्यांचे लढायांपासून खजिन्यांत भर न पडतां, त्यांस नेहमीं तूटच लागत गेली. त्यांस शिवाजी महाराजांप्रमाणें राज्यकारभाराचा आवांका मुळींच नसून, शहाणे कारभारी तरी ठेऊन त्यांचे मसलतीनें चालण्याचेंही त्यांस शहाणपण नव्हतें. शिवाय बदफैलीपणा, अविचार, क्रूरपणा वगैरे दुर्गुण महाराजांचे अंगीं परिपूर्ण असल्यामुळें, त्यांचे राज्यापासून प्रजेस सुख होऊन त्यांची भरभराट होण्याचा संभव मुळींच नसून, उलट ते आणखी कांहीं वर्षे वांचते, तर त्यांचे हातून पुष्कळ मूर्खपणाचीं व दुष्टपणाचींच कृत्यें घडलीं असतीं यांत संशय नाहीं. संभाजी महाराजांवरून त्यांचे दुर्गुणांमुळें प्रजेचीं मनें अलीकडे अलीकडे अगदीं उडून गेलीं होतीं; परंतु बादशहानें साधारण दहशत पाडण्याकरितां महाराजांस जें घोर शासन केलें, त्यामुळें मराठे लोकांत दहशत पडण्याचें राहून, उलटें महाराजांविषयीं त्यांचे मनांत कांहींसा द्रव उत्पन्न झाला व शिवाजी महाराजांचे पुत्राचा अशा दुष्टरीतीनें वध करणारे क्रूर, उद्दाम, हिंदुधर्म बुडवूं पाहणारे बादशहाचा सूड उगविण्याची सर्व मराठे लोकांत एकाएकीं मोठी ईर्षा उत्पन्न झाली!

# भाग १२.

## राजाराम महाराज.

१. राजारामसाहेब रायगडावर नजरकैदेंत होते. येसूबाई व शिवाजी हेही तेथेंच होते. संभाजी महाराजांच्या वधाचा परिणाम. जुने सरदार व प्रधान यांच्या मसलती. येसूबाईसाहेब व शिवाजी महाराज रायगडीं राहतात. २. तेथें यातिकदखानाचा हल्ला. सूर्याजी पिसाळ याच्या फितुरीनें रायगड किल्ला व खासा स्वाऱ्या मोंगलांच्या स्वाधीन झाल्या. यातिकदखान याचा बादशहाचे हातून बहुमान. शिवाजी महाराजांस पाहून औरंगजेब खूष होतो. त्याचे उद्गार. पादशहाजादीनें त्या मातापुत्रांचें स्वागत केलें, व त्यांची सर्व व्यवस्था लाविली. ३. राजारामसाहेब रायगडाहून प्रतापगड व तेथून पन्हाळा, विशाळगड वगैरे किल्ले हिंडत मुसलमानांस घुलकावणी दाखवीत होते; पण फार दिवस अशानें निभाव लागत नाहीं असें वाटून, किल्ल्याची मागें व्यवस्था ठरवून जंगम यात्रेकरूंच्या वेषानें जिंजीकडे जाण्यास निघाले. ४. मराठी राज्याची निराशेची स्थिति. मराठी राज्याच्या व मुसलमानी बादशाहीच्या अनुकूल प्रतिकूल गोष्टी. मराठी राज्याचा जोम. मोंगली अंमलाचा जुनाटपणा. बहुतकालच्या ऐश्वर्यापासून घडलेले अनिष्ट परिणाम. औरंगजेब बादशहाचे गुणदोष. घोरकृत्यें करविणारी राज्य-तृष्णा. प्रजेस नाराज करणारें धर्मवेड. आग्रही व संशयखोरपणामुळें अंमलदार मंडळींत स्वतंत्रपणानें कोणी अभिप्राय देण्यास धजत नसे. बादशहाचा सर्वांवर अविश्वास. कामगिरीवर परस्परविरुद्ध अशा दोन तीन लोकांस नेमण्याच्या रीतीपासून नुकसान. फौजेंतील ढिलाई व अव्यवस्था. डामडौल व थाटमाटच फार. लबाडी व भ्रष्टपणा. एका फ्रेंच गृहस्थाचा अभिप्राय. ५. औरंगजेब बादशहाचे लक्षांत या गोष्टी येत नाहींत. तो आपले बहुत दिवसांचे हेतु सिद्धीस गेले असें मानी. बादशाही मुलुखांची व्यवस्था. विजापूर व गोवळकोंडे हे दोन अधिक सुभे. फौजदार व दिवाण. दोघांचीं कामें. नवीन प्रजा खूष करणेची खटपट. आदिलशाही व कुतबशाहींतील फौज हांकून लावल्यामुळें मराठ्यांस मिळाली. बादशहाची दक्षिणप्रांताची व्यवस्था, ब्रेभरंवशाची व धर्मवेडाची

असल्यानें मोठा घोटाळा. वतनी तंटे अतोनात होऊन, पराभव पावलेले लोक लुटारू लोकांस मिळत असत, व उदरनिर्वाहार्थ बेकायदेशीर वागतों असें उघड ह्मणत. मयत अंमलदाराचे जागीं त्याचे नातेवाईकांस आपणास तें काम करून घेण्याचे कामीं होणारा खर्च. कामगार लोकांच्या भ्रष्टतेमुळें सत्याचा जय होण्यास येणारीं विघ्नें. ६. राजाराम साहेबांस पकडण्याबद्दल कासीमखान यास बादशहाचा हुकूम. खंडो बल्लाळ यांची हुषारी. त्यांची मसलत. राजाराम साहेब व प्रल्हाद निराजी फुटून फुटून जातात. मागें राहिलेल्या मंडळीवर आलेला प्रसंग. त्यांचा निर्धार व सुटका. सर्व जिंजीस पोहोंचतात. जिंजी येथील अधिकाऱ्यांची कृतज्ञता. त्यांचा बंदोबस्त. जिंजी येथें आणखी मराठे लोकांचें गुप्तपणें येणें. मंत्रिमंडळाचा धूर्तपणा व राजनिष्ठपणा. त्यांत प्रल्हाद निराजी यानें सर्व मानकरी लोकांस एकत्र केलें. राजाराम साहेबांचा मंचकारोहणविधि. अष्ट प्रधानांच्या नेमणुका. रामचंद्रपंत बावडेकर यांची महाराष्ट्रांत स्वतंत्र नेमणूक. पंतप्रतिनिधि ही नवीन जागा करून ती प्रल्हाद निराजी यास दिली. राजाराम महाराजांच्या अधिकाराची द्वाही. इनामें, जहागिरी वगैरे. तसें करण्यापासून फायदा. संभाजीचे वेळीं फौज बेकैद होती व लुटारूपणा वाढला होता. त्यापासूनच होणारा चांगला परिणाम. मराठे लोकांच्या मनांतील अभिमान व मुसलमानांबद्दल तिटकारा. ८. औरंगजेबास जिंजी येथील सर्व खटपटीची माहिती लागते. झुल्फिकारखान याची राजाराम महाराजांस पकडण्यासाठीं नेमणूक. महाराष्ट्रांत वचक बसावा ह्मणून राजाराम महाराज यांनीं संताजी घोरपडे व धनाजी जाधव यांस पाठवून दिलें. संताजीचा मानमरातब व पदवी. धनाजीचाही तसाच गौरव. झुल्फिकारखान जिंजीस येऊन ठेपतो; पण किल्ला अवाढव्य ह्मणून, हातीं तेवढ्या फौजेवर वेढा देण्यास धजत नाहीं. बादशहाकडे कुमक मागतो. मध्यंतरीं दुसरीकडे स्वाऱ्या करतो. बादशहाजवळ कुमक पाठविणेस फौज नाहीं. चाहोंकडे लुटारू लोकांचा बंदोबस्त करण्यास फौज गुंतली. विजापूर व गोंवळकोंडें येथून मोकळे झालेल्या लोकांनीं उत्तरेंत व रामोशांनीं दक्षिणेंत दंगा माजविला. महाराष्ट्रांत त्याहून भयंकर. रामचंद्रपंत बावडेवर व परशराम त्र्यंबक यांणीं बादशहाचे फौजेस बेजार केलें. संताजीचा वाई येथील मोंगल फौजदारावर छापा व त्यांत आलेलें यश. त्यापासून इतर मराठे लोकांवर परिणाम. पवार, थोरात वगैरेंची मोंगलांपासून चौथ सरदेशमुखी मिळतेशी पाहून, घासदाणा ह्मणून हक्क सांगण्यास सुरवात. या सरदारांचें महाराजांकडून अभिनंदन. त्यांस पदव्या दिल्या. शंकराजी नारायण यानें राजगड व परशराम त्र्यंबक यानें पन्हाळा असे किल्ले घेतले संताजी-

ची मिरज येथील मोहीम. त्याचें बक्षीस. संताजी व धनाजी मिळून गोदातीरा-वरील मोंगल फौजांवर चालून जातात, व त्यांचे उत्तर हिंदुस्थानांतील आलेले तांडे अडवितात. ९. अशा चोहोंकडून झालेल्या कैचींत, औरंगजेबाची तारंबळ. त्याची जिंजीवर एकवटून हल्ला करण्याची मसलत. आसदखानाचा जिंजीस वेढा. सुलतान खामबक्ष यास जिंजीच्या वेढ्यावर मुख्य नेमिलें; पण त्यास झुल्फिकारखान याच्या तंत्रानें वागण्यास सांगितलें. यामुळें दोघेही नाखूष झाले व परस्परांत चुरस पडून वेढ्याचें काम दिरंगाईनें होऊं लागलें. त्यापासून मराठी मंत्रिमंडळानें दोघांशीं वेगळें वेगळें फितुरीचें बोलणें लाविलें. खान अधिक वळला. झुल्फिकारखानाची महत्वाकांक्षा. त्याचा दक्षिणेंत स्वतंत्र राज्य स्थापण्याचा विचार. मराठ्यांशीं त्याच्या गुप्त मसलती व फितूरीचे बेत. इकडे बादशहास आपण उत्तम व्यवस्था लावून फौज धाडली आहे, काम फत्ते होणार अशी खात्री. तो आपला मुक्काम जिंजीच्या रोखानें बदलून गलगला येथें करतो. तसें करण्यांत त्याचा हेतु, संताजी घोरपडे उत्तर मुलूख लुटणें सोडून जिंजीकडे येतील; पण त्यास आयकच फावलें. अधिकच धुमाकूळ मांडली. बादशहानें आपली छावणी भीमेचे कांठीं ब्रह्मपुरी येथें केली. बादशहाची चोहोकडून फजिती. कोणताच बेत सिद्धीस जाईना. संताजी घोरपडे यांनीं आपलें उत्तरेंतील धुमश्चक्रीचें काम परसाजी भोसले व हैबतराव निंबाळकर याजवर सोंपवून, जिंजीकडे कूच केलें. मार्गांत बहुत अटकाव झाला; पण कधीं शत्रूस तोंड देऊन, कधीं चुकवून त्यांणीं आपली वाट काढली. शेवटीं धनाजीस संताजीनें आपली मोठी फौज देऊन जिंजीस पाठविलें. हें कळतांच मोंगल एकत्र होऊं लागले; पण त्यांच्यामध्यें शिस्त नसल्याकारणानें, आंतून व बाहेरून मार मिळाल्यानें त्यांची मोठी कत्तल झाली. संताजीही पाठोपाठ आला. वाटेंत कोवरीपाक येथें अलीमर्दीखानाचा त्यानें पराभव केला. शत्रूस दाणावैरण पोहोंचूं दिली नाहीं. आंत बाहेर बाद-शहाचे फौजेचें दळणवळण बंद केलें. बादशहा मेल्याची बातमी उठली. तिचा मोंगलावर परिणाम. खामबक्ष यास, दिल्लीचे गादीवर तुला बसवितों असें मराठे सरदारांनीं बोलणें लावलें. तो कबूल झाला न झाला; पण त्यावर हा आरोप ठेऊन, झुल्फिकारखान व आसदखान हे त्यास नजरकैद करितात. त्यामुळें मोंगलांच्या सैन्यांत दंगा होतो, तशांत मराठे हल्ला करून खूप नाश करितात. मोंगलाचे लोक लढतनासे होऊन एकत्र गोळा होऊन राहिले. मराठे लोकांनीं अर्थात्च त्यास कोंडून टाकिलें. तहाचें बोलणें. बादशहास ही बातमी कळतांच त्यानें आसदखान व खामबक्ष यांनीं परत यावें, व झुल्फिकारखान यानें लढाई चाल-वावी असा हुकूम केला. बादशहानें आपली छावणी विजापूरास नेली. झुल्फिकार-

खानाकडे सर्व अधिकार आला तरी तो फितूर होता, ह्मणून वेढ्याचे कामास लगट करीना. मराठे लोकांनीं मोंगलाचा दाणागोटा अडविण्याची खटपट केली. ह्मणून झुल्फिकारखान, मराठ्यांनीं तह मोडला असें सोंग करून दक्षिणेंत सैन्यासह जाऊन, मराठ्यांनीं घेतलेले किल्ले परत घेतो. त्रिचनापल्ली व तंजावर यांस वश करून पुन्हां जिंजीस येतो. पण जिंजीचा वेढा ढिलाईनेंच सुरू केला. झुल्फिकारखानाचे हातांत मोठी फौज होती, तिचा झपाट्यानें उपयोग न करण्यांत हेतु. औरंगजेबाचे ह्यासंबंधांत उद्गार. औरंगजेबाची आशा संपली नाहीं. त्यास झुल्फिकारखान वगैरे सरदार फसवित होते. झुल्फिकारखान तंजावराकडे गेला, तेव्हां संताजीनें विजापूराकडील मुलूख उजाड केला. औरंगजेबानें त्याजवर लोक पाठविले, ते मिजासी व बेकैद ह्मणून संताजीचाच जय झाला. मराठे लोकांचे विरुद्ध लढाई देण्यास समर्थ व वजनदार असा मोंगलांत सरदार नव्हता. दोधारींचे गडींस मोंगल सैन्य लागलें, तेव्हां त्याची फजिती. अन्नसामुग्री संपली. हुरूप बिलकूल नाहीं. बादशहास ही बातमी कळतांच त्याणें कुमक पाठविली. याही फौजेस गांठून संताजीनें तिचा मोड केला. मग दोधारी येथील लोक शरण आले. खंडणी घेऊन सुटका केली. बादशहानें त्यांची केलेली अप्रतिष्ठा. हिंमतखान याचा मराठे लोक मोठ्या युक्तीनें पराजय करितात. संताजी व झुल्फिकारखान यांच्या झटापटी. त्या केवळ वरपंगी होत्या. दाऊदखान मात्र फितला नसल्यामुळें, मराठ्यांवर तुटून पडे. संताजीविषयीं राजाराम महाराजांचे मनांत संशय. संताजी व धनाजी यांचें वैमनस्य. प्रल्हाद निराजी सर्वांत ऐक्य राखी. त्याचे मरणापासून नुकसान. संताजीच्या कैदखोर वर्तनामुळें सरदार लोकांची नाखुषी. बादशहाची या भांडणांत भर. आपसांत फूट पडल्यानें मराठ्यांचे सैन्यास आलेली दुर्बलता. झुल्फिकारखान यास त्याचे मित्रांकडून आलेला निरोप. खान राजाराम महाराजांस, निकरानें लढून जिंजी घेण्याचा आपला निश्चय कळवितो. खानाचा निरोप पोहोंचल्यावर, अष्टप्रधान मंडळी जमवून गुप्तपणें महाराष्ट्रांत जाण्याचा निश्चय करितात. खंडो बल्लाळ यांणीं शिर्के व मोहिते यांस, त्यांणीं मागितलेलीं वचनें देऊन सामील करून घेतलें. रामचंद्रपंत हुकमतपन्हा यांस आगाऊ कळविलें. राजाराम महाराज विशाळगड येथें दाखल झाले. हरजीराजे महाडीक याच्या ताब्यांत जिंजी किल्ला दिला. झुल्फिकारखानाबरोबर तहाचें बोलणें. खानाच्या उगीच लपंडावा दटावण्या. [illegible] लढण्याचा प्रसंग येऊन खानानें किल्ला सर केला. आंतील लोकांस [illegible] शिक्षा. महाराजांच्या स्त्रियांची शिर्के व मोहिते यांणीं सुटका केली व

विशाळगडास पोहोंचविल्या. धनाजीनें संताजीविरुद्ध तट बनवून त्याचा पाडाव केला. धनाजी, झुल्फिकारखान वेलोर घेत होता तिकडे गेला. धनाजीच्या टोळ्यांनीं संताजीचा केलेला पाठलाग. संताजी तळ्यांत स्नान करीत असतांना क्रूर व दुष्ट अशा माणसाकडून झालेला त्याचा खून. रामचंद्रपंतास अमात्याची जागा दिली. इतर नेमणुका. संताजीची जागा धनाजीस दिली. तुकोजी रघुनाथास प्रांतानिधिपद दिलें. आंग्रे यांस आरमारावर नेमिलें. आरमाराचीं ठाणीं. १०. धनाजी व झुल्फिकारखान यांचें युद्ध. त्यांत धनाजीचा वारंवार मोड होत होता. बादशहास संतोष; परंतु उत्तरेस मराठ्यांची सरशी. राजाराम महाराज यांस बहुतेक मराठे सरदार आपल्या फौजेसह येऊन मिळाल्यामुळें, त्यांच्याजवळ बहुत जमात झाली. ते गंगथडी प्रांतांत जाऊन हक्क मिळवूं लागले. पद्धतवार वर्तन. पाटलापासून वसूलचिठ्या. निरनिराळ्या प्रांतांत वसूलाच्या कामावर निरनिराळ्या सरदारांच्या नेमणुका करून राजाराम महाराज दक्षिणेस परत आले. औरंगजेब बादशहास हें कळल्यावर त्याचे विचार. सरदार लोकांबरोबर मसलती. दोन टोळ्या करण्याचा बेत. एकीवर सुलतान अझीम व झुल्फिकारखान, आणि दुसरीवर स्वत: बादशहा अशी व्यवस्था करून, एकीनें मराठी सैन्यास तोंड द्यावें, व दुसरीनें त्यांचे किल्ले घ्यावे असें ठरलें. बादशहाची तरतरी, त्यांचे सुस्त अंमलदारांस पसंत नव्हती. बादशहानें वसंतगड घेतला. त्यास बादशहानें नवीन नांव दिलें. बादशहा पन्हाळ्यास न जातां साताऱ्यास गेला. पन्हाळ्यावर मराठे बंदोबस्त करून राहिले होते. साताऱ्यास मराठ्यांची तयारी नव्हती. प्रयागजी परभू याचा पराक्रम व परशुराम त्र्यंबक याचें अझीमशहाबरोबर संधान. याच्या योगानें बराच टिकाव धरला. शिरजेखानानें मंगलाईचे बुरुजाखालून सुरुंग दडून उडविला व मराठे सावध नसतांना माची हदरून लोकांचे अंगावर बुरुज पडल्यानें लोक ठार झाले. प्रयागजीचा प्राण मोठ्या चमत्कारिक रीतीनें वांचला. दुसऱ्या सुरुंगापासून मोंगलाचेच २००० लोक मेले. ११. मोंगलाची दुसरी टोळी, जालना येथें मराठ्यांचे लोक लुटींत गुंतले असतां, त्याजवर पडते. मराठ्यांची धांदल उडाली; पण राजाराम महाराजांनीं व्यवस्थेनें आपल्या प्रांतांत आपली फौज आणली. सिंहगड येथें राजाराम महाराज यांचा मृत्यु. त्यांचें सरदार लोकांस शेवटचें भाषण. राजाराम महाराज यांचे स्वभाववर्णन. त्यांच्या स्त्रिया व संतति. तिसरी बायको सती गेली.

१. संभाजी महाराजांचे सापत्न व धाकटे बंधू राजारामसाहेब, हे मागें सांगितल्याप्रमाणें संभाजी महाराज गादीवर बसल्यापासून रायगडावर नजरकैदेंत होते. हे साहेब स्वभावानें शांत, विचारी व मनमिळाऊ असल्यामुळें, संभाजी महाराजांनीं त्यांस नजरकैदेपेक्षां जास्त अटक ठेविली. त्यांची पहिली बायको प्रतापराव गुजर यांची कन्या ही मरण पावल्यावर, संभाजी महाराजांनीं त्यांचीं दोन लग्नें करून दिलीं. या दोन बायकांपैकीं एक ताराबाईसाहेब ह्या मोहित्यांचे घराण्यापैकीं असून, दुसऱ्या राजसबाईसाहेब ह्या कागलचे घाटग्यांचे घराण्यांतील होत्या. संभाजी महाराजांनीं रायगड किल्ला बहुतेक आपले धाकटे बंधूचेच ताब्यांत दिलेला होता. तेथेंच पुष्कळ वेळ संभाजी महाराजांची बायको येसूबाईसाहेब व त्यांचा लहान मुलगा—शिवाजी महाराज—हीं येऊन राहत असत. येसूबाईसाहेब ह्याही मोठ्या समजूतदार व दिलदार असल्यामुळें, त्यांचें व राजारामसाहेब यांचें चांगलें सूत असे. ह्या बाईच्या समंजसपणाच्या व शहाणपणाच्या गोष्टी आपल्या पाहण्यांत आल्या आहेतच. हिच्या उपदेशाप्रमाणें संभाजी महाराज वागले असते, तर वीरसिंह शिवाजी महाराजांच्या पुत्रांवर, यवनांनीं नाहीं नाहीं ते हाल करून ठार मारावें व तो तमाशा हजारों लोकांनीं पहावा, असा लज्जास्पद प्रसंग आला नसता. संभाजी महाराजांनीं बाळाजी आवजीसारख्या हुषार, अनुभविक व स्वामिभक्त जुन्या नोकरांस हत्तीचे पायीं बांधून मारिलें, त्यावेळीं या बाईनें आपल्या पतीची चांगलीच कानउघाडणी केली. संभाजी सर्वथा व्यसनांध झाला, व याच्या हातून शिवाजी महाराजांनीं इतक्या कष्टानें उभारलेली स्वराज्यरूपी इमारत ढासळून पडणार, अशी बालंबाल खात्री झाली तेव्हां, येसूबाई—राणीसाहेबांनीं आपले बंधु शिरके यांशीं कारस्थान सुरू केलें होतें; पण संभाजीचें मरणमूळच कीं काय कोण जाणें! सर्व कांहीं उलट झालें. ज्यानें श्रीसमर्थ रामदासस्वामींच्या उपदेशमुक्ताफळाचा अव्हेर केला, त्यास आपल्या स्वतःच्या बायकोनें

सांगितलेल्या हितगोष्टींची पर्वा काय? असो; पण जिच्या शहाण-पणाचा उपयोग संभाजी महाराज जिवंत असतांना झाला नाहीं, तिचा समंजसपणा त्यांच्या वधानंतर महाराष्ट्र मंडळास फार उपयोगी पडला. राजारामसाहेब व मराठे सरदार मंडळी ज्या मसलती करतील, त्यांच्या विरुद्ध येसूबाई न गेल्यामुळें, मराठ्यांच्या या वेळच्या अलौकिक परा-क्रमास मोठी मदत झाली.

संभाजी महाराज हे, एकाएकीं मोंगलांचे हातीं लागून त्यांचा तुळा-पूर येथें मोठ्या भयंकर रीतीनें वध झाला ही बातमी पसरतांच सर्व महा-राष्ट्रदेशभर हाहाकार होऊन गेला! रायगडावर तर ही खबर येतांच चोहोंकडे मोठा हाहाकार होऊन, यापुढें मोंगलांचे हातून आपला बचाव कसा होतो, ही काळजी सर्वांस उत्पन्न झाली. असें झालें तरी लवकरच सर्व महाराष्ट्रवीरचमूमध्यें एकाएकीं दुःखाचा भाग नाहींसा होऊन, यवनांच्या अघोर कृत्याबद्दल क्रोधाचाच प्रादुर्भाव झाला. प्रतापशाली शिवाजी महाराजांच्या तालमींत तयार झालेले व त्यांच्या उदाहरणानें धर्माभिमान व देशाभिमान यांपुढें स्वतःचें जीवित कवडीमोल मानण्याची संवय झालेलें असें सरदारमंडळ एकत्र होऊन, यवनांचा सूड कसा घ्यावा याचाच विचार करूं लागलें. संभाजी महाराजांच्या सर्व दुर्गुणांचा एका क्षणांत विसर पडला. त्यांनीं आप-णांस जुमानिलें नाहीं. आपल्यापैकीं कित्येकांचा धडधडीत अपमान केला, कित्येकांचा तर हाल हाल करून वध केला व सर्वांस त्यांची कारकीर्द ह्मणजे मोठे संकटाचे दिवस असें झालें होतें; पण औरंगजेब बादशहाच्या क्रूरकर्मांमुळें, ह्या सर्व गोष्टी त्यांच्या मनांतून चट नाहींशा झाल्या. संभाजी महाराजांचा वध ह्मणजे मराठ्यांच्या गादीची विटंबना. संभाजी महाराज ह्मणजे शिवाजी महाराज यांचे पुत्र. एवढ्याच गोष्टी त्यांच्यापुढें उभ्या राहून, त्या घोर पातकाबद्दल मोंग-लास कडक प्रायश्चित्त भोगावयास लावून, शत्रूंच्या हातून महाराष्ट्र सोडवावें, एवढाच हेतु सर्वांनीं एक दिलानें पुढें ठेविला. आणि निरनिराळ्या

ठिकाणीं राहत होते तेथून त्या सरदारांनीं तडक रायगडचा मार्ग सुधारला. अशा रीतीनें चोहोंकडून जनार्दनपंत हनुवंते, प्रल्हाद निराजी (माजी न्यायाधीश यांचे पुत्र), रामचंद्रपंत बावडेकर, खंडो बल्लाळ चिटणीस, महादाजी नाईक पानसंबळ, संताजी घोरपडे, धनाजी जाधव, खंडेराव दाभाडे वगैरे जुने कारभारी व सरदार हे रायगडास येऊन दाखल झाले. तेथें येसूबाई साहेबांचा विचार घेऊन त्यांनीं असें ठरविलें कीं, "तूर्त शिवाजी महाराज हे अगदीं लहान आहेत व मराठी राज्यावर तर चोहोंकडून मोंगलांची धाड येऊन पडली आहे, तेव्हां राजारामसाहेब यांस प्रतिनिधि नेमून त्यांजकडे सर्व राज्यकारभार सोंपवावा; मग पुढें जसजसें कमीजास्त घडून येईल त्याप्रमाणें निराळी व्यवस्था करावी. शिवाजी महाराज, येसूबाईसाहेब व राजारामसाहेब या सर्वांनीं एकेच किल्ल्यांत राहिलें असतां, मोंगलांच्या फौजा तिकडेसच चालून येऊन सर्वच राजघराणें शत्रूचे हातीं लागण्याची भीति आहे; तेव्हां येसूबाईसाहेब यांनीं शिवाजी महाराजांसह रायगडावरच रहावें, कारण किल्ला चांगला मजबूत असून त्याचा बंदोबस्तही चांगला आहे; व राजारामसाहेबांनीं रायगडापासून विशाळगडापर्यंत असलेल्या किल्ल्यांवर जाऊन त्यांचा बंदोबस्त करून व आपला मुक्काम वरचेवर हालवून, शत्रूंस घुलकावीत जावें; व कदाचित् महाराष्ट्रदेशांत आपला निभाव लागत नाहीं असें त्यांस वाटल्यास, त्यांनीं जिंजीकडे जाऊन तोच मुलूख संभाळून रहावें."

२. येणेप्रमाणें राजारामसाहेब व इतर मराठे सरदार यांचे विचार ठरून, ते येसूबाईसाहेब व शिवाजी महाराज यांस रायगडावर चांगले बंदोबस्तानें ठेऊन, स्वतः जसजसा प्रसंग पडेल तसतसे इतर किल्लेकोटांचा व मुलुखांचा बंदोबस्त करण्याकरितां बाहेर पडले. इकडे बादशहानें आपला मुख्य वजीर असदखान याचा मुलगा यातिकदखान यास, कोंकणप्रांत काबीज करण्याकरितां पाठविलें ह्मणून मागील भागांत सांगितलेंच आहे. त्याप्रमाणें यातिकदखान हा आपले मोहिमेवर निघाला; परंतु इतक्यांत पावसाळा सुरू झाल्यामुळें तो कोंकणांत शिरला नाहीं;

तथापि तो संपतांच त्यानें त्या प्रांतांत जाऊन प्रथम रायगडासच वेढा दिला. जंजिऱ्याचे हबशानें मोंगलांचे फौजेस अर्थात् पुष्कळ मदत केली; परंतु किल्ला चांगला मजबूत असल्याकारणानें शत्रूचें कांहीं चालेना. इतक्यांत, सूर्याजी पिसाळ ह्मणून कोणी मराठा सरदार, पूर्वी शिवाजी महाराजांचे पदरीं असून, तो आतां मोंगलांस फितूर होऊन यातिकद्खानास ह्मणाला कीं, "वांई येथील देशमुखीचें माझें वतन आहे, तें जर माझें मला परत द्याल, तर मी रायगड किल्ला वरील महाराजांसुद्धां तुमचे हातीं आणून देतों. मी आपले खात्रीची अशी मावळे लोकांची एक टोळी घेऊन येऊन तुमचें काम करून देईन; पण ही टोळी मी कोणाचे हातीं देणार नाहीं; ती मी आपलेच हातांत ठेवीन" पिसाळाचें हें बोलणें खानानें लागलेंच मान्य केलें. पुढें लवकरच या राजद्रोही पिशाचानें, वेळ पाहून मोंगलांस किल्ल्यावर चढवून घेऊन तो त्यांचे हातीं करून दिला. येसूबाईसाहेब व शिवाजी महाराज हीं यातिकद्खान याचे स्वाधीन होतांच, तो त्यांस घेऊन बादशहाचे छावणीकडे मोठा जयघोष करीत चालला. त्यानें रायगडावरील शिवाजी महाराजांचें तक्त फोडून त्याचें सोनें, रुपें, जवाहीर हीं काढून घेऊन, व किल्ल्यावर जो खजीना व हत्ती घोडे वगैरे मालमत्ता सांपडली ती सर्व लुटून घेऊन बरोबर घेतली होती. यातिकद्खानानें मोहीम फत्ते केली ह्मणून बादशहानें त्याजवर फार खूष होऊन, त्यास झुलफिकरखान ह्मणून मोठा किताब दिला. छोटे शिवाजी महाराजांस बादशहास भेटविल्यावर, त्यांची राजतेजयुक्त व एके तऱ्हेची मोहक अशी बालमुद्रा पाहून, बादशहा कांहींसें लडिवाळपणानें व कांहींसें आदरानें ह्मणाला, 'बरकड चोर, हा मात्र साहू.' यावरून बालमहाराजांचें शिवाजी हें नांव लोपून जाऊन, शाहू हेंच नांव जाहीर झालें. बादशहाची मुलगी बेगम हिला, शाहू महाराजांचा हळूहळू लळा लागून, ती त्यांचा व येसूबाईसाहेबांचा चांगला सांभाळ करूं लागली. आपले डेऱ्यालगतच त्यांस तिनें डेऱ्यांत ठेऊन घेऊन, त्यांस खर्चाची नेमणूक करून देऊन व शागीर्द पेशा वगैरे सर्व ठरवून देऊन त्यांस कोणतेही गोष्टीची अडचण ठेविली नाहीं. बाळ महाराजांस बसावयास लहान

हत्ती, घोडीं हीं तिनें दिलीं. त्याचप्रमाणें त्यांस घालण्यास उंची उंची पोषाख, अलंकार वगैरे घेऊन तिनें त्यांचा उत्तम प्रकारानें परामर्श घेतला. ( १६९० )

३. येसूबाईसाहेब व शाहू महाराज हे वर लिहिल्याप्रमाणें परतंत्र होऊन पडले असतां, इकडे राजारामसाहेब हेही मोठे पेंचांत सांपडले. ते रायगडाहून निघाले ते प्रथम प्रतापगडावर आले. तेथें देवीचें दर्शन घेऊन व किल्ल्याचा बंदोबस्त करून, ते कांहींवेळ सातान्याचे किल्ल्यावर राहून तेथून पन्हाळा किल्ल्यावर येऊन पोहोंचले. संभाजी महाराजांचे बंधू व इतर मराठे सरदार हे पन्हाळा प्रांतीं जमाव करीत आहेत, ही बातमी बादशहास लागतांच, त्यानें लागलीच तिकडे फौजा रवाना केल्या. मोंगलांच्या फौजा आपली पाठ सोडीत नाहींत, व आपले मुलूख, किल्लेकोट यांचा अद्याप चांगला बंदोबस्त झाला नाहीं, तेव्हां कोठें कांहीं वेळ शत्रूंस अटकावून ठेऊन, आपणांस कांहीं अवकाश सांपडेल तर शत्रूंपासून बचाव होईल, एरवीं तो होण्याचें कठीण; ह्मणून राजारामसाहेब ह्यांनीं सह्याद्रींतील बांधारियाचे बिकट किल्ल्यांची वाट धरली. ते प्रथम विशाळगडास व तेथून रांगणा किल्ल्यास गेले; परंतु इकडे मोंगलांनीं मिरज, पन्हाळा वगैरे किल्ले काबीज करून, त्यांच्या फौजा रांगण्याकडेही येऊं लागल्या असें पाहून, राजारामसाहेब यांनीं असा विचार काढला कीं, आपण जिंजीकडे अखेर जाणार हें जोंपर्यंत मोंगलांना कळून येऊन त्यांनीं आपला रस्ता अडविला नाहीं, तोंपर्यंत तिकडे आपण व मुख्य मुख्य सरदार यांनीं वेष पालटून निघून जावें. याकरितां त्यांनीं रामचंद्रपंत बावडेकर यांचे स्वाधीन विशाळगड, रांगणा वगैरे किल्ले व सर्व मुलूख करून दिला, व त्यास तेथें 'हुकमतपन्हा' ह्मणून नेमून ठेविलें. त्यांचे हाताखालीं परशुराम त्र्यंबक नांवाचा पूर्वीं किन्हाई येथील कोणी कुलकर्णी असून, तो आपले हुषारीनें हळूहळू चांगले योग्यतेस चढला होता, त्यास दुय्यम ह्मणून नेमिलें. समुद्रांतील आरमारावर सिदोजी गुजर यास नेमून, त्यास सरखेल असा किताब दिला व त्याचे हाताखालीं कानोजी आंग्रे ह्मणून कोणी एक हुषार

मराठा सरदार होता त्यास नेमिलें, व या दोघांनीं सर्व समुद्रकांठचा बंदोबस्त ठेवावा असें ठरविलें. त्याचप्रमाणें महादाजी नाईक पानसंबळ ह्मणून कोणीएक ह्मातारा शिलेदार असून, त्याचे वळणांत पुष्कळ मराठे शिलेदार होते, त्यास सेनापती नेमून त्यासही महाराष्ट्रांतच ठेविलें. येणेप्रमाणें महाराष्ट्र देशांतील मुलुखाची वास्तपुस्त लावून तेथें निभाव लागेना ह्मणून, राजारामसाहेब व त्यांचे मुख्य मुख्य असे पंचवीस सरदार यांनीं, जंगम लिंगाईत यात्रेकरूंचा वेष धारण करून, जिंजी-प्रांताची वाट धरली.

४. बाल शाहूमहाराज व त्यांची आई येसूबाई हीं बादशहाचे छावणींत अटकेंत पडून, राजारामसाहेब व त्यांचें प्रधानमंडळ हीं वर लिहिल्याप्रमाणें महाराष्ट्रदेश सोडून देशोधडीस लागलीं असतां, महाराष्ट्र देशाची राज्यश्री लोपून गेली, शिवाजी महाराजांची मराठी बादशाही ही नष्ट झाली, भरतभूमीवर हिंदुराज्य पुनः स्थापन होण्याची आशा खुंटली. महंमदी धर्माचे वेडापुढें हिंदुधर्म अजीबात बुडून जाऊन, जिकडे तिकडे देशभर मोंगल बादशहाचा अम्मल निरंकुश असा आतां खास स्थापन होणार, असा कांहीं वेळ सर्व लोकांस भास झाला; परंतु मराठे बादशाहीरूप चंद्राचा पूर्णग्रहणकाल येथें समाप्त होऊन, त्याचे मोक्षकालास सुरुवात झाली. यापुढें महाराष्ट्रीयांस आल्हाद देणारी अशी तिची एक एक कोर यवनरूपी राहूचे मुखांतून बाहेर पडूं लागली. मोंगलांची बादशाही सर्व देशभर पसरत जाऊन, तिजपुढें मराठी राज्य बहुतेक सर्व बुडाल्यासारखें झालें असतां, त्यास थोड्याच वेळांत पुनः जीव येऊन, त्याचेकडून वरील प्रचंड बादशाहीचा नाश कसा झाला, हा इतिहास मोठा चित्तवेधक असून, त्याजपासून राजनीतिज्ञ लोकांस बोध होण्यासारखा आहे. ह्मणून हा कथाभाग यथासांग पुढें देतों.

मराठी स्वराज्य व मोंगल बादशाही यांची आतां जी मोठी झटपट लागली, तिची हकीकत वाचतांना, एकादे अल्पवयी, किरकोळ अंगाचे परंतु चिवट व जीवस अशा पैलवानाची, वयस्क, अंगानें मोठा,

जोरदार परंतु कमी दमाचे पैलवानाबरोबर होणारे कुस्तीची सहजच आठवण होते. मराठी स्वराज्य अगदीं अल्प काळाचें, ज्यास उत्पन्न होऊन पुरीं पन्नास वर्षेंसुद्धां झालीं नाहींत, ज्याचा मुलूख लहान, ज्याचा खजीना थोडा, ज्याच्या फौजा वगैरे लढाईची सामुग्री अगदीं अल्प; परंतु ज्याचे ठिकाणीं ज्वानीची ताकद व संकटांत न डगमगतां धीरानें युद्ध चालविण्याचें अमर्याद सामर्थ्य असें होतें. मोंगल बादशाही ही दीर्घकाळाची असून, तिचा दाब चोहोंकडे बसलेला, जिची दौलत, जिचें सैन्यही अमर्याद असल्यामुळें जिचे ठिकाणीं पहिली तडफ मारण्यांत अतिशय शक्ति; परंतु पुष्कळ वेळ नेटानें युद्ध चालविण्याचा दम तिचे कांहीं अंशीं दीर्घ काळामुळें व कांहीं अंशीं डामडौलानें नाहींसा झालेला, अशी तिची स्थिति होती. औरंगजेब बादशहा दक्षिणेंत स्वारी करण्याकरितां आला, तेव्हां त्याचे फौजेचें, त्याचे तोफखान्याचें, त्याचे छावणीचें, त्याचे बंदोबस्ताचें, त्याचप्रमाणें तेथील थाटमाट, ऐषआराम व अवाढव्य खर्च यांचें जें मागें वर्णन केलें आहे, त्यावरून वरील बादशाहीचे स्थितीची कल्पना नीट लक्षांत येण्यासारखी आहेच. बादशहाचे प्रचंड सैन्यानें दोन वर्षांतच दक्षिणेंतील दोन जुन्या शाह्या बुडविल्या व आणखी दोन वर्षांत नवीन उत्पन्न झालेली मराठी बादशाही बहुतेक तिनें जमीनदोस्त करून टाकिली; परंतु एवढे तडफेंतच मोंगल बादशहाची सर्व शक्ति वेंचून जाऊन तिचा दम तुटला. यापुढें मराठी स्वराज्य व मोंगल बादशाही यांचा जो सामना चालला, त्यांत जय प्राप्त होणें हें केवळ बळावरच नसून, विशेष चिवटपणा व जीवसपणा यांवरच अवलंबून होतें. यामुळें, पहिलेपहिल्यानें जरी मोंगलांची चोहोंकडे सरशी झालेली दिसून येऊन त्यांचे फौजांनीं सर्व दक्षिण देश व्यापिला व मराठी राज्य जिंजी येथें तरी कांहीं वेळ टिकतें कीं नाहीं याचा प्रथम वानवाच दिसला, तरी हळू हळू मोंगलांचा पाय मागें हटून, तितकेच मानानें मराठे लोकांचा पुढे सरसावूं लागला. हा प्रकार कोणते विवक्षित कारणांनीं कसा कसा होत गेला, इकडे आपण आतां वळूं.

मोंगल बादशाहीचा मुलूख, अर्ध्या अधिक हिंदुस्थानावर पसरलेला, तिची दौलत व खजिना हीं येवढीं मोठीं कीं, तितकीं त्यावेळीं जगांतील थोडेच बादशहांपाशीं असतील. तिचे तक्तावर एकामागून एक शूर, शहाणे असे बाबर, अकबर, शहाजहान यांसारखे बादशहा होऊन गेलेले, तिच्या फौजा मोठ्या बलाढ्य असून तींत निरनिराळे देशांतले निरनिराळे हत्यारांचे लोक ठेवलेले अशा, तिचा अम्मल देशांत दीडशें वर्षांवर चालल्यानें तिचा चोंहोंकडे दाब चांगला बसलेला, तिचे दरबारांत यूरोप व एशिया या खंडांतील मोठमोठ्या देशांचे वकील असून तिची दोस्ती संपादावी अशी त्या सर्वांस इच्छा असावी असें सर्व प्रकारानें तिचें एकंदर सामर्थ्य व ऐश्वर्य फार मोठें खरें; परंतु मोठमोठ्या बादशाहींतून कालांतरानें जे कित्येक अनिष्टकारक बदल—राष्ट्रांतील मूळ साधेपणा जाऊन डामडौल, मिजास वगैरे गोष्टींची प्रीति उत्पन्न होणें, हरएक धाडसाचें काम किंवा मसलत हीं स्वतः अंगानें करण्याची हौस जाऊन तींच दुसरे लोकांकडून करून घेणें, राजघराण्यांतच कज्जे, अमीरउमरावांमध्यें चुरस व वैमनस्यें, शत्रूशीं फितूर होऊन त्यांजपासून पैसे खाऊन बादशहाच्या मसलती बुडविणें—होत जातात, ते हळूहळू या बादशाहींत जास्त जास्त दृष्टीस पडूं लागले होते. औरंगजेब बादशहा स्वतः शहाजहान किंवा अकबर बादशहा यांचेहून कामकाज करण्यांत कमी हुषार किंवा कमी मेहनती होता असें नाहीं; कदाचित् उलटा तो कांहीं अंशीं अधिकही असेल. त्याची जातीची राहणी कांहीं अंशीं फकीराचे राहणीप्रमाणेंसुद्धां अगदीं साधी असे; परंतु त्याचे अंगचे मोठे दुर्गुण ह्मटले ह्मणजे अनिवार राज्यतृष्णा, विलक्षण धर्मवेड व अति आग्रही व संशयखोर स्वभाव हीं होत. पहिल्याचे पायीं त्यानें बंधुहत्या, पितृनिबंधन वगैरे अनन्वित कृत्यें करून, अर्ध्याहून अधिक हिंदुस्थान देशभर राज्य पसरलें असतां, दक्षिणेंतील राज्यें बुडवून आपल्या अगोदरच अनावर झालेल्या बादशाहीस अधिक प्रांत जोडण्याचा वेडेपणाचा सोस धरून, त्यानें सर्वत्र बादशाही बुडण्याचे पंथास लाविली. या बादशहास स्वधर्माचें जितकें वेड होतें, तितकें त्याचे

मागील कोणाही बादशहास नव्हतें. मागील बादशहा धर्माचे कामांत चालढकल करणारे असून, राज्यकारभारांत त्यांनीं धर्मसंबंध विशेष न ठेवतां मोठमोठे कामांवरून ते हिंदूंची योजना करीत असत. यामुळें हिंदुप्रजा त्यांशीं मुसलमान लोकांप्रमाणेंच राजनिष्ठेनें वागे; परंतु औरंगजेब बादशहाच्या धर्मसमजुती वेगळ्या असल्यामुळें, त्यास स्वराज्यप्रसाराची जितकी प्रबळ इच्छा होती, तितकीच साधारण स्वधर्मप्रसाराचीही असे. यामुळें त्यानें, यापूर्वींच सर्व हिंदु लोकांवर जिझिया नांवाचा कर बसवून, होतां होईल तोंपर्यंत सरकारी सर्व जागांवरून हिंदूंस काढून, मुसलमानांस ठेवण्याविषयीं सक्तीचा हुकूम फरमावला होता, ह्मणून मागें सांगितलेंच आहे. बादशहाचे अशा वर्तनामुळें हिंदुप्रजा अर्थात्च नाइराज होऊन बादशहाचें अहित चिंतूं लागल्या, व होतां होईल तोंपर्यंत त्याच्या मसलती फसविण्यास अत्यंत उद्युक्त झाल्या.

असें सांगतात कीं, संभाजी महाराज हातीं लागल्यावर, बादशहास फार आनंद होऊन त्यास वाटलें कीं, आतां हिंदूंचें थोडेंबहुत राज्य होतें तें बुडालें. त्यांस आतां बाटवून मुसलमान करण्यास हरकत नाहीं. ह्मणून त्यानें लागलीच बाजारांतून ओलें धान्य विकण्याचा हुकूम केला; परंतु कांहींवेळानें त्याचा अविचार त्यासच कळून येऊन, त्यानें आपला हुकूम फिरविला.*

बादशहाचा तिसरा दुर्गुण ह्मणजे अति आग्रही व संशयखोर स्वभाव. त्यास स्वतःचे शहाणपणाची मोठी घमेंड असल्यामुळें, तो बहुतेक मोठमोठ्या मसलती स्वतःच करी, व त्यांबद्दल कधीं त्यानें आपले वजीरांस किंवा मुख्य मुख्य उमरावांस सल्ला विचारिला, तर त्यानें काढिलेले कल्पनेंत कोणी उलट गोष्ट सुचविली, तर ती त्यास बहुतेक आवडत नसे. यामुळें वजीर व उमराव हे बहुतेक बादशहाचे विचारास, होस होय ठेऊन देत असत. याशिवाय बादशहाचा स्वभाव

* चिटणीसाची बखर.

अत्यंत संशयखोर असे. त्यास नेहमीं धाक वाटत असे कीं, आपण आपले भाऊ व बाप यांसंबंधानें जसें वर्तन केलें, तसें आपलेसंबंधानें आपले मुलगे करतील; व ही त्याची शंका व्यर्थ नव्हती. कारण, त्याचे पांच पुत्रांपैकीं—सुलतान महंमद व सुलतान अकबर व सुलतान खामबक्ष यांनीं निरनिराळे प्रसंगीं बादशहाची गादी मिळविण्याविषयीं खरोखरच यत्न केले व बाकी दोघांपैकीं सुलतान मोआझिम याजविषयीं बादशहास विनाकारण संशय उत्पन्न होऊन, त्यास त्यानें सहा वर्षे मागें सांगितल्याप्रमाणें आपले छावणींत कैद करून ठेविलें होतें. याप्रमाणें बादशहाचा विश्वास कोणा सरदारांवर किंवा पोटचे पुत्रांवर-सुद्धां नसल्यामुळें, तो कोणाएकाचे हातीं मोठें सैन्य किंवा मोठा अधिकार कधीं देत नसे. त्याची नेहमीं व्यवस्था अशी असे कीं, कोणतेही मोठे कामावर दोन किंवा तीन मनुष्यांची, ज्यांचीं परस्परांत वांकडीं असून जीं एकमेकाच्या कागाळ्या निरनिराळ्या तऱ्हेनें आपणांस कळवितील त्यांची योजना करावयाची. ही व्यवस्था एके तऱ्हेनें बादशहाची गादी सुरक्षित राखण्यास बरी होती खरी; परंतु तिनें दूरचे प्रदेशांत नवीन मुलूख काबीज करण्यास किंवा ते आपले ताब्यांत ठेवण्यास अर्थात् चांगलीशी नव्हती. त्यामुळें मोठमोठे उमरावांत देखील नेहमीं वैमनस्यें, द्वेष हीं वाढत असत.

येणेप्रमाणें मोंगल बादशाहीचे राज्यकारभाराची या वेळेची एकंदर वाईट स्थिति असतां, तिचे फौजेंत जी ढिलाई व अव्यवस्था होती ती याहूनही भयंकर होती. मोंगल शिपाई व मोंगल सरदार यांचे अंगीं प्रथम प्रथम जें धाडस, शौर्य व कांहीं अंशीं राकटपणा हीं होतीं, तीं शहाजहान बादशहाचे वेळीं राज्यांत पुष्कळ वेळ स्वस्थता राहून लढाईचें फारसें काम पडलें नाहीं ह्मणून हळूहळू कमी होत जाऊन, यावेळेस तर तीं बहुतेक नाहींशीं होण्यापर्यंत येऊन ठेपलीं होतीं. बडे बडे उमराव, जे आळस व मिजास यांचीं केवळ आगरें ह्मणून त्यांची हल्लीं ख्याति आहे, त्यांस हे दुर्गुण या वेळेपासूनच जडत चालले होते. त्यांपैकीं पुष्कळांस शिपाईगिरीचा धंदा आवडेनासा झाला होता.

व ज्यांस त्याची कांहीं आवड होती त्यांचा जामानिमा वाढल्याकारणानें, त्यांचा, मराठे लोकांसारखे चपळ, राकट व धाडसी अशा लोकांबरोबर युद्ध करण्यांत फारसा उपयोग नव्हता. त्यांनीं अंगास, तरवारीचा वार लागूं नये ह्मणून प्रथम कुडतें घालून त्याजवर चिलखत घालावें. त्यांचीं बसायचीं घोडीं मोठीं धिप्पाड व भपकीदार असून त्यांस त्यांनीं लगाम लाविलेले असत. त्यांचे पाठीवरून मोठमोठे कापडाचीं किंवा मखमालीचींसुद्धां खोगीरें घालून, त्यांस त्यांचे दोन्ही बाजूस खालीं लोंबत अशा साटणीच्या किनारी लाविलेल्या असत. याशिवाय घोड्यांचे मानेवरून वगैरे जिनावरून सोनेरुप्याचे गेंद, साखळ्या इत्यादि शोभेकरितां पुष्कळ डागडागिने बसविलेले असत. ही उमरावांची स्थिति झाली; परंतु प्रत्येक घोडेस्वारास आपले सरदाराचा थाटमाट पाहून तसा आपणही आपले ऐपतीप्रमाणें करण्याची त्यास हौस वाटूं लागल्यामुळें व त्यास तसें करण्याबद्दल त्याचे सरदारानें अटकाव न केल्यामुळें, औरंगजेब बादशहाची पागा ह्मणजे एक मिरवणुकीचेच स्वारीसारखी दिसे. हे घोडेस्वार लढाई जुंपली असतां, शत्रूवर चाल करून जाऊन त्यांजवर हल्ला करण्यांत कांहीं कमी नव्हते; परंतु त्यांच्यानें लढाईंत पुष्कळ वेळ नेट धरणें किंवा मोठी मेहनत करणें हीं त्यांचे अवजड जाम्यानिम्याचे योगानें होत नसत.

मोंगलांचे शिपाई व सरदार ह्याप्रमाणें कमकुवत झाले असतां, त्यांचे फौजेंतील शिस्त तर अगदींच मोडून गेली. औरंगजेब बादशहा आपणांस मोठा दक्ष ह्मणून ह्मणवीत असे; परंतु त्याचे लष्करी खात्यांत यावेळीं पुष्कळच लबाडी चालत असे. पुष्कळ सरदार त्यांचे हजेरींत दाखविलेले शिपायांपैकीं निम्मेच लोक चाकरीस ठेवीत व बाकी अर्धे शिपायांचा पगार ते तोंडांत टाकीत. कित्येक तर शिपायांचे पटांत आपले चाकर, गुलाम वगैरे लोकांची बढती करून देऊन बादशहाचे डोळ्यांत धूळ टाकीत असत. या अशा भेसळीनें शिपायांची अर्थात्च खराबी होत असेल हें सांगणें नको. सरदारांत येणेप्रमाणें लबाड्या व बेकैद वर्तन चालत असल्याकारणानें, त्यांची शिपायांवर चांगली

हुकमत चालत नसे. त्यांनींही लष्करांत दक्षतेनें पाहरा केला केला न केला न केला तरी चाले, व एखादे समयीं कांहीं प्रसंग गुदरला असतां, अगोदर त्यांचा जामानिमा होतां होतांच मारामार व्हावयाची, व तो यदाकदाचित् झाला तरी हे शिपाई लागलींच अंग झाडून शत्रूंवर चालून जातील असेंही व्हावयाचें कठीण! या सुमारास जेमेली क्यारेरी ह्मणून एक फ्रेंच गृहस्थ बादशहाचे छावणींत होता, तो तेथील लष्करी व्यवस्थेसंबंधानें लिहितो कीं, “ येथें शिपायांस पुष्कळ पगार आहे ही मोठी चांगली गोष्ट आहे; परंतु शिपायांस खेळण्यापेक्षां दुसरें कामच नाहीं. कोणी मनापासून लढत नाहीं किंवा पहाराही करीत नाहीं. कोणी आपले कामांत चुकला तर, त्यास फक्त तेवढे दिवसाचाच कायतो पगार दंड होतो!! ” *

९. येणेप्रमाणें मोंगल बादशाहीस मागेंच कीड लागून राज्यकारभार, फौजेंतील कैद वगैरे हरएक बाबतींतील तिची अव्यवस्था दिवसानुदिवस अधिकाधिक होत जाऊन तीस पडतीकळा लागली होती. तथापि ही गोष्ट बादशहाचे लक्षांत फारशी न येऊन त्यास वाटे कीं, फार दिवस आपण मनांत संकल्प केल्याप्रमाणें दक्षिणेंतील सर्व राज्यें तर आपण मोडून टाकिलीं; आतां त्यांचे मुलखांचीच काय ती व्यवस्था लावणें राहिलें आहे. हें काम फारसें कठीण नसून तें एकदां झालें ह्मणजे, एकंदर बादशाहींत जी कांहीं अव्यवस्था आहे ती सहज दूर करितां येऊन आपली बादशाही पूर्ववत् पुनः बलाढ्य करितां येईल. असा संकल्प मनांत करून बादशहा दक्षिणेंतील मुलखाचे व्यवस्थेस लागला. त्यानें विजापूर व गोवळकोंडें ह्मणून नवीन दोन सुभे केले, व यापूर्वीं दक्षिणेंत मोंगलांचे जे चार सुभे होते, त्यांसुद्धां ते आतां सहा झाले. सुभ्यांतून कमीजास्त असे जिल्हे करून त्या प्रत्येकावर एक फौजदार व एक दिवाण ह्मणून असे दोन अधिकारी नेमिले. फौजदार हा लष्करी अधिकारी असून त्याचे हाताखालीं कांहीं फौज

---

* एल्फिनस्टन साहेबांचा इतिहास.

असे. त्याचें काम आपले जिल्ह्यांत बंदोबस्त ठेऊन रयतेचें संरक्षण करावें हें होतें. दुसरा अधिकारी दिवाण; ह्याचें काम केवळ मुलकीच असून त्याजकडे जिल्ह्यांतील सारा वसूल करण्याचें काम असे. शिवाय त्या जिल्ह्यांत जे जहागीरदार असत, त्यांजपासून कर यांसच वसूल करावा लागे. फौजदार व दिवाण हे दोघे मिळून त्या जिल्ह्यांतील देशमुख किंवा देसाई यांस तालुके किंवा गांवकऱ्यांचे मक्ते देत, व त्यांपासून दिवाण हा एकंदर जिल्ह्याचा वसूल गोळा करून सरकारांत त्याचा भरणा करीत असे. फौजदार यांस त्याचे व त्याचे फौजेचे पगाराबद्दल, त्याचे जिल्ह्यांतून सरकारास जो वसूल होत असे, त्याचा चतुर्थांश देण्याची साधारणपणें वहिवाट असे; परंतु नवीन जिंकलेले प्रांतांत बहुतकरून त्यांस कांहीं नियमित वर्षेंपर्यंत बादशहाकडून जहागीरगांवही मिळत असत व त्यांचे उत्पन्नांतून त्यांस आपली फौज, कारकून वगैरे बाळगावे लागत, व मुदत संपली ह्मणजे त्यांस त्यांचे गांव पुनः सरकारांत सामील करावे लागत. त्यांस मराठे मनसबदारांप्रमाणें नेहमींच्या जहागिरी ह्मणून कधीं मिळत नसत.

येणेप्रमाणें औरंगजेब बादशहानें नवीन जिंकलेले प्रांतांची साधारण व्यवस्था लाविली. त्यानें फौजदारांस हुकूम पाठविले कीं, होतांहोईल तोंपर्यंत मराठे सरदार, जहागीरदार, इनामदार वगैरे लोकांस वश करून घ्यावें व ते जर बादशहाची चाकरी इमानइतबारें करतील, तर त्यांच्या जहागिरी, इनामें वगैरे बादशहा यापुढें चालवील, असें त्यांस समजून सांगावें. त्याचप्रमाणें बादशहास दक्षिणेंतील माहिती बरीच चांगली असल्यामुळें त्यानें मोठमोठे किताब, मनसबी, जहागिरी हीं देण्याचा व त्याहीपेक्षां तीं देऊं करण्याचा मोठा सपाटा लाविला. त्याचे मनांतील हेतु कीं, अशा रीतीनें नवीन प्रजेचीं मनें आपणांवर बसवून घेतल्यानें प्रांताची स्वस्थता लवकर होईल; परंतु औरंगजेब बादशहा हा वर लिहिल्याप्रमाणें एकीकडून दक्षिणेंतील लोकांपुढें साखर पसरीत असतां, तो दुसरीकडून आपले अविचारानें, धर्मवेडानें व संशयखोर स्वभावानें त्यांचीं मनें दुखवून आपणास चोहोंकडून शत्रू उत्पन्न

करीत होता. त्यानें आदिलशाही व कुतुबशाही यांचे फौजेंतील शिपायांची कांहींएक तरतूद न करितां त्यांस एकदम नोकरींतून काढून टाकिलें. यामुळें पुष्कळ शिपाई लोक मराठेशाही सरदारांस जाऊन मिळाले, व त्यांनीं मुलूख उध्वस्त करण्याचा मोठा सपाटा चालविला. विजापूर सरकारचे डफळे, माने, निंबाळकर वगैरे पूर्वींचे मानकरी ह्यांनीं आदिलशाहीचा नाश झाल्यावर बादशहाकडे वकील पाठवून व कधीं कधीं स्वतःही जाऊन, आपण बादशाहीचे नोकर असून, बादशहा सांगतील ती चाकरी करण्यास आपण तयार आहोंत अशीं वरपंगीं बोलणीं चालविलीं; परंतु ते आंतून मराठेशाहीचे सरदारांस अनुकूल होऊन किंवा कधींकधीं स्वतःच मुलुखांत धामधूम करीत. कधीं कोणी मोंगल फौजदारानें त्यांजबद्दल बादशहाकडे कागाळी नेली तर, बादशहाचे छावणींत त्यांचे वकील असतच. त्यांनीं बादशहाचे मर्जींतील कोणीतरी एकादे बडे उमरावास पैसे चारून व त्याचे बगलेंत शिरून, आपले मानकऱ्याचे तर्फे बादशहापाशीं कांहींतरी सबब लढवून देऊन, फौजदाराचा गिल्ला नाशाबीत ठरवावा.

बादशहाचा विश्वास कामगारांवर नसून त्यास वाटे कीं, या नवीन जिंकलेले मुलुखाची एकंदर व्यवस्थाच तर काय; परंतु तिची हरएक बारीक बाबही आपले स्वतःचे नजरेखालून गेली पाहिजे. तें झाल्यावांचून त्यास चैनच पडत नसे. परंतु त्याचें वय अगोदरच सत्तरावर असून तें जसेंजसें जास्त होऊं लागलें, तसेंतसें त्यास एवढा मोठा खटाटोप करण्यास कठीण पडूं लागलें. तरी तें दुसऱ्याकडे सोंपविण्याचें त्याचें मन होईना! जसें होईल तसें तो एकटाच आपले मनानें सर्व कारभार करी. याशिवाय दक्षिण प्रांताचा बंदोबस्त करितांना बादशहानें धर्मवेडास गुंतून ज्या जागीं ह्मणून हिंदु कामगार असतील, त्या त्या जागेंतून त्यांस काढून टाकून त्यांचे जागीं मुसलमान लावण्याचा क्रम जारीनें चालू केला. परंतु मुसलमान लोक कामाकाजांत चांगले वाकबगार नसल्यामुळें बादशहाचे या धर्मवेडाचे कृत्यानें नवीन मुलुखाचे कारभारांत जो घोंटाळा माजला, तो मोडण्याकरितां त्यानें

यानंतर कितीही अक्कल खर्चली तरी तो मोडला न जाऊन, त्यामुळेंच अखेर त्याचे बादशाहीचा नाश झाला !

मोंगल फौजदारांस मुलुखाचे वसुलाचा एक चतुर्थांश मिळत असे ह्मणून मागें सांगितलें आहे. परंतु मुलुखांत वर सांगितल्याप्रमाणें मोठी बंडाळी असल्यामुळें त्यांचे स्वतःचे खर्चाइतकासुद्धां वसूल होण्याची मारामार पडे. यामुळें दरवडेखोरांपासून त्यांचे लुटीचा कांहीं भाग घेऊन, त्यांचे चोऱ्यांकडे ते कानाडोळा करीत. याशिवाय वतनसंबंधानें जागोजाग भाऊबंदीचे तंटे चालू असून, पुष्कळदां बादशहाचा यत्न ते कमी करण्याचे ऐवजीं, ते वाढविण्याचा असल्यामुळें, एकंदर चोहोंकडे गोंधळ अधिकच होत चालला. हे खटले अगोदरच भानगडीचे असून, त्यांत कुलकर्णी, देशपांडे, मुखत्यार वगैरे मंडळींनीं पुष्कळदां आपली करामत खर्चली असल्यामुळें, ते असे बिकट झाले असत कीं, न्याय करणारास दोन्हीकडून अडचणीच पडाव्या ! तेव्हां अर्थात्च पुष्कळदां अतिशय अन्याय घडून येई, व त्यामुळें ज्या पक्षा-विरुद्ध फैसल होऊन त्यांचे वतनहक्क हिसकावले जात, त्यांस लुटारू लोकांस जाऊन मिळण्यास आयतीच सबब होई; व पुढें मागें मोंगल लोकांचे फौजेनें त्यांस जेर करून त्यांस शरण येण्याचा प्रसंग आणिला असतां, त्यांस 'आमचें वतन सरकारांनीं अन्यायानें हिसकावून घेतलें. मग पोट चालायाला लूट न करावी तर काय करावें ?' असें ते उघड ह्मणत व त्यांचें हें ह्मणणें सरकारासही अगदीं गैरवाजवी ह्मणून ह्मणवत नसे.

कोणी एकादा मनसबदार, देशमुख वगैरे कामगार मृत्यु पावला किंवा त्यानें सरकारचा कांहीं गुन्हा केल्याकारणानें त्याची जागा सरकारानें त्याजपासून काढून घेतली, ह्मणजे त्याचे भाऊबंदांपैकीं कोणी इसमास त्याचे जागीं सरकार नेमी; परंतु नवीन नेमणूक होतांना नवीन कामगारास आपले एक वर्षाचे उत्पन्नापैकीं शेंकडा ६५ सरकारास नजर ह्मणून द्यावा लागत असे. याशिवाय बादशाही सनदा तयार होऊन त्या त्यांचे हातीं येण्याचे अगोदर मध्यंतरीं नायब, तालुकदार,

कारकून वगैरे लोकांची संभावना त्यास करावी लागे ती वेगळीच! याप्रमाणें नवीन नेमलेला मनुष्य पुष्कळदां कंटाळून जाऊन अर्वाच खर्च करून जागा सोडून जात असे. यामुळें पुनः दुसरी नेमणूक करण्याचा प्रसंग येऊन कारकूनांचें वगैरे पुनः पिके. इतकेंही करून सनदा मिळाल्यावरही त्यांची बजावणी होण्यास कित्येक वर्षे लोटून जात. येणेंप्रमाणें मोंगल बादशाहीची वर सांगितलेल्या अनेक कारणांनीं फार वाईट स्थिति होत चालली होती. ती, एकादी जुनाट इमारत जी बाहेरून मात्र मोठी भव्य दिसणारी आहे; परंतु जी आंतून इतकी मोडकळीस येऊन गेली आहे कीं, जीस डागडुजी करण्याची मुळींच सोय राहिली नाहीं; परंतु जी थोडेच पावसाळे खाऊन जमीनदोस्तच होणार, अशाप्रमाणें होऊन गेली होती!

६. असो. आतां आपण मराठी बादशाहीचा उरलेला शेवटचा आशातंतु जे राजाराम साहेब व त्यांचे मंत्री, ज्यांनीं महाराष्ट्राचे राज्याची साधारण आशा सोडून देऊन जंगम, लिंगाईत व बनियांचे वेष धारण करून जिंजी प्रांताची वाट धरली ह्मणून मागें सांगितलें आहे, त्यांचेकडे वळूं. राजाराम साहेब व त्यांचे मुख्य मुख्य असे सुमारें पंचवीस सरदार हे रांगणा किल्ल्यावरून जे गुप्तपणें निघाले, ते गोकर्ण, सुंद ( सौंद ), श्रीव्यंकटेश या वाटेनें बंगलुरास येऊन पोंहोंचले. इतक्यांत राजाराम साहेबांचे गुप्तपलायनाची बातमी बादशहास लागून, त्यानें कर्नाटक प्रांताचा फौजदार कासीमखान यास महाराष्ट्रांतून निघालेले टोळीस वाटेंतच पकडण्याविषयीं लागलीच हुकूम पाठविला. फौजदारानें तो ताबडतोब आपले हाताखालचे अंमलदारांस कळवून या टोळीचा चांगला तपास ठेवण्याबद्दल त्या सर्वांस त्यानें सक्त ताकीद केली. यामुळें राजाराम साहेब व त्यांचे सरदार बंगलूर येथें येऊन पोंचण्याचे अगोदरच सर्व कर्नाटक प्रांतभर त्यांचा तल्लास एकसारखा मोठे बारकाईनें चालू होता. बंगलूरचे मुक्कामास असतां एका लहानशा गोष्टीवरून मोठे चमत्कारिक रीतीनें या टोळीबद्दल तेथील शिपाई लोकांस संशय आला व यावेळीं राजाराम साहेबांचे चिटणीस खंडो

बल्लाळ यांनीं वेळेवर सावधगिरी केली नसती, तर सर्व मंडळींवरच मोठा भयंकर प्रसंग आला असता. राजाराम साहेब यांचे पाय धुण्याकरितां त्यांचे पायांवर गड्यानें पाणी घातलें असतां, तेथें एका मनुष्यानें कानडी भाषेंत आपले सोबत्यांस ह्मटलें "हे लोक यात्रेकरू ह्मणवितात; परंतु दुसऱ्याकडून आपले पायांवर पाणी घेणारा हा कोणी तरी मातबर मनुष्य असला पाहिजे." हें भाषण राजाराम साहेबांपाशीं कोणी कानडी भाषा जाणणारे लोक होते त्यांनीं ऐकिलें. त्यांनीं तें मंडळीस सांगतांच खंडो बल्लाळ चिटणीस हा पुढें होऊन यजमानास ह्मणाला "साहेबांनीं आतां विलंब लावूं नये; येथून आपणांस निरनिराळे वाटांनीं फुटून तावडतोब निघून गेलें पाहिजे. कानडी लोकांस आपला संशय आला आहे. तेव्हां मोंगलांचे शिपाई आतांच येऊन आपणांस पकडून नेतील. तेव्हां साहेबांनीं संताजी घोरपडे, व धनाजी जाधव यांस बरोबर घेऊन एका वाटेनें निघून जावें, व प्रल्हादरावजी व खंडेराव दाभाडे यांनीं दुसरे वाटेनें चालतें व्हावें. आह्मीं तूर्त येथेंच स्वयंपाक वगैरे करीत बसतों. पुढें काय होतें तें पहावें." चिटणीसांची ही मसलत सर्वांस पसंत पडून त्यांचे ह्मणण्याप्रमाणें राजारामसाहेब हे आपली मंडळी घेऊन एका वाटेनें तावडतोब निघून गेले, व प्रल्हाद निराजी व दाभाडे वगैरे दुसरे रस्त्यानें चालते झाले. थोड्या वेळानें ठाण्यांतून मोंगलांचे शिपाई राजारामसाहेबांचा शोध करण्याकरितां ते जेथें उतरले होते, तेथें तावडतोब येऊन दाखल झाले. त्यांनीं सर्व उतारूं लोकांचा तपास करून खंडो बल्लाळ चिटणीस व इतर मंडळी जी तेथें स्वयंपाक करीत बसली होती, त्या सर्वांस पकडून कोटांत ठाणेदाराकडे नेले. तेथें त्यांस तुह्मी कोण ह्मणून विचारलें असतां त्यानीं उत्तर केलें, 'आह्मीं यात्रेकरू, श्रीरामेश्वरास जात आहों. आमचेजवळ आणखी दहापांच असामी उतरले होते; परंतु त्यांचे जेवणखाण आटोपल्यावर त्यांस जिकडे जावयाचें होतें तिकडे ते निघून गेले. आह्मांस दुसरीकडे जावयाचें ह्मणून आह्मीं येथें राहिलों.' यावर ठाणेदारानें त्यांचे डोईवर दगड दिले, त्यांस चाबकांनीं मारिलें, राखेचे

तोबरे दिले; परंतु इतकी माराहाण करून त्यांना जबाब बदलतच नाहीं, तेव्हां हे खरोखरच यात्रेकरू आहेत असें त्यास वाटलें. त्यानें त्यांस तीन चार दिवस तेथेंच कैदेंत ठेविलें; परंतु सुटका झाल्याशिवाय आह्मीं अन्नग्रहण करणार नाहीं, असा त्यांचा निर्धार पाहून त्यानें त्यांस सोडून दिलें. यानंतर ते निघून जाऊन प्रल्हाद निराजी वगैरेंचे टोळीस जाऊन मिळाले. तेथून पुढें कांहीं विघ्न न येतां ते जिंजी येथें येऊन दाखल झाले. तेथें त्यांचे अगोदरच राजारामसाहेब हे संताजी घोरपडे व धनाजी जाधव यांसह सुरक्षितपणें येऊन पोहोंचले होते. जिंजी प्रांताचे मुख्य अधिकारी हरजीराजे महाडिक व नीळकंठ मोरेश्वर पिंगळे यांस राजाराम साहेबांनीं मोठे शहाणपणानें त्यांचे पूर्वीचे अधिकारांवर मुकर करून नीळकंठराव यास त्याशिवाय त्याचे बापाचा मुख्य पेशव्याचा अधिकारही दिला, यामुळें दोघे मोठे खुष होऊन राजाराम साहेबांची सेवा करण्यास अत्यंत तत्पर झाले होते. साहेब मुख्य मुख्य सरदारांसह कांहीं दिवस आपलेच प्रांतीं राहण्यास येतात हें त्यांस कळतांच, त्यांनीं, आपले प्रांताचा नीट बंदोबस्त राखून चोहोंकडून सैन्य वगैरे गोळा करून, बादशहाच्या फौजा साहेबांचे पाठोपाठ आल्या तर त्यांचें निवारण करितां यावें ह्मणून त्या दोघांनीं मनापासून मोठी खटपट केली. अखेर राजारामसाहेब जिंजीप्रांतांत येऊन दाखल झाले, हें त्यांस कळतांच ते त्यांस आणण्याकरितां सामोरे जाऊन त्यांनीं यजमानाचा उत्तम प्रकारें सत्कार केला. राजारामसाहेब दूर जिंजी प्रांतांत येऊन पोहोंचल्यावर मराठी राज्याची कांहीं आवराआवर करण्यास त्यांस चांगली सवड सांपडली. त्यांचे मागोमाग त्यांचे कित्येक सरदार आपले लोकांसह निरनिराळे वेष धरून कोणी मोंगलाईंत चाकरी करायास जातों, कोणी कर्नाटकांत उद्यम करण्यास जातों, अशीं मिषें करून सर्व हळूहळू राजाराम साहेबांस जिंजी येथें येऊन मिळाले. त्या सर्वांचा साहेबांनीं योग्यतेनुरूप सत्कार करून मराठे बादशाहीची पहिल्यापेक्षांही पुनः उत्कृष्ट उभारणी केली.

राजाराम साहेबांचेजवळ यावेळीं मुख्य मुख्य मंत्री व सरदार जनार्दनपंत हनुमंते, प्रल्हाद निराजी, खंडो बल्लाळ, हरजी राजे महाडिक, नीळकंठ मोरेश्वर पिंगळे, संताजी घोरपडे, धनाजी जाधव हे होते. ही मंडळी मोठी धीराची, शहाणी व एकजुटीनें वागणारी होती. यावेळीं मराठी राज्याची जरी अगदीं तारांबळ उडून गेली होती, ह्मणजे सरकारी खजीना सर्व खलास होऊन गेला होता, फौजेंत अटक किंवा दाब ह्मणून फारसा राहिला नव्हता, किल्लेकोट यांचा बंदोबस्त नाहींसा होऊन ते बहुतेक बेसरंजाम झाले होते. कर्ती माणसें चार चहूंकडे निघून गेलीं होतीं, तरी या नवीन मंत्रिमंडळानें अगदीं न डगमगतां हातीं घेतलेलें काम मोठ्या युक्तीनें, एक विचारानें व नेटानें चालू केलें. आपल्या शत्रूचें सामर्थ्य किती आहे, त्याची लढाईची तयारी कशी आहे, त्याचप्रमाणें त्याजबरोबर युद्ध खेळण्यास आपणापाशीं काय काय साधनें आहेत, या सर्व गोष्टींचा त्यांनीं नीट विचार केला होता. त्यांनीं जिंजी प्रांतास येण्यापूर्वींच महाराष्ट्रांतील सर्व किल्लेदारांस हुकूम पाठवून दिला होता कीं, शिवाजी महाराजांनीं किल्लेकोटांचे बंदोबस्ता-करितां मागेंच जे कायदेकानू व वहिवाटी ठरवून दिल्या होत्या, त्याप्रमाणें सर्वांनीं चाललें पाहिजे; किल्ल्यांवरून धान्याचाच पुरवठा करून स्वस्थ बसूं नये, तर सभोंवतालील प्रदेशांतून गवतही कापून आणून त्याच्या घोड्याकरितां गंजी लावून ठेवाव्या. मंत्रिमंडळाचे या तरतुदीनें पुढील युद्धांत मराठे लोकांस फार फायदा होत गेला, हें सांगणें नकोच.

राजाराम साहेबांचे मंत्रिमंडळांत प्रल्हाद निराजी हा विशेष प्रमुख होता. हा निराजी रावजी माजी न्यायाधीश यांचा मुलगा असून, तो गोवळकोंडें येथें कुतबशाहाचे दरबारीं मराठ्यांचा वकील ह्मणून बरींच वर्षें राहिला होता. तो जातीनें मोठा शहाणा, बुद्धिमान् व निस्पृह असल्यामुळें त्याचें वजन राजाराम साहेबांचे दरबारांत दिवसा-नुदिवस अधिकाधिक पडूं लागलें. त्यानें सर्व मानकऱ्यांस पत्रें लिहून औरंगजेब बादशहा हा दक्षिणेंतील शिवाजी महाराजांनीं स्थापिलेली

मराठेशाही व हिंदुधर्म हीं बुडविण्यास उद्युक्त झाला आहे, तेव्हां सर्वांनीं एक जुटीनें वागून त्याची मसलत अवश्य बुडविली पाहिजे, अशी त्यांस गळ घातली.

त्याचप्रमाणें शाहू महाराज मोंगलांचे स्वाधीन असल्यामुळें, राजाराम साहेबांस राज्याभिषेक करितां येत नाहीं; तथापि तूर्त मराठी राज्य चालविण्यास कोणी धनी पाहिजे, ह्मणून ते जिंजीस येऊन पोंहोंचतांच त्यांजकडून त्यानें मंचकारोहणविधि करवून घेतला. पूर्वी शिवाजी महाराजांचे जसे अष्ट प्रधान होते, तसेच नवीन महाराजांचेहा अष्ट प्रधान नेमिले. यावेळीं नवीन नेमणुका ज्या झाल्या त्या खालीं देतों :—

१. निळो मोरेश्वर पिंगळे—पेशवा.
२. जनार्दनपंत हणमंते—अमात्य.
३. शंकराजी मल्हार—सचिव.
४. रामचंद्र त्र्यंबक पिंडे—मंत्री.
५. संताजी घोरपडे—सेनापती.
६. महादाजी गदाधर—सुमंत.
७. निराजी रावजी—न्यायाधीश.
८. श्रीकराचार्य कालगांवकर—पंडितराव.

महादाजी नाईक पानसंबळ सेनापति हा, त्याची नेमणूक झाल्यावर थोडेच महिन्यांनीं मरण पावल्यामुळें, त्याचे जागीं संताजी घोरपडे याची नेमणूक केली. रामचंद्र नीलकंठ बावडेकर यास मागें सांगितल्याप्रमाणें, हुकमतपन्हा हा मोठा किताब व त्यांनीं दिलेला हुकूम, महाराजांनं सुद्धां मोडूं नये असा अधिकार देऊन, त्यास अष्ट प्रधानांत सामील न करितां पुष्कळ अंशीं स्वतंत्रच असा अधिकारी महाराष्ट्रांत ठेविला होता. अष्ट प्रधानांहून निराळा व त्याहून अधिक अधिकाराचा असा दुसरा सरदार राजाराम महाराजांनीं पंतप्रतिनिधि ह्मणून नेमिला. जिंजीस येण्यापूर्वीच पेशव्याचे जागीं निळो मोरेश्वर पिंगळे यांची नेमणूक केली असल्यामुळें, प्रल्हाद निराजी यास त्याचे योग्यतेप्रमाणें

देण्यास जागा उरली नव्हती. यामुळें, पंतप्रतिनिधि ही मोठी जागा राजाराम महाराजांनीं नवीन उत्पन्न करून ती प्रल्हाद निराजी यास दिली. या नवीन जागेचा अधिकार, महाराजांचेच अधिकाराहून काय तो कमी असा असे.

७. येणेंप्रमाणें राजाराम महाराजांस सर्व मराठी राज्याचे यथाविधि पूर्ण अधिकारी करून, तसें केल्याबद्दल चोंहोंकडे सर्व मराठे सरदारांस व मानकऱ्यांस जाहीर होण्याकरितां, त्यांस त्यांचे योग्यतेप्रमाणें पोषाख व अलंकार पाठवून दिले. त्याचप्रमाणें महाराष्ट्रांत, आपले मुलुखांत व पुष्कळदां मोंगलांचेही मुलुखांत, राजाराम महाराजांनीं मराठे लोकांस भराभर इनामें, जहागिरी वगैरे देऊन टाकून त्यांबद्दल सनदाही पाठवून दिल्या. यावेळीं मराठी राज्याचा मुलूख बहुतेक बादशहाचे ताब्यांत आला असल्यानें, तेथें इनामें, जहागिरी देण्याचा अधिकार महाराजांस होता असें नाहीं; परंतु त्याचेयोगानें मराठे लोकांचा आपले राज्याविषयींचा धीर सुटून न जाऊन, आपणांस मिळालेल्या जहागिरी वगैरे संभाळण्याकरितां मोंगलांशीं लढण्याविषयीं त्यांस विशेष कळकळ उत्पन्न झाली,* व आपला राजा दूर देशीं तरी पण आहे असा त्यांस भरंवसा आला. हे लोक वारंवार कामानिमित्त जिंजी येथें जाऊंयेऊं लागल्या कारणानें, दोन्ही प्रांतांतील दळणवळण राहून एकमेकांची एकमेकांस चांगली मदत होऊं लागली.

तथापि मराठी राज्याचे रक्षणार्थ राजाराम महाराज व त्यांचें प्रधानमंडळ यांनीं आपले बुद्धीनें वर लिहिलेल्या ज्या तजविजी केल्या, त्या कदाचित् सर्वही निष्फळ होण्याचा संभव होता; परंतु ईश्वराची लीला अगाध आहे. एकादे व्यक्तीचा किंवा राष्ट्राचा अभ्युदय करण्याचें त्याचे मनांत आलें, ह्मणजे तो नेहमीं सुचिंत्य, योक्त व चांगल्याच उपायांनीं होतो असें नाहीं, तर कित्येकवेळां अचिंत्य व कदाचित् जीं कारणें एरवीं आपण अनिष्ट अशीं समजतों, त्यांकडूनसुद्धां तो होतो. मराठी राज्याची या वेळची गोष्ट अशीच झाली. संभाजी

* अशाच प्रकारचा प्रकार रोमन लोकांच्या इतिहासांत वर्णिला आहे.

महाराजांचे कारकीर्दींत फौजेमध्यें कैद किंवा व्यवस्था अगदीं राहिली नाहीं; शिपायांस वेळचेवेळीं पगार मिळत नसल्यामुळें, त्यांस लुटीचा कांहीं अंश स्वतः ठेवण्यास सवड मिळाली; परंतु हळूहळू शिपाई बहुतेक लूट बळकावून बसूं लागल्यामुळें, सरकारी खजिन्यांत लुटींतून भर जी पडावयाची ती न पडतां, उलटें फौजेचे खर्चानें खजीना मात्र खल्लास झाला; अशी मराठी राज्याची वाईट स्थिति झाली होती ह्मणून मागें सांगितलें आहे; परंतु या गोष्टीपासून संभाजी महाराजांची दौलत नाहींशी झाली, किंवा फौजेवर त्यांचा जो कडक अंमल चालावयाचा तो चालनासा झाला हें खरें; परंतु त्यापासून मराठे राष्ट्राचा, प्रथम औरंगजेब बादशहाचे प्रचंड स्वारीपासून बचाव झाला व त्यानंतर त्याचा पुनरुदय होऊन तें पूर्वीपेक्षां विशेष बळाढ्य झालें. महाराष्ट्र देशांतील लोकांस सभोंवतालील प्रांतांत लूट मारण्याची पहिल्यापासून मोठी हौस असे. ती ब्राह्मणी राज्य व त्यामागून विजापूर, गोवळकोंडें यांचीं जीं राज्यें झालीं, त्याखालीं बरीच दबली होती; परंतु संभाजी महाराजांचे कारकीर्दींत सरकारचा अंमल ढिला होतांच मराठे लोकांचा लुटालुटीचा सपाटा अतोनात वाढला. मराठे सरदारांनीं पुष्कळ लोक हाताखालीं ठेऊन, मोंगलांचे मुलुखांतून व कधीं कधीं स्वराज्यांतही लूट मारावी. ज्या कोणापाशीं एकादा घोडा व भाला हीं असत—मग तो दरवडेखोर असो किंवा सैन्यांतून कमी केलेला शिपाई असो—तो या सरदारांकडे गेला ह्मणजे त्यास ते आपले पदरीं ठेवून घेत. त्यास पगार ह्मणून कांहीं द्यावा लागतच नसे. एकादे दिवशीं कोठें चांगली लूट मिळाली ह्मणजे तो चांगला गब्बर होऊन जाई. येणेप्रमाणें हजारों घोडेस्वार व शिपाई लुटीचे आशेनें सर्व देशभर फिरूं लागले. जुनीं राज्यें बुडविलीं ह्मणजे असे लुटारू लोक उत्पन्न होऊन त्यांनीं कांहीं वेळ बंडाळी करणें हें साहजिक आहे, व त्यांचा बंदोबस्तही नवीन सरकाराकडून हळूहळू होतो, व मराठे लोक हे केवळ लुटारू पेंढारच असते, तर औरंगजेब बादशहाचे छावणींत जी कांहीं चांगली फौज होती, तिचे हातून त्यांचाही लवकरच बंदोबस्त झाला असता; परंतु यावेळीं मराठे लोकांस लूट मिळविण्याचे उत्कट इच्छेशिवाय

शिवाजी महाराजांचे पराक्रमाविषयीं अत्यंत अभिमान, आपले सह्याद्रि पठारीचे किल्ले फार मजबूत असून शत्रूंस आपण कधीं दाद लागूं देणार नाहीं असा मोठा विश्वास, प्रल्हाद निराजीसारख्यांचें बुद्धि-कौशल्य, संताजी घोरपडे, धनाजी जाधव, खंडेराव दाभाडे वगैरे महाशूर व धाडसी अशा पुरुषांचा मोठा भरंवसा व शिवाय औरंगजेब बादशहा हा सर्व देश बाटवून मुसलमान करणार, नाहीं तर जिझिया ह्मणून सर्व हिंदुलोकांवर माणसपट्टी बसविणार, अशा निरनिराळ्या कंड्या ऐकून, नवीन येणारा मोंगलबादशाहीविषयीं अत्यंत तिटकाराही वाटत असल्यामुळें, या लोकांत जो एकाप्रकारचा आवेश उत्पन्न झाला, तो बादशहापाशीं जितकी फौज होती, व जितका खजिना होता, त्यापेक्षां तीं पुष्कळ अधिक असतीं, तरी त्यांचेयोगानें चेतावलेलें जें मराठ्यांचें राष्ट्र, तें दबलें गेलें नसतें!

८. येणेप्रमाणें मराठे लोकांचीं मनें निरनिराळ्या मनोवृत्तींनीं चेतून गेलीं असतां, औरंगजेब बादशहास बातमी लागली कीं, राजाराम महाराज ह्यांनीं, जिंजी येथें जाऊन मराठी राज्याची पुनः जुळवाजुळीव केली, व ते त्या प्रांतांत फौजेचा चांगला जमाव करीत आहेत. त्यानें लागलींच झुल्फिकारखान याजबरोबर मोठी फौज देऊन, त्यास जिंजी काबीज करून, मराठ्यांचे राजघराण्यांतील राहिलेला अवशेष जे राजाराम महाराज, त्यांस धरून आणण्यास हुकूम केला १६९१. यापूर्वीं, प्रल्हाद निराजी याचे सांगण्यावरून राजाराम महाराजांनीं, माजी सेनापती महादाजी नाईक संबळ हा मरण पावला तेव्हां, महाराष्ट्रांत कोणी चांगले सरदार पाठविल्याशिवाय त्या देशांत आपला जम चांगला बसणार नाहीं ह्मणून, नवीन सेनापती संताजी घोरपडे व धनाजी जाधव यांस परत महाराष्ट्रांत पाठवून दिलें होतें. संताजी हा कापशी येथील घोरपड्यांचे घराण्यांतील असून, तो मराठे सरदारांत यावेळीं प्रमुख ह्मणून गणला जात होता. तो शिवाजी महाराजांचे वेळीं कित्येक मोहिमींवर गेला असून, त्यावेळींही त्यानें चांगलें नांव मिळविलें होतें. त्यास राजाराम महाराजांनीं आतां 'हिंदुराव ममलकत

दार ' ह्मणून मोठा किताब देऊन ' जरीपटका ' ह्मणून नवीन निशाण याचे स्वाधीन केलें होतें. याशिवाय मोंगलांचे मोठमोठे उमरावांपुढें शी नौबत वाजते, तशी त्याचे स्वारीपुढें वाजविण्याचा त्यास अधिकार देला होता. धनाजी जाधव याचाही मान महाराजांनीं चांगला केला असून, त्यास जयसिंगराव हा किताब दिला होता.

संताजी घोरपडे व धनाजी जाधव हे महाराष्ट्रांत निघून गेल्यावर, झुल्फिकारखान हा मोठी फौज घेऊन जिंजीवर चाल करून येतो असें पाहून, प्रल्हाद निराजी यानें त्यास अडविण्याकरितां पूर्वी विजापूर सरकारचे पदरीं कोणी एक मुसलमान सरदार होता त्याजबरोबर कांहीं फौज देऊन मोंगलांचे तोंडावर पाठविलें; परंतु त्याचें फारसें कांहीं न चालून, तोही कांहीं वेळानें फितूर होऊन मोंगलांस जाऊन मिळाला. शेवटीं झुल्फिकारखान हा जिंजी येथें येऊन पोहोंचला; परंतु त्याचे लवकर लक्षांत आलें कीं, खुद्द किल्ला चांगला मजबूत असून त्याचे सभोंवताली असलेल्या कित्येक टेंकड्याही चांगल्या बांधून काढिल्या आहेत, व त्यांचा एकंदर परिघ कितीएक कोस भरेल इतका तो मोठा आहे. मोंगल लोकांचा असा समज असे कीं, एखाद्या ठिकाणास वेढा दिला ह्मणजे तें सर्व मनुष्यांनीं वेढून काढून, आंतून बाहेर किंवा बाहेरून आंत रिघाव अगदीं बंद केल्याशिवाय तें ठिकाण हस्तगत होत नाहीं. या समजुतीमुळें झुल्फिकारखान यास वाटलें कीं, जिंजी-सारख्या विस्तीर्ण ठाण्यास वेढा देण्यापुरतीं आपणापाशीं मनुष्यें नाहींत. तेव्हां अर्धवट वेढा घालून कांहीं उपयोग होणार नाहीं. तेव्हां त्यानें बादशहास आणखी फौज पाठवून देण्याबद्दल लिहिलें व मध्यंतरीं त्यानें दक्षिणेकडे तंजावर, त्रावणकोर या प्रांतांवर स्वारी करून तेथील राजांपासून खंडणी वसूल केली.

झुल्फिकारखान यानें कुमक मागितली खरी; परंतु बादशहापाशीं तिकडे पाठविण्यास फाजील अशी फौजच उरली नव्हती. नवीन जिंकलेले मुलुखाचा बंदोबस्त राखतां राखतांच बादशहाच्या फौजेस पुरेपुरेसें झालें असून, ती चोहोंकडे गुंतली गेली होती. विजापूर

व गोवळकोंडें या राज्यांतील कमी केलेले शेकडों घोडेस्वार यांनीं निरनिराळ्या टोळ्या करून मराठे लोकांचे नांवाखालीं नाशिक, भीर व बेदर या निरनिराळ्या ठिकाणीं लुटण्याचा सपाटा चालविला. दक्षिणेकडे मागें सांगितलेल्या वाकणखेड येथील कर्नाटकी रामोशांचा नाईक पेम नाईक यानें असा उच्छेद मांडिला कीं, शेवटीं बादशहानें आपला पांचवा मुलगा मुलतान खामबक्ष यास, त्याबरोबर चांगली फौज व त्याचे हाताखालीं राहो उल्लाखान यास देऊन, कर्नाटकांतील रामोशांचा दंगा मोडून वाकणखेड हें जाळून उध्वस्त करून येण्यास पाठविलें; परंतु पेमनाईक हा बराच हुषार असल्यामुळें, त्यानें मोंगलांचे फौजेस बरेच वेळ दाद दिली नाहीं, व शेवटीं तो वाकणखेडास चांगली मजबुती करून बसला. मोंगलांनीं गांवास वेढा दिला; परंतु त्याचेपाशीं बुरूज, तट वगैरे पाडण्याचें सुरुंगाचें सामान नसल्यामुळें, त्यांचे हातून पेमनाईक यास गांवांत कोंडण्यापेक्षां जास्त इलाज होईना.

वर लिहिल्याप्रमाणें विजापूर व गोवळकोंडें या सरकारांचे चाकरींतून कमी केलेले शिपाई उत्तरेकडे, व वाकणखेड्याचा पेमनाईक हा दक्षिणे-कडे असे मोंगलाचे फौजांस पुरून उरले असतां, महाराष्ट्रांत रामचंद्रपंत बावडेकर हुकमतपन्हा व त्याचा दुय्यम परशुराम त्र्यंबक यांनीं जी धामधूम सुरू केली, ती वरील दोहोंपेक्षांही अधिक भयंकर होती. रामचंद्रपंत यानें आपलें मुख्य ठाणें साताऱ्यास करून, तो किल्लोकिल्लीं जाऊन तेथील शिबंदी, दारुगोळा, दाणावैरण वगैरे गोष्टींचा बंदोबस्त करी व याशिवाय सभोंवतालचे मुलुखांतील जमाबंदीचेंही होतांहोईल तितकें काम तो पाही. संताजी घोरपडे व धनाजी जाधव हे महाराष्ट्रांत येऊन दाखल होण्याचे पूर्वींच त्यानें बरीच फौज जमा करून, मोंगल लोकांच्या टोळ्या, मुलुखांतून धान्य वैरण गोळा करून नेण्याकरितां आल्या असतां, त्यांस एकएकट्या गांठून त्यांस ठार करून टाकण्याचा क्रम चालविलाच होता; परंतु वरील दोन मराठे सरदार महाराष्ट्रांत परत येतांच, त्यानें त्यांस वांई येथील मोंगल फौजदार याजवर एकाएकीं हल्ला करण्याची मसलत कळविली. ती संताजी

यास लागलीच पमंत पडून, त्यानें त्या फौजदारावर छापा घातला. त्यास व त्याचे शिबंदीस कैद केलें व वांई येथें आपलें ठाणें बसविलें. १६९२. संताजी व धनाजी हे स्वदेशांत परत येतांच सर्व मराठे शिलेदारांस मोठें अवसान आलें; शिवाय त्यांनीं वांई येथें केलेलें धाडसाचें कृत्य पाहून तर, आपणही असेंच करावें अशी सर्वांस मोठी ईर्षा उत्पन्न झाली. यांपैकीं पवार, थोरात व आटोळे हे मुख्य असून, त्यांनीं मोंगलांचे मुलुखांत चौथ व सरदेशमुखी या दोन्ही हक्कांबद्दल खंडणी वसूल करण्याचा क्रम चालू केला, व हे दोन हक्क लागू पडतात असें पाहून, त्यांनीं घांसदाणा ह्मणून तिसरा नवीनच हक्क आपण उत्पन्न करून तोही ते वसूल करीत चालले. येणेप्रमाणें या सरदारांनीं चांगले प्रकारें चाकरी बजाविली असें पाहून, राजाराम महाराजांनीं त्यांस गौरवाचीं पत्रें पाठवून पवार यास विश्वासराव, थोरात यास दिनकरराव व आटोळे याल समशेरबहादूर असे किताब दिले. रामचंद्रपंत हुकमतपन्हा याचेपाशीं शंकराजी नारायण गांडेकर ह्मणून कोणी हुषार कारकून होता. त्यानेंही यावेळीं मोठा पराक्रम करून, राजगड हा किल्ला मोंगलांपासून परत जिंकून घेतला. व याहूनही दुसरा मोठा किल्ला—पन्हाळा—हा परशुराम त्र्यंबक यानें यानंतर लवकरच एकाएकीं छापा घालून काबीज केला. रामचंद्रपंत यास मराठे धनगर विशेष आवडत असत व त्याचे सैन्यांत या लोकांचा बराच भरणा असे.

याच सालीं वांई येथील मोहिमेप्रमाणें दुसरी एक मोहिम संताजी घोरपडे यानें मिरज येथील मोंगल फौजदारावर केली व तीही उत्तम तऱ्हेनें फत्ते झाली. या पराक्रमाबद्दल हुकमतपन्हा यानें संताजी यास मिरज येथील देशमुखीची सनद करून दिली. यानंतर मोंगलांच्या फौजा गोळा होऊन त्या सर्वांचा मारा राजाराम महाराजांवर जिंजी येथें पडूं नये ह्मणून, संताजी व धनाजी यांनीं बरेंच सैन्य जमा करून, मोंगलांचे ताब्यांतील गोदावरी नदीचे कांठचा जो सुपीक प्रदेश होता, त्यावर एकाएकीं चाल केली. या सालीं याच मुलुखांत काय ती

बरीच सुबत्ता होती. परंतु मराठ्यांचें सैन्य तेथें जाऊन पोहोंचतांच त्यानें तो सर्व मुलूख लुटून जाळून फस्त केला. औरंगजेब बादशहानें उत्तर हिंदुस्थानांतून आपले सैन्यास धान्य वगैरे पुरविण्याकरितां सैन्याच्या टोळ्या बंदोबस्तासाठीं बरोबर देऊन मोठमोठे तांडे आणण्याची तजवीज ठेविली होती; परंतु ते मराठे पेंढारांचे तडाक्यांतून चुकून येतील तेव्हां खरें! यांपैकीं तीन मोठमोठे तांडे, त्यांवर तीन बडे बडे मोंगल उमराव असतांही, ते संताजीनें पाडाव केले व तिघांपासूनही चांगल्या मोठ्या खंडण्या घेतल्यावांचून त्यांस त्यानें बादशहाकडे परत जाऊं दिलें नाहीं.

९. येणेंप्रमाणें एकदम चोहोंकडून शत्रू उठल्यामुळें, मोंगलांचे सैन्याची मोठी तारंबळ उडून गेली. बादशहास आतां काय करावें हें कांहीं सुचेना. सर्वच शत्रू एकदम दाबून टाकतां येत नाहींत असें पाहून, त्यानें असा विचार काढला कीं, प्रथम राजाराम महाराज यांचा जिंजी येथील तळ मोडून त्यांचा पाडाव केला पाहिजे; तसें केल्यानंतर बाकीचे शत्रू हळूहळू सहजच दबले जातील. या बेतानें बादशहानें भीमा नदीचे कांठीं ब्रह्मपुरी येथील सैन्याचा तळ उठवून, तो जिंजीचे रोखानें हळहळू कूच करीत चालला. त्यानें आपला कनिष्ठ पुत्र – सुलतान खामबक्ष—यास हुकूम पाठविला कीं, " वाकणखेड येथील वेढ्याचें काम, तूर्त तुमचे हाताखालील रोहो उल्लाखान याजवरच सोंपवून, तुम्हीं जिंजीकडे कूच करावें. येथून आमचा मुख्य वजीर आसदखान याजबरोबर मोठी फौज पाठवून देतों. तुम्हीं जिंजीस जाऊन पोहोंचत आहां इतक्यांत ती तुम्हांस येऊन मिळेल. आसदखान हे चांगले अनुभविक सरदार आहेत, त्यांचे सल्लयानें तुम्हीं चालावें." आसदखान जिंजीकडे फौज घेऊन जात असतां, तीस अडविण्याकरितां मराठ्यांनीं पुष्कळ यत्न केला; परंतु तो निष्फळ होऊन, शेवटीं मोंगलांचे सैन्यानें जिंजीस वेढा घातला ( १६९३ ).

जिंजी येथील सैन्यावर बादशहानें सुलतान खामबक्ष यास पाठवून दिल्यामुळें, झुल्फिकारखान हा अर्थात्‌च दुय्यम झाला. यामुळें तो तर

मनांत फार खट्टू झाला यांत नवल नाहीं. परंतु त्याचा बाप आसद-खान यासही वाटलें कीं, आपले पुत्रानें रायगड किल्ला घेऊन शाहू महाराज व येसूबाई ह्यांस बादशहाचे हस्तगत करून देऊन मोठा पराक्रम केला असतांही, बादशहानें त्यास आतां दुय्यम केलें हा केवळ अन्याय होय; व त्यांतूनही ही आपले दर्जातील पिछेहाट, सुलतान खामबक्ष याची आई—*जोधपुरी—जीवर बादशहाची विशेष प्रीति असे तिचे सांगण्यावरून झाली, या गोष्टीमुळें तर त्या बापलेकांस फारच वाईट वाटलें. बादशहाची ही नवीन व्यवस्था सुलतान खामबक्ष यासही आवडण्यासारखी नव्हती. कारण, जिंजी येथील सर्व सैन्याचा मुख्य अधिकारी ह्मणून जरी त्यास पाठविलें होतें, तरी त्याचे हातीं वास्तविक अधिकार नसून, त्यानें सर्वतोपरी वजीर आसदखान याचे तंत्रानें चालत जावें ह्मणून त्यास बादशहाचा हुकूम होता. राजपुत्र अल्पवयी असून तो बराच लब्धप्रतिष्ठ असल्यामुळें, बादशहानें येणेप्रमाणें आपणांस प्रथम मोठा अधिकार दिल्यासारखा करून, शेवटीं त्यानें आपला हात बराच आंखडून घेतला, हें पाहून तोही आपले मनांत नाखुषच होता. येणेप्रमाणें राजपुत्र व झुल्फिकारखान यांचीं मनें परस्परांविषयीं शुद्ध नसल्यामुळें, त्यांमध्यें लवकरच कुलंगडीं उत्पन्न होऊन, किल्ल्याचे वेढ्याचें काम चांगलें चालेनासें झालें. शत्रूचें छावणींतील ही स्थिति राजाराम महाराजांचे मंत्रिमंडळीचे लक्षांत लवकरच आली व तिजपासून सहज होणारा त्यांचा फायदा त्यांनीं लवकरच करून घेतला. त्यांनीं झुल्फिकारखान व राजपुत्र यांजकडे निरनिराळीं फितुरीचीं बोलणीं लाविलीं. तीं ऐकून दोन्हीही पक्ष लांचावले; परंतु खान हा मराठ्यांकडे विशेष वळला. (१६९४.)

झुल्फिकारखान हा या वेळचे सर्व तरुण मोंगल सरदारांमध्यें मोठा वजनदार, होतकरू व शूर असा मोडला जात होता. त्याचा बाप

---

* ही राणी जोधपूरप्रांतांतील कृष्णगड या संस्थानची राजकन्या होती, यामुळें वजीर आसदखान व त्याचा मुलगा झुल्फिकारखान यांस तिचा विशेष द्वेष व मत्सर हीं वाटत असतील असें दिसतें.

आसदखान हा बादशहाचा मुख्य वजीर असून, त्याचे चांगले मर्जीतला असल्याकारणानें, झुल्फिकारखान याजविषयींही बादशहाचा चांगला ग्रह असे. त्याच्या वयाचे इतर तरुण मोंगल सरदारांप्रमाणें हा मिजासी, नामर्द व बेहुषार नाहीं असें पाहून, विशेष महत्वाची कामगिरी असली ह्मणजे बादशहा ती याजकडेसच सांगत असे. येणेंप्रमाणें हा तरुण सरदार एकामागून एक कामगिऱ्या फत्ते करून देऊन, दिवसेंदिवस अधिकाधिक योग्यतेस चढत चालल्यामुळें, त्याचे डोक्यांत या सुमारास हळूहळू महत्वाकांक्षेचें वारें शिरूं लागलें होतें! मोंगल बादशाहीची स्थिति यावेळीं कशी बिघडून गेली होती हें यामागें सांगितलेंच आहे. बादशहा हा वयातीत झाला असून, त्याचे हातून बादशाहीचा अवडंबर कारभार रेटणें हें दिवसेंदिवस कठीणच होत चाललें आहे; त्याचे मागें त्याचे कोणतेही मुलांत विशेष कर्तृत्व नसून त्यांमध्यें एकमेकां-विषयीं अत्यंत द्वेष, मत्सर हीं मात्र असल्यामुळें, मोंगल बादशाही यापुढें फार वेळ टिकणार नाहीं; तेव्हां पुढें मागें दक्षिणेंत विजापूर किंवा गोवळकोंडें येथें आपणांस एकादें स्वतंत्र राज्य स्थापितां येईल, असे विचार झुल्फिकारखान याचे मनांत घोळूं लागले होते, व या गोष्टीस मराठे लोकांचें साहाय्य आपणांस बरेंच उपयोगीं पडेल असा त्यांचा अदमास होता. त्याचे मनाची अशी स्थिति झाली असतां, बादशहानें त्याचा अधिकार कमी केल्यानें तर, त्याचे वर सांगितलेले विचार विशेष दृढता पावूं लागले. तो, खंडो बल्लाळ चिटणीस वगैरे लोक जे राजाराम महाराजांनीं त्याजकडे बोलणें लावण्याकरितां पाठविले होते, त्यांचे बोलण्यास लवकरच वश झाला. त्या दोघांनीं आपापसांत असें ठरविलें कीं, ‘ राजपुत्राची ह्मणून कोणतीही मसलत सिद्धीस जाऊं द्यावयाची नाहीं. त्याबद्दल खानानें मराठ्यांस अगोदर बातमी देऊन त्यांस सावध करावें, किंवा तसें करितां न आलें तर लढतेवेळीं तरी त्यानें कसूर करावी. कोणी कोणावर आपण होऊन तुटून पडूं नये. सहजरीत्या गांठ पडल्यास लढाई करावी; परंतु मोड झाल्यावर कोणी कोणाचा पाठलाग मात्र करूं नये. ’

इकडे जिंजीवर स्वतः राजपुत्र व आपले पदरचे दोन उत्कृष्ट सरदार यांस त्याजबरोबर मोठी फौज व लढाईचा चांगला सरंजाम देऊन रवाना केलें आहे, तेव्हां आतां किल्ला सहज हस्तगत होऊन मराठ्यांचे राज्याचा राहिलेला अवशेष खास नष्ट होतो, अशी बादशहास मोठी आशा वाटत होती; तथापि ही मोहीम कोणतेही तऱ्हेनें फसूं नये म्हणून त्यानें आपली बडी छावणीही जिंजीचे रोखानें दक्षिणेकडे चालवून तिचा गलगला येथें मुक्काम केला; त्याचे मनांतील हेतु हा कीं, आपण बडे फौजेसह दक्षिणेकडे चाल केली म्हणजे संताजी घोरपडे वगैरे मराठे सरदार, ज्यांनीं उत्तरेकडे मोंगलांचे मुलुखांत अतिशय धुमाळी मांडली होती, ते महाराजांचे रक्षणार्थ खालीं धांवून येतील; परंतु बादशहाची ही अटकळ अगदीं चुकली. संताजी घोरपडे, रामचंद्रपंत हुकमतपन्हा वगैरे सरदार हे दक्षिणेकडे धांवून न येतां, त्यांनीं मोंगलांचे मुलूख लुटून उजाड करण्याचा सपाटा तसाच चालविला. यामुळें बादशहानें पुनः आपलें लष्कर भीमा नदीचे कांठीं ब्रह्मपुरी येथें माघारें आणिलें, व तेथेंच तो मोठी छावणी बांधून कित्येक वर्षे राहिला, व यापुढें तेथें राहूनच त्यानें लढाईची व्यवस्था चालविली.

मराठे सरदारांस हुलकावणी देण्याचा बेत फसल्यानें बादशहा बराच नाउमेद झाला. इकडे जिंजी येथील त्याचे सैन्यांत दुही होऊन फितूरही सुरू झाल्यामुळें, किल्ल्याचे वेढ्याचें काम अगदीं ढिलाईनें चालूं लागलें. दोन वर्षेपर्यंत त्याचें सैन्य किल्ल्यास वेढा देऊन राहिलें; परंतु किल्ला कांहीं केल्यानें हातीं येईना, व तो केव्हां तरी हस्तगत होईल याचीही उमेद वाटेना. इतक्यांत संताजी घोरपडे यानें मोंगलांचे मुलुखांत यथेच्छ धुमाळी करून, गंगथडी व वऱ्हाड या प्रांतांत परसाजी भोसले व हैबतराव निंबाळकर या दोन सरदारांस, मराठे शिलेदार वगैरे मंडळीस उत्तेजन देऊन, धुमश्चक्री तशीच चालू ठेवण्यास उत्तेजन देण्याकरितां मागें ठेऊन, तो स्वतः वीस हजार स्वारांनिशीं जिंजीकडे चाल करून जाण्यास निघाला. तो महाराष्ट्रांतून जात असतां, त्यास अडविण्याकरितां बादशहानें कित्येक मोठमोठ्या फौजा पाठविल्या;

परंतु कांहींकांचा पराभव करून व कांहींकांशीं सामना चुकवून, तो मोठ्या शिताफीनें बादशहाचे छावणीचे पश्चिमेकडून साताराचे रस्त्यानें दक्षिणेकडे निघून गेला. जिंजीपासून कांहीं अंतरावर येऊन पोहोंचतांच, त्यानें धनाजी जाधव याजबरोबर सहा सात हजार सैन्य देऊन, आपण मोठें सैन्य घेऊन आलों आहों हें महाराजांस समजण्याकरितां त्यास पुढें आघाडीस पाठवून दिलें. धनाजी हा मोठे त्वरेनें कूच करीत करीत जिंजीपुढें येऊन दाखल झाला. त्यानें आपलें सैन्य येऊन पोहोंचलें हें महाराजांस कळविण्याकरितांच जणूं काय, दाखल होतांक्षणींच मोंगलांचे कांहीं मोर्च्यावर हल्ला सुरू केला. मराठ्यांचें सैन्य येऊन दाखल झालें असें मोंगलांचे सरदारांनीं पाहून, आपली फौज जी किल्ल्यासभोंवतीं लहान लहान टोळ्या करून पसरली होती, ती सर्व एकत्र जमवून, उजवे व डावे बाजूंस त्यांनीं मोठमोठे जमाव करून रहावें ह्मणून त्यांनीं हुकूम केला; परंतु यावेळीं या फौजेंत कैद व शिस्त हीं किती कमी होऊन गेलीं हें मागें सांगितलेंच आहे. यामुळें सरदारांनीं हुकूम केल्याबरोबर शिपायांनीं लवकर गोळा होऊन लष्कराचे दोन्ही बाजूंस मोठमोठे जमाव करण्यापूर्वींच, एका बाजूनें किल्ल्यांतील लोकांनीं व दुसरे बाजूनें धनाजी याचे लोकांनीं हल्ला केल्यानें, मोंगलांचे सैन्याची बरीच कत्तल उडाली ( १६९६ ).

संताजी घोरपडे हा बाकी राहिलेलें सैन्य पाठोपाठ घेऊन आलाच. त्याची व कोवरीपाक येथें तेथील फौजदार अल्ली मर्दानखान याची गांठ पडून लढाई जुंपली; परंतु तींत खानाचा लवकरच पराभव होऊन, तो जिंजीकडे मोंगलांचे लष्कराकडे पळून जाऊं लागला; परंतु मराठ्यांनीं त्याचा पाठलाग करून त्यास पकडून माघारें आणिलें. इकडे त्याचें लष्कर व लढाईचें सामानसुमान अर्थात्च शत्रूंचे हातीं लागलें. या जयामुळें मराठ्यांचे फौजेस अधिक आवेश येऊन, मोंगलांचे मोर्चे पाडाव करण्याचा मोठा सपाटा लाविला. त्याचप्रमाणें त्यांनीं चोहोंकडून शत्रूंस दाणावैरण वगैरे सामान अगदीं पोहोंचूं नये व त्यांचेकडील बातमी बादशहाचे छावणीस व बादशहाचे छावणीकडील बातमी त्यांस

अगदीं लागूं नये अशी नाकेबंदी केली. इतक्यांत, बादशहा फार बेफाम झाला आहे अशी कंडी पिकवून, पुढें तो मेल्याचीही बातमी चोहोंकडे मराठे लोकांनीं पसरवून दिली. या बातम्या ऐकून मोंगलांचे सैन्यांत अर्थात्च विलक्षण अस्वस्थता व चळवळही उत्पन्न झाली. ही त्यांची अवस्था पाहून, मराठ्यांनीं सुलतान कामबक्ष याशीं बोलणें लावून, आम्हीं तुला दिल्लीचे गादीवर बसवितों असें त्यास सांगितलें. राजपुत्रास हें त्यांचें बोलणें खरें वाटून, तो त्यांस खरोखरच गुप्तपणें कबूल झाला म्हणा, किंवा त्याचे गुप्त शत्रू जे वजीर आसदखान व त्याचा मुलगा झुल्फिकारखान यांनीं, राजपुत्रानें तसें केलें असें बळेंच त्याजवर कुभांड रचिलें म्हणा, कसेंही असो; परंतु लवकरच एके रात्रीं राजपुत्रानें आपले रिसाल्यास एकाएकीं हत्यारें घेऊन तयार होण्यास हुकूम केल्याबरोबर, बापलेक सरदारांनीं राजपुत्र हा मराठ्यांस जाऊन मिळतो असें त्याजवर तुफान घेऊन, त्यांनीं त्यास एकदम नजरकैद केलें. हें फाजील धीटाईचें व पूर्ण अविचाराचें कृत्य घडतांच, मोंगलांचे लष्करांत जो घोंटाळा व कज्जा माजला असेल, याची सहजच कल्पना होण्यासारखी आहे. मराठ्यांस ह्या गोष्टीची बातमी लागतांच त्यांनीं मोंगलांवर विशेष नेटानें हल्ला चालविला व त्यांचा पुष्कळ नाश केला. अशा वेळीं राजपुत्राचे लोकांनीं साफ सांगितलें कीं, आम्हीं शत्रूशीं मुळींच लढणार नाहीं. यामुळें तर चोहोंकडे एकदम अधिकच भीति वाटूं लागून मोठी ओरडाओरड चालूं झाली. शेवटीं मोंगलांचे फौजेनें आपल्या तोफा शत्रूंचे हातीं लागूं नयेत म्हणून त्यांत दारू घालून त्या सर्व फोडून टाकिल्या व आपले सर्व मोर्चे सोडून देऊन ती सर्व एकठिकाणीं गोळा होऊन राहिली. असें झाल्यावर, अर्थात्च मराठ्यांनीं त्यांस चोहोंकडून घेरा घालून त्यांस कोंडून टाकिलें.

मोंगलांचें सैन्य अशा पेंचांत येऊन पडून, त्यांस दाणा वैरण वगैरे अगदीं मिळेनाशीं झाल्यामुळें, त्यांनीं शेवटीं तहाचें बोलणें लावलें. शेवटीं वजीर आसदखान आणि संताजी घोरपडे यांनीं आपापसांत असें ठरविलें आहे कीं, मराठ्यांनीं कांहीं एक उपद्रव

न करितां मोंगलांचे फौजेस वांदिवाना येथें जाऊं द्यावें; परंतु बादशहाकडून उत्तर येईपर्यंत त्यांनीं पुढें मात्र जाऊं नये, आणि उत्तर जसें येईल त्याप्रमाणें मोंगलांचे फौजेनें चाललें पाहिजे. वजीरानें लिहून कळविलेली हकीकत बादशहानें वाचून पाहतांच, राजपुत्र व आसदखान यांस पाठविल्यानें झालेली आपली चूक त्याचे ध्यानांत आली; व यापुढें जिंजी येथें दोघांस ठेविल्यानें अधिकच वाईट परिणाम होईल असें जाणून, त्यानें लागलेंच राजपुत्र व आसदखान यांनीं तावडतोब माघारें यावें व झुल्फिकारखान यानें एकट्यानेंच मराठ्यांबरोबर पुढें लढाई चालवावी असा हुकूम पाठवून दिला, व तो स्वतः आपली छावणी घेऊन विजापुरास गेला.

राजपुत्र कामबक्ष व आसदखान हे निघून जाऊन, सर्व सैन्य पुनः झुल्फिकारखान याचे एकट्याचेच हातीं आल्यावरही तो आंतून मराठ्यांकडे फितुर झाला असल्यामुळें, तो जिंजी येथील वेढ्याचे कामास बराच वेळ लागेचना. तहाचें बोलणें चाललें असतां, कर्नाटकचा फौजदार हा मोंगलांचे लष्कराकरितां धान्याचा वगैरे बराच सांठा घेऊन येत असतां, त्याजवर मराठे लोकांनीं हल्ला केला होता; परंतु त्यानें जेमतेम करून कोवरीपाकचें ठाणें गांठलें व त्यानें आणलेला सांठा शत्रूचे हातीं पडूं दिला नाहीं. त्याचप्रमाणें वरील तहाचे अवकाशांत मोंगलांचे *परमेकाइल वगैरे कित्येक किल्ले हस्तगत करून घेतले होते. येणेंप्रमाणें मराठे लोकांनीं तह पाळला नाहीं असा त्यांस शब्द लावून, त्यांची खोड मोडण्याकरितां झुल्फिकारखान ह्यानें प्रथम दक्षिणेकडे कुच करून मराठ्यांपासून आपले किल्ले परत घेतले. यानंतर त्यानें त्रिचनापल्ली येथील राजास आपलासा करून घेऊन, त्याचीं कांहीं ठाणीं, व्यंकोजी राजे यांचे पुत्रानें बळकाविलीं होतीं तीं त्याजकडून त्यास परत करविलीं व आपण स्वतः तंजावरपासून चांगली मोठी खंडणी वसूल केली. येणेंप्रमाणें मुलखाचा बंदोबस्त करून झुल्फिकारखान हा जिंजीस येऊन पुनः वेढा देऊन बसला.

* चिटणीसांची राजाराम महाराजांची बखर.

खानाचें आणि राजाराम महाराजांचें पूर्वीप्रमाणें आंतून सूत होतेंच. यामुळें बाहेरच मुलुखांत असतां, जरी खानानें चांगली बहादरी दाखविली, तरी वेढ्याचें काम सुरू होतांच त्यानें पूर्वीची ढिलाई पुनः आरंभिली. यावेळीं त्याचे हातांत फार मोठी फौज आली होती व त्यास वाटे कीं, मराठ्यांची ही लढाई अशीच कांहीं वर्षे चालू राहिली तरच ही फौज आपले ताब्यांत राहील; मग मध्यंतरीं वयातीत झालेला बादशहा हा मरण पावला ह्मणजे, आपले स्वतंत्र राज्य स्थापण्याचे वगैरे बेत सिद्धीस नेण्यास आयतेंच फावेल. झुल्फिकार-खानाचा बाप आसदखान व दुसरे उमरावांचीही अशीच इच्छा होती. ही दक्षिणेंतील लढाई लवकर संपूं नये; ह्मणजे अर्थात्च आपणांस मोठमोठे अधिकार राहून आपले ताब्यांत फौजा राहतील.* ही गोष्ट वृद्ध बादशहाचेही लक्षांत येऊन चुकली होती. मागें, राजपुत्र कामबक्ष व झुल्फिकारखान यांमध्यें चुरस उत्पन्न होऊन, मोंगलांचें सैन्य मराठ्यांचे फौजेकडून कोंडलें गेलें, ही बातमी जेव्हां त्यास येऊन पोहोंचली, तेव्हां तो एक वेळ फार त्रासून आपले जवळचे विश्वासु असे लोकांस ह्मणाला "या लबाड उमरावांनीं मला या लढाईस लावून देऊन मला फसविलें. आतां पहा त्यांस कसें मोठमोठे अधिकार चालविण्यास व मोठमोठ्या फौजा हातांत ठेवण्यास फावलें आहे!!¶" औरंगजेब बादशहास एकदां पराजय झाला ह्मणजे कधीं कधीं वर सांगितल्याप्रमाणें उद्वेग येई; परंतु एरवीं त्यास ही मराठ्यांबरोबरची लढाई आतां रायगड घेतला ह्मणजे एकदांची संपते; त्यानंतर जिंजीचें बंड मोडून टाकलें ह्मणजे ती खास संपेल व सर्व देश या समुद्रापासून त्या समुद्रापर्यंत आपले ताब्यांत येतो, अशी त्यास एकसारखी अत्युत्कट आशा लागून राहिली होती. तेव्हां बादशहाचे मनाची अशी स्थिति असल्याकारणानें, झुल्फिकारखान वगैरे मंडळींनीं ही लढाई बरेच ढिलेपणानें चालविली होती; तथापि फारच ढिलाई केली असतां

---

* चिटणीसांची राजाराम महाराजांची बखर.

¶ एल्फिनस्टनचा इतिहास--टीप पान ६५७.

बादशहा कामावरूनच अज्ञो दूर करील अशी त्यांस भीति असल्यामुळें, त्यांस कधीं कधीं चांगली बहादरी करून दाखवावी लागे. अशी स्थिति असल्यामुळें, जिंजीचे वेढ्याचें काम मोठेसें नेटानें चाललें नव्हतें.

मागें सांगितल्याप्रमाणें, झुल्फिकारखान हा तंजावरकडे गेला असतां, संताजी घोरपडे यानें विजापूरचे बाजूनें कर्नाटकांत शिरून, तो प्रांत लुटून अगदीं उजाड करून सोडिला. ही बातमी बादशहास विजापुरास लागतांच, त्यानें आपले कांहीं सरदार बरोबर मोठें सैन्य देऊन, संताजीची खोड मोडण्याकरितां त्याजवर पाठवून दिले. कर्नाटक प्रांताचा फौजदार कासीमखान हाही या सैन्यास येऊन मिळाला; परंतु बादशहानें पाठविलेली मंडळी ही मागें सांगितलेल्या मिजासी, बेकैद, व बेहिंमतवान अशा तरुण सरदारांपैकीं होती. संताजी यास या नवीन स्वारीची खबर लागून, मोगलांची फौज बाहेर पडून तिचे आघाडीचे शिपाई कोठें तंबू ठोकीत बसले आहेत, इतक्यांत त्यानें तिजवर असा एकाएकीं जोरानें हल्ला केला कीं, वरील बडी सरदार मंडळी जामानिमा आटोपून गजारूढ होण्यापूर्वीच, आपले पाहऱ्याचे शिपाई कापले जाऊन बहुतेक सर्व सैन्य पळायाला लागून त्यांचे मागें चोहोंकडे मराठे लोक लागले आहेत, असें त्यांचे दृष्टीस पडलें.

मोंगलांचे फौजेवर, सर्वांवर मुख्य असा कोणीएक वजनदार सरदार नव्हता. ती कित्येक तरुण व अनुभवरहित अशा सरदारांचेच स्वाधीन होती. त्यांमध्यें विशेष हुषार असा कासीमखानच काय तो होता; परंतु त्याचा अधिकार त्याचे स्वतःचे फौजेपुरताच असल्यामुळें, बाकीचे सरदार याप्रसंगीं ज्यांस जसें सुचेल तसें ते लढून आपला बचाव करून घेऊं लागले. मराठे लोकांनीं त्यांची ही स्थिति पाहून त्यांजवर दिवसां वरचेवर हल्ले करून व रात्रीं मध्येंच त्याजवर दारूचे बाण टाकून त्यांस अगदीं जेर केलें. शेवटीं तिसरे दिवशीं, मोंगलांची फौज दोधारीचे गढीस लागून, तेथें त्यांस कांहीं विसावा मिळाला; परंतु यावेळपर्यंत त्यांचे जवळची अन्नसामुग्री अगदीं संपून गेली होती.

गढीचे भिंतीवरून खालीं सोडून वाणीलोक धान्य विकीत; परंतु तें अतिशय महाग विकीत. शेवटीं गढींतीलही धान्य संपलें. तेव्हां अर्थात्च पुष्कळ लोक उपासानेंच मरण पावूं लागले; परंतु आपण एरवीं भुकेनें मरतों आहोंच तर लढूनच कां मरूं नये, व झाली तर आपली सुटका कां करून घेऊं नये, असें त्या फौजेस वाटलें नाहीं. तिचा अगोदरच पराभव झाला असल्यामुळें व तिजवर नामर्द असे सरदार असल्यामुळें तीस हिंमतच वाटेना! या फौजेची याप्रमाणें वाताहत झाल्याची बातमी बादशहास लागतांच, त्यानें तिचे मदतीस दुसरी आणखी एक फौज, खानजहान बहादूर याचा मुलगा हिंमतखान याजबरोबरही पाठवून दिली; परंतु ही बातमी दोधारीचे फौजेस लागण्यापूर्वींच, संताजीनें खानाचे फौजेची खबर राखून, ती बरेच अंतरावर असतांच तीस गांठून, तिचा अगदीं मोड करून टाकला. येणेंप्रमाणें उपासानें मरण्याशिवाय आतां दुसरी गति नाहीं असें दोधारी येथील मोंगल सरदारांनीं पाहून, ते मराठ्यांस शरण येऊन त्यांचे स्वाधीन झाले. संताजीनें त्यांचें लढाईचें सर्व सामानसुमान लुटून घेऊन व प्रत्येकापासून चांगली मोठी खंडणी उगवून, मग त्यांस बादशहाचे छावणीकडे जाऊं दिलें. कासीमखान मात्र विशेष इभ्रतीचा व बाण्याचा माणूस असल्याकारणानें, त्यास तसें करणें लज्जास्पद वाटून, त्यानें विष खाऊन प्राण दिला. छावणीस परत आल्यावर, बादशहानें या फजीतखोर सरदारांचे अधिकार काढून घेऊन, त्यांस दूरदेशीं कोठें तरी लहानसहान कामांवर पाठवून दिलें.

हिंमतखान हा वर सांगितल्याप्रमाणें दोधारी नजीक पराभव पावल्यावर तो बादशहाकडे परत गेला, व त्याजपासून आणखी जास्त फौज कुमकेस घेऊन तो पुनः संताजीचे फौजेवर चालून आला. दोन्ही सैन्यांची प्रथम मैदानावर कांहीं वेळ चांगलीच चकमक झडली; परंतु इतक्यांत मराठ्यांनीं पराभव झाल्यासारखें दाखवून ते चोहोंकडे पळूं लागले. त्यासरसें मोंगलांचे सैन्यास अधिक अवसान येऊन, तें मराठ्यांचे मागें मोठे त्वेषानें लागलें. इतक्यांत मैदान संपून उंच सखल

व मधून मधून मोठमोठे चर गेले आहेत, अशा अवघड जमिनीवर शत्रूचें सर्व सैन्य गुलकावून आपले मार्गे आलें असें पाहतांच, मराठे लोक एकदम त्यांजवर उलटले, व त्यांनीं त्यांचे फुटलेले टोळ्यांवर जोरानें हल्ला करून त्यांचा अगदीं मोड करून टाकला. या लढाईंत हिंमतखान हा मारला गेला, व त्याचें लढाईचें सर्व सामानसुमान मराठ्यांचे हातीं लागलें. ( १६९६.)

यानंतर संताजी घोरपडे हा जिंजीकडे परत आल्यावर, त्याजवर झुल्फिकारखान यानें हल्ला करून त्यास बरेंच दूर हांकून लाविलें; परंतु खान हा पुनः वेढ्याचें काम सुरू करण्याकरितां परतला असतां, संताजी हा पुनः त्याचे पाठीवर आलाच. येणेंप्रमाणें झुल्फिकारखान व संताजी यांची दोस्ती जुळली असल्यामुळें, दोघांनीं हा लपंडावच चालविला होता. इकडे जिंजीचे वेढ्याचें कामही अगदीं थंडपणें व कांहीं रक्तस्राव न होतांच चाललें असतें; परंतु झुल्फिकारखान याचे हाताखालीं दाउदखान ह्मणून जो दुय्यम होता, तो मराठ्यांस फितला नसून त्याचे अंगांत मूर्तिपूजक लोकांचा संहार करण्याचें वारें बरेंच खेळत असे. त्यास दारूचें व्यसन फार असल्यामुळें, तो ती पिऊन तर्र झाला ह्मणजे, आपले लोकांस वरचेवर किल्ल्यावर हल्ला करण्यास नेत असे.

वर सांगितल्याप्रमाणें दोन्ही पक्षांकडील मुख्य सरदारांचा लपंडाव चालून, झुल्फिकारखान हा आपले धन्याशीं जशी बेइमानी करीत होता, तशीच संताजी ही आपणांशीं करीत आहे, असा राजाराम महाराजांस संशय उत्पन्न झाला. कारण, एवढें मोठें सैन्य हातांत असून, त्यानें १६९७ सालभर इकडून तिकडे पळापळीपेक्षां विशेष कांहींच केलें नाहीं. संताजीविषयीं महाराजांचा ग्रह बरेच दिवसांपासून वाईट झाला होता; परंतु प्रल्हाद निराजी यानें मध्यें पडून महाराजांस थोपून धरलें होतें. संताजी आणि धनाजी जाधव यांचीही परस्परांत बरीच चुरस असून त्यांचीं मधून मधून चांगलींच भांडणें होत; परंतु पंतप्रतिनिधी यानीं तीं तोडीत जाऊन, दोघांसही आटोक्यांत ठेविलें होतें; परंतु

या सुमारास प्रल्हाद निराजी हा मरण पावल्यामुळें, संताजी व धनाजी यांमधील कज्जे पुनः सुरू झाले, व राजाराम महाराजांचे मनांतही सेनापतीविषयीं जास्त जास्त संशय येत चालला. शिवाय संताजी याचे मनांत, शिवाजी महाराजांचे वेळीं सैन्यांत जशी कैद व व्यवस्था असे, तशी पुनः सुरू करण्याची इच्छा होती; यामुळें तो विशेष प्रसंगीं अधिक कडक व कैदखोररीतीनें वागे. हें अर्थात्च शिलेदार व सरदार मंडळीस पसंत न पडून, त्याचे वाईटावर बरेच लोक उत्पन्न झाले होते. यांचेपैकीं कांहींकांनीं, महाराजांचें मन त्याचेविषयीं बिघडवून देऊन, त्या दोघांचें अगदीं वांकडेंच आणिलें. महाराजांनीं धनाजीस उत्तेजन देऊन, त्याचेकडून सेनापतीविरुद्ध मोठा तट केला. मराठे सरदारांमध्यें झालेली ही दुफळी बादशहाचे कानावर जातांच, त्यानेंही मराठे सरदारांमधील आपले साथ्यांकडून ती अधिकाधिक करण्याची व तिजबद्दल आपणांस वित्तं बातमी कळण्याची तजवीज चालविली.

येणेप्रमाणें राजाराम महाराजांचे लष्करांत दुफळी झाल्यामुळें, मराठ्यांचें सैन्य आतां बरेंच निर्बळ झालें. त्यांनीं पूर्वीं चोहोंकडे जो अनिवार सुळसुळाट मांडला होता, तो अगदीं थंड पडत चालला. यामुळें आतां लवकरच जिंजी हातीं लागते व मराठे लोकांचा बंडावा नाहींसा होतो असें औरंगजेब बादशहास वाटूं लागलें. झुल्फिकारखानासही, इतके दिवस त्या लोकांचा बादशहास बाऊ दाखवून आपल्या हातीं मोठें सैन्य राखून ठेवण्यास व लढाई लांबविण्यास जें निमित्त सांपडलें होतें, तेंही आतां नाहींसें झालें. बादशहाजवळ त्याचा बाप आसदखान वगैरे जे त्याचे कित्येक आप्त होते, त्यांनीं त्यास आतां सांगून पाठविलें कीं, "याउपर तुमचे हातून जिंजी जर हस्तगत होणार नाहीं, तर बादशहा खरोखरच तुह्मांस दूर कोठें तरी पाठवून देऊन, तुमचें काम दुसरे कोणास सांगेल." मित्रांची ही इषारत पोहोंचतांच, खानास त्यांचें ह्मणणें खरें वाटलें व त्यानें पाहिलें कीं, आतां जिंजी घेतल्याशिवाय आपला अधिकार खचित रहात नाहीं; तथापि राजाराम महाराजांचें व त्याचें बरेच दिवसांपासून जें सूत जुळलें होतें, तें त्यास

एकाएकीं मोडतां येईना. त्यानें महाराजांस निरोप पाठविला कीं, "याउपर मला निकरानें लढून किल्ला घेतल्याशिवाय गति नाहीं. बादशहा मजवर फार फार नाइराज झाला आहे. किल्ला लवकर हातीं न आला तर, तो माझा अधिकार आतां खास काढून घेईल. तेव्हां तुम्हांस आपला बचाव करणें असेल तर, आठ दिवसांचे आंत तुम्ही शिर्के, मोहिते वगैरे मराठे सरदार, जे आमचे लष्करांत आहेत त्यांजबरोबर संधान करून, गुप्तपणें बाहेर निघून जावें. आठ दिवसांनंतर वेढ्याचें काम आम्हांस जारीनें सुरू करावें लागेल; मग मात्र माझा नाइलाज होईल."

खानाचा हा निरोप येऊन पोहोंचल्यावर, राजाराम महाराजांनीं आपलें प्रधानमंडळ बोलावून आणून त्यांजबरोबर अशी मसलत ठरविली कीं, आपण स्वतः अष्ट प्रधानांसह गुप्तपणें जिंजीचे किल्ल्यांतून निघून महाराष्ट्राकडे परत जावें. यापुढें येथल्यापेक्षां आपला जम तिकडेसच विशेष बसेल; कारण आलीकडे रामचंद्रपंत हुकमतपन्हा यानें बराच जोर धरून सिंहगड, पुरंधर, राजगड, रोहिडा वगैरे किल्ले मोंगलांपासून परत जिंकून घेतले आहेत; व त्याचे खालोखाल शंकराजी नारायण व परशुराम त्र्यंबक हेही चांगल्या मसलती फत्ते करीत चालले आहेत. परंतु प्रथम येथून निभावून निघून गेलें पाहिजे. याकरितां खानानें सुचविल्याप्रमाणें शिर्के यांचे गोटांत जाऊन त्यांचेमार्फत गुप्तपणें पळून जाण्याविषयीं बोलणें लावण्याचें काम, खंडो बल्लाळ चिटणीस यानें पतकरिलें. तो रात्रीं किल्ल्याचे बुरुजावरून पाळण्यांत बसून खालीं उतरला व शिरक्यांचे गोटांत गुप्तपणें जाऊन, त्यानें गणोजी व राणोजी शिर्के यांजपाशीं आपली गोष्ट काढली. प्रथम ते ती गोष्ट कबूल करीतना. मागें संभाजी महाराजांनीं, बहुतेक शिर्क्यांचा जो वध केला होता, तो त्यांचे पोटांत डाचत होता; तथापि कांहीं वेळानें कांहीं आढेवेढे घेऊन ते म्हणाले कीं, "दाभोळ गांवचें वतन व भोर तालुक्यांत तीन व रत्नागिरी तालुक्यांत पांच गांव इनाम असे आम्हांस, व आमचे सोयरे धाकटे मोहिते यांस, रत्नागिरी तालुक्यांतील

कुचरी गांव असे इनाम करून द्याल तर, आह्मीं तुमचे मसलतींत पडतों." चिटणीसानें ह्या सर्व अटी कबूल करून, शिर्के व मोहिते यांजबरोबर महाराज व मुख्य प्रधान ह्यांना गुप्तपणें कसें सुटून जावें याबद्दल मसलत ठरविली. त्याप्रमाणें एके दिवशीं रात्रीं राजाराम महाराज व मुख्य मुख्य मंत्री हे पाळण्यांत बसून बुरुजावरून खालीं उतरले व त्या रात्रभर ते शिर्क्यांचेच गोटांत छपून राहिले. दुसरे दिवशीं पहाट होण्यापूर्वीच, शिर्के हे शिकारीचें निमित्त करून बाहेर पडले व त्यांनीं आपणांबरोबर राजाराम महाराज व त्यांची मंडळी यांस वेष पालटून बरोबर घेतलें. कांहीं कोस गेल्यावर संकेताप्रमाणें धनाजी जाधव, दाभाडे वगैरे सरदार अगोदर तेथें आलेच होते, त्यांत महाराज व त्यांचे प्रधान मंत्री जाऊन मिळाले. यानंतर, रामचंद्रपंत हुकमत-पन्हा यांस, आपण जिंजीतून पार पडलों व महाराष्ट्रांत लवकरच येऊन दाखल होतों ; तुह्मीं फौजा जमा करून नीट व्यवस्था लावून ठेवा, ह्मणून महाराजांनीं पुढें निरोप धाडला. ते स्वत: शत्रूंचा माग चुकवून मोठे सावधगिरीनें विशाळगड येथें सुखरूप येऊन पोहोंचले ( डिसेंबर १६९७ ).

राजाराम महाराज जिंजी सोडून गेल्यावर, त्यांनीं तो किल्ला हरजी राजे महाडीक यांचे पुत्राचे स्वाधीन केला होता. महाराज निघून गेल्यावर किल्ल्यांतील लोकांनीं किल्ला भांडण्याचा नाद सोडून देऊन झुलफिकारखानाकडे तहाचें बोलणें लाविलें. त्यास पक्कें ठाऊक होतें कीं, राजाराम महाराज हे किल्ल्यांतून अगोदरच पळून गेले आहेत; परंतु आपले हाताखालील सरदार लोकांस त्या गोष्टीचा संशय न यावा ह्मणून त्यानें मोठा आव आणून ह्मटलें, "किल्ला तर आह्मीं सर करणार ; त्यांतील प्रत्येक माणूस आह्मीं ठार करणार. या एका किल्ल्यासाठीं आमचें किती माणूस आज पांच वर्षें खराब होत आहे !" परंतु कांहीं वेळानें अंमळ राग गेल्यासारखें दाखवून खान पुन: बोलला कीं, "इतर माणसांस आह्मीं सोडून देऊं; परंतु राजाराम महाराज व त्यांचे प्रधान यांस आह्मीं सोडणार नाहीं. त्यांस आह्मांस बादशहा-पुढें नेऊन हजर केलें पाहिजे."

येणेप्रमाणें तहाचें कांहीं बोलणें निवालें; परंतु तें पुढें कांहीं कारणांनीं फसून, अखेर तरवारीसच गांठ घालावी लागली. झुल्फिकारखान यानें किल्ल्यावर हल्ला करवून व मोठ्या शर्तीनें लोक वर चढवून एकदांचा किल्ला हस्तगत केला. आपण बरेच वेळ बादशहाशीं बेइमानी केली; तेव्हां त्यास तिचा संशय येऊन, तो आपणांवर बराच रागावला असेल, तर त्याचा राग शांत करण्याकरितां झुल्फिकारखान यानें बराच आंव आणून, शत्रूकडील पुष्कळ लोकांस जन्मकैदेची शिक्षा दिली. कित्येकांस बंडखोर ह्मणून फांशी दिले, व पुष्कळ दौलत गोळा करून ती बादशहाकडे पाठवून दिली. ( जानेवारी १६९८. )

राजाराम महाराज निघून गेल्यावर त्यांच्या स्त्रिया किल्ल्यांतच होत्या. त्या शत्रूचे हातीं लागू नयेत ह्मणून, किल्ला हस्तगत होतांच शिर्के व मोहिते ह्यांनीं झुल्फिकारखानास अर्ज केला कीं, आमच्या आप्तांच्या स्त्रिया किल्ल्यांत आहेत, त्या आमचे ताब्यांत द्याव्या. त्यावरून खानानें त्यांची विनंति मान्य करून, त्यांचे ताब्यांत स्त्रिया देण्यास सांगितलें. त्या शिर्के व मोहिते यांच्या स्वाधीन होतांच, त्यांनीं त्यांस गुप्तपणें मोठे तजविजीनें विशाळगडास नेऊन पोहोंचत्या केल्या. यानंतर तेही नीटशी संधि पाहून मोंगलांची छावणी सोडून राजाराम महाराजांस येऊन मिळाले.

येणेंप्रमाणें जिंजीचा किल्ला पाडाव होऊन राजाराम महाराजांचें दक्षिणेकडील राज्य नाहींसें झालें; परंतु याहीपेक्षां त्यांचें याच सुमारास दुसरें मोठें नुकसान झालें. हें, त्यांचा सेनापती संताजी घोरपडे त्याचा पाडाव, हें होय. संताजीविषयीं महाराजांस संशय येऊन त्याचे विरुद्ध सरदारांचा तट करण्यास, त्यांनीं धनाजी जाधव यास सांगितलें ह्मणून मागें सांगितलेंच आहे. त्याप्रमाणें धनाजीनें व्यवस्था करवून, सेनापतीचें सैन्यही गुप्तपणें फितवून घेतलें. यानंतर संताजी हा विजापुरास असतां, त्याजवर धनाजीनें आपल्या व संताजीचे फितविलेल्या सैन्यासह एकाएकीं हल्ला केल्यामुळें, सेनापती यास थोडे विश्वासु लोकांसह जीव घेऊन पळून जातां जातां पंचाईत पडली.

या सैन्यानें कांहीं वेळ त्याचा पाठलाग केला; परंतु तो रानोमाळ पळूं लागल्यामुळें, त्याचे पाठीवर तीन चार लहान लहान टोळ्या मात्र रवाना केल्या. बाकी सैन्याच्या दोन मोठ्या टोळ्या होऊन, एक धनाजी जाधव याजबरोबर कर्नाटकाकडे निघाली. कारण, या प्रांतांत झुल्फिकारखान यानें, जिंजी घेतल्यानंतर मोठा जोर करून व्हेलोर शहर घेण्याची मोठी खटपट चालविली होती. दुसरी टोळी महाराष्ट्रांत राजाराम महाराजांस येऊन मिळण्यास चालली.

इकडे संताजी याचे मागें धनाजीच्या ज्या टोळ्या लागल्या होत्या, त्या सर्वांस मोठे युक्तीनें चुकवून तो या गांवाहून त्या गांवीं, त्या गांवाहून पुढच्या गांवीं असा चालला होता; परंतु नागोजी माने ह्मणून कोणी ह्मसवडचा देशमुख होता, तो त्याची पाठ सोडीचना. त्याची आणि सेनापतीची कांहीं घरगुती चुरस असल्यामुळें, त्यानें त्याचा पाठलाग मोठे निकरानें चालविला. शेवटीं एके दिवशीं बरोबर जे थोडे विश्वासु शिपाई राहिले होते, तेही सर्व सोडून गेल्यावर, सेनापती हा थकून भागून जवळ कोणी शत्रु नाहीं असें समजून एका ओढ्यांत एकटाच स्नान करीत असतां, त्याजवर नागोजी हा हातांत तलवार घेऊन एकाएकीं धांवून आला. बिचारा संताजी हा गैरसावध असून त्याजपाशीं हत्यार नसल्यामुळें, नागोजीनें त्यास लवकरच ठार केलें. यानंतर त्या राक्षसी देशमुखानें, सेनापतीचें डोकें कापून घेऊन त्यानें तें बादशहाकडे छावणींत पाठवून दिलें, व त्याच वेळीं अर्ज केला कीं, मला पुनः बादशाहीचे चाकरींत घ्यावें. नागोजी हा पूर्वीं बादशहाकडे मिळून कांहीं वेळानें तो पुनः राजाराम महाराजांकडे आला होता; परंतु आतां वरील दुष्ट कृत्यानें बादशहाचा लोभ संपादण्याचा त्यानें पुनः एकवार यत्न चालविला. हा अर्थात्च लवकर सफळ झाला. कारण, बादशहानें सेनापतीचें शीर पाहून नागोजीची मोठी तारीफ केली व त्यास त्यानें मोठे संतोषानें आपले पदरीं पुनः ठेऊन घेतलें व त्याची पूर्वीपेक्षांही योग्यता वाढविली. येणेंप्रमाणें ज्या शूर सेनानायकानें मोंगलांचे सैन्यांस सहा सात वर्षेपर्यंत भयानें

थरारून टाकिलें होतें व ज्यानें शिवाजी महाराजांचे मागें नाशास प्रवृत्त झालेल्या मराठी राज्यास पुनः तरतरीत केलें, त्याचा शेवटीं अति नीच व दुष्ट अशा मनुष्याचे हातून फार भयंकर रीतीनें शेवट झाला!! * (१६९८).

इकडे राजाराम महाराज हे विशाळगडाहून साताऱ्यास आले, व रामचंद्रपंताचे सांगण्यावरून त्यांनीं हेंच ठिकाण आपली यापुढें राजधानी केली. या सुमारास जनार्दनपंत हनुमंते हे वारल्यामुळें, त्यांची अमात्याची जागा महाराजांनीं रामचंद्रपंत हुकमतपन्हा यास, त्यानें नुकतीच आपल्या मागें महाराष्ट्र देशाची उत्तम व्यवस्था ठेऊन जी मोठी कामगिरी बजाविली, तिजबद्दल दिली. ही जागा शिवाजी महाराजांचे वेळीं कांहीं दिवस रामचंद्रपंताकडे असून, १६७६ सालीं रघुनाथ नारायण, हा जेव्हां व्यंकोजी राजे यांचेपासून निघून महाराजांकडे आला, तेव्हां त्याची अधिक योग्यता जाणून रामचंद्रपंतापासून ती काढून रघुनाथ नारायण यास दिली होती, असें मागें सांगितलेंच आहे. याप्रमाणें रामचंद्रपंतास ही जागा बावीस वर्षांनीं त्याचे चांगले योग्यतेमुळें पुनः प्राप्त झाली. त्याचप्रमाणें, शंकराजी मल्हार सचीव हा, जिंजीस वेढा पडला असतां, यापुढें मराठीराज्य टिकणार नाहीं असा नाउमेद होऊन सर्व संसारपरित्याग करून काशीवास करण्यास निघून गेल्यामुळें, त्याचे जागीं महाराजांनीं रामचंद्रपंत याचे हाताखालील मागें सांगितलेला हुशार कारकून शंकराजी नारायण गैंडेकर यास नेमिलें; परंतु रामचंद्रपंत याचा दुय्यम परशुराम त्र्यंबक याचा या बढतीवर अधिक हक्क पोहोंचत असल्यामुळें, त्यास बरेंच वाईट वाटलें. याचवेळीं जनार्दनपंत हनुमंते याचा पुतण्या तिमाजी रघुनाथ जो जिंजी येथें

---

* संताजी घोरपडे याचे मरणाची ही हृदयद्रावक गोष्ट वाचून, रोमचे इतिहासांतील त्याजसारखाच मोठा सेनानायक जो पांपे, हा पराजय पावून आपले शत्रूपासून पळून जात असतां मिसर देशांत अशाच क्रूर रीतीनें मारला गेला, त्याची इतिहासज्ञांस सहजच आठवण होण्यासारखी आहे.

कैदेंत होता, तो तेथून मोठे युक्तीनें सुटून महाराजांकडे आला व त्याचे बापानें व चुलत्यानें पूर्वीपासून मोठमोठ्या कामगिरी बजाविल्या असल्यामुळें, त्यास प्रधानमंडळींत घेणें प्राप्त होतें. प्रल्हाद निराजी याचे मागें, त्याचा मुलगा नारो प्रल्हाद यास प्रतिनिधिपद दिलें होतें; परंतु तो जिंजी येथें धरला जाऊन फांशीं दिला गेल्यामुळें, प्रतिनिधीची रिकामी जागा, महाराजांनीं तिमाजी रघुनाथ यास दिली. संताजी घोरपडे याचे मागें सेनापतीची जागा धनाजी जाधव यास मिळाली.

समुद्रावरील आरमाराचा सरदार सिदोजी गुजर हाही याच सुमारास मरण पावला. त्यानें सिद्धी यास चांगलें अटकेंत ठेऊन कोंकणप्रांताचा चांगला बंदोबस्त ठेविला होता. त्याचा दुय्यम कान्होजी आंग्रे यानें, दुसरे देशांतून येणाऱ्या जहाजांवर हल्ला करून पुष्कळ दौलत गोळा केली. त्याचा दरारा सर्व किनाऱ्याभर चांगला पसरला असे. राजाराम महाराजांनीं आंग्रे यास, सरखेल, असा किताब दिला. आरमाराचें मुख्य ठिकाण कुलाबा हें असून, त्याचे खालोखाल सुवर्णदुर्ग व विजयदुर्ग हीं असत.

१०. इकडे महाराष्ट्रांत राजाराम महाराजांचे दरबारांत वरील घडामोडी चालल्या असतां, दक्षिणेंत कर्नाटक प्रांतांत सेनापति धनाजी जाधव याची आणि झुल्फिकारखान याची मोठी निकराची झटापट चालली होती. खानाचें आणि संताजीचें मागें जसें आंतून जुळलेलें असे, तसें धनाजीशीं जुळलें नव्हतें; यामुळें तो या प्रसंगीं अगदीं मनापासून लढत होता. शिवाय धनाजीचें वजन मराठे शिलेदार मंडळी व शिपाई यांमध्यें जरी संताजीपेक्षां अधिक असे, तरी तो लढाईचे कामांत माजी सेनापतीइतका कुशल नसल्यामुळें, झुलफिकारखान याजपुढें त्याचा टिकाव लागेना, व पुष्कळ ठिकाणीं मोंगलांकडून त्याचे पराभव होत चालले. येणेंप्रमाणें कर्नाटक प्रांतांत मोंगलांची चोहोंकडे चढाई होत चाललेली ऐकून बादशहास मोठा संतोष झाला; परंतु इतक्यांत उत्तरेकडे त्याचे मुलुखांवर मराठ्यांचे सैन्याचें जें एक प्रचंड

वावटळ उठलें, तेणेंकरून तो अगदीं घाबरून गेला व त्याचे निवारणार्थ त्यास प्रथम योजना करणें भाग पडलें. ( १६९९. )

राजाराम महाराज सातारा येथें कांहीं वेळ राहून, नंतर ते सैन्य घेऊन उत्तरेकडे चालले. त्यांस परसाजी भोसले, हैबतराव निंबाळकर, नेमाजी शिंदे, आटोळे, समशेर बहादर वगैरे सरदार जे इतका वेळ खानदेश, गंगथडी व वऱ्हाड हे प्रांत लुटीत राहिले होते, ते येऊन मिळाले. यामुळें राजाराम महाराजांपाशीं आतां येवढें मोठें सैन्य जमलें कीं, तितकें मागें शिवाजी महाराजांचे वेळींसुद्धां कधीं जमा झालें नव्हतें. हें सैन्य घेऊन महाराज प्रथम गंगथडीचे प्रांतांत शिरले, व तेथें चौथ व सरदेशमुखीचे आपले हक्क वसूल करण्याचा त्यांनीं सपाटा लाविला. ज्या ज्या गांवीं लोकांनीं तक्रार न करितां वसूल दिला, त्यांस कांहीं उपद्रव पोहोंचला नाहीं; ज्या ज्या मोंगलांचे ठाण्यांनीं महाराजांस अडथळा केला नाहीं, त्यांसही कांहीं इजा झाली नाहीं; परंतु जेथें जेथें ह्मणून लोकांनीं किल्ले अगर ठाणीं भांडण्याचा आव घातला, तेथें तेथें सर्व लोकांस ठार केलें. मराठ्यांचे सैन्यानें यावेळीं आपले हक्क वसूल करण्याचा जो क्रम सुरू केला, तो पूर्वीपेक्षां अधिक पद्धतवार होता. जेथें जेथें त्यांस तावडतोब रोकड पैसा मिळाला नाहीं, तेथून ते पाटलापासून अमुक अमुक पैसा आह्मांस अद्याप द्यावयाचा आहे, व तो लवकरच आह्मीं तुह्मांस पाठवून देऊं, अशा मतलबाच्या फक्त चिठ्याच घेऊन ते पुढें चालते होत. येणे-प्रमाणें राजाराम महाराजांनीं गंगथडी, नांदेड, वऱ्हाड व खानदेश या प्रांतांतून एक स्वारी पुरी करून, कित्येक गांवचे पाटलांकडून जो वसूल घेणें राहिला होता, तो त्यांजपासून घेण्याकरितां बागलाण प्रांतांत खंडेराव दाभाडे, खानदेशांत नेमाजी शिंदे, वऱ्हाडांत परसाजी भोसले व गंगथडींत हैबतराव निंबाळकर यांस ठेऊन, महाराज स्वतः जालन्याचे रोखानें दक्षिणेकडे परत येण्यास निघाले. ( १६९९. )

येणेंप्रमाणें उत्तरेकडे राजाराम महाराजांची मोहीम सफळ होऊन आपले मुलुखांतून ते बिनहरकत खंडण्या वसूल करीत चालले आहेत,

हें ऐकून बादशहास अतिशय वाईट वाटलें. जिंजी एकदांची घेतली म्हणजे मराठ्यांचें बंड अगदीं मोडेल, असें जें त्यास वाटत होतें, तें न होतां, उलटें त्या लोकांची शक्ति पूर्वीपेक्षां अधिक मात्र वाढली असें त्यास दिसून आलें. त्यास आतां असें वाटूं लागलें कीं, आपण एकेठिकाणीं येवढें लष्कर ठेऊन बसतों हें कांहीं बरें नाहीं; यामुळें आपले सरदार अगदीं सुस्तावले आहेत. कित्येकांनीं छान मजेच्या हवेल्या बांधून तेथें ते मोठे मजेनें दिवस काढीत आहेत. तेव्हां यापुढें लढाईची कशी मसलत करावी ह्मणून त्यानें आसदखान वगैरे उमरावांचा सल्ला घेऊन असें ठरविलें कीं, आपले सैन्याच्या दोन टोळ्या करून, एकीनें मराठ्यांस मैदानांत गांठून त्यांशीं लढावें किंवा त्यांस पळवून लावावें, व दुसरे टोळीनें त्यांचे किल्ले हळूहळू सर्व काबीज करावे. याप्रमाणें बादशहानें तूर्त कर्नाटकप्रांत दाऊदखान याजवरच सोंपवून देऊन, झुल्फिकारखान यास राजाराम महाराजांचे सैन्यामागें लागण्यास बोलावून आणिलें. खान येतांच, बादशहानें एक मोठें सैन्य तयार करून, त्याजवर सुलतान अझीम याचा मुलगा बेदर बख्त यास नेमून, त्याचे हाताखालीं खान यास दिलें, व त्यांस मोहिमीवर रवाना केलें. किल्ले काबीज करण्याकरितां जी टोळी तयार केली, तिचें आधिपत्य औरंगजेब बादशहानें स्वतःच घेतलें.

येणेप्रमाणें लढाईची नवीनच मसलत ठरवून, बादशहानें ब्रह्मपुरी येथें बरेच दिवस पडलेली छावणी उठविली. वृद्ध बादशहाची ही तरतरी सुस्त व सुखावलेले असे त्याचे मोंगल सरदारांस कितीशी आवडली असेल हें सांगणें नकोच! परंतु करितात काय? नाइलाज ह्मणून बादशहा हुकूम करील तसें त्यांस करणें भागच होतें. औरंगजेब बादशहानें छावणींतील सर्व सामानसुमान ठेवण्याकरितां, लष्कराचे टप्प्यांतच मचनूर येथील गढीचे आश्रयानें एक मोठी जागा बांधिली व तिचे बंदोबस्ताकरितां चांगली शिबंदी वगैरे ठेविली. बादशहा छावणी सोडून निघाला, तो नीट पश्चिमेकडे चालला. तो वीस दिवसांनीं बसंतगड किल्ल्याखालीं येऊन दाखल झाला. त्यास त्यानें लागलाच

वेढा घालून तो तीन दिवसांत घेतला. प्रथमच ही फत्ते झाली पाहून, बादशहास आनंद होऊन त्यानें त्या किल्ल्याचें नांव, कलिंदी फत्ते (विजयाची किल्ली) असें नवीन ठेविलें.

वसंतगड मोंगलांचे हातीं लागल्यावर मराठे लोकांस वाटलें कीं, बादशहाची फौज आतां पन्हाळा किल्ल्यावर जाईल; ह्मणून ते तेथें मोठी कडेकोट तयारी करून त्याच्या येण्याची वाट पहात बसले होते; परंतु बादशहानें आपले सैन्याचा रोंख एकाएकीं फिरवून, तो सातान्यास येऊन दाखल झाला. (सप्टेंबर १६९९) या किल्ल्यांत दुर्दैवेंकरून रामचंद्रपंताकडून चांगली तयारी झाली नव्हती. तेथील धान्याचा पुरवठा दोन महिन्यांपेक्षां जास्त झालेला नव्हता. यामुळें किल्ला चांगले जोरावर नव्हता. बादशहानें स्वतःचे तंबू किल्ल्याचे उत्तरेस हल्लीं *करंजें गांव आहे तेथें ठोकिले. आझीमशहा याची फौज पश्चिमेकडील बाजूस हल्लींचे शहापुरास तळ देऊन राहिली. शिरजीखान हा दक्षिणेचे व तरबीयतखान हा पूर्वेचे बाजूस मोर्चे लावून बसले. याशिवाय चारी छावण्यांचे मधून जागजागीं चौक्या पहारे ठेऊन किल्ल्याची चोहोंकडून अगदीं नाकेबंदी केली. सातान्याचे किल्ल्याचा डोंगर फार उंच आहे असें नाहीं; तथापि त्याचा कडा तुटलेला असून, तो एकसारखा चाळीस फुटांपेक्षां अधिक असा उभा नीट आहे. त्याजवर चुनेगच्चीचा तट बांधला असल्यामुळें, खालून किल्ल्याची उंची बरीच झाली आहे.

या किल्ल्यावर प्रयागजी परभु ह्मणून कोणी हवालदार होता. तो मोठा शूर असून शिवाजी महाराजांचे तालमींत तयार झालेला होता. मोंगलांचे सैन्याच्या टोळ्या जसजशा किल्ल्याकडे येऊं लागल्या, तसतसे त्यानें त्यांजवर वरचेवर हल्ले करून त्यांस होतां होईल तोंपर्यंत पुढें येऊं दिलें नाहीं. शेवटीं शत्रूचे लोक फार होऊन ते जेव्हां माची चढून आले, तेव्हां त्यानें आपली सर्व फौज एकदम किल्ल्यावर चढवून तेथून शत्रूंवर मोठमोठे दगड लोटून देण्याचा सपाटा लाविला. तेणें-

* या गांवास आझीमशहाचे नांवावरूनच नांव पडलें आहे.

करून तोफेचे गोळ्यांप्रमाणेंच मोंगलांचे फौजेचा बराच नाश झाला; तथापि किल्ल्यांत धान्याचा सांठा थोडा असून, किल्ला चोहोंकडून कोंडला गेला असल्यामुळें, प्रयागजीस किल्ला फार वेळ भांडवितां आला नसता; परंतु इतक्यांत परशुराम त्र्यंबक यानें, शेजारचे परळीचे किल्ल्यांत जाऊन व तेथून आझीमशहाबरोबर संधान बांधून, सातारचे किल्ल्यांत गुप्तपणें धान्य, दारुगोळा व माणसें हीं चढविण्याची तजवीज केली. यामुळें किल्ला घेण्याबद्दल बादशहाची जरी अतोनात खटपट चालली होती, तरी कित्येक महिने तो त्याचे हातीं आला नाहीं.

आझीमशहा व शिरजेखान यांनीं, आपापल्या बाजूंकडून धवधवे रचून त्यांजवरून किल्ल्यावर तोफा चालू केल्या; परंतु विशेष जोराचा मारा ईशान्येचे कोपऱ्यास मंगळाईचे बुरुजावर होता. हा कोन किल्ल्यापैकीं विशेष बळकट असा भाग असून, तेथील बुरुज खालून एकंदर सदुसष्ट फूट उंचीचा होता. तरबियतखानानें या खालीं सुरुंग लावून तो उडविण्याचा उद्योग चालविला. चार साडे-चार महिन्यांत त्यानें दोन सुरुंग तयार करून ते उडवून दिल्या-बरोबर, किल्ल्यावर हल्ला चढविण्याकरितां त्यानें एक मोठी टोळी तयार करून, तीस त्यानें एका पुढें आलेल्या खडपाखालीं दडून ब-सून ठेविलें. शिवाय किल्ल्यावरील सर्व लोक एकत्र बुरुजावर गोळा होऊन, सुरुंग उडाल्याबरोबर एकदम त्यांचा नाश व्हावा या हेतूनें, त्यानें बादशहास सांगून पाठवून त्या भागाकडे मोठ्या थाटामा-टाची आपली स्वारी आणण्यास विनंति केली. त्या सरसें बादशहा मोठी वरात काढून मध्यें आपण एका उंच सिंहासनावर बसलेला व भोंवतालीं अफाट पसरलेली अशी फौज घेऊन मंगळाईचे बुरुजा-कडे आला. बुरुजाखालीं सुरुंग तयार केला आहे, हें किल्ल्या-वरील लोकांस माहित नसल्यामुळें, ते सर्व बादशहाची ही मिरवणूक पाहण्याकरितां चोहोंकडून गोळा झाले. इतक्यांत तरबियतखानानें एका सुरुंगास बत्ती लावविली. त्यासरसें एकदम भयंकर आवाज होऊन सर्व माची मोठे जोरानें हदरून तीस चिरा पडल्या. तिज-

वरील चुनेगच्चीचा जो तट होता तो उडून, आंतले बाजूस प्रयागजी वगैरे किल्ल्यावरील लोक बादशहाची स्वारी पहात उभे हाते त्यांचे अंगावर पडला, व तेणेंकरून लोक दबून ठार झाले. प्रयागजी हा शेजारीं मंगळाईचें देऊळ होतें तें त्याचे अंगावर पडून आंत दबून पडला होता. परंतु सुदैवानें तीन धोंडे तिहींकडे व चौथा त्यांच वरती पडून यांजवरून मातीचा ढीग पडला होता. हवलदार देवळाजवळ उभा होता हें त्याचे लोकांस ठाऊक होतें, ह्मणून त्यांनीं तेथील माती काढून टाकतांच, तो आयताच त्यांस जिवंत सांपडला. मंगळाई देवीनें या अद्भुत रीतीनें प्रयागजीचा बचाव केला हें पाहून, त्यांस व किल्ल्यावरील लोकांस विशेष उमेद आली असेल यांत संशय नाहीं.

सुरुंग उत्तम रीतीनें उडून किल्ल्यावरील लोकांची चांगली त्रेधा झाली असें पाहून, किल्ल्यावर हल्ला चढविण्याकरितां तरबियतखानानें जी टोळी तयार करून दबून ठेविली होती, तिनें एकदम पुढें सरसावून हल्ला सुरू केला. इतक्यांत दुसरा सुरंग जो पहिल्यापेक्षांही मोठा होता त्यासही बत्ती दिली; परंतु हा सुरंग चांगला तयार केला नसल्यामुळें, तो आंत न फुटतां बाहेरच फार मोठ्या जोरानें फुटून आला. या अपघातानें मोंगलांचे दोन हजारांवर लोक तेथल्या तेथेंच ठार झाले. ( फेब्रुआरी १७०० ).

११. याप्रमाणें औरंगजेब बादशहानें बरोबर मोठी फौज घेऊन मराठे लोकांचे किल्ले हस्तगत करण्याचा उद्योग चालविला असतां, राजाराम महाराजांचा पाठलाग करण्याकरितां त्यानें आपला नातू बेदर बख्त व झुल्फिकारखान यांजबरोबर दुसरी मोठी फौज देऊन रवाना केलें ह्मणून मागें सांगितलें आहे! त्याप्रमाणें ते निघून राजाराम महाराजांचे शोधानें चालले. इकडे राजाराम महाराजही वर सांगितल्याप्रमाणें नांदेड, खानदेश, वऱ्हाड या प्रांतांतील स्वारी संपवून दक्षिणेकडे जालन्याचे वाटेनें परत येत होते. जालना शहरास पोहोंचून महाराज तें लुटीत असतां, राजपुत्र बेदर बख्त व झुल्फिकारखान हे येऊन

पोहोंचले. मराठ्यांची फौज लूट मिळविण्याचे कामांत गुंतून ती गैरसावध असतां तिजवर मोंगलांनीं एकाएकीं हल्ला केल्यामुळें तिची धांदल उडून ती पळूं लागली. त्यांचेमागें मोंगल लोक मोठे आवेशानें व नेट धरून लागले; तथापि राजाराम महाराजांनीं आपली फौज पुनः गोळा करून तीस बेताबेतानें फारसें नुकसान न होऊं देतां स्वदेशांत आणून सोडिलें. परंतु दुर्दैवानें याच वेळीं त्यांचे फुफ्फुसास विकार होऊन त्यांचे तोंडावाटें रक्त पडूं लागलें. (फेब्रुआरी १७०० ). महाराज जेमतेम सिंहगडास येऊन पोंहोंचले. तेथें त्यांस ताप येऊं लागून थोडे दिवसांत नवज्वराचींही चिन्हें दिसूं लागलीं. आपली अत्यवस्था जाणून, महाराजांनीं रामचंद्रपंत अमात्य यांस बोलावून आणिलें, व तेथें हजर असलेले प्रधान व सरदारलोक यांसमक्ष ह्मटलें कीं, " तुह्मीं सर्वजण थोरले महाराजांपासून राज्याचे साधनासाठीं श्रम, साहस करीत आहां; यापुढेंही तुह्मीं तसें करालच. आमचा काळ तर समीप आला. आमचे मागें तुह्मीं अमात्य यांचे आज्ञेत वागून राज्याचें रक्षण करा. शिवाजी महाराजांस यवनांचे हातांतून सोडवून आपले राज्यावर बसवा. सर्व एक विचारें वागून थोरले महाराजांनीं स्थापन केलेली हिंदुपदपादशाही चालूं द्या. " इतकें बोलून राजाराम महाराजांनीं प्राण सोडिला. ( मार्च १७०० ).

राजाराम महाराजांचें मरणसमयीं वय तीस वर्षांचें होतें. ह्यांचा स्वभाव लहानपणापासून गरीब, भिमा व विचारी असल्यामुळें, त्यांजवर त्यांचे प्रधानमंडळीचा व एकंदर प्रजेचा लोभ असे. त्यांस पहिल्यापासून प्रल्हाद निराजीसारखा शहाणा, इमानी व निर्लोभी असा मंत्री मिळाल्यामुळें, त्यांच्या राज्याचा लवकरच जम बसला. त्याचप्रमाणें संताजी घोरपडे, धनाजी जाधव, रामचंद्रपंत अमात्य अशासारखे कर्ते पुरुष त्यांचे सुदैवानें त्यांचे पदरीं होते, ह्मणून मोंगलांचे कचाटींतून मराठी राज्य पार पडलें. महाराजांमध्यें त्यांचे वडिलांप्रमाणें बरेंच शौर्य व धाडस हीं होतीं; तथापि त्यांचा विशेष गुण ह्मटला ह्मणजे, आपले सरदारांची योग्यता जाणून त्यांचे कर्तृत्वाबद्दल त्यांस इनामें, जहागिरी

हीं त्यांनीं मोठेपणानें द्यावीं हा होय. कांहीं *लोकांचें असें ह्मणणें आहे कीं, महाराजांचा संताजी घोरपडे याजबद्दलचा विनाकारण संशय व त्यानंतर फार क्रूरपणानें झालेला त्याचा वध, ह्या गोष्टी महाराजांचे नांवास कमीपणा आणणाऱ्या आहेत. परंतु महाराजांचे वेळची विलक्षण स्थिति—कीं, झुल्फिकारखानासारख्या हुषार सरदारांनींसुद्धां आपल्या धन्याशीं बेइमानी करावी—तिचा विचार केला असतां, संताजी सुद्धां आपणांशीं खानाप्रमाणें कपट करीत असेल, असा जो संशय राजाराम महाराजांस आला, यांत विशेष नवल नाहीं. आतां संताजीचा फार क्रूर रीतीनें वध झाला; परंतु तो परभारें त्याचे एका दुष्ट व नीच वैऱ्याचे हातून झाला; त्यांत महाराजांचा मुळींच हात नव्हता. शेवटीं संताजी मरण पावल्यानंतर, त्याचे पुत्रांस महाराजांनीं बोलावून आणून त्यांस आपले पदरीं राहून घेण्याबद्दल आग्रह करून, संताजीबद्दल आपला कळवळा महाराजांनीं दाखवायाचा; परंतु संताजीचे पुत्रांचे मनांतही महाराजांविषयीं अढी उत्पन्न झाली असेल, तर तें तरी व्हावें कसें हें आह्मांस समजत नाहीं.

राजाराम महाराजांचे क्रियाकर्मांतराचा सर्व विधि सिंहगडासच जीवजी राजे भोंसले बावीकर यांनीं केला. रामचंद्रपंत यांनीं पुष्कळ दानधर्म केला व महाराजांची छत्री सिंहगडावर बांधून तिचीं पूजा अर्चा करण्यासाठीं व्यवस्था करून दिली. महाराजांस तीन स्त्रिया होत्या. पहिली ताराबाई ही मोहित्यांचे घराण्यांतील असून तीस शिवाजी ह्मणून दहा वर्षांचा एक मुलगा होता. दुसरी स्त्री राजसबाई ही घाटगे यांचे घराण्यांतील असून तीस संभाजी ह्मणून तीन वर्षांचा मुलगा होता. ह्या दोन स्त्रिया महाराजांचे मरण समयीं पन्हाळा किल्ल्यावर होत्या. तिसरी स्त्री अंबिकाबाई ही विशाळगडास असून तीस पुत्र नव्हता. ती महाराजांचें मृत्यूचें वर्तमान ऐकून विशाळगडींच सती गेली.

---

* ग्रांट डफ् यांचा इतिहास.

# भाग १३.

## दुसरे शिवाजी महाराज—ताराबाईसाहेब.

१. सातारा किल्ला मोंगलांच्या हस्तगत झाला, अझीमशहानें सवलत दिल्यानें सामानसुमान व माणसें बाहेर निघालीं. परळीचाही किल्ला अशाच रीतीनें मोंगलांकडे गेला. २. औरंगजेबाच्या मनांतील विचार व पुढील आशा. मराठे लोकांतील व्यवस्था. लुटीच्या व जहागिरी मिळविण्याच्या इच्छेनें सरदार लोकांनीं दाखविलेला शूरपणा. ३. ताराबाईच्या मनांतील रामचंद्रपंताविषयींचा किंतु. तोच दृढ करण्याविषयीं औरंगजेबांचें कपटी वर्तन. पुढें परशुराम त्र्यंबकास आपले हातीं घेण्याची ताराबाईची खटपट. पंतप्रतिनिधीचे जागीं त्यांची नेमणूक. धनाजी जाधव वगैरे सरदारांचा पराक्रम. ४. झुल्फिकारखान व बेदरवक्त यांची मराठ्यांशीं लढण्याच्या कामीं नेमणूक. त्यांस सर्व साधनें अनुकूल होतीं. त्यांनीं मराठ्यांस निरनिराळें गांठून पराभव केलें; परंतु त्यापासून मराठ्यांचें ह्मणण्यासारखें कांहीं नुकसान झालें नाहीं. मराठ्यांची हुलकावणीची लढाईची पद्धत. मोंगलांचें नुकसान. ५. मराठ्यांच्या सैन्यांतील लोकांचें सामानसुमान, राहण्याची तऱ्हा व त्यायोगानें मोंगलांबरोबर लढाई करण्यांत त्यांचा होणारा मोठा फायदा व अत्यल्प नुकसान. बादशहास आपल्या सैन्याबद्दल येणारा खर्च. हिंदुस्थानांतून आणलेले खजिने मराठे लुटीत, तेणेंकरून नुकसान फार होई. मराठ्यांच्या निरनिराळया टोळयांनीं मांडलेली धुमाकूळ. बादशहानें त्यांच्या विरुद्ध आपलीं सैन्यें पाठविलीं; परंतु तीं बेकैद वागत असल्यामुळें, त्यांच्याकडून मराठ्यांचें पारिपत्य झालें नाहीं. बादशहाचे सरदारांच्या स्वाऱ्यांचा कांहीं उपयोग झाला नाहीं. खुद्द बादशहाच्या हाताखालील सैन्यानें बरीच कामगिरी केली. त्यांचे हाल पुष्कळ झाले. त्याचें वर्णन. बादशहाची छावणी विजापूरास केली. ६. सरदार लोक कसूर करीत, ह्यामुळें व कांहीं अंशीं त्यांच्या

कमकुवतीमुळें त्यांच्या हातून कांहीं कामगिरी झाली नाहीं. यामुळें बादशहास लढाईचा कंटाळा वाटत होता. त्यांत दिवसेंदिवस खर्च अतोनात वाढत होता, तोही भागेना, यामुळें शाहूस कैदेंतून सोडून मराठ्यांशीं तह करण्याची मसलत निघाली. मराठ्यांचे हक्क कबूल करतां करतां त्यांच्या मागण्या फारच वाढल्या, यामुळें तहाचें बोलणें थांबलें. बादशहानें पेमनायकाच्या वांकणखेडावर चाल केली. नायकापासून बादशाहास पोहोंचणारा उपद्रव. बादशहा वांकणखेडास वेढा घालतो. धनाजीचे बाहेरून वरचेवर हल्ले येतात. धनाजीचा मोंगल लोकांस दरारा. शहर हस्तगत होईना, तेव्हां दौदखान व झुल्फिकारखान यांस मदतीस बोलावलें. वांकणखेड घेतलें. इकडे मराठ्यांस अर्थात् फावलें, मोंगलांनीं घेतलेले सर्व किल्ले त्यांनीं पांच सहा महिन्यांत परत घेतले. पन्हाळ्यावर ताराबाई राहतात व त्यांचा रामचंद्रपंतावर विश्वास बसतो. सातारा किल्ला अण्णाजीपंत कारकून याच्या हुशारीनें हस्तगत होतो. मोंगल लोकांत शिरून त्यांची नानाप्रकारें करमणूक करून त्यांस स्नेही करून आपल्या लोकांचा शिरकाव करतो. रामचंद्रपंत, परशुराम त्र्यंबक याजप्रमाणें शंकराजी नारायण गौंडे यांचा पराक्रम. सिंहगड, राजगड वगैरे किल्ले घेतले. सर्व किल्ले हातचे गेल्या-बद्दल बादशहास झालेला खेद. झुल्फिकारखान यास सिंहगड घेण्यास पाठविलें. शाहू महाराजांस मुक्त करण्याचा बेत, व मराठे लोकांनीं शरण यावें अशाबद्दल बादशहाची खटपट. ती व्यर्थ गेली. सिंहगड मोंगलांनीं घेतला; पण तो त्यांजकडे टिकला नाहीं. पुढें बादशहा अगदीं निराश होऊन आपलें सैन्य त्यानें अहमदनगराकडे नेलें. त्यावेळची त्याची दीन स्थिति, व मराठे लोकांस तें पाहून आलेलें अवसान. ७. अहमदनगर येथें मरणोन्मुख झालेल्या बादशहाच्या मनांतील विचार. त्यास आपल्या घोरकृत्याबद्दल झालेला पश्चात्ताप व आपल्या पश्चात् बादशाहीची काळजी. मुलगे व नातू यांस दूर पाठवितो. सरदारांपैकीं कोणावर विश्वास नाहीं. औरंगजेबाचा मृत्यु. ८. औरंगजेबाचें मृत्युपत्र. त्याचे पुत्र तें जुमानीत नाहींत. उपसंहार.

१. राजाराम महाराज मरण पावल्यानंतर सुमारें एक महिन्यानें, साताराचा किल्ला औरंगजेब बादशहाचे हातीं आला. किल्ल्यांतील

अन्नसामग्री अगोदरच संपून गेली होती; परंतु परशुराम त्र्यंबक यानें, अझीमशहाबरोबर संधान लावून कांहीं दिवस किल्ल्यावर गुप्तपणें धान्य, दारूगोळा वगैरे चढविण्याचा क्रम चालविला होता ह्मणून मागें लिहिलें आहे; परंतु त्यास असें फार वेळ करितां येईना. अझीमशहास, आपले फितुराची बातमी बादशहास कळेल अशी भीति वाटून, त्यानें परशुराम त्र्यंबक यास निरोप पाठविला कीं, ' या उप्पर किल्ल्यावर धान्य वगैरे चढविण्याचे कामाकडे आह्मांस कानाडोळा करितां येणार नाहीं. बादशहा हट्टास पडला आहे, तेव्हां तुह्मीं आतां किल्ला स्वाधीन करावा हें बरें. उगीच माणूस खराब करण्यांत हांशील नाहीं. ' हा निरोप पोहोंचतांच परशुरामपंतानें पाहिलें कीं, अझीमशहाचे साहाय्या-खेरीज आपणांस यापुढें किल्ला मुळींच भांडवितां येणार नाहीं; ह्मणून त्यानें शहाचेच मार्फत किल्ला खालीं करून देण्याबद्दल बादशहाजवळ बोलणें लाविलें. तें मान्य झाल्यावर, परशुरामपंतानें किल्ल्यावरून आपलें माणूस, चीजवस्त वगैरे सर्व उतरवून घेऊन, किल्ला मोंगलांचे स्वाधीन करून देण्यास प्रयागजीस सांगून पाठविलें. त्यावरून सातारचा किल्ला औरंगजेब बादशहाचे हातीं आला ( एप्रिल १७०० ). हा किल्ला घेण्याचें श्रेय बादशहानें *अझीमशहास देऊन किल्ल्यास त्याचेच नांव अझीमतारा असें दिलें. येणेंप्रमाणें आपले पुत्रच शत्रूंस फितूर होऊन ते आपणांस ठकवीत आहेत, हें बादशहास न कळून तो त्यांचा उलट गौरवही करीत असे !

---

* सातारचा किल्ला बादशहाचे हस्तगत झाला याविषयीं निबंधमालेंत पुढील खुबीदार आख्यायिका दिली आहे:—

**सातारचा किल्ला**—औरंगजेब बादशहानें शेवटीं शेवटीं मराठ्यांचा सर्व मुलूख काबीज केला हें आमच्या वाचकांस माहीत असेलच. त्यांत सातारचा किल्ला त्याच्या हस्तगत इ० स० १७००त झाला. यावेळची एक गोष्ट मोठी मजेदार आहे. ज्या दिवशीं सकाळीं हा किल्ला मोंगलांच्या हातीं आला, त्या दिवशीं तें वर्तमान औरंगजेबाचा अकबरनवीस नियामतखान यानें येऊन प्रथमतः बादशहास कळविलें.

साताराचा किल्ला हस्तगत झाल्यापासून सुमारें दीड महिन्यांनीं, परळीचाही किल्ला अझीमशहाचेच मध्यस्थीनें, परशुरामपंतानें आपले सर्व लोक, सामानसुमान वासोट्याचे किल्ल्यावर नेऊन, स्वाधीन केला. ( जून १७००. ) यापुढें पर्जन्यकाळ सुरू झाला. सह्याद्रीचे जवळचे मुलुखांत पाऊस मोठा जोराचा असून, तो अधिक काळ राहतो; परंतु बादशहानें आपले फौजेचे बचावाकरितां अगोदर कांहीं तजवीज केली नसल्याकारणानें तिचे फार हाल होऊं लागले. शेवटीं त्यानें डोंगरकांठचे किल्ले घेण्याचें काम पावसाळा संपेपर्यंत बंद ठेऊन, तो आपली छावणी मोठे कष्टानें देशावर माण नदीचे कांठीं कावसपूर येथें घेऊन आला. वाटेंत त्याचे फौजेची व सामानसुमानाची अर्थात्च पुष्कळ खराबी झाली.

२. राजाराम महाराजांचे मृत्यूची खबर ऐकून व आपण त्यांचे किल्ले काबीज करण्याचें काम जें नेटानें चालविलें आहे, त्यांत आपणांस बरेंच यश येत चाललें आहे असें पाहून, बादशहास बराच संतोष वाटला.

---

त्यावेळेस खासा स्वारी आपल्या डेऱ्याच्या तोंडीं बसून किल्ल्याकडे सारखे डोळे लागले होते, व तोंडानें निमाज चालला होता; आणि आंगठा करंगळीच्या मुळाशीं असून, पठणाची संख्या चालली होती. खान दृष्टीस पडतांच, बादशहानें पुसलें, “ कां, काय बातमी ? ” नियामतखानानें उत्तर केलें, “ खुदावंत, बातमी तर मोठ्या आनंदाची आहे. सरकारच्या निमाजाचें फळ तावडतोब आह्मांस मिळालें. कां, तर किल्ला सर होऊन त्याचा शक महाराजांच्या हातावर आहे. ” अकबरनविसाच्या बोलण्यांतील मतलब हा कीं, औरंगजेबानें आंगठा मिटून चार बोटें वर उभीं धरलीं होतीं; तेव्हां किल्ला काबीज केल्याचा शक ११११ त्यावरून दिसला. हिजरी शक ११११ ह्मणजे इसवी १७००.

अंक १३, पृष्ठ २३।२४.

महाराजांचे मागें, त्यांचे पुतणे शाहू महाराज हे आपलेपाशीं कैदेंत असून, त्यांचे दोन पुत्र केवळ अज्ञान आहेत, तेव्हां मराठे लोकांची शक्ति आतां खास नष्ट होईल असा बादशहानें अंदाज केला; परंतु तो अगदीं चुकीचा होता. मराठे लोकांची हळू हळू अशी स्थिति बनत चालली होती कीं, त्यांचा राजा वयांत आलेला असो किंवा तो लहान अज्ञान असो, त्यांची शक्ति दिवसानुदिवस वृद्धिंगतच होत जावी. दक्षिणेंत अहंमदनगर, विजापूर, गोंवळकोंडें येथील मुसलमानी राज्यें बलहीन होऊन जाऊन, स्वतः मोंगल बादशाहीही हळू हळू त्याच पंथास लागली आहे; तेव्हां एखादे बुद्धिमान्, शूर व धाडशी अशा पुरुषानें, सह्याद्रि पर्वताचे किल्ल्यांचा आश्रय करून शत्रूंशीं मैदानांत उभें राहून न लढतां, त्यांजबरोबर जर धरपळीचीच झुंज खेळली, तर दक्षिणेंतील मुसलमान व उत्तरेकडील मोंगल या दोघांस गुंडाळून ठेवून, त्यास महाराष्ट्रांत स्वतंत्र राज्य स्थापन करण्याचे उद्योगांत बरेंच यश येण्यासारखें आहे, हें जें शिवाजी महाराजांनीं स्वतःचे चरित्रानें सर्व मराठे लोकांस स्पष्टपणें विदित केलें, तें, त्या लोकांची शक्ति वाढण्याचें एक मुख्य कारण होय. याशिवाय मागें सांगितल्याप्रमाणें दुसरें एक कारण असें झालें कीं, शिवाजी महाराजांचे वेळची सैन्यांतील कैद व शिपायांनीं लूट गोळा केल्यानंतर तिचा भरणा सरकारांत करण्यासंबंधानें कानू, ह्या दोन्ही गोष्टी संभाजी महाराजांचे कारकीर्दींत मोडून जाऊन, लूट बहुतेक सरदार व शिपाईच बळकावूं लागले. यामुळें राज्यांतील शिस्त बिघडली, सरकारचा खजिना ओस पडला व गादीचें बरेंच नुकसान झालें खरें; तथापि एकंदर मराठी राज्याचें या अव्यवस्थेपासून हितच झालें, व यामुळेंच संभाजी महाराजांचा वध झाल्यानंतर, मराठी राज्यावर औरंगजेब बादशहाचे अवाढव्य सैन्याची धाड पडली असतांही, नुकतेंच मागें सांगितल्याप्रमाणें त्याचा बचाव झाला. राजाराम महाराज व प्रल्हाद निराजी यांनीं, मोठे शहाणपणानें मराठे सरदारांस, ते जे मुलूख मोंगलांपासून जिंकून घेतील, ते त्यांस जहागीर ह्मणून करून देऊन, त्यांजबद्दल त्यांजला सनदा देण्याचा जो सपाटा लाविला, तेणेंकरून त्यांस विशेष निकरानें लढण्यास

अर्थात्च हुरूप आली. राजाराम महाराजांचे मागें, त्यांचाच कित्ता रामचंद्रपंत अमात्य यानें उचलून, सर्व मराठे सरदारांचें लक्ष गादीकडे लागावें ह्मणून, त्यानें त्यांस महाराजांचे मृत्यूचें वर्तमान कळवून त्यांसच मोठेपणा देऊन, 'आतां राज्य रक्षण करणें तुह्मांकडेसच आहे; सर्व लज्जा तुमची आहे' वगैरे मजकूर लिहून पाठविला. त्यांचींही उत्तरें आलीं कीं, 'महाराजांचे ठिकाणीं आपण आहां. खासा स्वारी असतांना कामकाज उदईक करूं ह्मणत होतों, सांप्रत उद्यांचें आज करून आपणांस विनंति लिहीत जाऊं. आपल्या हुकुमासरशी तृणवत् प्राण मानून उडी घेऊं. कांहीं काळजी करूं नये.' सरदारांचें हें वीरश्रीचें उत्तर वाचून, स्वामिभक्तीच्या आच्छादनांत आत्मप्राप्तीविषयीं संतोष बराच आहे, हें अंमळ लक्ष लावून पाहिलें असतां व सरदारांचें पुढील वर्तन ध्यानांत आणिलें असतां, कळण्यासारखें आहे! प्रल्हाद निराजी किंवा रामचंद्रपंत अमात्य यांनीं, या सरदारांनीं जिंकलेले मुलूख किंवा लूट यासंबंधानें शिवाजी महाराजांचे वेळचा हिशेबी कांटा हातीं घेऊन, सर्व दौलत सरकारी खजीन्यांत ओढली असती तर, महाराजांचे गादीविषयीं वरील सरदारांची किती भक्ति राहिली असती याचा संशयच आहे. त्यांतून सध्यां तर, गादीचा मालक लहान अज्ञान असून सर्व कारभार त्याची आई व अमात्य ह्यांजकडे आल्यामुळें, आज कांहीं वर्षें चालू असलेली वहिवाट—कीं गादीकडे मोठेपणा देऊन, तिचे आपण चाकर आहोंत असें ह्मणून घ्यावें; परंतु जिंकलेला मुलूख किंवा लूट ही ज्याची त्यानेंच स्वतःस ठेवावी—ही सहजच अधिक बिनहरकत चालू राहील असें या सरदारांस वाटत होतें. ही व्यवस्था नेहमींचे रीतीस गैरच खरी; तथापि मराठी राज्याचे यावेळचे स्थितीचे मानानें पाहिलें तर, तीच उत्तम अशी झाली. कारण, तिचे योगानें औरंगजेब बादशहाचे प्रचंड सैन्याबरोबर झुंजण्याचें काम, भोंसल्यांच्या एकट्याच घराण्यावर पडून न राहतां, एकाचे जागीं पांच पंचवीस त्यांचेसारखेच शूर अशा मराठे घराण्यांवर तें पडलें. मराठी राज्य हें सर्व एकाच घराण्याची प्राप्ति नसून, तें सर्व शूर, बुद्धिमान् व साहसी अशा मराठे सरदारांचें. जो जें जितकें जिंकून घेईल, तें तितकें त्याचें

आहे. असें सर्वांस भासूं लागल्यामुळें, अर्थात्च त्यांमध्यें मोठमोठे पराक्रम करण्याची हुरूप उत्पन्न झाली.

३. राजाराम महाराजांचे मरणानंतर, ताराबाई साहेबांनीं आपला पुत्र शिवाजी महाराज यांस गादीवर बसवून, त्या स्वतः, रामचंद्रपंत अमात्य, शंकराजी नारायण सचीव व धनाजी जाधव सेनापति यांचे मदतीनें राज्यकारभार पाहूं लागल्या. त्या जातीनें मोठ्या हिंमतवान्, खबरदार व महत्वाकांक्षी अशा होत्या. त्यांनीं प्रथमदर्शनींच राजसबाईसाहेब यांस नजरकैदेंत ठेविलें. अमात्याविषयींही त्यांचें मन निर्मळ नव्हतें. कारण, साताऱ्याचे किल्ल्यास बादशहानें वेढा घालण्यापूर्वीं, त्यांत धान्याचा पुरवठा वगैरे करण्याचें काम, त्यानें शत्रूंस फितूर होऊन मुद्दाम केलें नाहीं, असा त्याजवर कांहींकांचा संशय होता. त्याबद्दलची बातमी बादशहास लागून, मराठे लोकांचा संशय विशेष दृढ करण्याकरितां, अमात्यास फितूरीचे मजकुराचें एक पत्र लिहून तें मध्येंच शत्रूकडील लोकांनीं पकडून, त्याचा वैरी जो परशुराम त्र्यंबक याचे हातीं लागावें अशी त्यानें हिकमत केली; परंतु या सुमारास, राजाराम महाराज जे दूर देशीं स्वारीस गेले असून तेथून ते दुखणाईत पडून सिंहगडास आले, त्यांस ह्या गोष्टीची खबर नसल्यामुळें, त्यांनीं सहजच अमात्यास बोलावून आणून आपलेमागें त्यानें सर्व राज्यकारभार चालवावा ह्मणून सांगितलें. परंतु महाराजांचेमागें ताराबाईसाहेबांस हा फितूरीचा मजकूर कळला असल्यामुळें, त्यांस अगदीं स्वस्थही बसवेना व उलट पक्षीं अमात्याबद्दल आपणांस कोणत्याही प्रकारें संशय आहे असेंही त्यांस दाखवितां येईना. तेव्हां अशा अडचणींत बाईसाहेबांनीं परशुराम त्र्यंबक यास आपले हातीं धरण्याचा निश्चय केला. त्यांनीं तिमाजी रघुनाथ यांचे अंगीं विशेष कर्तृत्व नसून, तो पंतप्रतिनिधीचे कामास योग्य नाहीं असें पाहून, त्यास त्या कामावरून दूर केलें व त्याचे जागीं परशुराम त्र्यंबक यास नेमिलें. ही नेमणूक रामचंद्रपंतास आवडली नसेल हें सांगणें नकोच; परंतु त्याबद्दल ताराबाईसाहेबांचा विशेष निग्रह दिसल्यावरून, अमा-

त्यानें या गोष्टींत पडती घेतली. ताराबाईसाहेब ह्या एकेच किल्ल्यांत बसून न राहून, त्या किल्लेकिल्लीं जाऊन तेथील बंदोबस्त नीट करूं लागल्या. इकडे सेनापति धनाजी जाधव ह्यानें, मैदानांत शत्रूंशीं सामना करण्याचा क्रम चालवून, मराठे घोडेस्वार चोहोंकडे पसरवून दिले व मोंगलांची बरीच धांदल करून सोडिली. त्याचप्रमाणें दुसरे मराठे सरदार निंबाळकर, भोंसले, दाभाडे, थोरात, पवार, चव्हाण, शिंदे, आटोळे हे स्वारांच्या मोठमोठ्या टोळ्या गोळा करून, सर्व मुलुखांत शिरून तेथें चौथाई, सरदेशमुखी व घांसदाणा हे आपले हक्क मोठे झपाट्यानें वसूल करूं लागले.

४. मराठे लोकांचे अशा टोळ्यांबरोबर लढण्याला, बादशहानें आपला नातू बेदर बख्त व झुल्फिकारखान यांची योजना केली होती ह्मणून मागें सांगितलें आहे. खान हा स्वतः शूर, हिंमतवान् व मेहनती असल्यामुळें, त्याचे फौजेंत बरीच चांगली तरतरी असे. त्याजपाशीं घोडा, हत्ती, लढाईचें सामान वगैरे चांगलें असून, तें वाहून नेण्याकरितां उंट, बैल वगैरे जनावरेंही पुष्कळ व मजबूत होतीं. याशिवाय युद्धाची मुख्य बळकटी जो पैसा, तोही बादशहानें पुष्कळ दिला असल्यामुळें, झुल्फिकारखान याची फौज जेव्हां ब्रह्मपुरीहून बादशहाची छावणी सोडून १६९९ सालीं निघाली, तेव्हां ती अर्थात्च चांगल्या स्थितींत होती हें सांगणें नकोच. ह्या फौजेनें मराठे सरदारांच्या निरनिराळ्या टोळ्या, ज्या खानदेश, *बागलाण, वऱ्हाड, गंगथडी वगैरे मोंगलांचे प्रांत लुटीत चालल्या होत्या, त्यांस गांठून त्यांचा मोड करण्याचा, व त्या पळून जातील तर त्यांचे पाठीस लागून त्यांचा नाश करण्याचा क्रम सहा वर्षें चालविला. तिनें पहिले स्वारींत, राजाराम महाराजांस जालना येथें गांठून, त्यांचे फौजेची बरीच दाणादाण केली, व ती स्वदेशास परत येत असतां, तिचा मोठे निकरानें पाठलाग केला, ह्मणून मागें सांगितलेंच आहे. यानंतर तिनें धनाजी जाधव, भोंसले, निंबाळकर, दाभाडे वगैरे सरदारांचे मागें लागून, त्यांचा कित्येकवेळां

* एलफिनस्टन् साहेबांचा इतिहास.

पराभवही केला; परंतु मराठी फौजेचा पराभव करणें ह्मणजे पाण्यावर मोठ्या जोरानें आघात करून तें दुभंगण्यासारखेंच होय! त्यांनीं होतांहोईल तोंपर्यंत प्रथम शत्रूवर निकराचे हल्ले करावेत; परंतु इतकेंही करून आपला पराभव होतो असें त्यांस दिसूं लागलें ह्मणजे, त्यांनीं शत्रूपासून सहज दूर पळून जावें, व मोंगलांस आपले जयाबद्दल आनंद वाटूं लागतो आहे न लागतो आहे, इतक्यांत त्याचदिवशीं किंवा दुसरे दिवशीं तेथून कांहीं अंतरावर, मराठी फौजेचा पहिलेपेक्षांही मोठा जमाव लढाई खेळण्यास तयार असा त्यांच्या दृष्टीस पडावा; परंतु मोंगलांचे फौजेची स्थिति फार वेगळी होती. त्यांचे पराजय कमी होत खरे; परंतु ते झाले ह्मणजे त्यांचे बरोबर सामानसुमान पुष्कळ असे. तें सर्व शत्रूंचे हातीं पडे, व त्यामुळें त्यांचें पुष्कळ नुकसान होई. शिवाय मोंगलांचा पराभव झाला असतां, त्यांस त्यापासून विशेष मानखंडना वाटे.

९. यावेळचे मोंगलांचे फोजेबरोबर असलेले भपकीदार परंतु अवजड अशा तंबू वगैरे सामानसुमानाची रेलचेल, त्यांचे सरदार लोकांची ती मिजास, त्यांचीं तीं जड चिलखतें, त्यांचे घोड्यावरून घातलेले ते सोन्यारुप्याचे डाग, उत्तम मखमालीच्या त्या झुली इत्यादि गोष्टींचें वर्णन यामागें केलेंच आहे. आतां उलटपक्षीं ज्या भयंकर शत्रूंशीं त्यांचा सामना चालला होता, व ज्यांत ते अखेर पूर्ण पराभव पावले, त्या मराठे लोकांची लढाईची तयारी कशी होती ती येथें सांगतों. त्यांजबरोबरचें सामानसुमान ह्मटलें ह्मणजे, थोडीशी कांदाभाकरी व एक घोंगडी एवढें काय तें असे. रात्रीं ते कोठें उतरले, तर ते घोड्यांचे लगाम हातांत धरूनच घोंगडी पसरून त्यावर कांहीं वेळ अंग टाकून रहात. त्याचप्रमाणें दिवसां दोनप्रहरीं कांहीं खाण्याकरितां किंवा ऊन टाळण्याकरितां ते उतरले, ह्मणजे पांच पांच सहा सहा जण एकादें झाडझूड असलें तर त्याचे छायेखालीं पडलेले दृष्टीस पडत; परंतु उघडें मैदानच असलें, तर ते जमिनींत भाले रोंवून त्यांस ते आपले घोडे बांधून, भाल्यांचे टोकांवरून एकादी घोंगडी अटकवून

देत व तिचे लहानसे छायेंतच फक्त डोकीं ठेऊन बाकी सर्व अंगास मध्यान्हीची जबर तिरीप लागत असतांही ते जमिनीवर घोरत पडलेले आढळत. मात्र ते आपल्या तलवारीस कधीं न विसंबितां त्या तें आपल्या कुशीशीं जवळच ठेवीत. त्यांजवळ उंट, बैल वगैरे कांहीं नसून फक्त लहान खुरी, परंतु चपळ व कंटक अशीं तट्टं असत. त्यांवर मिळालेली लूट पिशव्यांतून भरून, ती ते फार जलदीनें लांबवीत. येणेप्रमाणें मराठ्यांची फौज हिजबरोबर सामानसुमान फार थोडें असून, ती अगदीं सुटसुटीत असल्यामुळें, लवाजम्यानें लादलेल्या व कांहीं अंशीं सुभा व बेकैद अशा बादशहाचे फौजांस तिचा पाठलाग करणें ह्मणजे कठीणच पडे. त्यांतूनही कधीं ती गांठली जाऊन तिचा पराभवही झाला, तरी तिचें सामानसुमान मोंगलांचे हातीं तें काय लागणार? ज्या लोकांची अन्नसामुग्री काय ती कांदाभाकरी, ज्यांचें आंथरूण, पांघरूण, घोड्यावरील सरपोस, झूल सर्व काय ती एक घोंगडी, अशा कंगाल मराठी फौजेस लुटून काय मिळावयाचें होतें? परंतु उलटपक्षीं मोंगलांचे फौजेचा पराभव झाला ह्मणजे, त्यांचे लुटीनें मराठ्यांची चांगली चंगळ उडून जाऊन मोंगलांचे अति हाल होत. कारण, त्यांस मिजासेची संवय लागल्यामुळें, लवाजम्यावांचून त्यांचें चालत नसे.

बादशहास त्याचे फौजेचा खर्च फार मोठा असे. त्यास प्रथम दक्षिणेंतील खानदेश, बागलाण, वऱ्हाड, गंगथडी वगैरे प्रांतांतून बराच वसूल होत असे व त्यांतून फौजेचा खर्च बराच बाहेर पडे; परंतु मराठे सरदारांनीं चौथाई, सरदेशमुखी, घांसदाणा वगैरे निरनिराळे हक्क सांगून तेथून खंडण्या वसूल करण्याचा सपाटा लविल्यामुळें, या प्रांतांतून बादशहास वसूल कमी कमी येऊं लागला; परंतु मराठ्यांचा बंदोबस्त करण्याकरितां फौज ठेवणें जरूरच होती, ह्मणून औरंगजेब बादशहा उत्तरहिंदुस्थानांतूनच जास्त जास्त खजीना मागूं लागला; परंतु खजीना आणणारे टोळ्यांचे पाळतीवर मराठे लोक; हे त्यास कित्येक-वेळां गांठीत. प्रांतांतील लोकांपासून मराठे फौजेबद्दलची खरी बातमी

मोंगलांस बहुतकरून मिळत नसे; परंतु मोंगलांची फौज कोणीकडे जाणार किंवा त्यांचा खजीना केव्हां येणार, यांची बित्तं बातमी मात्र मराठ्यांस कळत असे. अशा एकादे खजीन्याची खबर मराठ्यांचे फौजेस लागली ह्मणजे, त्यांनीं एकादे अवघड ठिकाणीं एकीकडे खजीन्याबरोबर असणारे शिपायांवर एकाएकीं हल्ला करून, दुसरीकडून धान्य वगैरे वाहून नेणारे उंट, बैल इत्यादि जनावरांस पळवून न्यावें. अशाप्रसंगीं खजीना शत्रूचे हातीं लागूं नये ह्मणून, मोंगलांचे शिपाई अर्थात्च एकत्र होऊन त्याचा बचाव करण्याकरितां झटत. इतक्यांत मराठे लोक इकडची बातमी तिकडे व तिकडची बातमी इकडे न पोंहोंचेशी तजवीज फार जलदीनें करून, आपली फौज अधिकाधिक जमवीत. तेव्हां मोंगलांची टोळी मध्येंच थबकून मुक्काम धरून राही; परंतु जवळची अन्न-सामुग्री शत्रूचे हातीं लागल्यामुळें व कधीं कधीं जवळपास असलेली नदी किंवा ओढा हा मराठ्यांनीं कोंडून धरला असल्यामुळें, मोंगलांस शरण येणें भाग पडे. यानंतर त्याचीं घोडीं, खजीना वगैरे सर्व बुचाडलें जाऊन, मुख्य मुख्य सरदार असत त्यांस आपले सुटकेक-रितां मोठमोठ्या खंडण्याही द्याव्या लागत.

येणेंप्रमाणें बादशहास ही लढाई चालविण्यास अतोनात पैसा लागत जाऊन, त्याचें चीज मात्र ह्मणण्यासारखें कांहीं होईना. मराठे लोकांच्या लुटारु टोळ्यांचा त्रास कमी न होतां तो उलटा वाढतच चालला. सन १७०२ सालीं, ह्या लोकांची एक मोठी टोळी सुरत व बऱ्हाणपूर या शहरांवर उतरून त्यांनीं तेथून खंडण्या वसूल केल्या. यापुढें ते दरसाल अधिकाधिकच आपलें पाऊल पसरवीत जाऊन, सन १७०६ या सालीं तर, त्यांची एक मोठी टोळी नर्मदा नदी उतरून माळव्यांत शिरली व तेथें तिनें खंडणी वसूल करण्याचा मोठा झपाटा लाविला. दुसरी एक तशीच मोठी टोळी वऱ्हाड व खानदेश या प्रांतांवर पसरली. तिसऱ्या एका पंधरा हजारांचे टोळीनें गुजराथ प्रांतांत प्रवेश करून, तेथील फौजदारांनीं गोळा केलेल्या सैन्याचा पराभव केला व ते जिकडे जिकडे ह्मणून गेले, तिकडे तिकडे शिपाई मरून पडले आहेत, घरेंदारें

मोडून जाळून टाकल्यामुळें रयत अगदीं अनाथ व कष्टी होऊन बसली आहे व चांगलीं पिकास आलेलीं शेतें अगदीं उध्वस्त होऊन किंवा जाळून कोळ झालीं आहेत, असाच भयंकर देखावा दृष्टीस पडे!

ह्या भयंकर खबरा बादशहास एकामागून एक पोहोंचल्या. त्यानें ताबडतोब झुल्फिकारखान यास माळव्याकडे, गाजीउद्दीन यास वऱ्हाडाकडे व अझीमशहास गुजराथेकडे मोठमोठ्या फौजा देऊन मराठ्यांचे टोळ्यांमागें लागून त्यांचा बंदोबस्त करण्याकरितां रवाना केलें; परंतु मागें सांगितल्याप्रमाणें बादशाहीची शिस्त यावेळीं अगदीं बिघडून गेली असून, मोंगल सरदारांमध्यें व राजपुत्रांमध्येंही दिवसानुदिवस निकरानें लढून ही लढाई संपवून टाकावी अशाविषयीं विशेष इच्छा वाटत नव्हती. बादशहाचे वयाची मजल यावेळीं सत्त्यांयशीपर्यंत येऊन पोहोंचली असून तो हळू हळू अधिकाधिक व्यथितही होऊं लागला होता. तेव्हां तो आतां फार दिवस वांचत नाहीं, व त्याचे मागें त्याचे गादीसाठीं लढाया खास होणार तेव्हां, मराठ्यांचे बरोबर व्यर्थ लढण्यांत आपली शक्ति वेचण्यापेक्षां पुढील युद्धासाठीं ती आपणांस राखून ठेविली पाहिजे असें झुल्फिकारखानासारख्या प्रत्येक महत्वाकांक्षी सरदारास व बादशहाचे पुत्रांस वाटूं लागलें होतें. लढाई चालविण्याचा हव्यास काय तो एकटे बादशहासच वाटत असून बाकी सर्व जो तो आपापले स्वार्थावर दृष्टि ठेवून होता. यामुळें मोंगलांचे फौजांची इकडून तिकडे व तिकडून इकडे फडफडाट व धांदल मात्र दृष्टीस पडत; परंतु त्यांचे हातून मराठ्यांचे लुटारू टोळ्यांचा बंदोबस्त मुळींच होईना.

येणेंप्रमाणें औरंगजेब बादशहानें ब्रह्मपुरी येथील छावणींतून आपला नातू बेदर बख्त व झुल्फिकारखान यांजबरोबर एक मोठी फौज देऊन मराठ्यांचे लुटारूं टोळ्यांचे मागें लागून त्यांचा नाश करण्याकरितां जी मोहीम काढिली व जी त्यानें सुमारें सहा वर्षें चालविली होती ती निष्फळच झाली; परंतु त्याचवेळीं त्यानें मराठ्यांचे सर्व किल्ले हस्तगत करून घेण्याकरितां जी दुसरी मोहीम काढली, व जिचे

आधिपत्य मागें सांगितल्याप्रमाणें त्यानें आपणाकडेसच ठेविलें होतें, ती बरीच सिद्धीस गेली. बादशहानें सहा वर्षांचे अवकाशांत पन्हाळा, विशाळगड, सिंहगड, पुरंधर, राजगड, तोरणा, वगैरे बहुतेक किल्ले हस्तगत करून घेतले. या मोहिमेंत त्यास जे विलक्षण कष्ट, श्रम, व अडचणी होत व जे तो सर्व अपूर्व धैर्यानें सोसून पार पाडून नेई, त्याबद्दल कोणाही मनुष्यास आश्चर्य वाटल्यावाचून राहणार नाहीं. सह्याद्रि पठारचे किल्ले घेत असतां, पुष्कळदां त्यास त्या पहाडी मुलुखांतील मोठ्या कडाक्याचा पावसाळा काढावा लागे. कित्येकवेळां त्याचें सैन्य कूच करीत असतां, मध्येंच जोराचा पाऊस कोसळून शेजारचे उंच पहाडांवरून एकाएकीं पाण्याचे प्रचंड लोंढे खालीं यावेत व तेणेंकरून सैन्याची पुष्कळ खराबी व्हावी. एकदां तर, परळीचे किल्ल्यास वेढा देऊन बादशहाचें सैन्य बसलें असतां, डोंगरावरून असा कांहीं जबरदस्त लोंढा आला कीं, त्याचे योगानें हजारों लोक वाहून गेले. घोडे, उंट, बैल वगैरे जनावरें व लष्कराचें सामानसुमान यांचा नाश झाला, व खुद्द बादशहाचे प्राणांवर संकट गुदरतें कीं काय असा कांहीं वेळ धाक पडला. वाटेंत कधीं कधीं ओढ्यांस उतार मुळींच नसे. दऱ्या व खोरीं हीं कधीं कधीं पुराचे पाण्यानें व कधीं कधीं चिखलानें अशीं भरून जात कीं, त्यांतून मार्गच मिळत नसे; त्याचप्रमाणें डोंगरावरचे रस्ते इतके अरुंद असत कीं, त्यावरून जनावरें सामानसुमान वगैरे नेण्यास मोठीच यातायात पडून बरेच दिवस लागत. या अडचणीमुळें कित्येकवेळां फौजेचा मुक्काम अशा ठिकाणीं पडे कीं, तेथें अन्न मिळण्याचीसुद्धां भ्रांति पडावी. कोठें कोठें फौजेचे जनावरांमध्यें अशी सांथ निघावी कीं, तिचे योगानें मुक्काम हलविण्यासही पंचाईत होई. त्याचप्रमाणें उन्हाळ्यांत कधीं कधीं असें प्रखर ऊन पडे कीं, तेणेंकरून बादशहाचे विस्तीर्ण व उंच अशा तंबूंतही मोठी तलखी होई. शिवाय कित्येक ठिकाणीं पाण्याचें इतकें दुर्भिक्ष असे कीं, सैन्यास तें पिण्यापुरतेंही मिळूं नये. असे हाल व कष्ट, जे एकादे ज्वान सरदारासही बरेच दुःसह होण्यासारखे होते, ते शांयशी सत्त्यांयशी वर्षांचे वयाचे बादशहानें मोठे धिमेपणानें या मोहिमेंत सोसून ती

एकदांची पार पाडली! यानंतर त्यानें आपली छावणी विजापूरास नेली. ( १७०९ ).

६ *औरंगजेब बादशहाची स्वतःची मोहीम फत्ते होऊन, त्याचे ताब्यांत मराठे लोकांचे बहुतेक किल्ले आले खरे; परंतु त्याचे पुत्र व सरदार ह्यांचे हातून कांहीं त्यांची कसूर व कांहीं कमकुवत यामुळें, मराठ्यांचे सरदार व त्यांच्या भयंकर लुटारू टोळ्या यांचा बंदोबस्त अगदीं होईना. यामुळें बादशहा बराच नाउमेद झाला होता. यावेळीं त्याचे खजीन्याची मोठी तारंबळ उडून गेली होती. दक्षिणेंत मराठ्यांबरोबर मोठे निकरानें लढाई चालू असतांच, उत्तरेंत रजपूत व जाट या लोकांबरोबरही युद्ध चाललेंच होतें. तेव्हां चोहोंकडे सैन्यांस पैका पुरविणें दिवसानुदिवस अधिकाधिक कठीण पडूं लागलें. सरदारांनीं फौजांचे थकलेल्या पगाराबद्दल लिहून पाठविलें ह्मणजे, बादशहा कित्येकवेळां अगदीं वेडावून जाई. पैशाचे पेंचामुळें त्यानें कांहीं फौजही कमी केली; परंतु तेवढ्यानें अडचण कांहीं दूर होईना. शेवटीं त्यास असेंही वाटूं लागलें कीं, मराठ्यांबरोबरची ही लढाई कशी तरी आतां मिटविली तर बरें पडेल!

बादशहाचे मनाची अशी स्थिति झाली असतां, त्याचा आवडता पुत्र सुलतान खामबक्ष, ज्याचे पोटांत, झुल्फिकारखानाप्रमाणेंच कित्येक वर्षांपासून, विजापूर येथें निराळेंच स्वतंत्र राज्य स्थापन करून मराठ्यांस दक्षिणेंतील मुलुखांचे वसूलाचा कांहीं भाग ठरवून देऊन आपला जम बसविण्याचा विचार घोळत होता त्यानें, व दुसरे कित्येक सरदार यांनीं बादशहास अशी मसलत सुचविली कीं, छावणींतच नजरकैदेंत असलेले शाहू महाराज यास मुक्त करून आपला मांडलिकराजा ह्मणून मराठ्यांचे गादीवर बसविल्यास त्या लोकांची समजूत पडेल. ही मसलत बादशहासही बरी वाटून, त्यानें राजपुत्रास मराठ्यांबरोबर बोलणें लावण्यास सांगितलें. त्यानें प्रथम धनाजी जाधव यांजकडे वकील

---

* एल्फिन्स्टनचा इतिहास.

पाठवून शाहू महाराजांचे सुटकेबद्दल बोलणें लावलें. पुढें दोन्ही पक्षांचीं बोलणींचालणीं बरींच होऊन शेवटीं येथपर्यंत घाटलें कीं, दक्षिणेंतील सहा सुभ्यांचा जो वसूल बादशहास येतो, त्यांपैकीं त्यानें मराठ्यांस त्यांचे सरदेशमुखीचे हक्काबद्दल शेंकडा दहा टक्के द्यावे, व त्याबद्दल मराठ्यांनीं मुलुखांचा बंदोबस्त राखावा व त्यासाठीं लागणारी फौजही त्यांनीं त्यांतूनच ठेवावी. औरंगजेब बादशहासही या अटी कबूल होऊन, त्यानें त्याबद्दल आपली पसंती दर्शविली; परंतु इतक्यांत इतर मराठे सरदारांस ह्या गोष्टीची बातमी लागून, त्यांत आपणांसही कांहीं हक्क बादशहापासून मिळाले तर पहावे, या हेतूनें ते धनाजीचे लष्करांत गोळा होऊं लागले. शेवटीं या सरदाराचें कांहीं मागणें, त्या सरदाराचें कांहीं मागणें असें होतां होतां, मराठ्यांनीं बादशहास आणखी अशी एक अधिक अट सांगितली कीं, आमचेपैकीं सत्तर सरदारांस बादशहाकडून सन्मानाचे पोषाख मिळावेत. बादशहास अशा लुटारू लोकांबरोबर तहाचें बोलणें करणें हें अगोदर आवडत नव्हतेंच; परंतु कित्येक अडचणीमुळें तो त्या गोष्टीस कांहींसा वळला होता; परंतु शत्रूचे लोक अधिकाधिक गोळा होऊं लागून, ते बादशहाचे छावणीशीं अगदीं येऊन भिडले, व त्यानीं गरीबीनें कांहीं थोडे हक्क मागण्याचें सोडून देऊन, ते आतां कांहींसे तोऱ्यानें वागूं लागले आहेत व त्यांच्या मागण्याही हळूं हळूं चढाईच्या होऊं लागल्या आहेत असें पाहून, त्याचें मन यापूर्वीच बदलूं लागलें होतें, आणि इतक्यांत सत्तर सरदारांचे पोषाखाविषयीं बोलणें जेव्हां मराठ्यांकडून आलें, तेव्हां तर शत्रूंबरोबर चाललेलें बोलणें मोडून टाकण्याचा त्याचा अगदीं निश्चयच झाला. त्यानें पोषाखाचे मागणीबद्दल मराठ्यांकडे कांहीं एक उत्तर न पाठवितां, त्यांचे लष्करांतून आपला वकील परत बोलावून घेतला व त्याबरोबर चाललेलें तहाचें बोलणें मोडून टाकून, त्यानें छावणीचा मोर्चा पेमनाईकाचे वाकणखेड्याकडे वळविला.

विजापूर, बेदर, कलबुर्गे वगैरे प्रांतांत आलीकडे संताजी घोरपडे याचे मुलगे व पुतणे यांनीं व इतर कांहीं मराठे सरदार, जे सातारचे

गादीपासून वेगळे होऊन स्वतःच स्वतंत्रपणें लुटालूट करीत होते, त्यांनीं फार उपद्रव मांडला होता; परंतु या सर्वांहून विशेष उच्छेद झटला ह्मणजे, वाकणखेड येथील पेमनाईक ह्मणून मागें सांगितलेला बेरड लोकांचा मुख्य, याचा होय. या नाईकाचा मोंगल लोकांनीं पुष्कळ वेळां पराभव करून, त्याचे गांवास वेढे घालून व त्याजपासून खंडण्याही उकळून त्यास बराच जेर केला होता; परंतु मोंगल लोकांच्या फौजा अंमळ दूर गेल्या कीं, यानें आपला लुटालुटीचा क्रम पुनः सुरू करावा. पेमनाईक आणि धनाजी जाधव यांचें चांगलें सूत असल्यामुळें, बादशहा सह्याद्रि पठारींचे किल्ले काबीज करीत असतां, धनाजीनें आपलीं मुलेंमाणसें वाकणखेडासच आणून ठेविलीं होतीं. सारांश, पेमनाईकाचें प्रकरण यावेळीं एवढें माजलें होतें कीं, घोरपडे वगैरे सरदारांस सोडून देऊन, बादशहा प्रथम नाईकाचेच पाठीस लागला (१७०६).

वाकणखेड हें लहानसें शहर असून, त्यास भोंवताली कायतो एक तट मात्र होता. त्यास एरवीं दुसरा कांहीं बंदोबस्त नव्हता. तथापि नाईकानें बादशहाचे फौजेचे हल्ले मोठे निकरानें परतविले. शेवटीं बादशहा शहरास वेढा घालून बसला. नाईकाचें साहाय्य करण्याकरितां धनाजी जाधवानें बादशहाचे छावणीवर वरचेवर छापे घालून तीस मोठी पीडा करण्यास आरंभ केला. मराठ्यांचे फौजांचा या वेळीं असा जबरदस्त धाक बसला होता कीं, मोंगलांचे सरदार व त्यांच्या फौजा ह्या धनाजींचें नुसतें नांव काढिलें कीं, पळत सुटत. असें सांगतात कीं, एकादे मोंगल स्वाराचा घोडा नदीवर पाणी पिण्यास नेला आणि तो पाण्यांत पडलेली आपलीच छाया पाहून भिऊन पाणी न पितां मागें सरूं लागला, ह्मणजे स्वारानें त्यास थट्टेनें ह्मणावें कीं, " तुला पाण्यांत धनाजी *दिसतो काय रे ! "

बादशहाचे फौजेची अशी स्थिति झाली असल्यामुळें, अर्थात्च वा-

* स्कॉट वेअरिंग यांचा इतिहास.

कणखेडास कित्येक महिने वेढा दिला असतांही तें शहर हस्तगत होईना. शेवटीं बादशहानें झुल्फिकारखान यास व दौदखान यास आपले मदतीस बोलाविलें. झुल्फिकारखान यानें, नेमाजी शिंदे यास माळव्यांतून हुसकून देऊन, तो नुकताच औरंगाबादेस येऊन पोहोंचला होता. दौदखान यानेंही व्हेलोर शहर मानाजी मोरे याजपासून १७०४ सालीं जिंकून घेऊन, त्यानें कर्नाटकाचा बहुतेक बंदोबस्त करीत आणिला होता. दोन्हीही मोंगल सरदार बादशहाचे हुकुमाबरोबर वाकणखेडास येऊन दाखल झाले व त्यांनीं शहरावर मोठा मारा करून तें एकदांचें घेतलें; परंतु या कृत्यांत दोहोंही पक्षांची पुष्कळच खराबी झाली. येणेंप्रमाणें पेमनाईकाचें शहर मोंगलांचे हातीं जाऊन त्यांची फत्ते झाली खरी; परंतु लुटारू लोकांचें एवढेंसें लहान शहर घेण्यास खुद्द बादशहास जावें लागून, शिवाय झुल्फिकारखानसारख्या सरदाराचीही मदत घ्यावी लागली. येवढ्यावरून यावेळीं बादशहाची फौज किती निर्बल होऊन गेली होती, याची कल्पना होण्यासारखी ¶आहे!

बादशहानें येवढी मोठी फौज जमा करून पेमनाईकाचें शहर घेतलें खरें; परंतु इकडे महाराष्ट्रांत त्यानें सहा वर्षें मोठे हाल सोसून मराठ्यांचे जे किल्ले काबीज केले होते, ते बहुतेक सर्व त्यांनीं पांच सहा महिन्यांतच परत जिंकून घेतले. बादशहा स्वतः वाकणखेडास व झुल्फिकारखान हाही तिकडेस अशी स्थिति होतांच, महाराष्ट्रांत व उत्तेरकडील सर्व मुलुखांत अर्थात्‌च बंदोबस्त अगदीं नाहींसा होऊन, मराठे लोकांचा संचार पूर्ण अबाधित असा चोहोंकडे होऊं लागला. रामचंद्रपंत अमात्य यांनें, पन्हाळा व पावनगड हे किल्ले मोठे शौर्यानें त्यांजवर हल्ले चढवून परत जिंकून घेतले. या त्याचे पराक्रमावरून, ताराबाईसाहेबांचें मन त्याजविषयीं पुनः शुद्ध होऊन, त्याजकडे त्यांनीं पूर्ववत्‌ पुष्कळसा कारभार सोंपविला, व यापुढें त्या पन्हाळा येथें येऊन राहिल्या. परशुराम त्र्यंबक प्रतिनिधी यानेंही यानंतर लवकरच

---

¶ एलफिन्स्टन साहेबांचा इतिहास.

वसंतगड व सातारचा किल्ला हे काबीज करून घेतले. सातारचा किल्ला पुनः मिळाल्याची अशी हकीगत सांगतात कीं, अण्णाजीपंत ह्मणून कोणी मावळे शिपायांचे फौजेकडील कारकून होता. त्यानें परशुराम त्र्यंबक याजबरोबर मसलत करून बैराग्यांचें सोंग घेऊन, मोंगलांची कांहीं फौज सातारचे किल्ल्यावरील शिबंदींत जाऊन मिळण्याकरितां चालली होती, तींतील शिपायांचीं मनें कांहीं गमतीचीं गाणीं ह्मणून व मौजेच्या गोष्टी सांगून वश करून घेऊन, तो त्यांचे टोळीबरोबर चालला. अण्णाजीपंत हा शिपायांस बराच आवडता झाला असल्यामुळें, त्यांनीं त्यास आपलेबरोबर निःशंकपणें किल्ल्यावरही घेतलें. येणेंप्रमाणें आयतेंच किल्ल्यावर गेल्यावर, अण्णाजीपंतानें पूर्वीं संकेत ठरल्याप्रमाणें, मोंगलांची शिबंदी गैरसावध आहे अशी संधि पाहून, खालून बरेच मावळे शिपाई गुप्तपणें चढवून घेतले व मोंगलांवर एकाएकीं हल्ला करून, त्यांनीं त्या सर्वांची अगदीं कत्तल करून टाकली व किल्ला काबीज केला.

शंकराजी नारायण गैंडे हाही यावेळीं स्वस्थ बसला नाहीं. त्यानेंही सिंहगड, राजगड, रोहिडा वगैरे आपले टापूंतील किल्ले पुनः सर केले. आपण एवढे कष्ट सोसून जिंकलेले किल्ले पुनः परत शत्रूचे हातीं गेले, हें ऐकून बादशहास मोठा संताप आला व त्यास फार दुःख वाटलें. त्यांतूनही सिंहगड व पन्हाळा ह्या किल्ल्यांबद्दल त्यास विशेषच वाईट वाटलें. त्याचा आजार अधिक वाढला व तो बरा होण्यासही कित्येक दिवस लागले.

शत्रूंपासून सिंहगड परत जिंकून घेण्याकरितां बादशहानें झुल्फिकारखान यास पुढें पाठविलें, व त्याजबरोबर शाहू महाराज यांस दिलें. महाराजांस मुक्त करण्याचा विचार त्याचे मनांत येऊं लागला; परंतु एकदम तसें करण्यास त्याचे मनाचा धडा होईना. त्यानें तूर्त महाराजांकडून मुख्य मुख्य मराठे सरदारांस, लढाई बंद करून आपणांस शरण येण्यास पत्रें लिहविलीं; परंतु महाराज तूर्त परतंत्र असून मोंगलांचे अगदीं स्वाधीन असल्यामुळें, सरदारांनीं अर्थात्च या पत्रांचा

अनादर केला व पूर्ववत् आपला लुटालूट करण्याचा व लढण्याचा क्रम चालूंच ठेविला.

सिंहगड किल्ल्यावर धान्याची वगैरे सामग्री थोडी असल्यामुळें, मराठ्यांच्यानें किल्ला फार वेळ लढवला नाहीं व तो झुल्फिकारखान याचे हातीं लवकरच आला; परंतु मोगलांची फौज तेथून दूर जातांच, शंकराजी नारायण यानें तो पुनः जिंकून घेतला. येणेंप्रमाणें बादशहानें १६९९सालीं ब्रह्मपुरीची छावणी सोडून ज्या दोन मोहिमी—एक मराठ्यांचे लुटारू टोळ्यांस मैदानांत गांठून त्यांचें पूर्ण निर्दळण करण्याकरितां व दुसरी त्यांचे किल्ले घेण्याकरितां—काढिल्या होत्या, त्या अगदीं फसून जाऊन, मराठे लोक आतां इतके प्रबळ झाले कीं, त्यांचे मुलुखांतून निघून जाऊन आपले मोंगलाई मुलुखांत एकदांचे सुरक्षितपणें कसे जाऊन पडतों, असा वृद्ध बादशहास धाक वाटूं लागला! फौजेंत कोणी मर्द व खबरदार असे सरदार राहिले नाहींत; शिपाई मराठ्यांचेविषयीं नेहमीं पोटांत धाक बाळगणारे, बरोबर लवाजमा मात्र मोठा; परंतु तो वाहून नेण्याकरितां हत्ती, उंट, बैल वगैरे जनावरें पुरींशीं नाहींत; खजीना खलास झालेला; इतके वेळ बरेच इमानानें पदरीं राहिलेले मराठे व इतर जातींचे सरदार हे शत्रूंचे टोळ्यांत मिसळून, मोठ्या चैनीनें मेजवान्या देत आहेत घेत आहेत व मध्येंच परस्परांची सहज गांठ पडली असतां, "ह्या आमचे अन्नदाते बादशहास खुदा असाच पुष्कळ वर्षें वांचवून, तो अशीच सदोदित लढाई चालवो आणि आमची पोळी चांगली पिको" असें ह्मणत आहेत; अशी स्थिति औरंगजेब बादशहाचे लष्कराची झाली असतां, तो तें अहंमदनगराकडे घेऊन येण्यास निघाला. वीस वर्षांमागें हेंच लष्कर मोठ्या तोऱ्यानें व ऐश्वर्यानें, अहंमदनगर शहर सोडून दक्षिणदिग्विजय करण्यास निघालेलें कोणीकडे व तेंच आतां फटफजीत व भयगलित होऊन खालीं मान घालून त्याच शहराकडे परत चाललेलें तें कोणीकडे!! मोंगलांचे सैन्यांत अर्थात्च कांहीं शिस्त किंवा व्यवस्था उरली नव्हती. कसेंतरी त्वरा करून मुक्काम गांठण्याचा कायतो सर्वांचा विचार होता.

बादशहाचे फौजेची ही धांदल पाहून मराठ्यांस विशेषच अवसान आलें. त्यांनीं बादशहाचे फौजेवर मोठे निकरानें हल्ला करून, तिचा पराभव केला व तिची अगदीं दाणादाण करून सोडली. याप्रसंगीं खान आलम, ज्याचें मूळचें नांव इखलासखान असून ज्यानें संभाजी महाराजांस संगमेश्वरीं प्रथम धरिलें ह्मणून मागें सांगितलें आहे, तो आपले बाजूकडील मराठ्यांचा हल्ला परतविण्यास ब-याच शौर्यानें लढला व त्यानें पठाणजातीचें नांव राखिलें. बाकी चोहोंकडे अगदीं पळापळच होऊन, बादशहाचे फौजेचा पुष्कळ नाश झाला. यावेळीं मराठ्यांचे फौजेनें जर विशेष नेटानें पाठलाग केला असता, तर खुद्द औरंगजेब बादशहाही त्यांचे हातीं लागला असता ( १७०७ ).

७ बादशहा जेमतेम करून अहंमदनगरास येऊन पोहोंचला. यावेळीं अनेक प्रकारचे व्याधींनीं त्याची प्रकृति फारच क्षीण झाली होती. आपण आज वीस वर्षें चालविलेला दक्षिणदिग्विजयाचा उद्योग अगदीं फसून, मराठे लोक उलटे अधिकच बळावत चालले हें पाहून, त्यास फारच वाईट वाटलें. यापुढें आपण आतां फार दिवस वांचत नसून, आपला मरणकाल समीप आला हें मनांत येऊन, त्याचे पोटांत नाना प्रकारचे विचार येऊं लागले. राज्यलोभास्तव आपले हातून पुष्कळ वाईट कृत्यें घडून आलीं— प्रत्यक्ष बापास पदच्युत करून कैदेंत घातलें व सर्व भावांस व पुतण्यांस ठार मारलें—तेव्हां मरणानंतर आपणांस कोणत्या घोर शिक्षा प्राप्त होतील? त्याचप्रमाणें इहलोकीं आपले मागें आपले बादशाहीची काय अवस्था होईल कोण जाणें? आपले पुत्र व नातू या सर्वांमध्यें पराकाष्ठेचा द्वेष व मत्सरभाव हे असून, ते खचित आपापसांत भांडून आपण येवढीं पापकृत्यें करून संपादन केलेलें राज्य अखेरीस रसातळास खास घालविणार, इत्यादि दुःखकारक विचार मृत्यूचे दारीं येऊन बसलेले बादशहाचे पोटांत येऊं लागले. त्यानें अझीमशहास माळव्याकडे आपले नवीन सुभ्यावर जाण्यास अगदीं निक्षून सांगितलें व त्याचप्रमाणें सुलतान खामबक्ष यास विजापुराकडे मोठी फौज बरोबर देऊन तिकडे सुभ्यावर पाठवून

दिले. ते दोघे निघून गेल्यावर, त्यांस त्यानें मोठे ममतेनें शेवटलींच ह्मणून पत्रें लिहिलीं; तथापि त्यांनीं आपलेजवळ अगदीं येऊं नये ह्मणून त्यानें त्यांस ताकीद केली. त्यास वाटे कीं, हे जवळ आले असतां ते कदाचित् आपण शहाजहानास केलें त्याप्रमाणेंच आपणास पदच्युत करून आपली दुर्दशा करून टाकतील. शेवटीं जवळ कोणी पुत्र नाहींत, कोणा उमरावाचा विश्वास पोटांत वाटत नाहीं, मरणानंतरचे स्थितीविषयीं मनांत अनेक प्रकारचे भयाचे व दुःखाचे विचार उद्भवताहेत, अशा अत्यंत शोचनीय स्थितींत औरंगजेब बादशहा तारीख २१ माहे फेब्रूआरी सन १७०७ या रोजीं मृत्यु पावला. यावेळीं त्यास ८९ वें वर्ष होतें.

औरंगजेब बादशहानें मरणापूर्वीं आपले राज्याचे व्यवस्थेसंबंधानें मृत्युपत्र केलें होतें. त्यांत त्यानें असें ठरविलें होतें कीं, सुलतान मोआझिम यानें उत्तरेकडील व पूर्वेकडील सर्व मुलूख संभाळून दिल्ली येथें आपली राजधानी करावी. अझीमशहा यानें माळवा, गुजराथ, महाराष्ट्र या प्रांतांवर राज्य करावें व त्यानें आपली राजधानी आग्रा शहर करावें, व धाकटा मुलगा खामबक्ष यानें गोंवळकोंडा व विजापूर हे प्रांत सांभाळावे; परंतु बापाची ही व्यवस्था त्याचे कोणाही पुत्रास न आवडून, सर्वांनीं या पूर्वीच भविष्य केल्याप्रमाणें, त्यांमध्यें लागलीच गादीविषयीं लढाई उत्पन्न झाली. बादशहा मृत्यु पावल्याची बातमी अझीमशहास माळव्याकडे जातांना वाटेंतच लागली. तिजसरसा तो माघारा अहंमदनगरास कूच करीत येऊन त्यानें प्रथमदर्शनी तेथील सर्व फौज आपले ताब्यांत घेतली. यावेळीं झुल्फिकारखान हा, ताराबाईसाहेबांचे राज्यांत, घोरपडे यांनीं लुटालूट केल्यावरून त्यांचें पारिपत्य करण्याकारितां त्यांचे मागें धनाजी जाधव सेनापती लागला असतां, घोरपड्यांचा पक्ष उचलून सेनापतीबरोबर कृष्णा नदीचे मुलुखांत लढत होता. त्यासही बादशहा मृत्यु पावल्याची खबर पोहोंचतांच, आणीबाणीची वेळही आतांच आहे असें समजून, त्यानें ताबडतोब सेनापतीबरोबर चालूं असलेली लढाई बंद ठेऊन, एकदम अहंमदनगरकडे चाल

केली, व तो अझीमशहाचे फौजेंत येऊन मिळाला. अझीमशहा यास आपला वडील भाऊ सुलतान मोआझिम, ज्यास बादशहानें मागें सांगितल्याप्रमाणें कांहीं संशयावरून दूर काबूलचे सुभ्यावर ठेविलें होतें, त्यास, बादशहानें मृत्युपत्रांत ठरविल्याप्रमाणें, राज्याचा हिस्सा न देतां सर्वच राज्य आपण बळकवावें असें वाटून, तो दक्षिणेंतील सर्व फौज घेऊन दिल्लीकडे मोठ्या त्वरेनें निघून गेला.

येथें महाराष्ट्राचे इतिहासाचा पहिला भाग संपला. अल्लाउद्दीन खिलजी यानें देवगिरीवर प्रथम थडकून, महाराष्ट्र देश जिंकण्यास आरंभ केल्यास, आतां सुमारें चारशें वर्षें होऊन गेलीं होतीं. इतके काळांत, मुसलमान लोकांचे विजयाच्या लाटा ज्या दिल्लीहून निघून महाराष्ट्रदेशावर वरचेवर आपटत असत, व ज्यांनीं शेवटीं शेवटीं वीस वर्षें तर तो देश अगदीं बुडवून टाकिला होता; त्यांचा आतां जोर कमी होऊन त्या दिल्लीकडे ओसरून जाऊं लागल्या. पुराणांतर्गत कथेंत ज्याप्रमाणें, अर्जुनानें आपले सहस्र बाहू पसरून विशाल अशा नर्मदा नदीचा अवरोध केला, त्याचप्रमाणें शिवाजी महाराज, संताजी घोरपडे, धनाजी जाधव, रामचंद्रपंत अमात्य, परशुराम त्र्यंबक वगैरे अनेक महाराष्ट्र वीरांनीं, आपले पराक्रमेंकरून मुसलमान लोकांचे विजयरूपी प्रचंड जलौघास, महाराष्ट्र देशांतच अगदीं आटवून टाकून त्यास पुढें पसरूं दिलें नाहीं. यानंतर उत्तरोत्तर दिल्लीचे बादशाहीचा जोर कमी कमी होत जाऊन, दिल्लीकडून महाराष्ट्रावर मुसलमान लोकांच्या स्वाऱ्या होणें तर दूरच राहून, उलट मराठे बादशाही हीच बलावत जाऊन, महाराष्ट्रांतून उत्तरेकडे दिल्लीचे बादशाही मुलुखांवर मराठे वीरांच्या स्वाऱ्या होऊं लागल्या!

औरंगजेब बादशाहाच्या मरणानें मराठ्यांच्या राजाची सुटका होऊन, पुढें सर्व हिंदुस्थानदेश त्यांच्या पराक्रमास पूर्णपणें खुला झाल्यानें, यापुढील इतिहास महाराष्ट्राचाच ह्मणण्यापेक्षां, मराठे लोकांच्या शौर्याचा व राज्यविस्ताराचाच ह्मटला पाहिजे. अल्लाउद्दीनपासून औरंगजेबापर्यंतच्या दीर्घकालांत मराठे लोकांचा उदय, स्वराज्यस्थापना व स्वराज्य-

संरक्षण इतक्या गोष्टी झाल्या. त्यांचा उदय दक्षिणेंतील मुसलमानांच्याच साहाय्यानें कसा झाला, हें सामान्यतः त्या त्या मुसलमानी राज्यांचा संक्षिप्त इतिहास देऊन, त्यांत दर्शविलें आहे. पुढें श्रीशिवाजी महाराजांचा अवतार होऊन, सद्गुरु रामदाससमर्थांच्या उपदेशानें मराठी राज्याची टोलेजंग इमारत कशी उभारली, तें उपलब्ध असलेल्या साधनांचा यथामति उपयोग करून वर्णिलें. त्यांत औरंगजेबासारख्या कवित्राज व महापराक्रमी शत्रूबरोबर कधीं शक्तीनें, तर कधीं युक्तीनें टक्कर देऊन, सामान्य जनास खचवून टाकणाऱ्या प्रसंगांतून पार पडून हिंदुपदपादशाही थाटानें उभारली. त्यांस साहाय्यही तशाच नरवीरांचें मिळाल्यानें राष्ट्रत्वकल्पना सर्व मराठे लोकांत बाणून राहिली. एकंदरीनें दिल्लीच्या तक्तावर यावेळीं औरंगजेबासारखा कर्तृत्वशाली पुरुष होता हें मराठ्यांचें सुदैव, असेंच विचाराअंतीं वाटल्यावांचून राहत नाहीं. किंबहुना ही परमेश्वराची कृपाच समजली पाहिजे. अशा प्रकारच्या शत्रूस तोंड देण्याचा व त्याजपासून बचाव करण्यासाठीं युक्तिप्रयुक्ति योजण्याचा हरहमेषा प्रसंग असल्यानें, मराठे मंडळाच्या अंगीं अलौकिक शौर्य व चातुर्य यांचा प्रादुर्भाव झाला. बर्कसाहेब ह्मणतात त्याप्रमाणें, *आपला शत्रू हा आपला मदतगार होय यांत कांहीं शंका नाहीं. त्याच्याशीं सामना करण्याचा केव्हां प्रसंग येईल याचा नियम नसल्यानें, आपण सदा सावध व युद्धास सिद्ध राहतों. नेहमीं लढाईचे प्रसंग असावेत नाहींतर अशक्तता, आलस्य, व ऐषआराम यांचा सुकाळ होतो, असा स्पार्टन लोकांचा ग्रह असे, ह्मणून ते लढाईचे प्रसंग उकरून काढीत. तसेंच रोमन लोकही सवड सांपडल्याबरोबर कांही तरी करून युद्धांत असण्याविषयीं उत्सुक असत. त्यांच्यामध्येंही बाहुबल वाढविणाऱ्या अशा शूर शत्रूंचा त्यांना वेळोवेळीं लाभ झाल्याकारणानें त्यांचा उत्कर्ष झाला. अशाच कांहीं चमत्कारिक

---

* Difficulty is a severe instructor, set over us by the ordinance of a parental guardian and legislator, who knows us better than we know ourselves, as he loves us better too. He that wrestles with us strengthens our nerves, and sharpens our skill. Our antagonist is our helper. Reflections on the French Revolution.

योगायोगानें, औरंगजेबाच्या मनांत अनावर महत्वाकांक्षेची प्रेरणा होऊन, सर्व मोंगलसेनासागर दक्षिणेवर लोटल्यानें, मराठे लोकांचें शौर्य व चातुर्य कसास लागून, त्यांची वृद्धि झाली. उत्तरेकडील मुसलमान लोकांचा जोर किती आहे, त्यांची फौजेची स्थिति कशी इत्यादि गोष्टींचा समरांगणावर त्यांस अनुभव येऊन, आपला पराक्रम सर्व हिंदुस्थानावर गाजविण्यास विशेष अटकाव होणार नाहीं, अशीच खातरजमा औरंगजेबाच्या साऱ्या धामधुमीपासून झाली; आणि ह्मणूनच पुढें उत्तरहिंदुस्थानांत भगवा झेंडा फडकविण्याची उमेद मराठे लोकांस येऊन, त्याप्रमाणें त्यांनीं अजब पराक्रम करून दाखविले. ह्या सर्व मनोहर 'महाराष्ट्रविस्तारा'चा पाया, मराठे लोकांनीं औरंगजेबाच्या मरणापर्यंत घातला, असें ह्मणण्यास हरकत नाहीं.

---